# श्रावण भाद्रपद

संपादिका

डॉ. सरोजिनी बाबर
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला, पुष्प २५ वे

भारतीय संस्कृतीच्या उपासक

पंतप्रधान **श्रीमती इंदिरा गांधी**

यांना —

सादर सप्रेम

## महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

अध्यक्ष

डॉ. सरोजिनी बाबर

सभासद

प्रा. वामनराव चोरघडे

डॉ. यू. म. पठाण

सौ. शैलजा राजे

श्री. बाजीराव पाटील

श्री. नामदेव ढसाळ

श्री. आत्माराम राठोड

श्री. रो. बो. अल्वा, संचालक<br>शासन मुद्रण, लेखन सामग्री,<br>संचालनालय, मुंबई

सचिव

श्री. शिवाजीराव साळुंखे, शिक्षण उपसंचालक,<br>शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

आपल्या घरातील वातावरण प्रसन्न रहावे, आपले नित्याचे व्यवहार सुरळीतपणे पार पाडले जावेत आणि सर्वार्थाने आपले आयुष्य सुखी जावे म्हणून माणूस रोज सकाळी स्नान झाल्या झाल्या देव्हाऱ्यातील देवाची पूजा करतो. पानाफुलांनी आणि गंधाक्षतांनी त्यांना सजवतो. नतमस्तक होत विनम्रपणाने त्यांना वंदन करतो. अशावेळी वाडवडिलांची चालरीत आणि घराण्याचा कुळाचार त्यांच्या मनात घोळतो. नजरेत भरतो. त्यामुळे त्याप्रमाणे स्वतःही वागताना त्याचा जीव सुखावतो. सणासुदींच्यावेळी तर त्याचे हे समाधान आणखीनच फुलून जाते.

त्यातून पावसाळ्याचे दिवस असले म्हणजे तर मग फावला वेळ त्याच्यापाशी पुष्कळसा सापडतो. कामाधामाची नेहमीची गर्दी नसते. म्हणून मग पोथ्या पुराणं वाचावीत अगर ऐकावीत या गोष्टीत त्याला रस वाटू लागतो. देवळात जाऊन कथाकीर्तनात स्वतःचे भान हरपून जावे अशा कल्पनेत तो स्वतःला झोकून देतो.

श्रावण भाद्रपदात अशा गोष्टींना उधाण येते. सणासुदींची गर्दी उसळून जाते. उपासतापास मानाने साजरे होतात. व्रत वैकल्यांची धमाल उडून जाते. लेकीसुनांना माहेरपण घडते. घरात हौसेमौजेचा उपसा होतो. तेव्हा हे

सगळे लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाच्या लोकसाहित्य समितीने "सणउत्सवा" संबंधीची प्रकाशने हाती घेतली. आज त्या संदर्भातच 'श्रावण भाद्रपद' हा ग्रंथ प्रकाशित होत आहे.

या ग्रंथात श्रावण भाद्रपदात येणाऱ्या सण उत्सवांचा विचार झालेला आहे. त्या संदर्भातील अभ्यासपूर्ण लेख, कहाण्या आणि लोकगीते येथे समाविष्ट करण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे एखाद्या विषयाची शक्यतो परिपूर्ण माहिती उपलब्ध करून देताना थोडाफार आगेमागे येणारा सण उत्सवही त्या संदर्भात येथे नमूद करण्यात आला आहे.

या ग्रंथाची जुळणी करीत असताना अनेकांशी पत्रव्यवहार करावा लागला. कित्येकांशी समक्ष चर्चा करावी लागली. पुष्कळांच्या भेटी गाठी घ्याव्या लागल्या. त्यामुळे बारीक सारीक, ठळक ठळक असे खूप हाती आले परंतु काही राहूनही गेले. तथापि शक्य तो बरेचसे मिळविण्याचा प्रयत्न गेली चार पाच वर्षे आम्ही केलेला आहे. त्या त्या सणांची सचित्र माहिती दिलेली आहे.

सण उत्सवांच्या वेळी होणाऱ्या खेळ गाण्यांची सचित्र माहिती "स्त्रियांची खेळ आणि गाणी" या लोकसाहित्य समितीच्या प्रकाशनात स्वतंत्रपणे आलेली असल्याने या ग्रंथात त्यासंबंधी फार थोडे लक्षात घेतलेले आहे. खेरीज व्रतवैकल्यांसंबंधीचा वेगळा स्वतंत्र भागही येथे देण्यात आलेला आहे. म्हणून वाचकांनी या संदर्भात स्त्रियांची खेळ आणि गाणी हे पुस्तक या ग्रंथाच्या बरोबरीने लक्षात घ्यावे ही विनंती. लोकसाहित्य समितीचे हे पंचविसावे प्रकाशन आहे. त्यादृष्टीने आम्ही हा ग्रंथ शक्य तितक्या डामडौलाने वाचकांच्या हाती देत आहोत. श्रावण भाद्रपद मासातील मराठी मुलखाची संस्कृती आम्ही येथे शक्य तेवढी मिळवून त्या त्या सण उत्सवांच्या कुळाचारांसह देण्याचा प्रयत्न केलेला आहे.

या ग्रंथाला सर्वांग परिपूर्ण करण्यासाठी ज्या ज्या लेखकांनी व संग्राहकांनी आपुलकीने सहकार्य दिले त्या सर्वांची लोकसाहित्य समिती ऋणी आहे.

त्याचप्रमाणे ह्या ग्रंथाच्या सजावटीसाठी प्रसिद्ध चित्रकार श्री. ग. ना. जाधव यांनी घेतलेले परिश्रम आणि ह्या ग्रंथाच्या उत्कृष्ट छपाईसाठी महाराष्ट्र शासनाच्या शासकीय मुद्रणालयातील सर्व थरांमधील मंडळींनी घेतलेली मेहनत अपूर्वाईची आहे. आम्ही त्यांचे आभारी आहोत.

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेच्या या वर्षी साजऱ्या होत असलेल्या रौप्य महोत्सव सोहळयात आमचा हा ग्रंथ विशेषत्वाने उठून दिसेल यात शंका नाही.

अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

पुणे
१ मे १९८५

# पावसाळ्यातील महापूजा !

प्राजक्ताच्या घरंगळत्या फुलांची न् निशिगंधाच्या फुलत्या ताटव्यांची मंद-मधुर दरवळ जिकडं तिकडं असावी म्हणजे जीव कसा हरखून जातो. झिरमिरत्या पावसातून भटकत रहावंसं वाटतं. दारी ठिपकत्या पागोळीच्या ठेक्यावर घुंगुरते पाय घेऊन मिरवायची लहर येते. शेलके अलंकार ठेवून न् नवी जरतारी साडीचोळी नेसून खुळखुळत्या चुडयांच्या हातांनी फुगडी झिम्मा रंगवीत खेळगाण्यांचा भडिमार करून सोडायला केव्हा एकदाशी गल्ली बोळातल्या पोरींच्या खोळक्यात जाईन असं होतं. पुरणावरणाचा महानैवैद्य घरात शिजत असताना श्रावण भाद्रपदात येतेल्या सणावारांचे कुळाचार पाळ-ताना आपल्यासारखे श्रीमंत आपणच असा म्हणायचा मोह होऊन भुलायला होतं... अशावेळी ...

सूर्यदर्शन अवचितच झालं ! म्हणून विलक्षण सुखावलेल्या ओलेत्या धरतीवर पाय ठरू नयेत अशी गत होऊन जाते न् मग हिरव्यागार पानांच्या गर्द राईत फुललेल्या मनोहारी पानाफुलांना वेचीत आपली परडी सजवून देवादिकांची पूजा मांडायची उत्सुकता ध्यानी मनी दाटून येते... पण मग...

पाऊस पडतो झिरीमिरी ओल्या झाल्यात कामिनी
भाकरीच्या पाटया शेतात जातात घेऊनी

पाऊस पडतो पडतो थांबेना ग पागोळी
धरणीमाय हिरवी चोळी घालीतसे

पाऊस पडतो पडतो सये पडतो मुसळधार
गंगेला आला पूर दुही थडी

असल्या बातम्या इकडून तिकडून कानावर येत गेल्यानं थोडं सबुरीनं घ्यावं असा घरातल्या वडीलधाऱ्यांचा हाकारा झाल्यानं धावते पाय थबकतात, पण जाईजुई भिजवतेला न् थुईथुई नाचतेला भिरभिरता पाऊस अंगावर झेलायची उतावीळता स्वस्थ बसू देत नाही. वाटतं की, डोईवर अंगावरच्या शेल्याची अगर पदराची अब्दागिरी धरावी न् दाबून दणाण् पळत निघून जावं ... पावसाच्या भारानं लवतेल्या भल्या दांडग्या झाडांना झोपाळे बांधावेत न् आपण मनसोक्त झोके घेत गीतं गावीत... श्रावणाला हुंकारहुंकार घालीत नागारपंचीम साजरी करावी न् त्यायोगे खेळगाण्यात दंग होऊन जात स्वतःचं भान हरपून बसावं.

नागपंचमी उगवायची म्हणजे भल्या पहाटेपासूनची घरात धांदल. भिंत सारवून घ्यायची. तिच्यावर हळदीनं पिवळा नागोबा काढायचा. नागदेवाला काजळाच्या काळ्या न् चुन्याच्या पांढऱ्या ठिपक्यांनी सजवायचं. गंधाक्षता वहायच्या. लाह्या वहायच्या. आघाडा दुर्वा वहायच्या. दुधाचा नैवेद्य दाखवायचा. कुणी कुणी तर पाटावरही लाल चंदनी रंगाचा नागोबा काढतात अगर चिखलाचा सुरेख फणी काढलेला नागोबा तयार करतात, त्याची मनोभावे पूजा बांधायची.

नागपंचमीला काही चिरायचं नाही. काही वाटायचं नाही. काही कुटायचं नाही. सगळं वर्ज्य. म्हणून हरभऱ्याची डाळ शिजवायची न् गूळ घालून सारण करीत दिंडं करायची. कानोले शिजवायचे. उकडायचे. नागाचा फणा दुखावेल असं काही करायचं नाहीच मुळी. नागदेवाच्या रूपानं आपले वाडवडील घरी येतात व घराचं रक्षण करतात हीच त्यामागची भावना. म्हणून एखादा गारूडी

नागदेवाला घेऊन त्याला खेळवीत दारी आला की, त्याला दूध द्यायचं, लाह्या द्यायच्या. ऐपतीप्रमाणं दान करायचं. नागदेवाच्या पूजेसाठी खेळगाण्यांनी आनंदोत्सव साजरा करायचा. लेकीबाळींना माहेरी आणून त्यांना माहेर करायचं.

आमच्या गावी लहानपणी आम्ही न्हवणं घेऊन वारूळाला जायच्या. पानाफुलांनी सजलेले तांबे हातात घेऊन जिवाभावाच्या गडणींच्या सहवासात झोकात गीतं गात जायच्या. अशावेळी आमच्या मुखीचं--

चल ग सये वारूळाला
नागोबाला पूजायाला
हळदंकुंकू वहायला
ताज्या लाह्या वेचायला....

हे गीत भारी खुलायचं. गोड गळयानं सजायचं. सुरेख नादमधुर सुरावटीनं रंगायचं. त्यातल्या त्यात --

जिथं पाय ठेवू बाई
तिथं उठलं दवणा

ह्या गीतातल्या या कल्पनेनं सगळया जातीजमातींच्या पोरींच्या या घोळक्याला आपली काया मोहरून उठल्याचा आनंद मिळायचा. त्या कारणानं --

या ग या गडयिनी
या ग या मैतरणी
तेल्या तांबूळयाच्या बाई
वाण्या बामणाच्या बाई
जमूनिया साऱ्याजणी
जाऊ बाई न्हवणा...

ह्या ओळी ठसक्यानं म्हटल्या जायच्या न् मग --

नदीच्या पल्याड ग दामूजी सोनार
त्येनं बाई जडविला बांगीडचा जोड
ले ग ले ग ले ग लेकी
कशी लेवू सांग दादा
घरी माझ्या नंदा जावा
करतील हेवा दावा

ह्यातली मेख प्रत्येकीच्या मनात भरून जायची. लेण्यानेसण्यातल्या नखऱ्यापेक्षा मग गीतं देणारीची न् खेळ खेळतेलीची वाहवा निघायची. वारूळ पुजून झाल्यावर मग फुगडीझिम्याला ऊत यायचा न् फेराची गीतं तासन्तास वाढत्या उत्सुकतेनं कहाणी सांगत घुमत रहायची . . . घरोघरीचं अंगण या नादब्रम्हानं साजिवंत होऊन उठायचं. रात्री मधाळून जायच्या . . .

श्रावण म्हणजे श्रवणाचा महिना. व्रतवैकल्यं साजरी करायचा महिना. सणावाराची मौज लुटायचा महिना. सप्ताह साजरे करायचा महिना. गोकुळ अष्टमी याच महिन्यातली न् नववधूनी पूजा करायची मंगळगौरही याच महिन्यातली.

आमच्या गावी भागवताचा सप्ताह देवळात असायचा. या सप्ताहात सकाळी संस्कृतातून न् दुपारी मराठीतून भागवताचं वाचन व्हायचं. कितीतरी लोकं यायची. तिथं मी आमच्या थोरल्या काकूंबरोबर जायची. तिच्यासारखा सात दिवस फराळ करून उपासही करायची. त्यावेळी कशातलं काही नेमकं कळायचं नाही, पण मोठ्या माणसांबरोबर रुबाबात पोथी ऐकत बसता येतं यातलीच फुशारकी असायची ना फार ? त्या कारणानं अधून मधून—

मायेच्या डोळ्यांना सुटल्या शतधारा
हात फिरतो कापरा लेकीच्या पाठीवरी

अशी मज्जा यायची. कवतिकानं लोकं माझ्याशी बोलायची. आपल्या घरी येत जा म्हणायची.

तर अशीच एकदा मी आमच्या मावशीकडं गेलेली. ही मावशी म्हणजे आमच्या आईची मैत्रीण. तिच्या घरी तिच्या लेकीची मंगळागौर होती. म्हणून खेळायला मला बोलावलेली. तशी मी तिथं नटून थटून गेलेली. त्यावेळी ––

गोऱ्या गालावर मुलामा ग लाली लाल
जणु गुलाबाचं फूल शोभिवंत

तुझ्या गालावर कुणी ग गोंदले
फूल कुणी ग टोचले गुलाबाचे

लांब लांब केस वेणी येते ग मोगऱ्याची
फणी आणावी घागऱ्याची लेकीसाठी

माझा असा डामडौल. म्हणताना सगळ्या पोरींमध्ये मी उठून दिसतेली. तर, जिनं तिनं मलाच म्हणावं, "तू माझ्याशी खेळ. तू माझ्याजवळ बैस. तू माझ्याशी बोल" त्या कारणानं मी मोठ्या दिमाखानं तिथं वावरतेली.

या मंगळागौरीसाठी मी आमचं न् त्यांचंही सगळं वावर पालथं घातलेलं. लोकांची परसदारं चाळलेली. त्यामुळं मंगळागौरीच्या पूजेसाठी मी ढिगानं पानं-फुलं गोळा केलेली. पारिजातक, मोगरा, जाई, जुई, जास्वंदी, गुलाब, निशिगंध, तेरडा असली किती तरी फुलं मी गोळा करून आणलेली. त्या कारणानं मला आणखीनच आंजारलं गोंजारलं गेलेलं. त्यातून झाडून सगळ्या झाडांची पत्री मी ओचा भरून आणल्यामुळं माझ्यावर शाबासकीचा वर्षाव होतेला. केवडा, कमळ न् कळंबाची पानं मी आपल्या दादाकडून मिळवल्यानं मजा आलेली. इतर पोरींनीही पत्री न् फुलं गोळा केल्याकारणानं त्या दिवशीची मंगळागौर कशी भरगच्च दिसतेली.

या पूजेला चांगल्या दहा-पंधरा वसोळ्या जमा झालेल्या. त्यांनी सायंकाळच्या वेळी पारिजातकाच्या कळ्या जमवून त्या केळीच्या टाटोळ्यात

कमानदार रीतीनं रोवल्यामुळं गौरीवरची अब्दागिरी सुगंधी न् डोळ्यांचं पारणं फेडणारी झालेली. म्हणताना फराळाचं झाल्यावर आपलं सौभाग्य अखंड वाढत्या वयाचं लेणं लेत रहावं न् आपलं आयुष्य सर्वार्थानं समृद्ध व्हावं म्हणून या महादेवीची केलेली अंगभोगाची पूजा फारच वहारीची झाली.

फुलांचेच हात, वेणी, चोळीचा खण, न् काजळ तयार केलेल्या देवीचं रूप त्या दिवशी कुणाच्याही नजरेत भरण्याजोगं होत. चौरंगावर बसवलेल्या तिची षोडशोपचारानं पूजा केलेली. कणकीच्या अलंकारांनी तिला सुशोभित करताना म्हटलेलं की, "देवी देवी, तुला घे पिठाचे, आम्हाला दे सुवर्णाचे."

त्या दिवशी जागरण झोकात झालं. फुगडी, झिम्मा, कळशी, सूप, लाटणं, गोफ, गाठोडं, पिंगा, काचरकिरडा, फेर, आगोटा, पागोटा, कोंबडा असले किती तरी खेळ खेळताना वेळ कसा गेला ते कळलंच नाही. त्यामुळं पहाटेची आरती हसून खेळून मोकळ्या मनानं झालेली.

पोरीबाळींनी एकत्र येऊन वयाचं भान विसरून खूप खेळावं, पोटभर गावं, हसत खेळत एकमेकीत असावं ही आमच्या घराची हौसच मुळी. म्हण-ताना श्रावण सरला न् भादवा निघाला की, घरोघरी गौरी गणपतीची स्थापना करताना मुलीत मुली होऊन आपली हौस कशी भागवावी यातलं गणित वडीलधाऱ्यांना झक्कास जमून जातेलं.

आमचे आजोबा फार हौशी माणूस. घरातल्या मुलाबाळांप्रमाणं त्यांचं घरच्या जनारांवर अपार प्रेम. त्यामुळं श्रावण मासातील आमच्या घरच्या बैलांची मिरवणूक उभ्या गावात गाजून जायची. चोळून मोळून ते बैलाला आंघोळ घालायचे. शिंगं रंगवायचे, त्यांच्या गळ्यात नवे चाळ बांधायचे. त्यांच्या अंगावर झुली घालायचे. त्यांना पुरणपोळीचा घास भरवायचे. आंबील प्यायला द्यायचे. बैलपोळा साजरा करताना म्हणायचे, "देवा बैलोबा, चुकलं माकलं सांभाळून घे राजा!" बैलांच्या पाया पडायचे. ताशे वाजंत्री लावीत त्यांना मिरवून आणायचे. आम्ही पण त्या मिरवणुकीत असायचे. मोठी गंमत यायची. जिनगराच्या घरची बेगड आणून बैलांच्या शिंगांना आम्ही सुंदर नक्षी

कातरून चिटकावयाचे. त्यातलाच कागद उरवायचे न् मग तो आणखी भरीस भर घालीत गणपतीच्या मखराला वापरायचे. अशा वेळी आजोबा स्वत: मखर तयार करायला मदत करायचे. पाहिजे तेवढा जरतारी रंगीबेरंगी कागद मग आम्हाला मिळायचा. चार माणसात उठून दिसेल असं मखर त्यामुळं आमच्या कोनाड्यावर यायचं. मखराच्या प्रत्येक कमानीच्या टोकावर मध्यभागी आम्ही काचेचे लोलक बांधायचे. आवतीभोवती काचेच्या नळ्यांचं न् मण्यांचं नक्षीकाम केलेलं तोरण असायचं. आजोबांची कलाकुसर मस्त असायची. त्यातला आमचा तेगारा उठून दिसायचा.

पोरापोरांच्या बेंडबाजानं वाजत गाजत घरी घेऊन स्थानापन्न झालेला मोठ्ठा गणपती पाहिला म्हणजे या गणपतीचं पोट एवढं मोठं का असा प्रश्न कुणी तरी आजोबांना केला की, ते म्हणायचे, "गणपती सगळ्यांचे अपराध पोटात घालतो म्हणून त्याचं पोट मोठ्ठं! त्याच्या डोक्यात चांगले विचार गच्च भरलेले म्हणून त्याचं डोकं मोठ्ठं! तो आपला महान् नेता आहे. विद्येची ती देवता आहे. म्हणून त्याची पूजा करायची." आम्ही त्यावर विश्वासून रोज त्याची आरती करायचे. अगदी टाळमृदंगांसह! त्या कारणानं रोज वेगळी खिरापत घ्यायला येतेल्या पोरांची आमच्या गणपतीपुढं आरतीच्या वेळी खच्चून गर्दी जमायची.

कोकणात गणपतीच्या डोक्यावर पावसाळ्यातील फळं टांगायची पद्धत आहे. या तोरणाला मोळी म्हणतात. या मोळीला कवंडळे, कांगण्या, दोडके, सहस्त्रफळं वगैरे भाजीफळे बांधलेली असतात.

गौरी गणपतीचे दिवसच मोठे मजेदार. घरातील सर्वांचा उत्साह जसा दाटून येतो. गणपतीच्या तिसऱ्या चौथ्या दिवशी आमच्याकडे गौरी आल्या की, घरात धमाल उडून जाते.

न्हवणं भरून आम्ही मुली मुली गीतं गात नदीवर जातो. तिथले पाच खडे घेवून गात गात घरी येतो. अशावेळी आमच्या अंगावर शेलके वस्त्रालंकार असतात न् हाती रंगीबेरंगी पानाफुलांनी सजलेला तांब्या असतो. त्यालाच

न्हवण म्हणायचं. या न्हवणातच हे पाच खडे आणलेले असल्यानं हीच गौर म्हणायची. त्यामुळं आम्ही तिला घेऊन आलो की, आमच्या घरी हळद कुंक-वाची पायघडी पस॰लेली दिसते. त्या पायघडीवरून आम्ही दारी आलो की, आमची आजी गरम पाण्यानं आमचे पाय धुते. हळदकुंकू लावते आणि विचारते, "गौरी कोणत्या पायानं आल्या ?" आम्ही उत्तर देतो, "आरोग्य-आबादीच्या-सुखसमृद्धीच्या..." मग घरात येत येत ही प्रश्नोत्तरं अशीच लांब जायची पार गौरीची स्थापना होईस्तोवर !

आमच्याकडे कुणी ही गौर वाटीवर काजळाचे नाकडोळे काढून किंवा मातीच्या वाडग्यावर हळदकुंकवानं गौरीला रूप देऊन बसवतात. कुणी कुणी शाडू मातीच्या देखण्या गौरीही डब्यावर डबे ठेवून, त्यात ओटीचं सामान भरून, अंगावर भर्जरी साडी नेसवून, पुढ्यात खण नारळ ठेवून मांडतात. अलीकडे या गौरींना माणसासारखे हातपायही करतात. त्यामुळं ही गौर खरोखरच माहेरी आलेल्या लेकीसारखी दिसते! तिच्या अंगावर ठळक दागिने घातल्यानं न् फुलांचे हार तिच्या गळ्यात घातल्यानं ही गौर आपल्या नजरेला सुखावते. तिच्यापुढं पाची पक्वान्नांचा नैवेद्य ठेवायला उत्सुकतेनं कामाला लावते. तीन दिवसांच्या तिच्या मुक्कामात सैपाकघरातील सुगरणींचा हात कसा हालतो, कसा डुलतो, ते खरंच पहाण्याजोगं असतं. मुलाबाळांच्या जिभा त्यामुळं एवढ्या चटावतात की, ही गौर घरात नेहमीचीच असू दे असा मोह व्हावा !

कोकणात गौरी गणपतीचं फार महात्म्य. नवे नवे कपडे नेसलेले रामा लोक यावेळी फार सुंदर नाच करतात. पायात घुंगरू बांधून, हातात रंगीबेरंगी रुमाल घेऊन आणि एकमेकांचे हात एकमेकात गुंतवून एकदा डावीकडे तर एकदा उजवीकडं नाचत गिरकी घेणारी ही माणसं मधेच हवेत रुमाल उडवून अवचितच उठली बसली की, मोठी मजा येते. त्यांच्या मुखी अशावेळी फार सुंदर अशी लांबच लांब कथा गीतं अशी मोहरून उठतात की, बस्स !

गौरीसाठी कोकणात मोती (नथ) जसा पाहिजे तसंच घाटल्याचं जेवणही

हवंच. आम्ही देशावरील माणसं गौरीला पुरणावरणाचा न् गणपतीला मोदकाचा नैवेद्य दाखवितो.

रात्रीच्या वेळी गौर जागवताना आमच्या घरी खेळगाण्यांनी आमची अंगणं दणकारून जातात. बायकांचे सगळे खेळ मोठ्या दिमाखानं खेळले जातात न् गीतांना जसा बहर येतो. विशेषतः आमची आई ज्यावेळी घरातली परात अगर काटवट पालथी घालून तिच्यावर वस्त्रगाळ राख पसरवीत एका हातात लाटणं न् एकात रवी घेऊन त्याची टोकं या राखेवरून आगंमागं करते त्यावेळी असा सुंदर आवाज घुमतो की, ऐकणाराचं भान उडून जावं न् आपोआप आईबरोबर—

गवरी ग बाई जागरान तुजं<br>
जागता जागता पडल्या झापाडी<br>
एवड्या निज़ेची पिरत केवडी....<br>
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी<br>
नारळीच्या गोण्या झोकील्या अंगनी....

या गीतात आपल्या सूर मिसळून टाकावा अशातली गोष्ट घडून येते. त्या कारणानं—

दण् दण् फुगडी दणाणला सोपा<br>
खेळताना सुटला राधिकेचा खोपा

फुगडी खेळताना फुटत्या लाहीगत पोरींच्या ओठावर येणारे असले उखाणे ऐकत रहावेसे वाटतात. एवढंच नाही तर—

करवंदी मोत्याची नथ लाखाच्या मोलाची<br>
कोवळ्या नाकाची मंजूबाई

पिवळी नागीण चंदन वेलीला ग<br>
तसा पट्टा कमरेला मंजूबाईच्या

**दागिन्यांनी वाके जशी लवली ग केळ**
**नाजूक फुलवेल मंजूबाई**

अशा नोकझोकातल्या पोरी खेळायला लागल्या म्हणजे त्यांच्या घामेजल्या कायेत किती देखण्या दिसतात ते पहायलाही जीव उतावीळ होऊन जातो. अशा वेळी—

**आठशे खिडक्या नऊशे दारे**
**कोण्या दरिवाज्यानं गेली गो नार**

यातलं काही उमजूच नये अशा रीतीनं भुईला पाय ठरू न देता खेळतेल्या पोरी कोणत्या कुणाच्या ते पण उमजत नसल्यानं घरातल्या थोरल्या बायका सगळ्याच पोरींची अलावला घेत कवतिकानं तंबून जातात न् सांगायचं म्हणजे वयाचं ओझं खाली उतरवीत त्यांनाही खेळ खेळावेसे वाटतात ! म्हणताना गौरीचं हे जागरण असं रमतं अस रंगतं की, खेळायला येणारी एखादी सहजच—

**हमरस्ता, पाय पुरता**
**देवाला निघाले, पाच वाजता**

असं बोलून ठमकारतच घरी निघून जाताना दिसते !...

आमच्या दारीच्या अंगणापासून तो पार कवाडापर्यंत दोन्ही अंगांनी झेंडूची झाडं लावायचा आमच्या दादाला फार नाद. त्यामुळं सुंदर गेंदेबाज दिसतेली गोंडयाची फुलं येतील अशीच झाडं तो शोधून आणून लावायचा. त्यामुळं खेळून जातेल्या पोरी पुन्हा भोंडला घालायला येईन असं सांगूनच गौरीचं हळदकूंकू लेवून माघारी फिरायच्या.

घरोघरी अशावेळी होतेलं त्यांचं फिरणं नामी ठरायचं. पावसाच्या सह-वासानं वसुंधरा चांगलं नटते की, घरच्या शेलक्या वस्त्रालंकारांनी या पोरी नजरेत भरतात यातलं गणित मग कुणालाच सुटायचं नाही!... शप्पथ!

# साज शिणगार !

सणासुदीच्या निमित्तानं अगर हौसेमौजेच्या सोपस्काराच्या कारणानं घरच्या लेकीबाळी एकत्र यायच्या न् त्यांच्या शिणंजोडीच्या गडणी गोळा व्हायच्या म्हणजे आमच्या घरादाराचा नुसता घंग्रावोळ उडून जातो. त्यातून श्रावण भाद्रपदाचं टिप्पण निघालं म्हणजे तर धांदल गडबड विचारूच नका एकेकीची ! अगोदरच घरात देवादिकांची महापूजा बांधली जायची न् त्यातून सासरी माहेरी वावरतेल्या मुलीबाळींना गाडीघोडं पाठवून मनसोक्त खेळगाणी करायला एकत्र आणायचं म्हणजे आमच्या आजीचा लई दांडगा तगादा निघायचा. पार एक महिना दीड महिना अवकाश आहे तोवरच ! खेळगाण्यांनी आपलं पैस अंगण घुमारलं पाहिजे, देवादिकांच्या वर्दळीनं घराची शोभा वाढली पाहिजे, यातली तिला दांडगी हौस मौज.

त्यामुळं पाऊस काळ निघाल्या निघाल्याच आमच्या जिवाची धांदल गडबड उडून जायची आम्ही त्यावेळी जिथं असू तिथं ! नागारपंचीम खेळायला न् गौरी गणपती जागवायला आजोळघरी गेलंच पाहिजे या विचारानं भुलून जायला व्हायचं! धरणीला पाय ठरायचाच नाही का कशाएकात लक्षही लागायचंच नाही तर !

जराशी जरी सवड सापडली तरी उगीचच ठेवणीच्या बासनात उठता बसता हात जायचा ! कडीकुलपं काढून पेटी उघडली जायची न् सगळ्यांजणीत आपण उठून कशा दिसू यासाठी हे नेसू का ते नेसू असं व्हायचं ! उगीचच आईचा कडेल काढून बघ, इरकली पदर घेऊन बघ, चंदेरी नेसून बघ,

धनवडी खांद्यावर ठेवून बघ, रेशमी पैठणी अंगावर झेलून बघ अगर चंद्रकळा न्याहाळून बघ यातच तास न् तास जायचा ! झालंच तर आईचे वेल झुबे, बुगडया, नथ, पुतळया, पाचपदरी मोहनमाळ, थोरला कोलापुरी साज, कंबर पट्टा, गोठपाटल्या, पैंजणवाळे यातलं काय काय घालून बसायचा मोह पण व्हायचा ! ...

पण यातलं कोणतं एक हाताशी येत नसल्याकारणानं नुसतीच नजरभेट घडवीत जीव शांत करावा म्हणून धडपडायला व्हायचं. बरोबरीच्या पोरीबाळीत आरवताना मिरवताना एकदम ताज्यातव्यान्यामनानं न् हसऱ्याचेहऱ्यानं आपण दणकून नाचगाणी करावीत वाटायचं. देहाचा मृदंग, हातांचे टाळ आणि गळयातला सूर एकमेकात भिजवीत अंगणात साजऱ्या होतेल्या संगीतोत्सवात आपण अग्रभागी रहावं म्हणजे कित्ती कित्ती मज्जा येईल असं मनापासून वाटायचं. म्हणून कारण नसताना आम्ही आपलंच ध्यान तीन तीनदा आरशात रोखून रोखून बघावं अशातली गत व्हायची ! घरादारासकट स्वत:ला पण नटवून सजवून गीतनृत्यांच्या झंकारात लोटून द्यावं आणि आयुष्याला समाधानाची झालर लावीत ख्याली खुशालीत न्हाऊन उठावं असा मोह व्हायचा !

म्हणून मग कोण भेटेल त्याच्याजवळ नागपंचमी कधी येतेय न् गौरी गणपती कधी बसताहेत असं विचारून विचारून शिणायला व्हायचं ! सगळं नेमकं कळलं अगर ठाऊक झालं तरी हौसेमौजेचा दणका उडवून देत आपल्या आयुष्यालाच दाबून शिणगारून सोडावं या भावनेनं ही विचारपूस वाडीदिडीनं चालायचीच चालायची !

अशावेळी मनात यायचं की, परमेश्वर हा इथून तिथून सगळीकडं एकच असला तरी त्याची रूपं अनेक आहेत. त्यामुळं आयुष्याला दैवी गिलावा देण्यासाठी माणूस सण उत्सव साजरे करतो. वाडवडिलांची रीतभात ध्यानात घेऊन परोपरीचे कुळाचार सांभाळतो. त्याकारणानं त्याच्या ठायीच्या धार्मिक भावना सुखावतात. एकमेकांच्या सहवासातील आनंदाचे क्षण वेचीत आपल्या

मनातील परमोच्च बिंदू गाठणारे सात्विक मनोभाव देवावर शिंपताना त्याचं मन तृप्त होतं जसं !... त्यावेळच्या पावित्र्यानं शिणगारून उठणारे मनोभाव त्याला सांगतात की, ज्यांना ऐकायची सवय आहे त्यांना देवाचा धीरगंभीर आणि स्वच्छ असा आवाज जरूर ऐकू येतो ! .... देवाशी गुजगोष्ट साधता येते. म्हणून तर मग अशा वेळी माणूस आपल्या कल्पनाविश्वाला नटवीत देवादिकांना मानवी रूप देऊन मोकळा होतो ! आपल्या अपेक्षेप्रमाणं देवानं वागावं या कल्पनेत गुंतून जाताना तो मनातली सारी भावभावना देवावर शिंपून मोकळा होतो न् मग त्यालाच भ्रांत पडते की, देव आपल्यात आहे का, आपण मांडलेल्या देवादिकांच्या प्रतिकांमध्ये आहे ?...

पंचमीचा सण नागोबा नटवा
फुलांचे हारगजरे दुरडी लाह्याची पाठवा

दह्या दुधाच्या वाट्या जाईजुईची फुलं
दारामंदी पूजींते सये नागोबाची मुलं

पंचमीचा सण नागोबा मी पूजीला
मुराळी यावा मला पाठी भाऊ मागीतला

दुरून दिसतं माजं म्हायार नेटकं
दरवाजाच्या तोंडावरी रामसीताची बैठक

पहिल्या ववीला गाईला मी गणपती
सांगते मैना तुला तिथं शारदा उभी होती

असल्या कवतिकानं देवाची आळवणी केली की, माणसाला बरं वाटतं. त्याचा जीव खुशालीत येतो. सुखावतो. आनंदानं त्याचं पोट भरतं. तशी मग सणासुदीच्या कारणानं पोरीबाळी जमल्या न् खेळगाण्यांनी अंगण घुमारलं की, राजीखुशीनं त्याचा जीव एवढा होतो !

"वेळापूर नगरी, भवताली डगरी, काटचाची कुलपं, मोत्याची झुलपं, आमी लेकी थोराच्या थोराच्या; कानी बुगडचा मोराच्या मोराच्या".

फुगडी खेळताना पोरी सोरींच्या मुखी घुमतेला असला उखाणा मग ऐट-बाज ठरतो. तसं पाहिलं तर आपलं घर मग चंद्रमौळी का असेना, तिथं राया इंद्राच्या घरचं वैभव उभं झालंच पाहिजे तर खरं अशातली गंमत दिसून येते.

" समींदराची वाळू चाळणीनं चाळू, चाळणीनं चाळू; आम्ही दोघी मैत्रिणी गंजिफा खेळू."

" फुगडी फुलते, चवरी डुलते, पाठीवरली वेणी जशी नागीण खेळते."

असल्या उखाण्यांनी भुईला न ठरणारे पाय चिक्कार नाचत दणकारतात आणि एकमेकींचे हात एकमेकींच्या हातात गुंफलेले असतात ते आपापला तोल सावरीत फुगडीचं रिंगण देखणं करतात. अशावेळी तोंडानं घातला जाणारा पिंगा देहभान हरपून टाकणारा ठरतो. अंगणभर घुमणाऱ्या तऱ्हेतऱ्हेच्या फुगडचा काळजाचा ठाव घेऊन सोडतात. बसणारा माणूस देखील मग अव-चितच फुगडी खेळावी म्हणतो तर? आणिक फुगडयांच्या तऱ्हा तरी किती म्हणाव्यात देवा?

एका हाताची फुगडी, दोन्ही हातांची फुगडी, बस फुगडी, कासव फुगडी, जातं घुमवतेली फुगडी, पाठ फुगडी ... अशी आपली नानारूपं घेऊन नाच. तेली फुगडीच फुगडी! खेळणारणीचं अंग कसं चवळीगत हाललं पाहिजे! आणिक पक्वा तर कसा मस्तपैकी घुमलाच पाहिजे तरच खरी मज्जा!... अशावेळी एखादी जर दमलीच चुकून तर मग–

"दमली ग दमली, चिटक्यात कोंबली, चिटका फुटला, दणकारा उठला..." असल्या भाषेत त्या पोरीला ओढून पुन्हा नेटानं खेळताना हास्याचे फवारे उडून अंगणातलं चैतन्य पुन्हा नव्यानं उभं रहातं!...

ही खेळगाणी म्हणजे जणु धरित्रीची पूजा! देवादिकांच्या रंगभोगासाठी, अंगभोगासाठी सर्व सामान्यांनी स्वीकारलेलं अपूर्वाईचं व्रत!

फुगडी मागं सरली की, झिम्मा मान वर काढतो. दोघी दोघींचा, चौघी चौघींचा असा झिम्मा हवा तेवढा मोठा होतो. एकमेकींच्या शिणं जोडीच्या, सारख्या उंचीच्या सारख्याच अंगलटीच्या पोरी झिम्मा घालताना गोलगोल फिरत एकमेकींना टाळी देऊन गीतं गात सारं अंगण दणकारून सोडतात. अशा वेळी—

सर सर गोविंदा येतो
मजवरी गुलाल फेकीतो

त्या बाई गुलालाचा भार
आमच्या वेण्या झाल्या लाल

आमच्या वेण्या मोकळ्या
सोनीयाच्या साखळ्या

घड रे घड रे सोनारा
माणिक मोती बिजवरा

बिजवराला खिडक्या
आम्हीबाई लेकी लाडक्या

लाड सांगू बापाला
मोती मागू कापाला

या परीचं गीत सुंदर सुरावटीनं मोहरून उठतं. करतालांचा झंकार पाटल्या वांगड्यांच्या किणकिणत्या साथीनं शिणगारून उठतो... आणि झिम्मा खेळणाऱ्या सख्या साजणी चाफेकळीच्या डौलानं हसत खिदळत वावरताना जशा वयाचं भान विसरून जातात!... "पोरीत पोरी मीच गोरी"

म्हणीत लहान लहान पोरींसोरींच्या घोळक्यात विसावतात. माहेरघरचं असलं सुख त्यांना मानवतं आणि मग–

राधा रुसली सुंदरी
समजावीतो हरी की
राधे चल ग मंदिरी
नथ ठेविली तबकात
कृष्ण लावीतो हात
माझ्या गळ्याची शपथ
राधे घाल ग नाकात
राधा रुसली सुंदरी...

अशातली गंमत घडून यावी असा देखील मोह झाल्यानं त्यांच्या गालांवर खळी पडून गुलाब फुलतात! ... त्या धांदलीत आपलं हे गुपीत कुणाला कळू नये म्हणून एखादी हळूच भुरूला घालीत पुढं सरसावते–

माझा पिंगा ग ऽ जातो म्हमईऽऽ
आणतो समईऽ पोरी पिंगाऽऽ...

तुझ्या पिंग्याचीऽ माझ्या पिंग्याचीऽऽ
उतरा दिष्ट गऽ पोरी पिंगा गऽ पोरी पिंगाऽऽ...

आणिक जाग्यावरचे पाय हलू न देता कमरेवर डावा हात ठेवीत उजव्या हातानं पदर खेचून वर उडवीत भोवळ येस्तोवर आपल्याच भोवती घुमताना असलं गीत निघालं की, मजा येते. तिच्या मुखी गीतानंतर न दमता घुमतेला तोंडातला पिंगा ऐकणाराचं भान हरपून टाकतो. चवळीगत वाकणारं तिचं शरीर बघून नजर सुखावते. आपणही असंच पोटभर खेळायची लहर येते...

आदल्या दिवशी हळदकुंकवाच्या हातव्यांच्या पायघडीवरून घरी आलेल्या मानापानाच्या महालक्ष्मी देखील अशावेळी खुद्किनी हसतात तर? रात्रीच्या वेळी गव्हल्याची खीर न् कानवले खाऊन आपण असं खेळायचं सोडून उग्गाच बसलोय असं देखील त्यांच्या मनात येतं ना? म्हणून तर पुरणावरणाचा महानैवेद्य पुढ्यात असला आणि फराळाची भरगच्च ताटं आवतीभोवती दिसली तरी त्या दारात खेळलेल्या माहेरवाशिणींना पंक्तीला घेतल्याशिवाय जेवायचंच नाही म्हणतात! त्यांचं त्या घरी येणंच मुळी सोन्याचांदीच्या पायांनी न् धनदौलतीच्या शिडकाव्यांनी झालेलं असतं ना? मग?

शिवाय घरात गणपती देव आलेला. वाजत गाजत येऊन त्याची प्राण प्रतिष्ठा केली गेलेली. आष्ट गंधानं माखलेला नाजुक कापसाचा हार न् दुर्वांकुरांची माळ त्यानं घातलेली. त्याची पण विचारपूस हवीच की?

गणपतीची पूजा म्हणजे भक्ति, कर्म, योग आणि ज्ञान यांच्या सहवासानं निर्माण होणारी साधना साधायची. व्रती व्हायचं. आपल्या आशा आकांक्षा फुलतील म्हणून समाधानी रहायचं. कर्मयोग आचरणात ठेवायचा. भक्ति-योगामुळं देवाला वश करून घेत सर्वार्थानं समर्थ व्हायला धडपडायचं. देवाचं दर्शन व्हावं म्हणून निराकार वृत्तीनं नतमस्तक व्हायचं. फुलांसारखं सतेज रहायचा प्रयत्न करायचा. अष्टगंधाची मंदमधुर दरवळ आपल्या विचारांशी जवळीक साधील हे आवर्जून पहायचं. गणपतीची आरती करताना आपणही परमेश्वराचे सुपुत्र आहोत या भावनेनं सावधानतेतली तल्लीनता साधायची. महालक्ष्मीपुढं गीतनृत्यांचा वर्षाव करताना आपलं अंतःकरण् आपल्या सुरांइतकंच व पदन्यासांइतकंच प्रभावीपणानं बहरलेलं राहील हा ध्यास मनी बाळगायचा. भूतकाळाशी वर्तमानाचा स्पर्श होऊ देताना उत्सवा-तील भव्य रूप धारण करीत मानवी जीवनातील आनंदी आनंद सर्वत्र प्रेम-भरानं उधळला जाईल हे बघायचं. रांगोळीनं भुईफुलं सजवायची. सुंदर सुंदर सुरावटींनी वातावरण घुमारून जाईल हे पहायचं.

उत्सव म्हणजे मनानं वरच्या पातळीवर जाणं ! हौसमौजेचा खजिना लुटणं. आनंदी आनंद निर्माण करीत मिळालं आयुष्य कारणी लावणं. रोजच्या कामाच्या गर्दीतून विसावणं. सर्वार्थानं सुखी होणं. आयुष्य पेलताना वाटणारा जडभार उतरून ठेवीत हलकं फुलकं होऊन मजेत जगणं. निसर्गाशी एकजीव होणं जीवनातील संगीताचा मनमुराद आस्वाद घेणं . . . आणखीन् . . . परमेश्वराशी जवळीक साधण्याच्या प्रयत्नात रहाताना विवेक सांभाळणं . . . सणांच्या निमित्तानं रोजच्या कामाची सुट्टी घेत देवादिकांच्या सान्निध्यात असणं . . . सामाजिक जीवनातला आनंद उपभोगणं . . . तुझं माझं करतेला मनोभाव झुगारून देत आपलेपणानं सजणं . . . आनंदी, समाधानी वृत्तीनं बंधुभाव जोपासणं . . . आपल्या स्वत:मध्ये नवचैतन्य निर्माण करणं आणिक स्वत:सह सर्वांच्याठायी तरळतेल्या देवत्वाचा शोध घेणं ! . . .

आणि असला साज शिणगार लेत परंपरेनं चालत आलेल्या सण उत्सवाची जोपासना करीत कुळाचारांची आवड निवड लक्षात घेताना उडला जाणारा घंघाघोळ ताब्यात ठेवून हसत मुखानं महापूजेला स्थानापन्न होणं ! . . . बस्स ! या परतं महाभाग्य आणखी कोणतं असावं देवा ?

# अंगण घुमारलं ! राऊळ दणाणलं !

गल्ली बोळातील फुफाटचातून खेळताना शेवरीच्या काटकीनं धुळाक्षरं गिरवतेली मी, जनावरांच्या गोठ्यातून हुंबर घालीत वावरताना शेण गोळा करून भाकरी करायला शिकतेली चिमी, आनवाणी पायांनी रानातली ढेकळं तुडवीत शेंगाचं वावर चाळून झुवल्याचा वटा भरून घेऊन येतेली वेणू, धाकल्या मामासंगं शेत नांगरून न् पेरा करून मोप कवतिक मिळवतेली किशी, भल्या पहाटेला घरातले पारवे घुमायला लागले की, घरच्या वडील धाऱ्यांना दळणाला हात देतेली शांती, भाजी निवडून, लसूण सोलून, तांदूळ नीट करून आणि दुधं तापवून घरात कवतिक करून घेतेली राधा, उभ्यानं डेऱ्यात रवी घुमवून घरादाराचं लक्ष खेचून घेतेली चंपा आणि गल्लीतल्या कोण कोण पोरी त्या दिवशी आमच्या अंगणात गोळा झाल्या तशी सारं घर हारखून गेलं. वाणी-वानच्या लेकीची एकुलती एक लेक मी कधी नव्हे ती पंचीम खेळायला आजोळघरी आलेय यातल्याच आनंदानं आजीसकट सगळचांना उल्हास चढ-लावता. चिलीमवडत्या आज्याची तरी लईच कळी खुललीवती. त्या कारणानं प्रत्येक पोरीला ताजे कानवले न् खुसखुशीत खडूबळी आल्या आल्याच खायला मिळाली. कर्दळीच्या पानावरची ही अप्रूबाई सगळचांनी चवीनं खात ढेकर दिला न् कोकूर उडचा घेत अंगणात झेपावतेल्या किशीचा साद ललकारला..

हुंबर ऽ पोरी ऽ हुंबर<br>
घाल ग ऽ हुंबर पोरी ऽ ऽ हुंबर

त्यासरशी आम्ही सगळ्याजणी झुबल्याचा न् परवंटच्या साडीचा घोळ आवरीत अंगणात पळालो. त्या धांदलीत पाण्याचे गडवे पेले लवंडले. कर्दळीच्या पानांची पंगत विसकटली. जाईजुई फुलांचे गजरे ल्यायचे राहून गेले. अंगती पंगतीत मिरवून आग्रह करायचा डाव घरंगळला आणि वारं प्याल्यागत आम्ही एकदम अंगणात उडी घेतली!.. एकमेकींच्या हातात एकमेकींचे हात गुंफले गेले. फुगडी झिम्म्यांचा दणका उसळला...

"खोल खोल विहीरीवर उंच उंच चिरे, उंच उंच चिरे, तुझी माझी फुगडी गर गर फिरे." चंपानं हा उखाणा घालीत फुगडी घुमवली. तशी तिचे हात खेचून धरीत न् "जातं" घालीत भिंगरीनं उखाणा घातला, "सुया बाई सुया–पोलादी सुया, आम्ही दोघी फुगडी खेळू नणंदा भावजया." त्या सरशी सगळ्या पोरींनी "अय्याऽऽ बय्याऽऽ"चा गजर करीत त्या दोघींच्या मुखीचा पक्वा जोरात घुमवला न् मग हशाचा गदारोळ उसळवीत भिंगरीचं लगीन चंपाच्या भावाशी ठरवून देखील टाकलं गेलं!...

पण भिंगरीला ते मुळीच खपलं नाही. नाक फेंदरून रुसत ती एका बाजूला जाऊन बसली न् म्हणाली कशी, "अग जा! त्याचे डोळे पिचके आहेत. मी बरी हो म्हणीन?"

ते ऐकून पोरींनी गलका केला, "नको तर नको. जाऊ दे. चल ये फुगडी खेळू." आणि ती पण आली की मग हसत खेळत! धरले की तिनं माझे हात! मला ओढून घेत आणि फुगडी खेळतेले पाय आपटीत बोलली पण, "नमस्कार करते तुम्हो आशीर्वाद द्या, आशीर्वाद द्या, लहाग्या सुनेला संभाळून घ्या!"

झालं! पोरी पुन्हा खळखळून हसल्या. आमच्या आईला दाराशी उभी बघून त्यांनी डोळे मिचकावले आणि हा विषय उगीच रूसारूशी नको म्हणून तिथंच सोडून दिला! ... आईनं गप्प बसा म्हणून खुणावलंवतं... म्हणून मग कुणीच काही बोललं नाही. उलट आईनं सांगितलेला उखाणा किशीनं ध्यानात घेत भिंगरीला मैदानात ओढली न् म्हणाली कशी, "कोरा कागद काळी शाई न् माझ्या लग्नाची तुला का घाई?"

फुगडी खेळताना झिन्झिन्कारत्या पायांकडे पाहात मग खुशीत आलेल्या भिंगरीनं पण उखाणा घातला, "आरंड्यावर करंड्या, करंड्यावर मोर, माझ्यासंगं फुगडी खेळती चंद्राची कोर."

त्यासरशी सगळ्यांनी टाळ्या वाजवून या दोघींना शाबासकी दिली. त्यामुळं त्यांच्या फुगडीनं एवढा वेग घेतला आणि असा पक्वा घुमवला की, त्या दोघीपण घेरी येऊन त्या तिकडे जात केव्हा आपटल्या ते कुणालाच कळलं नाही ! . . .

आईनं मग त्या दोघींना उठवलं. त्यांना लागलं होतं तिथं बिगीबिगीनं तिनं हळद दाबली आणि "आता बास खेळ !" म्हणून त्यांना एका अंगाला नेऊन कोपऱ्यात बसवलं.

आमच्या म्हातारआईनं (आजीनं) ते पाहिलं. म्हणाली, "खेळताना पड-झड चालायचीच. रडूनी कुणी पण !" म्हणताना "आईऽऽ आई गऽऽ" करीत इवळत्येल्या भिंगरीनं न् किशीनं आली कळ सोसावी म्हटलं. लागल्या जागेवर फुंकर घालीत त्यांनी आमच्या खेळाकडं नजर टाकली.

आता आम्ही झिम्म्याचा बेत काढला होता. पण चंपीनं मधेच घसर फुगडी घालून आम्हाला बाजूला केल्या न् वेणूनं कोंबडा घालीत मोठी मजा आणली. आम्हाला पण मग जोर चढला. कोंबडा खेळता खेळता आमच्या झिम्म्यानं मनावर घेतलं आणि आजीनं अवचितच आम्हाला गीत दिलं . . .

पान पुडा की, शंकर चुडा की, शंकर चूऽऽडा
मामा माझा की, लेकुरवाळा की, लेकूरवाऽऽळा
त्याच्या घरी की, दुभतं काही की, दुभतं काऽऽही
मामा पाहुणा आला बाई की, आला बाऽऽई
त्याला जेवायला काय करू की, काय कऽऽरू

त्याला जेवायला साखर उंडे की, साखर उंऽऽडे
मामा सांगे की, मामी भांडे की, मामी भांऽऽडे
त्यानं आणली की, तेलंग साडी की, तेलंग साऽऽडी
नेसून गेले की, बुरूजावरी की, बुरूजावऽऽरी

पण गीत संपायच्या आतच उगीचच पाय दुखून आल्यानं आम्ही खेळता खेळता कोलमडून पडलो... तशी आमचं आम्हालाच हसू आलं. मग आम्ही घटकाभर खेळ मागं सारला...

एवढ्यात झिरमिरत्या पावसानं तोंड वर काढलं न् पायाखालची खेळती जमीन ओली होत गेली. आम्ही अंगणातून घरात सोप्यावर आलो. सोप्यातून माळीत गेलो. तिथं घरच्या देवाचा देव्हारा होता. त्यामुळं अंगणातला खेळ माळीत आला. माळीचंच राऊळ झालं. आजीनं प्रत्येकीच्या हातावर आलेपाकाची वडी ठेवली. ती खाऊन पाणी प्यालो. इकडचं तिकडचं बोलत बसलो. तेवढ्यात चिमीचा गळा खुलला,

पडलं टिपूर चांदणं भावजं दिवा लाव ग
नणंद निघाली सासऱ्या काय तो आनंद दाव ग

आणि पाखरांचा बसला थवा भुर्र-दिशी उडून जावा तशा आम्हीपण खेळायला उठलो. तशी शांतीनं झिम्मा घालीत त्या गीताला पुढं सरकवलं. ...

देईनं म्हटलं विसाचं देण्याजोगं न्हाय ग
पडलं टिपूर चांदणं भावजं दिवा लाव ग

झिम्मा मग झोकात रंगत गेला. हातातल्या बांगड्या खुळखुळल्या, पाठीवरचे गोंडे खडबडले, पायातले पैंजण वाळे झंकारले, गळ्यातल्या रंगीत मण्यांच्या दुडी नाचल्या, आम्ही एकमेकींवर झेपावत झिम्मा घालू लागल्यानं बहार उडून गेली... वाढत्या लयीच्या खेळाबरोबर पिंगाही देखणा झाला.

त्या धांदलीत कळशीत पिंगा घुमवतेल्या शांतीनं फूऽऽ फूऽऽ करीत कमाल करून सोडली! ... त्यातूनच आमच्या मामीनं लय पकडन सूप नाचवलं. आणि ...

नाच ग घुमा
कशी मी नाचू? ...
या गावचा त्या गावचा
सोनार नाही आला
माझ्या बाळाला वाळा नाही दिला
कशी मी नाचू? ...

या गीतानं लाडू झिम्म्याला खरी रंगत आणली. मोठ्या बायकापण आमच्या खेळात जमा झाल्या. खामनीवर चिमण्या पेटवून ठेवल्या गेल्या. दे्व्हाऱ्याकडच्या समईत तेल घालून वाती पुढं सरकवल्या. माळीत उजेडच उजेड झाला ... तशी नागारपंचीम मग आम्ही पाहिजे तेवढी खेळलोच खेळलो ...

रात्री निजताना आमच्या आजीनं खेळून खेळून दमलेल्या माझ्या हाताचा मुका घेतला न् घामेजलेल्या बाळचा बुगड्यांच्या चेहऱ्याची आलाबला घेत मला आपल्या कुशीत ओढली... आपल्या अंगावरच्या पदराचं पांघरूण माझ्या अंगावर लपेटून तिनं माझ्या कानात सांगितलं, "असं रोज खेळायचं! वाट्टेल तेवढ्या पोरी येऊदेत. खायला दीन कधी हावळा तर काय बाय! झालंच तर तुला जरीकाडी साडी चोळी पण आणीन... परवाची पंचीम घरात अशी झोकात होऊ देत की, बास!"... त्यासरशी मग मी दोडक्यागत अशी फुगले अशी फुगले की, विचारूच नये! ...

अनुक्रम :—

# नागपंचमी

सौ. कुमुदिनी पवार

नागराजांची पूजा भारतात सर्वत्र केलेली आढळते. फार पूर्वी प्राचीन काळापासून नागपूजेची प्रथा सुरू झाली आहे. तैत्तिरीय संहितेत नागपूजेचा स्पष्टच निर्देश केलेला आहे. अश्वमेध यज्ञ प्रसंगी लोहितादि व बायस या नागाचे पूजन करावे असे सांगितले आहे. दरवडेखोरांपासून संरक्षण करायचे असेल तर नागाच्या कातीचे कवच वापरावे असे अथर्ववेदात सांगितले आहे. नागदेवाचे महत्व सर्वत्र आढळते. नागमाता कद्रू ही पृथ्वीचे प्रतीक असून तिची पूजा करावी असे शतपथ ब्राम्हण सांगते. ऋग्वेदात नागपूजेचा उल्लेख नाही. पण त्या कल्पनेचा बीजांकुर मात्र आहे.

पुराणात विष्णु व शिव यांच्या बरोबरीने नागांचा उल्लेख केलेला आहे. शिव हा हातात व गळयात जटा बंधनासाठी नागवलये वापरतो तर विष्णूने त्याच्या शरीराची शय्याच केलेली आहे.

हिंदुधर्मांप्रमाणे बौद्ध धर्मातही नागांचा उल्लेख केलेला आहे. बुद्ध जन्मानंतर नंद उपनंद या नागांनी त्याला प्रथम न्हाऊ घातले. बुद्धाच्या गौरवार्थ मुचलिंद नागाने त्याच्यावर फणाछत्र धरले अशा कथा आहेत. बौद्ध ब्राह्मण नागपूजा करीत असे चिनी प्रवाशांनी लिहून ठेवले आहे.

प्राचीन ग्रीक इतिहासकारांनी आणि अन्य परदेशी प्रवाशांनी भारतातल्या नागांविषयी अनेक प्रकारची मनोरंजक माहिती लिहून ठेवली आहे. ग्रीक सेनापती नियरकस लिहीतो की, नद्यांना पूर आले म्हणजे जे सर्प नाग पाण्याबाहेर फेकले जात ते राजरोस लोकांच्या घराचा आश्रय घेत. गमतीची गोष्ट अशी की, लोकही त्यांना आस्थेने ठेवून घेत ! विषडंखाच्या भीतीने भारत

नसत. सेनापती ओनिकोटसने लिहून ठेवले आहे की, काश्मीर देशातील अभिसार प्रांताच्या राजाजवळ ८० व १४८ फूट लांबीचे दोन नाग आहेत. ते त्याचे रक्षण करतात. सेनापती इलियनने म्हटले आहे की, पहाडात रहाणाऱ्या एका ७० फूट लांबीच्या नागाने नुसत्या फुत्काराने सिकंदराच्या सेनेची एक तुकडीच्या तुकडी उधळून लावली !

सिंधू नदीच्या परिसरातील प्रत्येक गावात नागाची मंदिरे वा मूर्ती आढळतात असे युवानच्वांगने लिहून ठेवले आहे.

तक्षशीलेचे राजे नागपूजक असून त्यांनी आपल्या राजचिन्हांवर नागप्रतिमा मुद्रित केल्या होत्या.

काश्मीरमध्ये ७०० ठिकाणी नागाकृती कोरल्या असून त्यांची बहुतेक ठिकाणी आजही पूजा केली जाते. पंजाबातले सफ दोन हे गाव म्हणजे तिथल्या नागपूजेचे प्रमुख केंद्र. महाभारतातील जनमेजयाचे जे सर्पसत्र केले गेले ते याच ठिकाणी असे मानतात.

कर्नाटकात नागाच्या नैवेद्याला तांदळाच्या पिठाचे लाडू करतात. केरळमधील लोक घराच्या परिसरात नागट्टंन काबू नावाचा एक वृक्षकुंजच बनवतात व त्यात नागाच्या पाषाणमूर्ती ठेवून प्रतिवर्षी त्यांची पूजा करतात. नाग त्यांचे कुलदैवत आहे.

बंगालच्या काही भागात नागमंडळ नावाचे एक नृत्य प्रचलित आहे. तेथील वैद्य जातीचे लोक नाग किंवा नागावतार शुभराय याच्या प्रित्यर्थ नृत्य करतात.

रामायण महाभारतात अनेक ठिकाणी नागराजाचे वर्णन निरनिराळ्या रूपात आढळते.

छत्तीसगढ या ठिकाणी नागपूजा मोठ्या उत्साहाने साजरी होते. श्रावण महिन्यातच इकडेही नागपूजा होते. त्यावेळी नागराजांना पिण्यासाठी गावाच्या बाहेर शेतातून, मैदानातून, नाल्यातून दूध ठेवले जाते.

पूर्वीपासूनच मनुष्य आणि सर्प यांच्या संबंधीच्या कथा चालत आलेल्या आहेत. सर्पाचे विष जहाल म्हणून मंत्रांच्याद्वारे ते दूर करण्याचा रिवाज भारतात पूर्वीपासून चालत आलेले आहेत. छत्तीसगढ मध्ये नागपंचमीच्या दिवशी या मंत्राची पुनरावृत्ती होते. त्याचबरोबर नागराजाला प्रसन्न करण्यासाठी अनेक गाणी म्हटली जातात. ही गीते म्हणायच्या अगोदर खूप तयारी करावी लागते. एका ठिकाणी सर्पाची हाडे ठेवतात. त्याच्या जवळच एक कलश ठेवतात. त्याच्यावर एक दिवा ठेवतात. या कलशात आंब्याची पानेही ठेवतात. गाईच्या कच्च्या दुधाचे भांडे ठेवतात. तिसऱ्या प्रहरी मंत्र माहित असलेले लोक येतात. हे कच्चे दूध सर्पाच्या हाडावर शिंपडतात. या जवळच अग्नी तयार करून त्यावर धूप घालतात आणि मग वाद्यमेळाच्या साथीत सर्पमंत्र म्हणतात. गुरूमहात्म्य नावाची वेगळी गाणी असतात. या गाण्यांतून गुरूचे महत्त्व प्रदर्शित केले जाते. गुरूकृपेमुळेच मंत्राचे ज्ञान होते व गुरूच्या हाकेनेच सर्पविष दूर होते असा समज आहे.

सर्पप्रसन्नतेच्या गीतामधून सर्पाच्या जन्म-स्थानाचे वर्णन केलेले असते. डमरूच्या साथीबरोबर हे गीत गायले जाते. यावेळी असे मानतात की, सर्पराज प्रसन्नतेने नाचत उठतात. सर्पराजाला निरनिराळी संबोधने जोडून ही गीते गायिली जातात.

सर्प उतरण्याच्या वेळची गीते आणखी निराळी आहेत. फोफावत येणाऱ्या नागाचे विष माणसाला चढते ते उतरावयासाठी अनेक प्रकारची आळवणी या गीतातून केलेली असते.

केरळमधील वृक्षांच्या खोडावर नागराजांचे प्रतीक उभारलेले आढळते. वृक्ष पृथ्वीमधील दिव्यशक्ती शोषून घेतात, ती स्वर्गात दान करण्यासाठी अशी कल्पना आहे. मोठमोठे वृक्ष, त्यांची मुळे, खोड आणि फांद्या म्हणजे ब्रम्हा विष्णू, महेश यांचे प्रतीक मानतात.

निरनिराळ्या बागा, देवळे यामधून नागराजाचे प्रतीक असणाऱ्या आकृती कोरलेल्या आहेत. घरातील कर्त्या पुरुषाने आणि वडीलधारी स्त्रीने नागपूजा

केलीच पाहिजे असे शास्त्र आहे. नागपूजा हे त्यांच्या जीवनातील महत्त्वाचे अंग होऊन बसले आहे.

भारतातील इतर प्रांताच्या प्रमाणेच महाराष्ट्रातही नागपूजा फार महत्त्वाची मानतात. महाराष्ट्रात सोमयाचे करंजे आणि बत्तीस शिराळे ही महत्त्वाची ठिकाणे. सोमनाथ हा अगदी लहान जातीचा नाग विशेष प्रकारचा असून त्याच्या मस्तकावर कोणीतरी कुऱ्हाड मारल्याचे चिन्ह दाखवितात. सोमया हातात घेता आला तर ते भाग्यसूचक मानले जाते. बत्तीस शिराळा या ठिकाणी तर नागपंचमी दिवशी यात्राच भरते. आजूबाजूच्या खेड्यातील लोक शेकडो नाग मडक्यातून आणतात. तिथं त्यांची पूजा होते. खेळ होतात. त्या दिवशी नागदेव कुणाला चावत नाहीत असे म्हणतात.

नागपंचमी दिवशी नागाची पूजा करण्यासाठी किंवा त्या निमित्ताने सासुरवाशीण माहेरी येते. खेडेगावातील घराच्या भिंती सारवून त्यावरती हळदीने नागाचे चित्र काढतात. दारात रांगोळीपण नागाचीच काढतात. शहरातही घरात मातीचा छोटा नाग करतात. त्याला हळदकुंकू, लाह्या, फुले, दूध वाहून नमस्कार करतात. खऱ्या नागाची तर पूजा होतेच. हाताला मेंदी, अंगावर अलंकार, नवीन कोरी साडी लेवून, घरातली मुलगी, सून, वयस्कर गृहलक्ष्मीसुद्धा वयाचे भान विसरून त्या दिवशी मनमुराद खेळते, गाते. पंचमीची गाणी पुष्कळ आहेत. सासर, माहेर, सुख दुःख, मनात जे काही आहे ते मोकळेपणाने या गीतातून प्रकट केले जाते.

त्यामुळे ठराविक चाकोरीतून जीवन जगणाऱ्या स्त्रीमनाला काही काळ वेगळाच दिलासा मिळतो. पंचमीचा दिवस केव्हा उगवतो आणि केव्हा मावळतो कळत नाही. या मावळत्या दिवसाला आनंदानं नमस्कार करत असताना उजाडत्या रात्रीला काही वेगळाच साज चढतो. सारी रात्र पंचमीच्या गाण्यांनी खेळांनी नटून जाते. पंचमीचा सण फार जुना आहे हे आपण पाहिलेच. त्या संदर्भात एक मजेदार गाणे आहे. स्त्रीच्या स्वभावधर्मानुसार नटण्याची आवड, नवीन साडीची आवड, देवादिकांच्यात सुद्धा होती हे या गाण्यातून

दिसते. या संदर्भात पंचमीच्या दिवशी वारूळाला जाताना नवीन साडी हवी म्हणून विठ्ठलाकडे हट्ट घेऊन बसलेली रुक्मिणी फारच वेगळी वाटते.

अशी वसली पंढरी
वाळवंटी पुंडलिक हरी
तिथून पुंडलिक झडकिला
गेला रुक्मिणीच्या वाड्या
रुक्माबाई ग सुंदरी
जाऊ वारूळा गुजरी
तिथून रुक्मीण झडकिली
न्हाईबाईच्या वाड्या गेली
न्हाईबाई ग सुंदरी
चल ग वारूळा गुजरी
तिथून दोघी झडकिल्या
सत्यभामाच्या वाड्या गेल्या
सत्यभामा ग सुंदरी
चल ग वारूळा गुजरी
तिथनं तिघी झडकिल्या
लक्ष्मीबाईच्या वाड्या गेल्या
लक्ष्मीबाई ग सुंदरी
चल ग वारूळा गुजरी
तिथनं चौघी झडकिल्या
तुळशीबाईच्या वाड्या गेल्या
तुळशीबाई ग सुंदरी
चल ग वारूळा गुजरी

तिथनं पाची झडकिल्या
गेल्या विठ्ठलाच्या वाड्या
विठ्ठल रुक्माई उभाईत
देवा आम्हाला नेसाई
जरीतारी खंबाईत, जरीतारी खंबाईत
रूक्मिणीला खंबाईत
न्हाई रूपानं सावळी
धाटी दिलीया पिवळी
सत्यभामा अगुंचार
तिला दिला मोतिचूर
लक्ष्मीबाईचा अलंकार
तिला दिला पितांबर
तुळशीबाई ग गुजरी
तिला दिली जरीतारी

असा हा थाट करून पाची जणी वारूळाला गेल्या.

नागदेव संपत्तीचे रक्षक मानले जातात. अंगावर केस असलेले नागराज ज्यावेळी कुठे कुठे दृष्टीस पडतात त्यावेळी असे मानतात की, वडिलार्जित संपत्ती त्या भूमीत असली पाहिजे. तिचे रक्षण हे नागराज करतात. त्यामुळे आपोआपच अशा भूमीची ही पूजा होते.

नागदेवांचा महिमा असा आहे. म्हणूनच कळत न कळत आपलेही हात आपोआप जोडले जातात.

# बत्तीस शिराळे

श्री. गणेश पांडुरंग कुलकर्णी

शिराळे येथे गोरखनाथाचे प्रसिद्ध देवस्थान आहे. ते शिराळे या गावापासून दक्षिणेस तोरणा व मोरणा या नद्यांच्या संगमाजवळ आहे. या देवस्थानाला किती वर्षे झाली याचा काही अंदाज नाही.

आजपर्यंत ह्या गोरखनाथाच्या गादीची परंपरा अविवाहिताची अथवा कुटुंबविहीन असून गोसाव्याची दीक्षा घेतल्याची आहे. शिराळे येथे नाथाच्या स्थानाच्या ठिकाणी एक मठ आहे. हा मठ कानफाटे म्हणून गोसाव्यांचा पंथ आहे, त्यांचा आहे. येथे कानफाटे गोसावीच राहतात. येथे त्याची एक गादी आहे, त्याला महंत म्हणतात. हा महंत दर बारा वर्षांनी निवडला जातो.

दर बारा वर्षानी कन्यागत येते. त्याच प्रमाणे सिंहस्थही बारा वर्षांनी येतो. हे कानफाटे लोक भारतभर इतस्तत: अशाच गोरखनाथाच्या मठामध्ये राहतात. ते सर्व सिंहस्थाला नाशिकला जमतात व तेथून जमत जमत कन्यागताला कराडला प्रीतिसंगमाचे स्नान करण्यासाठी येतात. तेथे थोडे दिवस राहून मग शिराळच्यास येण्यास निघतात. शिराळच्यास येताना वाटेत रेठरे ब्रुद्रक म्हणून एक गाव आहे, तेथेही गोरखनाथपंथी यांचा मठ आहे. तेथे वस्ती करून शिराळच्यास येतात. शिराळच्यास त्यांचा मुक्काम दहा बारा दिवस तरी असतोच.

एकदा हे गोरखनाथ भिक्षेस गावात आले होते. एक बाई मातीच्या नागाची पूजा करताना त्यांनी पाहिली तेव्हा मातीच्या नागाची पूजा का करता खऱ्या नागाची पूजा करा, असे ते म्हणाले व पुंगी वाजविली. तेव्हा खरा नाग तेथे आला व पुंगीच्या आवाजात डोलू लागला. बाईने पूजा केली. ही प्रसिद्धी

तेव्हाच गावात झाली. त्यावेळेपासून खरे नाग आणून त्यांची पूजा करण्याचा प्रघात शिराळ्यात सुरू झाला. हा प्रघात अर्थात् फार प्राचीन आहे. हे नाग शिराळ्यास कोठून आले, याचीही एक कथा आहे. ती आंबाबाईच्या कथेत आहे. शिराळ्या शिवाय इतर कोठेही ही प्रथा नाही. ललगुण शेजारी नाग-नाथवाडी म्हणून गाव आहे पण तेथे हा प्रघात नाही. नागाचे दात पाडीत नाहीत. जिवंत धरतात. हे धरण्याचे मोठे कौशल्य आहे. सावधगिरी फार लागते. आज ह्या नाग धरण्यांच्या कलेला यात्रेमुळे विशेष उत्तेजन मिळाले आहे. हे नाग पंचमीच्या आधी आठ दिवस तरी लोक आसपास हिंडून वारूळे किंवा इतर बीळे उकरून त्यातून काढतात. सावधानतेने धरतात. नाग अत्यंत विषारी आहे. चावला तर पंधरा वीस मिनिटातच तो मनुष्य खलास होतो. नाग हवा तेथे सापडत नाही. नागात नर मादी असे दोन प्रकार आहेत. ज्याचा फणा असतो त्यावर दहाचा आकडा असतो. नराच्या फणीचा डावा उजवा भाग सारखा असतो. मादीचा डावा भाग लहान असतो. ही जात जर कोणी इजा केली नाही तर धरीत नाही. मारण्यासाठी काठी मारली आणि चुकून हा निसटून गेला तर तो त्या मनुष्यावर भयंकर डूख धरतो आणि त्याला त्याच्या आवाजावरून शोधून चावतो. याला चक्षुश्रवा असे नाव आहे.

दिसण्यात नागासारखे पण त्याच्यापेक्षाही सुंदर असे एक सर्प जातीतील जनावर आहे. त्याला येथे नायकुळ म्हणतात. पण खरे नाव नागकुल असे आहे. त्याच्या मस्तकावर गाईच्या खुराचा आकार असतो. त्यावरून नाग व नागकुळ ही ओळखतात. याला फणी व विष नाही. हे जनावर चावते. पण जोराने फुंकले तर ते सोडते. पंचमी दिवशी ही नागकुळे घेऊन लहान मुलेही हिंडत असतात. गळ्यात घालतात. मोकळीच हातावर सोडतात.

धामण या नावाची पाण्यात राहणारी, क्वचित जमिनीवरही राहणारी, एक सर्प जात आहे. वरील दोन्ही जातींपेक्षा ही निराळी आहे. पोटाला पिवळी आंगाला काळी. दिसण्यात भीतीदायक पण नायकुळाप्रमाणे गरीब अशीच जात

आहे. ही घेऊन लोक हिंडतात. मुले हिंडतात. गळचात व हातात नायकुळे घेऊन हौशी लोक फोटो काढून घेतात. क्वचित नागपंचमीस घोरपडी धरून काठीला बांधून मिरवितात. पंचमी दिवशी नागाची पूजा येथील महाजन म्हणून एक गृहस्थ आहेत त्यांच्या घरी नागाची प्रथम हजेरी लावून होते. नंतर तेथून ते सकाळी घरोघर पूजेसाठी घेऊन त्या त्या घरी कित्येक माणसे उभी असतात त्यात सोडतात. बायका त्यांची पूजा करतात. नाग धरणारास आठ आणे, चार आणे, रुपाया असे देतात. पुढे काही नागवाले बँड वगैरे लावून नागांची मिरवणूक काढतात. महाजनांना नागाचे वरदान आहे. नागाच्या वरदानाने त्यांचा वंश वाढला अशी परंपरा आहे.

फार पूर्वी शिराळे येथील कोणी ब्राह्मण कोल्हापुरास जाऊन पंचगंगेचे स्नान करून देवीचे दर्शन घेऊन पुन्हा शिराळे येथे येई. कोल्हापूर ही दक्षिण काशी म्हणून प्रसिद्ध आहे. तेव्हा गंगेचे स्नान व देवीचे दर्शन घ्यावयाचे. पण पुढे तो वृद्ध झाला. चालवेना, देवीला शरण गेला. तेव्हा देवी प्रसन्न झाली. मी तुझ्या तेथे येते. तुला दृष्टांत होईल म्हणाली. त्याप्रमाणे त्याला दृष्टांत झाला व स्वप्नात दर्शन देऊन तिने आपली स्थापना करण्याबद्दल सांगितले. त्याप्रमाणे तिने दिलेल्या प्रसादाची स्थापना त्याने यथाविधी गावाच्या पश्चिमेस केली. त्यावेळी कोल्हापुरास नागांची वस्ती होती. देवीचे जे भक्त होते (नागलोक नव्हेत) तेही देवी बरोबर येण्यास निघाले. देवीबरोबरच काही नाग आले. अर्थात ते या गावात येऊन तिच्याजवळ राहिले. तेव्हा श्री म्हणजे देवी लक्ष्मी येथे येऊन राहिली अशी प्रसिद्धी होऊन या गावाला श्री आलय म्हणजे शिराळे असे नाव पडले व तिच्या बरोबर आलेले नागही तेथे सुखाने राहू लागले. कोणीही त्यांना धक्का लाविनासे झाले. शिराळचास नाग अनुयायी व मोर देवीचे वहान म्हणून मारू नयेत असा सरकारचा दंडक आहे.

श्री व तिच्या बरोबर आलेले नाग येथे सुखाने राहू लागले. या गोष्टीने आणखीही नाग येऊ लागले. तेव्हा देवीने त्यांना आज्ञा दिली की, तुम्ही

केदारलिंगावरील तळ्यात स्नान करून यावे. तेव्हा त्यांनी जोतिबाच्या तळ्यात स्नान केले. तेव्हा प्रथम त्यांची फणा गळून पडली व ते निर्विष झाले. ते नागकुळे किंवा नायकुळे या नावाने प्रसिद्ध झाले. ही जात शिराळ्यालाच आढळते. हिला ओळखण्यास सराईत मनुष्य पाहिजे.

देवीच्या देवळात नागाचे भुयार म्हणून एक भाग आहे. याची दंत कथा आहे. देवीचा भक्त ब्राह्मण हा देवीपुढे नित्य देवी भागवत वाचीत असे. त्याचा मोबदला म्हणून देवीनेच आज्ञा दिलेला नाग रोज एक रत्न आणून टाकी. पोथी ऐके आणि विवरात जाई. त्याच्या गैरहजेरीत मुलाने पोथी वाचली. त्यालाही रत्न मिळाले. पण त्याला दुर्बुद्धी होऊन नागाजवळ पुष्कळ रत्ने असतील अशा समजुतीने त्याला मारण्याचा प्रयत्न केला ! पण नाग मारा चुकवून भुयारात निघून गेला. पुन्हा ब्राह्मण आला. पण नाग पोथीस आला नाही. त्याला सर्व हकीकत मुलाकडून कळली. बापाने मुलाला अतिशय दोष दिला.

अद्यापही या देवीचे दृष्टांत होतात. काही वर्षांपूर्वी मुंबईचा एक व्यापारी आला व त्याने देवीच्या अंगणाच्या आवाराला भिंत घालून दिली. तो म्हणाला, "ही देवी मला पावली आहे. पण परवा दृष्टांत झाला की, माझे आवार मोकळे आहे, त्याची दुरुस्ती कर. त्याप्रमाणे मी करतोच आहे." आणि तसे करून तो परत मुंबईला गेला.

परवाच्या मोठ्या भूकंपात देवीच्या देवळाचा कळस पडला. तो त्याने दुरुस्त केला.

# बत्तीस शिराळ्याची नागपंचमी

डॉ. दामोदर दत्तात्रय जोशी

सांगली शहरापासून सुमारे पस्तीस मैलांवर शिराळा नावाचे एक गाव आहे. या गावात दरवर्षी श्रावण शुद्ध पंचमीस म्हणजे नागपंचमीस जिवंत व दात न काढलेल्या जलाल विषारी अशा नागोबाची सामुदायिकरीत्या मिरवणूक काढून त्यांची पूजा व खेळ करविले जातात. नागपंचमीस सुमारे एक महिना अवकाश असताना गावातील दर्दी व धाडशी गारूडी लोक बरोबर कुदळ, पहार, काठी, मडकी, फडकी घेऊन गावाबाहेरील डोंगरात जातात. तेथील वारूळापाशी कानोसा घेऊन त्यात नागराज विराजमान असल्याची खात्री करून घेऊन ते वारूळ कुदळीने उकरून पहारीने खणून घेतात. मग त्यात असलेल्या नागास हळूच काठीने डिवचून फणा काढून फूत्कार करणाऱ्या नागोबास काठीच्या साह्याने चटकन् मडक्यात कोंबून मडक्याच्या तोंडावर जाड फडके दोरीने गच्च बांधून टाकतात. वरीलप्रमाणे श्रावण शुद्ध तृतीयेपर्यंत जवळ जवळ दोनशे ते अडीचशेपर्यंत नागसर्प पकडले जातात. गारूडी लोक सरावलेले धाडशी व वाकबगार असल्यामुळे वरीलप्रमाणे नागोबांना पकडताना त्यांना सहसा कधी इजा अगर अपघात होत नाही.

गारूडी लोक जिवंत नागोबा पकडून श्रावण शुद्ध चतुर्थीला शिराळ्यात घरोघरी नेतात. सुवासिनी स्त्रिया या जिवंत व जहरी नागोबांची भक्तिभावाने हळदकुंकू वाहून पूजा करतात, नागोबास लाह्या वाहतात व दूध पाजतात. नागोबाला देव समजून त्यांना अंतःकरणपूर्वक वंदन करतात. गारूडी लोकांना दोन-चार आणे दक्षिणाही प्रत्येक घरी मिळते. बत्तीस शिराळ्यास नागपंचमी हा मुख्य व महत्त्वाचा सण फारच वैशिष्ट्यपूर्णरीत्या साजरा केला जातो. महाराष्ट्र सरकारने या गावातील नागपंचमी सणाचे महत्त्व ओळखून

व मुंबई, पुणे वगैरे लांब लांबच्या गावाहून नागोबांचे खेळ पहावयास येणाऱ्या हजारो लोकांची सोय व्हावी म्हणून श्री. अंबाबाईचे देवळाचे प्रशस्त आवारात एक भव्य असे स्टेडियम उभारले आहे. या स्टेडियमवर बसून शांतपणे नागोबांचे रोमहर्षक व मनोरंजक खेळ पहाण्याची उत्तम सोय झालेली आहे.

नागपंचमीचे दिवशी रानातून पकडून आणलेले दोनशे ते अडीचशे पर्यन्त जहरी नागसर्पाची मडकी गारूडी लोक दुपारी तीन वाजता आपल्या डोक्यावर घेऊन व समोर ताशा वाजंत्र्यांचा ताफा लावून सर्व गावभर मिरवत मिरवत अंबाबाईचे प्रशस्त आवारात येऊन दाखल होतात. नंतर सुमारे दीड दोन तास सर्व मडक्यातून नागोबांना बाहेर काढून सुवासिनी स्त्रिया त्यांची हळदकुंकू वाहून पूजा करतात व नागोबाला दूध लाह्या वहातात. मग गारूडी लोक नागोबांचा फणा काढावयास लावून काठीच्या सहाय्याने व पुंगीच्या नादाने त्यांचे विविध प्रकारचे मनोरंजक खेळ करवून प्रेक्षकांकडून वाहवा व पैसे मिळवितात. हे जहरी, विषारी व दात न काढलेले, फणा काढून फूत्कार करणारे नागसर्प पाहून परगावच्या लोकांना मोठी भीती वाटते. पण खुद्द बत्तीस शिराळचाचे लोक नागोबांना मुळीच घाबरत नाहीत. गावातील लहान मुले हातात सर्पाची पिले धरून त्यांचा चाबकाप्रमाणे बेधडक वापर करताना आढळतात. कित्येक धाडशी लोक गळ्यासभोवती नागसर्प गुंडाळून रस्तोरस्ती मिरवताना दिसतात. शिवाय कित्येक मुलेही आपल्या खिशात नायकूळ जातीची सर्पाची पिले घालून त्यांच्याशी नानाविध खेळ खेळण्यात दंग झालेली आढळतात.

बत्तीस शिराळे या लहान गावात नागपंचमीचे नागोबाचे हे मनोरंजक व रोमहर्षक खेळ पहाण्यास सांगली, कोल्हापूर, मिरज, पुणे, मुंबई वगैरे लांबलांबच्या भागातून सुमारे वीसपंचवीस हजारांपर्यंत जनसमुदाय जमत असतो व साऱ्या गावास यात्रेचे स्वरूप प्राप्त होते.

बत्तीस शिराळचास नागपंचमीचे दिवशी नागसर्प सहसा कोणास चावत नाही, अशी समजूत आहे. पण नागास कोणी मारण्याचा प्रयत्न केल्यास

याला त्याची अद्दल घडते असे मानतात. या बाबतीत येथे एक दंतकथा चलित आहे ती अशी –

बत्तीस शिराळ्यास तेथील अंबाबाईचे देवळात एक गरीब वृद्ध ब्राह्मण रोज दुपारी चार ते पाच या वेळेत पुराण सांगत बसे. या पुराण श्रवणास तर स्त्री-पुरूषांप्रमाणे देवळाचे गाभाऱ्यातून एक नागसर्पही दररोज बिनचूक येऊन एका कोपऱ्यात बसे व सर्व पुराण श्रवण केल्यावर त्या ब्राह्मणाचे पोथी-पुढे एक सोन्याचे नाणे टाकून पटकन बिळात अदृश्य होई. असे कित्येक वर्षे सतत चालू होते. त्या रोजच्या सोन्याच्या नाण्याच्या प्राप्तीमुळे त्या ब्राह्मणाचे दारिद्र्य नाहीसे होऊन त्याचा योगक्षेम उत्तम प्रकारे चालू झाला. पुढे वृद्धाप-काळामुळे तो वृद्ध ब्राह्मण मरण पावला. नंतर त्याचा तरुण मुलगा त्याच देवळात पुराण वाचनाचे काम आपल्या पित्याप्रमाणे नित्यनेमाने करू लागला. नागराजही पूर्ववत पुराण श्रवणास बिनचूक हजर राहून पुराणाचे शेवटी पोथीपुढे एक सोन्याचे नाणे टाकून जात असे. असा थोडे वर्षे नित्यक्रम चालू होता. पण पुढे त्या तरूण ब्राह्मण पुत्रास दुर्बुद्धी झाली. त्याला पैशाची हाव उत्पन्न झाली. पुराण श्रवणास येणाऱ्या त्या नागसर्पाचा मार्ग त्याने बारकाईने देवळात चोहोकडे हिंडून पाहून ठेवला. त्याने असा विचार केला की, ज्या अर्थी नागोबा रोज एक सोन्याचे नाणे पोथीपुढे टाकतो त्या अर्थी सोन्याच्या नाण्याच्या फार मोठा साठा त्या नागोबाच्या बिळात खचित असावा. त्या नागोबास आपण ठार करावे म्हणजे त्याच्या बिळातील सोन्याच्या नाण्यांचा ढीग आपणास मिळेल व आपण फार मोठे श्रीमंत होऊ.

त्या ब्राह्मणपुत्राने वरीलप्रमाणे विचार करून आपला हा बेत तडीस नेण्याचा प्रयत्न केला. प्रथम त्याने त्या नागोबाच्या पाळतीवर राहून तो नागोबा बिळात शिरण्याच्यावेळी त्यास काठीने ठार केले. मग लगेच त्याने नागोबाचे बीळ खणून काढून पाहिले तर तेथे एकही सोन्याचे नाणे नव्हते. उलट हजारो फणा काढून फूत्कार करणारे नागसर्प त्या ब्राह्मणपुत्रावर तुटून पडले. ब्राह्मणपुत्र

पळून देवळाचे बाहेर जाण्याचा प्रयत्न करू लागला. पण देवळाचे सभोव
चोहोकडे हजारो नागसर्पांनी वेढा घालून त्याला देवळाबाहेर पडण्यास अश
करून सोडले! शेवटी त्या भयानक नागसर्पांच्या फूत्काराने तो ब्राह्मण
देवळातच बेशुद्ध पडला! मग ही वार्ता त्याचे बायकोस व आईस कळल
त्या दोघी धावत धावत अंबाबाईचे देवळासमोरील दरवाज्यासमोर आल्य
तेथे तो ब्राह्मणपुत्र बेशुद्ध पडलेला पाहून त्या दोघी धाय मोकलून रडू लागल्य
त्यांनी अंतःकरणपूर्वक दोन्ही हात जोडून त्या नागराजांची प्रार्थना कर
त्यांना वंदन केले व त्या म्हणाल्या, "आमच्या मुलाची चूक झाली. त
मुलास व आम्हास क्षमा करा व आमच्या मुलास जीवदान द्या. आम्ही
पुढे तुमच्या कुळाची हत्या करणार नाही. तुम्हाला देव समजून तुमची यथ
सांग मनोभावे हळदकुंकू वाहून व तुम्हास लाह्या खावयास घालून तुम्हास दु
पाजू व दरवर्षी आजच्या दिवसाची स्मृति म्हणून तुमचा सण साजरा करू
त्या सासू सुनांची ती मनोभावे होणारी प्रार्थना ऐकून सर्व नागराज संतु
झाले. त्यांनी त्यांना क्षमा केली व देवळासभोवतीलचा नागसर्पांचा वे
उठविला. त्या मुलास जीवदान दिले.

वरील घटना श्रावण शुद्ध पंचमीला घडली. त्या सासू-सुनेने व त्या ब्राह्
पुत्राने मग नागसर्पांना वचन दिल्याप्रमाणे त्या दिवशी अंघोळी उरकून शु
र्भूतपणे त्या जिवंत व दात न पाडलेल्या, फणा काढून फूत्कार करणाऱ्या, जल
नागसर्पांची यथासांग पूजा करून, त्यांना भक्तिभावाने वंदन करून, त्य
गोड अन्नाचा नैवेद्य समर्पण केला. तेव्हापासून गारूडी लोक नागपंचमीचे दु
दिवशी पकडलेले सर्व सर्प गावाबाहेरील डोंगरात घेऊन जातात व त्य
दूध पाजून तेथील वारुळात सोडून देतात.

# नाग-सर्प पूजा, कथा व प्रथा

श्री. शरद जोगळेकर

सर्प पूजा प्राचीन काळी सर्वत्र प्रचलित होती व आजही ती या ना त्या स्वरूपात पाहायला मिळते. या पूजेच्या पाठीमागे ही एकच भावना आहे की, सर्प हा देव किंवा देवाचा प्रतिनिधी आहे व त्याला प्रसन्न करून घेणे म्हणजेच देवाला प्रसन्न करणे होय.

भारतामध्ये श्रावण व भाद्रपदामध्ये विशिष्ट तऱ्हेने नागसर्पाची पूजा केली जाते. श्रावणामध्ये नागपंचमी येते व भाद्रपदामध्ये अनंत चतुर्दशी येते म्हणजेच अनंत नागाची पूजा होते.

नागपंचमीच्या दिवशी नागाची पूजा होते. काही ठिकाणी हिंदूंच्या घरातील भिंती अगर दरवाजावर ७ अगर ९ नागांचे चित्र रेखाटलेले असते व त्याची पूजा केली जाते. आपल्याकडे गारूडी लोक घरोघर जिवंत नाग घेऊन हिंडतात व स्त्रिया-मुले त्यांची पूजा करून त्याला दूध, लाह्या व पैसे देतात. काही लोक कपडेही देतात.

नागपंचमीच्या दिवशी नांगर चालविले जात नाहीत. भाजी वगैरे कापली जात नाही व काही घरी तर चुलीवर तवासुद्धा चढत नाही. दक्षिण भारतात बांबूच्या वनात नागसर्पांचा वास असतो. म्हणून बांबूंची पूजा केली जाते. महाराष्ट्रात सर्वत्रच नागसर्पाची पूजा मोठ्या उत्साहाने व भक्तीभावाने केली जाते. विशेषतः सांगली जिल्ह्यातील बत्तीस शिराळे गावी तर मोठ्या जत्रेचे स्वरूप येते. यासाठी परदेशी पाहुणेही मुद्दाम येऊन येथील छायाचित्रे घेऊन जातात. या दिवशी काही विशिष्ट लोक जंगलातून नाग पकडून आणून ते मडक्यात ठेवतात व या मडक्यांची एकावर एक अशी उतरंड ठेवून त्याची

पूजा केली जाते. नंतर ही मडकी मैदानात ठेवून त्यावर एक इसम खड्याने आवाज करतो की, लगेच नाग फणा काढून उभा राहतो. नागानी फणा काढली की, भाविक लोक पूजा करतात. या दिवशी नागसर्प येथे येणाऱ्या कोणालाही दंश करीत नाही, अशी भाविकांची श्रद्धा आहे. म्हणून लहान-मोठ्यांच्या अंगाखांद्यावरून सर्प फिरवितात.

मध्य प्रदेशात महाकोसल क्षेत्रात नागपूजेशिवाय "मारबत" नावाच्या यक्षिणीची पूजा करून प्रार्थना केली जाते की, सर्व रोगांचे निवारण कर.

केवळ नागाचीच पूजा का केली जाते, याबद्दल थोडा इतिहास आहे व त्यासंबंधी माहिती अशी :

नऊ नागराजांची पूजा प्रातःकाळी व सायंकाळी अशा दोन्ही वेळा पुष्कळ हिंदू लोक करतात व त्याची प्रार्थना पुढील प्रमाणे आहे :

**अनंत वासुकि शेषं पद्मनाभंच कंबलम् शंखपालं धृतराष्ट्रं तक्षकं कालियं तथा एतानि नवनामानि, नागानांच महात्मना सायंकाळे पुढे नित्यं प्रातःकाळे विशेषतः तस्य विषमयंनास्ति, सर्वत्र विजयी भवेत ।**

नल-दमयंती आख्यानामध्ये नागांचे वर्णन खालील प्रमाणे आहे :

**कर्कोटकस्य नागस्य दमयंत्या नलस्यच,**
**ऋतुपर्णस्य राजष, कीर्तनं कलिनाशनम् ।**

भगवान श्री विष्णु शेष नागावरच विराजमान झाले असून त्यांची स्तुति प्रत्येक घरात होत असते. त्यात देखील नागसर्पाचे वर्णन आहे ते असे –

**शान्ताकारम् भुजंगशयनम् पद्मनाभं सुरेशम् ।**

भगवान शंकराच्या नावानेही काही संस्कृत श्लोक आहेत. त्यातही नागाचे वर्णन आहे ते असे –

नागेंद्रकुंडल, नागेंद्रहार, नागेंद्रवलय, नागेंद्र चर्मधर (शिव कवचम्)
नागेंद्रहाराय त्रिलोचनाय, भस्मांगरागाय महेश्वराय (शिवपंचाक्षर)
गळेरूंडमाळं, तनोसर्पजालं (शिवाष्टकम्)
जटाधारी कंठ भुजंगपतिहारी पशुपति (देवीस्तोतम्)

श्री गणेशाच्या हातामध्ये नागबाण असतो व त्याचप्रमाणे त्याच्या कमरेला देखील नागसर्प असतो. ऋग्वेदामध्ये इंद्राने वृत्रासूर नावाच्या अहि (सर्प) दानवांच्या राजाचा वध केलेला दाखविला आहे. यजुर्वेद व अथर्ववेदामध्येही नागसर्पादि प्राण्यांची स्तुति असून त्यांचा वास जलाशयात असतो असे म्हटले आहे.

रामायणामध्ये "सुरवा" नावाच्या राक्षसीचे वर्णन आहे. ती नागमाता होती. महाभारतामध्ये बलराम हा शेषाचा अवतार मानला आहे. वीर अर्जुनाने उलुपी नावाच्या नागकन्येशी विवाह केला होता. महाकवि कालिदासाने रघुवंशामध्ये नागकन्या कुसुमावतीचा विवाह रघुवंशातील राजाशी झालेला दाखविला आहे. भगवान बुद्धांच्या मूर्तीवरही नागाची फणा आहे. सम्राट अशोकाने आपल्या कन्येमार्फत बोधिवृक्ष लंकेत नेला त्या वेळी नागांनी आपली शक्ति खर्चून नावेची गती रोखली तेव्हा राजकन्येने गरूडास्त्र वापरून त्यांना दूर केले. भगवान महावीर तसेच इतर जैन तीर्थंकरांच्या शरीरावर नागाची फणा आहे.

श्रीकृष्ण भगवानांनी कालिया मर्दन केले व शेषाचा उपयोग समुद्रमंथनासाठी केला. त्याचप्रमाणे जन्मेजय राजाने आपल्या पित्याच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठी नागयज्ञ केला होता.

केरळ प्रांतात प्रत्येक नायर या हिंदूच्या घरी "काऊस" नावाचे छोटेसे नाग सर्पाचे मंदिर असते व तेथे नाग सर्पाची पूजा करून नैवेद्य दाखवितात.

कारण त्यामुळे घरात लक्ष्मी सदोदित वास करीत राहील, असा यांचा समज आहे. सुप्रसिद्ध वैयाकरणी पाणिनी यांचाही नागराजाशी संबंध जोडला जातो.

सौराष्ट्रामध्ये प्रत्येक गावाच्या वेशीवर एक सर्प मंदिर असते. धांगध्रा संस्थानात नागसर्पाचे एक देऊळ आहे. तेथे ठराविक दिवशी राजा पूजेला येई व त्यावेळी नेमका जिवंत नागसर्प पूजेसाठी हजर राही, असे सांगतात. उतर हिंदुस्थानात चंबा, कांगडा या खोऱ्यात तसेच काश्मीरमध्येही कैक ठिकाणी जी दैवते आहेत, त्यांची नावे शेषनाग, बसकनाग, तखतनाग, प्रीतम-नाग, शबीर नाग, कर्कोटकनाग, कर्षनाग, इंद्रनाग, संतननाग, अशी आहेत. चिनाब नदी तीरावर एके ठिकाणी वासुकी नागाचे देऊळ आहे.

काश्मीरचा इतिहास ज्यात आहे ती "राजतरंगिणी" असे दाखविते की, तेथील राजे कर्कोटकाच्या वंशातील आहेत. हिमालयातील दऱ्याखोऱ्यांतून "किरा", "किरी" या शब्दांचा सर्रास वापर केला जातो आणि त्याचा अर्थ "सर्प" असा आहे. त्यावरून "किरात" या शब्दाची व्युत्पत्ति लागते.

बहुतेक सगळ्या सरपटणाऱ्या म्हणजेच सर्पाच्या जातींचा उगम व वस्ती बहुधा जलाशयातून अगर डोंगर कपाऱ्यातून दिसून येते. त्यामुळे पाणी, ढग, वीज यांच्याशी त्यांचा संबंध जोडला जातो आणि म्हणूनच त्यांचा आशीर्वाद लाभल्यास सर्व मनोकामना पूर्ण होतात, अशी सर्वत्र समजूत आहे. त्यामुळेच पुष्कळ ठिकाणी पिंपळाच्या झाडांच्या बुंध्याशी, दगडात कोरलेल्या नागाची प्रतिमा ठेवलेली आढळते. तसेच संतान व्हावे या इच्छेने स्त्रिया या मूर्तीची पूजा करून त्याला प्रदक्षिणा घालतात.

सारनाथाच्या स्तंभावर भगवान बुद्धांना भेटायला आलेल्या प्राण्यात नागाचे चित्र आहे. तेथे नागराजाच्या शरीरावर पाच फण्यांच्या नागाचे चित्र दाखविले आहे.

बायबलच्या सुरुवातीला ॲडम व ईव्ह यांची कथा आहे. त्यात सृष्टीची रचना दाखविली आहे. त्यात वृक्षाला लपेटलेला सर्प दाखविला आहे. मिसर देशाच्या राजांच्या मुकुटावर नागाची फणा असे.

मेक्सिकोच्या जुन्या संस्कृतीत सूर्याची पूजा आहे. या सूर्य मंदिरात दगडांवर कोरलेल्या सर्पमूर्ति असत व त्यावर हात ठेवून लोक शपथ घेत. चीनच्या सेनानीच्या निशाणावर " इगन " चे चित्र असते. तिबेटचे सुनाग नावाच्या राजाचा वास पाटली नावाच्या सरोवरात होत असे, असे सांगतात. कोरिया, जपान, इंडोनेशीया, कंबोडिया या सर्व देशात देखील नाग किंवा सापांची चित्रे खूप दिसतात. आफ्रिकेतदेखील सर्पपूजा प्रचलित होती व आहे. सर्पाच्या नजिक असणारी जी कासवांची जात तिला तिकडे जास्त मान दिला जातो.

सर्पाच्या पूजेसंबंधी अनेक कथा निरनिराळ्या देशात प्रचलित आहेत.

सर्प भूमीच्या पोटात राहतो. त्यामुळे तो भूमि व जल यांवर नियंत्रण ठेवतो, असे मानले जाई व याच कल्पनेमुळे त्याची पूजा होऊ लागली. त्याच बरोबर तो भयंकर विषारी असतो, तेव्हा त्याची मर्जी संपादण्यासाठीही त्याची पूजा करतात.

भूकंपाचे कारण सर्पच, अशीही एक कल्पना आहे. कारण सर्प हा पृथ्वीच्या चोहोबाजूला विळखा घालून बसला आहे व तो हलला की भूकंप होतो, अशी एक समजूत आहे.

कधी कधी साप हेच पृथ्वीच्या उत्पत्तीचे कारण मानले जाते. एके ठिकाणी तर अशी समजूत आहे की, सर्पाने पृथ्वीपासून आकाश दूर केले व त्यात सर्पाचे मात्र तुकडे झाले व त्यापैकी काही भागांची विभिन्न सृष्टी बनली. त्यापैकी दुसरा भाग म्हणजे तारांगण. आकाशातील व्याधालाही सर्पच मानतात.

सर्प मरत नाहीत व म्हातारेही होत नाहीत. ते फक्त कात टाकतात, अशीही कल्पना आहे आणि म्हणूनच सर्प अमर मानला जातो. संपत्तीचे रक्षण

करणारा व जादूटोणा करताना उपयोगी पडणारा म्हणूनही पुष्कळजण सर्पाचे महत्त्व मानतात.

प्राचीन काळात सर्प पूजेसंबंधी अनेक सिद्धांत मांडले गेले. त्यापैकी सर्प देव मानला जात असे, म्हणून त्याची पूजा होत असे असाही एक सिद्धांत आहे.

यूफरेटस् मधल्या तोरानियम लोकांच्यात सर्पपूजा प्रथम सुरू झाली व तेथून ती जगाच्या अन्य भागात पसरली, असेही एकाचे म्हणणे आहे. आस्ट्रेलियात सर्प ही एक नैसर्गिक संपत्ति मानली जाई. परंतु तेथे त्याची उपासना केल्याचा कोठे उल्लेख नाही. प्राचीन काळी मध्य अमेरिकेत जिवंत सर्पांची पूजा केली जात असे. पेरूतही "इन्का" जातीच्या सर्पाची पूजा होई व त्यांना रक्तही अर्पण करीत. चीनमध्ये काही ठिकाणी सर्प वाईट मानतात तर काही ठिकाणी तो फलदायी समजतात. जपानी लोकही सर्पाची पूजा करतात. इजिप्तमध्येही सर्पाला पूज्य मानतात. नाग व विशेषत: काळ्या सर्पाची आवर्जून पूजा केली जाते. नाग तर सूर्य व अग्नीचे प्रतीक मानला जातो. देवाच्या डोळ्यातून पडणाऱ्या प्रकाशाप्रमाणेच नाग मानला जातो. आणि म्हणूनच दोन्ही डोळे व सर्प ही सूर्याचीच बाळे मानली जातात.

---

*श्री. तु. मो. भटकर*

नागपंचमीचा सण आगळ्या स्वरूपात साजरा होतो.
ाी खेडेगावातील लोकांत एक वेगळ्याच प्रकारचा छंद
ावा' म्हणतात.

ापंचमीच्या दिवशी घोंगडीची चुंबळ करून त्यावर तांब्याची
चरवीच्या (भांड्याच्या) तोंडावर एक पसरट भांडे
ा) उफडे मारतात. त्या भांड्याभोवती लोक गोलाकार
भांड्यावर (चरवीवरील) एकजण आपला डावा हात
जव्या हाती कडे घेऊन ते कडे उफड्या भांड्याच्या काठा-
वर उफड्या मारलेल्या हाताच्या थापेची साथ मिळते. ह्या
ाषयीच्या गायनाला सुरुवात होते. ह्या गाण्याला 'बारी'
म्हणणाऱ्यांना "अरबडे" म्हणतात. ज्यांना नागाचे विष
येतो किंवा जडीबुटीच्या साहाय्याने विष उतरविता येते
ाबडे" म्हणतात.

ा गायनाला व त्या वाजंत्र्याला असा काही तालसूर चढतो
ाप चावला असेल अशा व्यक्तीला विष उतरविण्याचा
ार मग ती व्यक्ती पुरुष असेल किंवा स्त्री ह्या वाजंत्र्याच्या
सापासारखी डोलते!... सापासारखीच पोटावरही डोलते
ड्यास "पचवणीचा विडा" असे म्हणतात.

**ठाव्यात म्हटल्या जाणाऱ्या बाऱ्या**

**पहिले नमन पहिल्या गणा**
**दुसरे नमन हनुमंताला**

तिसरे नमन त्रीभुवनाला
चौथे नमन रामचंद्राला
पाचवे नमन पाचीपांडवांला
सहावे नमन धुरपतीला
सातवे नमन साती आसरांला
आठवे नमन महिशासुराला
नववे नमन नवकुळी नागाला
दहावे नमन पद्मीनी मातेला

वरील नमन झाल्यानंतर ज्या व्यक्तीच्या अंगात पान असेल त्या व्यक्तीला विचारतात की, तू कोणत्या जातीचा नाग आहेस? पान असलेली नागासारखी क्रिया करणारी व्यक्ती आपली नागाची जात सांगेल. जी जात असेल त्या जातीची बारी अशावेळी म्हटली जाते.

**नागाच्या काही जाती**

**चंदन शेष :**

आलम तुलम बालम या
पद्मिनीच्या स्वयंवरा
बारी झुलो रे बारी झुलो
बारी चंदन शेषाले ... हो चंदन शेषाले
देव आले पहा आले...हो चंदन शेष आले...
लावा कापूराची ज्योत
या ज्योतीत चंदन शेष तुझे आहे सत
अंतर शोधुन पाहे...चंदन शेषा कोड जबर आहे
लावली कापूराची ज्योत
या ज्योतीत आहे रे तुझे सत
हर हर बोला चंदन शेष आता कैलासी जातात...

गडाचे वाटेनं
ुलाल शेषाचे ठाणं
बाजूला होते निर्गूळाचे बन
्क पैदा झाली पद्मीण
ाडले सूर्याचे किरण
ोळत चालली आता पद्मीण
ुकले भुकले अंडे ऐसे दोन
अंडे ते घोळून घोळून
गुलाल शेषाचे ठाणं
अंडं ते घोळून घोळून
चंदन शेषाचे ठाणं
दोन बंधूची जोडी
ली पृथ्वीवरी
एक भोपळ्याचा वेल
ऽ लागले कांडोकांडी
ग एक भोपळा तोडला
सुताराच्या घरला
ड्या म्हणे सुताराला
भोपळा कोरला
ा पुंगी बाजा केला
डोलू ते लागले रे रामा...डोलू ते लागले ...

# आनंदाचा सण

कु. विद्या देसाई

नागपंचमी म्हणजे श्रावणमासातील एक महत्त्वाचा सण. स्त्री-पुरुषांच्या आनंदाचा क्षण. गोडधड घरात शिजवायचा दिवस. मुलीबाळींच्या खेळांचा दिवस. वाडवडिलांच्या पूजेचा दिवस.

नागपंचमीला नागाच्या रूपाने वाडवडील घरात येतात व घराचे रक्षण करतात अशी जुनी आख्यायिका आहे. त्यामुळे ह्या दिवशी काही कुटायचे नाही, काही लाटायचे नाही किंवा तळावयाचेही नाही. चुलीवर तवाच मुळी ठेवायचा नाही अशी चाल आहे. तशा करण्याने नागाचा फणा दुखावला जाईल ही भीति मानली जाते.

खेडेगावातून घरातील भिंतीवर हळदीने नाग काढून त्यास चुन्याच्या व काजळाच्या टिकल्यांनी सजविण्याची पद्धत आहे. शहरात हा प्रकार फारसा आढळत नाही. मात्र चिखलाचा नागोबा शहरात सर्वत्र आढळून येतो.

दारी पुंगी वाजवीत एखादा वैदू नागोबा घेऊन आला म्हणजे सुवासिनी स्त्रिया हळदकुंकवाने त्या नागाची पूजा करतात. त्यास दूध व लाह्या देतात ऐपतीप्रमाणे दक्षिणा देखील देतात.

ह्या नागपंचमीच्या सणाला खेडोपाडी नागारपंचीम असेही म्हटले जाते. नागारपंचमीसाठी सासरी गेलेल्या मुलीबाळींना आवर्जून माहेरी आणले जाते. त्यांना चोळीलुगड्याचे माहेर होते.

या सणाच्या वेळी मुलीबाळी व मोठ्या बायका भरपूर खेळ खेळतात. तिन्हीसांजेला अगर तिसऱ्या प्रहरी दारीच्या अंगणात सुरू होणारा त्यांचा खेळ रात्रभर देखील कुठे कुठे चालू राहतो.

फुगडी, झिम्मा, कोंबडा, फेर वगैरे अनेक खेळ स्त्रिया यावेळी खेळतात. त्याचप्रमाणे या खेळांच्या निमित्ताने वेगवेगळी मोठी सुरेल अशी गाणीही म्हणतात. त्यामुळे ही नागपंचमी चांगलीच गाजते. ह्या गीतातून प्रकट होणाऱ्या देवादिकांच्या अद्‌भुतरम्य कथांनी तिला मोठा उठाव येतो. आणि सारे गाव कसे या गीत-नृत्यांनी रात्रभर घुमू लागते. धुंद होऊन जाते.

या सणाचे वेळी पुरुषमंडळी मनमुराद झोके घेतात. हे झोके उंच झाडांना टांगलेले असतात. त्यामुळे झोक्याचा खेळही चांगलाच गाजतो. कुठे कुठे खेड्यांमधून जीगही झोकात खेळला जातो.

फुगडी व फुगड्यांचे इतर प्रकार खेळताना यावेळी घातले जाणारे उखाणेही या गाण्यांच्या प्रमाणेच मोठे चटकदार असतात. पोरीबाळींना व मोठ्या बायकांनाही त्यामुळे मोठा हुरूप येतो.

# नागपंचमी

सौ. सुभद्रा पाटील

हा सण साजरा करण्यासाठी बहुतेक सासुरवाशीणी माहेरी आलेल्या असतात. नागराज हा बंधुराज म्हणून त्याचा उपवास पंचमीच्या आदल्या दिवशी करतात. हे व्रत माहेरच्या कुटुंबियांना सुखी ठेवण्यासाठी करायचे असते.

त्या दिवशी पाटावर चंदनाने नागाची चित्रे काढतात. कुणीकुणी भींतीवर शेणानेही ही चित्रे काढतात. सर्व माहेरवाशिणी व इतर स्त्रिया नवे कपडे लूघान, गाणी म्हणत व झिम्मा, फुगडच्या इत्यादि खेळ खेळत वारूळाला जातात. नागोबाची पूजा (घरातल्या व वारूळातल्या) गंधफुले वाहून, हळद-कुंकू वाहून, फुटाणे, लाह्या व दुर्वा वाहून करतात. दुधाचा नैवेद्य दाखवितात. हात जोडून त्याची प्रार्थना करतात की, "आमचे रक्षण कर, आम्ही तुझी पूजा केली आहे ती मानून घे. आम्हाला सुखरूप ठेव." वारूळावरही दूध लाह्या ठेवून पूजा करतात.

त्या दिवशी जमीन खणत नाहीत. भाजीपाला चिरत नाहीत. दळत, कांडत नाहीत. चुलीवर तवा ठेवत नाहीत. उकडीचे कानुले (उकडीच्या करंज्या) करून त्याचा नैवेद्य दाखवतात. हे व्रत दरवर्षी श्रावण शुद्ध पंचमीला असते.

अनुक्रम :—

1. श्रीमती मालती दांडेकर
2. सौ. शरदिनी मोहिते
3. श्रीमती राधाबाई कुलकर्णी
4. श्री. महादेव गव्हाणे

१

*संग्राहिका :* श्रीमती मालती दांडेकर

सणामंदी सण नागपंचमी खेळायाची
वाट पहाते बोळायाची[1]

एकादस पारणं बहीण धरते भावाचं
नागोबादेवाचं काय होईल जिवाचं

पंचमीच्या दिशी नागोबाला पऊतं[2]
सोड कुणब्या आऊत

पंचमीचा सण नागाला दूधलाह्या
आऊक्ष मागूया भाऊराया

पंचमीच्या दिशी नाग काढीला भिंतीशी
बहीण भावाची उपाशी

पंचमीचा सण आयाबायांना गेली मूळं[3]
माझी बाळाबाई बघतीया सारा ईळ

सणामंदी सण नागपंचमी नाचारी
बहिणी न्हाइल्या सासरी बंधु पडले ईच्यारी

सणामंदी सण पंचमी खेळायाची
सावळे भावजई कर जलदी मुराळ्याची

सणामंदी सण बारा सणाला नेऊ नका
सावळ्या बंधुराया नका पंचमीला देऊ धक्का

१. मुराळ्याची. २. पोवतं, पिवळा दोरा. ३. मुराळी, निमंत्रण.

नागपंचमीच्या दिशी नागाला दूधलाह्या
यावं बहिणीच्या घरी भाऊराया

नागपंचमीच्या दिशी नाग कुणी आवितला
गोरेबाईनं पाठी भाऊ मागितला

नागपंचमीच्या दिशी नाग निघालं खेळाया
कोन्या पापिनीनं गहू काढलं दळाया

आल्या गेल्या हाती सांगून पाठवीते
नागपंचमीला लेक मैनाला आणवीते

पंचमीच्या दिवशी नाग काढिला भिंतीशी
बहीण भावाची उपाशी

पंचमीचा सण आयाबायांची न्हानीधुनी
माजी बाळाबाई वाट बघतीया येड्यावानी

नाग भाऊराया तुला वाहते दूधलाह्या
दर्शनाला येती शेजारच्या आयाबाया

२

संग्राहिका : सौ. शरदिनी

सरावण मासामंदी आला पंचमीचा सण
आनंदलं मन्हं मन

सारविल्या भिंतीवरी काढीला नागोबा
दूध लाह्या वाहू त्येला

नागोबा संगट पूजा केली नागीणीची
वाटी देते फुटाण्याची

पंचमीच्यादिशी घालीना वेणीफणी
पूजीली नागफणी

पंचमीच्यादिशी काजळ घालीना
नाग येणार पाव्हणा

पंचमीच्यादिशी निवद उकडीचा
नागोबाच्या आवडीचा

## ३

*संग्राहिका : श्रीमती राधाबाई कुलकर्णी*

पंचमीचा सण गहू काढीले दळायाला
नाग निघाले खेळायाला न्हाईबाई

पंचमीचा सण नागोबा वेगीला
मुराळी यावा मला पाठी भाऊ मागीतला

पंचमीचा सण नागोबा नटवा
फुलांचे हार गजरे दुरडी लाह्याची पाठवा

दह्या दुधाच्या वाट्या जाईजुईची फुलं
माझ्या दारामधी पुजते नागोबाची मुलं

पाटवाच्या झुली गाडीच्या बैलाला
पंचमीचा सण भाऊ मुराळी आला मला

घाटाच्या गळ्यांनी सजविले बैल
पंचमीचा सण भाऊ मुराळी कधी यील

४

संग्राहक : श्री. महादेव गव्हाणे

सणामंदी सण आली पंचमी खेळायाची
माजी ती भैनाबाई वाट बगती मुराळ्याची

सांगून धाडीयीती आल्या गेल्या मानसाला
बया माजीला म्हनावं येतो म्हनली गणपतीला

पंचीम सणादिशी बंधू अजून आला न्हाई
बंदु माजा म्हनी जोड ठुशाचा झाला न्हाई

अनुक्रम :—

१. सौ. सरस्वती शेटे

२. श्रीमती जानकीबाई पाटील

३. डॉ. सरोजिनी बाबर

४. सौ. विमल बाबर

५. सौ. शांताबाई उमराणी

६. कु. विद्या देसाई

१

संग्राहिका : सौ. सरस्वती शेटे

( १ )

ऋषीकेशी का मुरली वाजवीशी
नंदापाशी कामिनी थाप देशी
पैलीचा गौळण काय बोलली
दूध घ्या म्हणीत चालली चालली
आला किष्णदेव तिकून धावूनी
दूध त्यानं सर्वी टाकलं पिऊनी
अग येश्वदे सांग तुझ्या हरीला
कुंची सावरली हरीच्या जावळाला ...

(या रीतीने दही, तूप, ताक, लोणी इ. सर्व याच रितीने गुंफीत हे गीत लांबते.)

( २ )

किष्णानं मांडली चेंडूफळी
तिथनं चेंडू झुगारीला
कळंब काठीत आडकीला
कळंब काठी कडाडली
देवकीबाईला आत गेली
नको रडू ग देवकीबाई
आमाला किष्ण झाला न्हाई
धुरळा माती खेळला न्हाई

झाला न्हाई कशी म्हणू
चेंडू खेळला कशी म्हणू

(३)

हळद वाटून पिवळा पारा
हे बोट लागलं शेल्याला
हा बाई शेला वीजबाई नेसली
बिजबाई गेली वारूळाला
वारूळीच्या नागानं धरली पालवी (पदर)
साडीचं मोल काय सांग मालनी
मला काय पुसता
किकवीचं लेणं
आमाला काय उणं ...

(हे गीत मुलींची अनेक नावे गुंफीत असेच लांबते.)

(४)

मथुरी पेठेमंदी किष्णा नेटकं
गौळणी तिथं तीनशे साठ
काळी चंद्रकळा करवंदी काठ
अंगी जरीचोळी करी तटतट
नाकी सर्जी नथ करी लटपट
मुखी पानवीडा तांबडं व्हट ...

(या रीतीने हे गीत ठुशी, चंद्रहार, पुतळ्या, बांगड्या, कंगण्या, तो
साखळ्या, पैंजणवाळे, बुगडी, मासूळ्या इ. दागिने गुंफीत खूप वेळ लां

( ५ )

आई ग आई मी खेळायला जाते
जा ग जा ग लाडक लेकी
आई मला नेसायला काय न्हाई
घे जा घे जा वैनीची साडी
वैनीबाई वैनीबाई रागा भरली
दादांनी दादांनी डोळे मोडीली ...

(या रीतीने सर्व दागिने–वस्त्रालंकार–गुंफून होईतो हे गीत याप्रमाणेच लांबते व मग ती तशीच खेळायला जाते.)

( ६ )

न्हाई रुक्मिणी दोघीजणी भैनी
हे न्हाई आवडे देवा तुमाला
जनी घरी देवा जाशी
जनीचे थंड पाणी न्हाशी
सुवर्णाचे ताट देवा बत्तीस पक्कान्नं
बारीक तांदूळ सोलीव डाळ
धया दुधांनी भरल्या वाट्या
साखर देवा सोडीशी
जनीचे तुकडे खाशी
जनी घरी देवा जाशी
सुवर्णाचे पलंग देवा करती हातरायला
रेशीम गाद्या वरती घालायला

चहूबाजूंला लावील्या समया
इठ्ठलाच्या दासी पाय दाबायला
हे न्हाई आवडे देवा तुमाला
जनी घरी देवा जाशी
भक्तासाठी रानोमाळ हिंडशी

( ७ )

वनमाळी आले रातरी
सत्यभामा मंदिरी
यीना देती सानंद
यीना दे गे परोपरी
आज तुमाला किष्णा उशीर झाला
रुक्मिणीच्या बायाकरिता
राधे घरी राहिलो
फुलं सुंदर पाहूयीनी
निदरा गेली लागूयीनी
राधेला पाहूयीनी
गुप्त झाले शिरीहरी
भेट द्यावी गा लौकरी

## २

*संग्राहिका : श्रीमती जानकीबाई पाटील*

आज देवा किष्ण देवा
तुमा उशीर का झाला
मिक्षूकांत का दिसता
ऐसा कुठंशी भोगला
मुखप्रभा दिसती पिवळी
कुण्या सदनी जागला
आपरात्री फिरता तुमी
'होय' 'नाही' तुमा अंतरी
आले वनमाळी रातरी
सत्यभामा मंदियीरी
कुठं न्हाई गेलोवतो
रुक्मिनीच्या म्हाली व्हतो
पुष्प शेज पाहुनी निजलो
झोप मजशी लागली
तुजसी पाहूनी जाग आली
शुद्धी तुजी मज आली
अपरात्री फिरता तुमी
होय न्हाई तुमा अंतरी

रुक्मिनीचा भाना करूनी
राधिकेच्या घरी न्हाइलो
बाळपणाला जागलो
पिरत तिजशी वाहिलो

३

*संग्राहिका :* डॉ. सरोजिनी बाब

( १ )

या हो या रूक्मिणी आमुच्या आळी
हिरा मोराची बाई तुमची काचोळी
हिरा मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी बाई बसली पंढरी
पंढरपूरचा दामाजी सोनार
त्येनं घडविलं जोडव्यांचं ज्वाड
एका जोडव्याला साडेतीनशी मोती
न्हाई रूक्मिणीचा बाई पांडुरंग पती

या हो या रूक्मिणी आमुच्या या आळी
हिरा मोराची बाई तुमची काचोळी
हिरा मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी बाई बसली पंढरी
पंढरपूरचा दामाजी सोनार
त्येनं घडविलं पैजनाचं ज्वाड

एका पैंजनाला साडेतीनशे मोती
न्हाई रूक्मिणीचा बाई पांडुरंग पती

या हो या रूक्मिणी आमुच्या आळी
हिरा मोराची बाई तुमची काचोळी
हिरा मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी बाई वसली पंढरी
पंढरपूरचा बाई दामाजी सोनार
त्येनं घडविला बाई बांगडीचा जोड
एका बांगडीला बाई साडेतीनशे मोती
न्हाई रूक्मिणीचा बाई पांडुरंग पती

(हे गीत याप्रमाणे सर्व दागिने संपेपर्यंत असेच लांबते)

( २ )

साखळ्या ठेवील्या तबकात
राधा रूसली सुंदरी
कृष्णात लावी हात
राधे घाल ग पायात
पुतळ्या ठेवील्या तबकात
राधा रूसली सुंदरी
कृष्णात लावा हात
राधे घाल ग गळ्यात

टिक्का ठेवील्या तबकात
राधा रूसली सुंदरी
कृष्णात लावी हात

राधे घाल ग गळ्यात
अग तू फुलारी माळणी
राजा बोलावी साजणी
बांगड्या नव्यानं घडवीतो
दागिन्याचं तबक आता
राधे घे ग तू हातात

( ३ )

कारल्याचं आळ लाव ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याचं आळं लावलं वो फुईजी
बंधु आलं न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

कारल्याला पानं येऊं दे ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याला पानं आली वो फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

कारल्याला कारली येऊं दे ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याला कारली आली वो फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

कारल्याची कारली काड ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याची कारली काढली वो फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

कारल्याची भाजी कर ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याची भाजी केली वो फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

कारल्याची भाजी खा ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याची भाजी खाल्ली वो फुईजी
बंधु आले नियाजी
मी जाते मपल्या माहेरी

४

---

*संग्राहिका : सौ. विमल बावर*

( १ )

अंगणी खेळी सीता
जनकाला पडली चिंता
सीता ऽऽ माईला रामाला द्यावी आता
येरे कासार दादा

उघड तुझी पेटी
सीता ऽऽ माई ऽ लग्नाचा चुडा लेती
येरे सोनार दादा
उघड तुझी पेटी
सीता ऽऽ माई ऽ लग्नाचं डोरलं घेती
येरे भट बुवा
उघड तुझी पेटी
सीता ऽऽ माई ऽ लग्नाला उभी रहाती
चांदीच्या ताटामधी
ठेवीले मंगळसूत्र
सीता माईचा पती ओवितो रामचंद्र
चांदीच्या ताटामधी
ठेविते दूध पेढे
सीतामाईचा पती जोवितो रामचंद्र

( २ )

राजस तळावरी राधा धुणं धूती
माझ्या पाटल्यावरी सूर्या चमक देतो
सूर्या चमक साडीवरी
हिरवा रंग माडीवरी
माझ्या डोरल्यावरी सूर्या चमक देतो
सूर्या चमक साडीवरी
हिरवा रंग माडीवरी

(याप्रमाणे सर्व दागिन्यांची नावे घेणे)

( ३ )

गण्या गुलाल उधळीतो
माझ्या बांगड्या झाल्या लाल
जाऊन यश्वदेला सांग
माझ्या टिक्का झाल्या लाल
जाऊन यश्वदेला सांग
(याप्रमाणे सर्व दागिन्यांची नावे सांगणे)

( ४ )

नदीच्या अलीकडे बाई नदीच्या पलीकडे
एक पुनवेचा कावळा आला बाई कावळा आला
एकेक लिंबुण्या तोडून नेल्या बाई तोडून नेल्या
सईनं त्याचं चोळून मोळून राळं केलं बाई राळं केलं
माझ्या माहेरचा पावणा आला बाई पावणा आला
त्याला बसायला रंगीत घोडं बाई रंगीत घोडं
त्याच्या हातात रंगीत काठी बाई रंगीत काठी
त्याच्या कपाळी गंधाचा टिळा बाई गंधाचा टीळा
त्याच्या तोंडात पाण्याचा विडा बाई पाण्याचा वीडा
कसा दिसतो राजावाणी बाई राजावाणी
माझ्या सासरचा पावणा आला बाई पावणा आला
त्याला बसायला लंगडं घोडं बाई लंगडं घोडं
त्याच्या हातात जळकं लाकूड बाई जळकं लाकूड
त्याच्या कपाळी शेणाचा टिळा बाई शेणाचा टिळा
त्याच्या तोंडात काळा किडा बाई काळा किडा
कसा दिसतो खुळ्यावाणी बाई खुळ्यावाणी.

५.

संग्राहिका : सौ. शांताबाई उमराणी

( १ )

रायबाय ग, रायबाय ग, तुझा झुंझणी वाडा
वाड्याला, वाड्याला, तुझ्या खिडक्या चार
खिडक्यावर, खिडक्यावर, तुझ्या काढीला मोर
मोराला, मोराला, तुझ्या रेशमी गोंडं
रेशमी गोंडं वाड्याला डुलं
रायबाय ग, रायबाय ग, तुझा झुंझाणी वाडा

( २ )

झोका झिम्मा, ताईता गोपीला, वेळी रंगा
वेळीता दिवस गेला खेळीता
आकडी घालू झिम्मा झकडी पैंजाण पकडी
सोबन साय गवराय धाडा
आमुशा दिवशी कारंडी बायचा वाकडा बुचडा
तिकंडं आला रामोशी खेकडा
त्यानं काय केलं हिकमत केली
गावची गुरवीन काढून नेली
हळद लावून पिवळी केली
बाशींग बांधून नवरी केली

( ३ )

दोडक्याचं बी बाय टाकीती का शिपीती टाका
ती का शिपीती आल्याला खोपा माळ्याच्या
रोपा वाढतो का फुलतो वाढतो का फुलतो
पडवाळाचं बी बाय टाकीती का शिपीती
टाकीती का शिपीती आल्याला खोपा
माळ्याच्या रोपा वाढतो का फुलतो वाढतो का फुलतो
कारल्याचं बी बाय टाकीती का शिपीती
टाकीती का शिपीती आल्याला खोपा माळ्याच्या
रोपा वाढतो का फुलतो वाढतो का फुलतो

( ४ )

तांब्यानं तवली कंबर लवली
खुटीवरला कासरा तोच माझा सासरा
परड्यातली भाजी तीच माझी आजी
चुलीतली कोलती तीच माझी चुलती
पाण्यातला भवरा तोच माझा नवरा
तांब्यानं तवली कंबर लवली

( ५ )

असा कसा बाई ग माझा भोळा शंकर
रावणाला आत्मलिंग दिले काढून
सारंगपट खेळू दोघे मोठ्या हौसेनं
पार्वतीनं शंकराला घेतलं जिंकून
शंकरानं वर दिला भस्मासूराला

मोहिनीच्यासंगं रूप धरिलं नारायणा
गिरीजेसाठी शंकर तो वेडा जाहला
भिल्लीणीच्या पाठोपाठ नाचू लागला
भोळा कसा म्हणता याला भोळ्या शंकराला
रामनाम मंत्र त्यानं हृदयी ठेवीला

( ६ )

चांदण्या चांदण्या मूठभर चांदण्या
चांदण्या घालीती वारा बाय चांदण्या घालिती वारा
फुलाचा करंड केला बाई फुलाचा करंड केला
सिताच्या हाती दिला बाई सिताच्या हाती दिला
सिताबाय गेली अशोकवनाला बाय अशोकवनाला
सितेचा शोध मारूतीनं केला बाय मारूतीनं केला
रामाच्या घरी संसार सुखी झाला बाय संसार सुखी झाला

६

---

*संग्राहिका* : कु. विद्या देस

(१)

श्रावण हंकारी हंकारी
कांडून कुटून करा पंचमी
गणपतीची सोंड वाकडी
अग या गणपतीचे लाडू
या बाई लक्ष्मीपुढे वाढू

अग या लक्ष्मीच्या गाठ्या
अग पित्रांनी केल्या दाट्या
अग या पित्राचं ग ताट
दसरा आला गजघाट
अग या दसऱ्याच्या माळा
दिवाळी आली काळूकाळा
अग या दिवाळीचा दिवा
सटीनं घेतला बाई धावा
अग या सटीचा रोडगा
संक्रातीनं घातला फुगा
अग या संक्रातीचं सुगडं
शिमग्याला बाई बिगी धाड
शिमग्याचा तो गुलाल ग
पाडवा आला दलाल ग
अग या पाडव्याची गुढी
अखीतीनं मारली उडी
अखीतीचा आंबरस
सर्व सणा निंचिंत बस

(२)

आरड करड
बैल भरड
झेंडू माळ्या
म्हशी काळ्या
गाय गौळ्या

गाईच्या पोटी
उपाजला पाडा
तोच पाडा
कुंदा काडा
कुंदा न्हवं हराळी
वन वन पाडा
माशी झळाकली
आमच्या नागोबाला
सोन्यारुप्यानं ववाळी

अनुक्रम :—

१

*संग्राहिका : सौ. सुधा दामले*

१. चहा बाई चहा, गवती चहा
माझ्यासंगं फुगडी खेळतो गणपती पहा.

२. फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी
माझ्याशी फुगडी खेळते लेकुरवाळी.

३. द्राक्षाच्या वेलाला त्रिकोणी पान
समोरच्या समोर नवरा पाहिला छान.

४. बाजारातलं खोबरं खवट नाही
........च्या मुली आम्ही चावट नाही.

५. जातं बाई जातं, चंदनी जातं
माझ्याशी फुगडी खेळते चंदनाचं पोतं.

६. परात बाई परात, साखरेची परात
पुढच्या वर्षी काढू वन्संबाईंची वरात.

७. माडीवरी माडी तीन मजली माडी
माझ्याशी फुगडी खेळते माझ्यापेक्षा जाडी.

८. बटाट्याची भाजी आंबली ग, आंबली ग
जाऊ माझी खेळताना दमली ग दमली ग.

९. चहा बाई चहा रानोमाळ चहा
सासवा सुनांची फुगडी पहा.

## २

संग्राहिका : श्रीमती लक्ष्मीबाई कर्वे (आठवले

१. फुगडी खेळता खेळता जमीन झाली लाल
माझ्या संगं फुगडी खेळतं तान्हं बाळ.

२. सुयाबाई सुया, पोलादी सुया
आम्ही दोघी फुगडी खेळतो नणंदा भावजया.

३. आपण दोघी मैत्रिणी वाक्या करू, वाक्या करू
खोपा घालायचा बंद करू, बंद करू.

४. आम्ही दोघी मैत्रिणी टांग्यात ग, टांग्यात ग
फुगडी खेळू बागेत ग, बागेत ग.

५. सरी बाई सरी कोल्हापुरी सरी
वन्संबाई तुमच्या साडीवर प्राणी कोणते बघू द्या तरी.

६. दारी होती केळ तिला दिला धपाटा
माझ्यासंगं फुगडी खेळतो नंबरी फुपाटा.

७. गोफ बाई गोफ, चांदीच्या ताटात ठेवला गोफ
माझ्या संगं फुगडी खेळते विजापुरी तोफ.

८. कणी बाई कणी, तांदळाची कणी
माझ्याशी फुगडी खेळते ताकाची माथणी.

९. चिकीबाई चिकी, परातभर चिकी
गोटपाटल्या घालू आम्ही गृहस्थांच्या लेकी.

*संग्राहिका : सौ. विमल बाबर*

डबा म्हण डबा, चंदन डबा
येणी फणी केली, तुळशी मागं गेली
तिकडून आल्या तेल्या
धरल्या माझ्या वेण्या
सोड सोड तेल्या माझ्या मैत्रिणी गेल्या
गेल्या तर गेल्या सायबानी नेल्या
सायबाचा बंगला चुन्यानं रंगला
काय बाई चुन्याची तारीफ ग तारीफ
लवंगा घातल्यात बारीक ग बारीक
जरीचं पातळ मला, डोंगरी नवरा तुला.

फुगडी खेळू दण् दण्
रूपये वाजवू खण् खण्
रूपयाची सुपली, मोत्यानं गुंफली
जाऊ माझी सोकली, पान खाया शिकली
पानाची देठं, माझ्या फुगडीचा येठ.

चिंच खाली जाती दागिने घेती,
मामाच्या सायकलीवरनं नांदायला जाती.

सारीवलेल्या जागेला चित्र किती काढू
भाभीच्या नवऱ्याला पत्र किती धाडू.

५. माझ्या चुलीवर सांडगा ग सांडगा
सविताचा नवरा लांडगा ग लांडगा.

६. आम्ही दोघी मैत्रिणी वांग्यात ग
फोटो काढू टांग्यात ग.

७. आम्ही दोघी मैत्रिणी मांडीवर ग
गुलाबाचं फूल माझ्या साडीवर ग
गुलाबाच्या फुलाला वास न्हाय
स्वातीला नवरा पास न्हाय.

८. शाळेमागं सांडल्या तुरी
वेचून वेचून दमल्या पोरी.

९. मोगऱ्याच्या फुलाला घमघम वास
आम्ही दोघी मैत्रिणी बी. कॉम् पास

१०. हां ऽ हूं ऽ साजनी सूं ऽऽ
बेलाच्या झाडाखाली महादेवा तू.

११. आवा रंगीला पवा रंगीला
शेंवतीचं फूल माझ्या पार्वतीला.

१२. घोड्यात घोडा एकीचा एकीचा
तुंगकरांच्या लेकीचा लेकीचा
अशी लेक गोरी गोरी
हळद लावा थोडी थोडी
हळदीचा झाला ऊंडा ऊंडा
त्यात होता रुपाया रुपाया
भाऊ माझा शिपाया शिपाया

शिपाय घेरून भोगला भोगला
शिळ्या चुलीत चाफा चाफा
नाव ठेवा गोपा गोपा
गोपा गेला ताकाला ताकाला
विंचू चावला नाकाला नाकाला
इचवाची केली गुळवणी गुळवणी
त्यात माझी मिळवणी मिळवणी
मिळवणीचं रहाट ग रहाट ग
कोल्हापूरची पेठ ग पेठ ग
पेठंला लागली श्यांग ग श्यांग ग
अशी श्यांग फुटंना फुटंना
घरचा मामा उठंना उठंना
घरचा मामा कहारी कहारी
मामीव डोळ वट्टारी वट्टारी
मामी गेली रागानं रागानं
तिथंच खाल्ली वाघानं वाघानं
वाघ मामा गुरगुरतो गुरगुरतो
शेळ्या मेंढ्या नाचीवतो नाचीवतो
अस्वलमामी पोळ्या करते पोळ्या करते
बारा मुलास्नी जेवाय वाढते
एक पोरगा रूसला झाडावर जाऊन बसला
झाड लागलं हलायला पोरगं लागलं पडायला.

# ४

*संग्राहिका* : सौ. शरदिनी मोहिते

१. कोथंबिरीची काडी लवती कशी
दादाला बायको शोभती कशी
ताई वयनी मला लाजती कशी.

२. आरंड्यावर करंडा करंड्यावर मोर
माझ्यासंगं फुगडी खेळती चंद्राची कोर.

३. आपण दोघी मैत्रिणी खोक्यात ग खोक्यात ग
गुलाबाचे फूल माझ्या डोक्यात ग डोक्यात ग.

४. आपण दोघी मैत्रिणी आदराव ग आदराव ग
चित्र काढू पदराव ग पदराव ग.

५. आपण दोघी मैत्रिणी आट्टीच्या आट्टीच्या
साड्या नेसू पट्टीच्या पट्टीच्या.

६. आपण दोघी मैत्रिणी एकपान खाऊ एकपान खाऊ
सकाळी उठूनी देवाला जाऊ.

७. काचेची बशी शिऊ नको पोरी
आज मला आहे एकादशी खरी.

८. अग सखू ले ग कुंकू का ग लाजतेस
डबल खुडची चहाचा कप न् बिसकिट मागतेस.

९. बामणाचे मुली इथं का ग उभी, पदर का ग ओला,
भरली होती नदी, शिरली होती मदी,
सारंग बागेमधी.

१०. वागज गाव नगरी भोवतनं उगरी
काट्याचंच कुलूप मोत्याचं झुलूप
आपण लेकी थोरांच्या कान्या बुगडी मोराच्या.

११. आकण माती चिकण माती सलाम ग
बामणाच्या मुली गुलाम[1] ग.

१२. ये ग सखू ले ग कुंकू कां ग लाजते
मारुतीच्या देवळामधी घंटी वाजते.

१३. फुगडी फुलदार माझा भाऊ शिलेदार
आकाशाची घार माझी सासू दगडेदार
लिंबाला आला भार माझा सासरा हावलदार.

१४. माळाच्या मळ्यात जाईचं झाड
तोडिती नार गुंफिती हार
अशी सुरत अनिवार मारिती ल्हार.

१५. रंभा पातर, झाली रात्तरं
श्रीकृष्णाच्या डोलाखाली पोहत्याती पाखरं.

१६. आट्टुपुट्टू आले पाटातुनी गेले
कांचेचे बेल माझे फुटूनी गेले.

१७. खुर्ची बाई खुर्ची, वेताची खुर्ची,
माझ्याशी फुगडी खेळते लवंगी मिरची.

---

१. हुशार

१८. केळं बाई केळं, राजेरी केळं
एवढी मोठी झालीस तरी लग्न नाही केलं.

१९. कोरा कागद काळी शाई,
माझ्या लग्नाची तुला ग काय घाई ?

२०. समुद्राची वाळू चाळणीनं चाळू
आपण दोघी मैत्रीणी गंजीफा खेळू.

२१. बटाट्याची भाजी आंबली कशी ?
माझी मैत्रीण दमली कशी ?

२२. बटाट्याची भाजी आंबली का ?
खेळून खेळून तू दमलीस का ?

२३. आंबाड्याच्या भाजीला पळी पळी तेल
पहा पहा सासूबाई सुनेचा खेळ.

२४. काळा कासोटा भुई लोळतो
जेजूरीचा खंडोबा फुगडी खेळतो.

२५. लाही बाई लाही मक्याची लाही,
मुक्यानं फुगडी शोभत नाही.

२६. फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी
हत्तीच्या सोंडेवर मोत्यांची जाळी.

२७. आपण दोघी मैत्रीणी जोडीच्या जोडीच्या
हातात पाटल्या तोडीच्या.

२८. आपण दोघी मैत्रीणी एकमत करू,
स्वदेशी कपडे नेहमीच वापरू.

संग्राहिका : सौ. सुभद्रा पाटील

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

नाचून नाचून दमली ग बाई
दुधानं घागर भरली ग न्हाई
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

नाचत नाचत मी गेली हुती
कुणाच्या आळी ?
सोनार आळी
सोनार आळीनं जेवाय काय केलं ?
अधाच पोळी
गोदीचं लिंबू
भैनीनं वाढलं
कोयनानं काढलं
कशी मी नाचू ?

ारांनी असेच रंगत जाते. यावेळी दोघी जणी सूप घेऊन
दहापंधराजणी त्यांच्या भोवती गोल करून टाळ्या वाज-
श्न विचारतात. याच रीतीने हे गीत मग निरनिराळ्या

पदार्थांची व वेगवेगळ्या मुलींची नावे गुंफीत असेच लांबते. शेवटी नाचाचा वेग वाढत पिंगा घुमतो व मग हा नाच संपतो.)

## २

*संग्राहिका :* **सौ. भारती चोपडे**

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

आमच्या गावचा सोनार नाही भला
माझ्या बाळाला अंगठी नाही केला
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

भोवतंनं लाकडं अंगण वाकडं
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

या गावचा सोनार नाही भला
माझ्या बाळाला सरी नाही केला
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

या गावचा त्या गावचा सोनार नाही आला
माझ्या बाळाला मनगठ्या नाही केल्या
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

या गावचा त्या गावचा सोनार नाही आला
माझ्या बाळाला बिंदल्या नाही केल्या
कशी मी नाचू ?

नाच ग घुमा
कशी मी नाचू ?

या गावचा त्या गावचा सोनार नाही भला
माझ्या बाळाला हासळी नाही केला
कशी मी नाचू ?

अनुक्रम :—

संग्राहिका : श्रीमती जानकीबाई पाटील

( १ )

तळ्यायाच्या काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिशी वारूळाला जातो
वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा तू माझा पदर
सांग सांग तुझ्या जोडव्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेणं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

तळ्यायाच्या काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिवशी वारूळाला जातो
वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा तू माझा पदर
सांग सांग तुझ्या मासूळ्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेणं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

तळ्यायाच्या काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिवशी वारूळाला जातो

वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा तू माझा पदर
सांग सांग तुझ्या करंगळ्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेणं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

(या प्रकारे सर्व दागिने सांगून होईपर्यंत हे गाणे असेच लांबते).

( २ )

वनाच्या वाऱ्याला गाईचं खिलारू
गाई राख्या दादा खिलारू कोणाचं
चांगुणा बाईचं शिराळ राजाचं
चांगुणाच्या घरी दान कोण करी
निळ्या घोड्यावरी द्याव झाले स्वारी
राजानं तळं जी खांदिलं
बारा न् बारा वर्ष झाली
पाणी लागंना तळ्याला
देवा तुझा थोरला लेकू
घरचा कारभार करील कोण
देवा तुझा मधला लेकू
शेताचा कारभार करील कोण
देवा माजी रंभा तानी
दिली माझी रंभा तानी
तिथ रंभा झटकली
गेली शिंप्याच्या आळी

आरं तू शिंपी दादा
माझा मैतर होशील का ?
मला लुगडं देशील का ?
मला चोळीबी देशील का ?
आरं तू कासारदादा
माझा मैतर होशील का ?
मला काकणं देशील का ?
आरं तू अत्तारदादा
माझा मैतर होशील का ?
मला कुंकूबी देशिल का ?
आरं तू सोनार दादा
माझा मैतर होशील का ?
मला नथबी देशील का ?
तिथनं रंभा झटकली
गेली सुतांराच्या घरी
आरं तू सुतारदादा
माझा मैतर होशील का ?
मला रथबी देशील का ?
तिथनं रंभा झटकली
गेली आपल्या घराला
सगळा शिनगार केला
रंभाची ओटी भरली
रंभा रथात बसली
रथ चाले खडाखडा
माता रडे धडाधडा

एक वन वोलांडिलं
दोन वनं वोलांडिली
चौथ्या पाचव्या वनाला
गेल्या आपल्या बागेला
तिथंबी सगळा शिनगार केला
घोट्याला लागलं पाणी
तळ्यात भरलं पाणी
दंड सोड वैऱ्या
रंभा माझी तानी
बागंत बसली राणी

(३)

तळून मळून केला पोळा, तळून मळून केला पोळा
पंचमीनं उघडला डोळा, साजनीबाई
पंचमीचं काढते चित्र, पंचमीचं काढते चित्र
आली वडलांची पित्रं, साजनीबाई
पितराची निसते डाळ, पितराची निसते डाळ
आली घटाची माळ, साजनीबाई
घटाच्या माळीला बांधते गाठी, घटाच्या माळीला बांधते गाठी
सिलंगनानं केली दाटी, साजनीबाई
सिलंगनाचं घेते सोनं, सिलंगनाचं घेते सोनं
दिवाळीनं केलं येनं, साजनीबाई
दिवाळीची पाजळते पंती, दिवाळीची पाजळते पंती
संक्रात आली नेनती, साजनीबाई

पुजते सुगड, संक्रातीचं पुजते सुगड
ाही पुनव आली दुगड, साजनीबाई
वेची तिंबते कनीक, माही पुनवेची तिंबते कनीक
शेवरात्र आली आणिक, साजनीबाई
चं सोडते पारणं, शिवरात्रीचं सोडते पारणं
शेमग्यानं घेतलं धरणं, साजणीबाई
ग्री करते खीर, शिमग्याची करते खीर
ंचमीनं टाकला धीर, साजनीबाई
शिंपते रंग, पंचमीचा शिंपते रंग
ाडवा आला जबर-दंग, साजनीबाई
ग्री उभारते गुढी, पाडव्याची उभारते गुढी
आखिती आली लाडी, साजनीबाई
चा पूजते कऱ्हा, आखितीचा पुजते कऱ्हा
आषाडीपातूर दम धरा, साजनीबाई

(४)

कनकन कनानीलं
वारूळ दनानीलं
चांगुनेच्या घरी
ऋषी देव आलं
आलं तर येऊ द्या
परसदारानं येऊ द्या
आलं परसदारानं
पाट बसाया टाकीला
झारी भरून पाणी दिलं

घेतलं चौरंगी सूप
गेली पाची उतरंडी
काढली साळी नि बा डाळी
पेटविल्या कातीव उभ्या चुली
लावल्या चंदनाच्या फाळी
पाणी घंगाळ सारीलं
ऊठा बाबाजी भोजना
आमा भोजन काय बा केलं
येळल्या साळी नि बा डाळी
साळी डाळीयीचं काई
आमाला नाही चालईत
सत्त्वाची चांगुणा ग
गेली देवायाच्या खोली
घेतला बंदानी रुपाया
सत्त्वाची चांगुना निघाली
वर उडयीतं मोत्याचं इंजानं
गेली खाटक्याच्या आळी
खाटकी मैतर होशील
मगरमासा तू देशील
होय म्हणोनी बोलीला
घेतला मगरमासा
आली वाड्याला निघून
गेली देवायाच्या खोली
सोन्याच्या सुरीनं शीरकमळ उतरलं
कांडूनी कुटूनी भरीलं

कांदा कोतंबीर हिंगाची फोडणी
आंदी कड आला रगात पाण्याला
मग कड आला मगरमाशाला
पाणी घंगाळ सारीलं
उठा बाबाजी भोजना
भोजन काय बा केलं
केला मगर बा मासा
मगरमाशायाची आमाला नाही चाड
गेली देवायाच्या खोली
घेतले पाचनी रुपये
सत्त्वाची चांगुणा निघाली अंगणा
वर उडयींतं मोत्याचं इंजानं
गेली खाटक्याच्या आळी
खाटकी मैतर तू होशील
शिंगरं बकरं तू देशील
होय म्हणोनी बोलीला
आली वाड्याला निघोनी
गेली देवायाच्या खोली
सोन्याच्या सुरीनं शिरकमळ उतरीलं
कांडूनी कांडूनी भरीलं
कांदा कोतंबीर हिंगाची फोडणी
कड आला रगात पाण्याला
कड आला शिंगरं बकऱ्याला
पाणी घंगाळ सारीलं
उठा बाबाजी भोजनाला

आमा भोजन काय बा केलं
केलं शिंगार बकरं
शिंगार बकऱ्याची आमाला नाही चाड
तुमा भोजना काय बा करु
मारा पोटीयाचं बाळ
गेली देवायाच्या खोली
घेतली गुळायाची वाटी
गेली बाळाच्या चौकशीला
कडी तोडीयाच्या येरे माझ्या बाळा
कंबरी करदोड्याच्या येरे माझ्या बाळा
पेटी डुलयाच्या येरे माझ्या बाळा
दंडी वाकयायाच्या येरे माझ्या बाळा
कळी फुलायाच्या येरे माझ्या बाळा
आंगरी पोचायाच्या येरे माझ्या बाळा
गळा बदामाच्या येरे माझ्या बाळा
सदरा टोपीयाच्या येरे माझ्या बाळा
बाळ धुम धुम पळीलं
हाती दिली गुळायाची वाटी
घेतलं उचलून कडेवरी
आली वाड्याला निघोनी
गेली देवायाच्या खोली
सोन्याच्या त्या सुरीनं
शीर बाळाचं उतरीलं
शीर ठेविलं शिक्यावरी
धड कांडुनी भरीलं

कांदा कोतंबीर हिंगाची फोडणी
आदी कड आला रगताला
मग कड आला चिलया बाळाला
पाणी घंगाळ सारीलं
ऊठा बाबाजी भोजना
आमा भोजन काय बा केलं
मारीला पोटीचा तो बाळ
शिराचं केलं का धडाचं
केलं धडायाचं शीर ठेवीलं कमान्याला
नको आमाला नर कुंडाचं
करा शिराचं शिर खुर्माचं
केलं शिराचं शिर खुर्माचं
दोन पाट टाकिलं बसाया
दोन ताटं करीयली
दोन तांब्या भरीयले
आग तू सत्त्वाची चांगुणा
दोन पाट या कुणाला
दोन ताट या कुणाला
दोन तांब्या या कुणाला
एक पाट बाबाला
एक तांब्या बाबाला
एक शिराळ राजाला
आग तू सत्त्वाची चांगुणा
पाट आणि एक टाकावा
ताट आणि एक करावं

तांब्या आणि एक भरावा
पाट आणि एक कुणाला
ताट आणि एक कुणाला
तांब्या आणि एक कुणाला
एक चिलाळ बाळाला
बाळ आताजी कुठलं
आग तू सत्त्वाची चांगुणा
जा ग देवायाच्या खोली
घे जा गुळायाची वाटी
हाक बाळाला देवावी
बाबानं डावी करंगुळी कापीली
बाळ साजीवंत केलं
बाळाला हाक या देतीया
कडी तोडीयाच्या येरे माझ्या बाळा
कंबरीकरदोड्याच्या येरे माझ्या बाळा
सरीबिंदल्याच्या येरे माझ्या बाळा
डूलपेटीयाच्या येरे माझ्या बाळा
दंडी वाक्यायाच्या येरे माझ्या बाळा
गळी बदामाच्या येरे माझ्या बाळा
आंगटीपांचीयाच्या येरे माझ्या बाळा
बाळ धुम धुम आलं
दिली गुळायाची वाटी
घेतला कडेवर उचलुनी
आली वाड्याला निघोनी
बाळ भोजना बसवीलं

बाबानं भोजन बा केलं
राजानं भोजन बा केलं
बाळानं भोजन बा केलं
सत्त्वाची चांगुणा ग बाई
नाही ग हरली सत्त्वाला

## २

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

आली वर्षाची पंचीम, आली वर्षाची पंचीम
लोकांच्या बाळाया माहेरी, लोकांच्या बाळाया माहेरी
आमची बाळाई सासरी, आमची बाळाई सासरी
आरं तू सुबना रं बाळा, आरं तू सुबना रं बाळा
जावं बाळीला आनाई, जावं बाळीला आनाई
जातो म्हणोनी बोलीला, जातो म्हणोनी बोलीला
कर ग तानीयाचं लाडू, कर ग भुकेयेचं लाडू
बांधी शेल्याच्या पदरी, बांधी शेल्याच्या पदरी
गेला नंदीच्या पागंला, गेला नंदीच्या पागंला
शेलका नंदीबा सोडीला, शेलका नंदीबा सोडीला
आला वाड्याला निघूनी, आला वाड्याला निघूनी
घातला मखमली मठ, घातला मखमली मठ
वडली रेशमी पठार, वडली रेशमी पठार
नंदीवरी स्वार झाला, नंदीवरी स्वार झाला
जातो म्हणोनी बोलीला, जातो म्हणोनी बोलीला

निघाला वाड्याच्या बाहेरी, निघाला वाड्याच्या बाहेरी
निघाला वेशीच्या बाहेरी, निघाला वेशीच्या बाहेरी
लागला वनाच्या मारगी, लागला वनाच्या मारगी
एक वन वलांडिलं, दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली, तीन वनं वलांडिली
चौथ्या पाचव्या वनायाला, चौथ्या पाचव्या वनायाला
लागलं दिसाया नगर, लागलं दिसाया नगर
गेला नगराजवळी, गेला नगराजवळी
गेला नगराच्या आत, गेला नगराच्या आत
गेला वेशीच्या जवळी, गेला वेशीच्या जवळी
गेला वाड्याच्या आत, गेला वाड्याच्या आत
बाळीनं तिथंच देखीलं, बाळीनं तिथंच देखीलं
झारी रांजनात बुडविली, झारी रांजनात बुडविली
घेतलं चौरंगी सूप, घेतलं चौरंगी सूप
गेली पाचव्या उतरंडी, गेली पाचव्या उतरंडी
काढल्या साळी नि बा डाळी, काढल्या साळी नि बा डाळी
पेटविल्या कांतीव चुली, पेटविल्या कातीव चुली
लावल्या चंदनाच्या फाळी, लावल्या चंदनाच्या फाळी
सासू आली बाहेरनं, सासू आली बाहेरनं
काहो सुबाना येणं केलं, काहो सुबाना येणं केलं
लोकांच्या बाळाया माहेरी, आमची बाळाई सासरी
सासरा आला बाहेरून, सासरा आला बाहेरून
काहो सुबाना येणं केलं, काहो सुबाना येणं केलं
लोकांच्या बाळाई माहेरी, आमची बाळाई सासरी
आलो बाळीला न्यायला, आलो बाळीला न्यायला

न्हेजा म्हणोनी बोलीला, न्हेजा म्हणोनी बोलीला
दीर आला बाहेरून, दीर आला बाहेरून
काहो सुबाना येणं केलं, काहो सुबाना येणं केलं
लोकांच्या बाळाई माहेरी, आमची बाळाई सासरी
आलो बाळीला न्यायला, आलो बाळीला न्यायला
नेजा म्हणोनी बोलईला, नेजा म्हणोनी बोलईला
कांत आले बाहेरून, कांत आले बाहेरून
काहो सुबाना येणं केलं, काहो सुबाना येणं केलं
लोकांच्या बाळाई माहेरी, आमची बाळाई सासरी
आलो बाळीला न्यायाला, आलो बाळीला न्यायाला
नेजा म्हणोनी बोलाइलं, नेजा म्हणोनी बोलाइलं
सासरा भोजनाबा केलं, सासरा भोजनाबा केलं
दीर भोजनाबा केलं, दीर भोजनाबा केलं
सुभाना भोजनाबा केलं, सुभाना भोजनाबा केलं
सासू भोजनाबा केलं, सासू भोजनाबा केलं
आपून भोजनाबा केलं, आपून भोजनाबा केलं
झालं सर्वांचं भोजन, झालं सर्वांचं भोजन
नेशीवली साडी चोळी, नेशीवली साडी चोळी
कुंकू बाळीला लावीलं, कुंकू बाळीला लावीलं
वटी बाळीची भरीली, वटी बाळीची भरीली
नंदीवरी स्वार झाली, नंदीवरी स्वार झाली
जातो म्हणोनी बोलीईली. जातो म्हणोनी बोलीईली
निघाली वाड्याच्या बाहेरी, निघाली वाड्याच्या बाहेरी
निघाली वेशीच्या बाहेरी, निघाली वेशीच्या बाहेरी
लागली वनाच्या मारगी, लागली वनाच्या मारगी

एक वन वलांडिलं, एक वन वलांडिलं
दोन वनं वलाडिली, दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडीली, तीन वनं वलांडिली
चौथ्या पाचव्या वनाला, चौथ्या पाचव्या वनाला
नगर दिसायला लागलं, नगर दिसायला लागलं
गेली नगराजवळ, गेली नगराजवळ
गेली वेशीच्याजवळ, गेली वेशीच्याजवळ
गेली वेशीईच्या आत, गेली वेशीईच्या आत
गेली वाड्याच्या जवळी, गेली वाड्याच्या जवळी
बयानं तिथंच देखीलं, बयानं तिथंच देखीलं
पाट बसाया टाकिला, पाट बसाया टाकिला
झारी रांजनात बुडविली, झारी रांजनात बुडविली
आग तू आंबीका ग माता, आग तू आंबीका ग माता
जा ग गडणीच्या आळी, जा ग गडणीच्या आळी
आग त्या वाण्या बामणाच्या, आग त्या वाण्या बामणाच्या
जा ग तेल्या तांबोळ्याच्या, जा ग तेल्या तांबोळ्याच्या
आग त्या शिंप्या कासाराच्या, आग त्या शिंप्या कासाराच्या
साऱ्या गडणी जमविल्या, साऱ्या गडणी जमविल्या
आली वाड्याला निघून, आली वाड्याला निघून
आग तू आंबीका ग माता, आग तू आंबीका ग माता
आमी काय ग नेसावं, आमी काय ग नेसावं
नेस जा तुजं पातळ, नेस जा तुजं पातळ
नको माजं पातळ, नको माजं पातळ
नेस जा माझी नवी साडी, नेस जा माझी नवी साडी
नको तुझी नवी साडी, नको तुझी नवी साडी

नेस जा वयनीची कासायी, नेस जा वयनीची कासायी
काढली मधुपका चोळी, काढली मधुपका चोळी
काढला नऊलाखी हार, काढला नऊलाखी हार
काढला खुंटीचा झोळणा, काढला खुंटीचा झोळणा
नागा निवद् भरईला, नागा निवद् भरईला
घेतलं हाळद् आणि कुंकू, घेतलं हाळद् आणि कुंकू
नागा पवतं घेतईलं, नागा पवतं घेतईलं
लाह्या झोळण्या भरईल्या, लाह्या झोळण्या भरईल्या
निघाली वाड्याच्या बाहेरी, निघाली वाड्याच्या बाहेरी
निघाली वेशीच्या बाहेरी, निघाली वेशीच्या बाहेरी
लागली वनाच्या मारगी, लागली वनाच्या मारगी
एक वन वलांडीलं, एक वन वलांडीलं
दोन वन वलांडीली, दोन वनं वलांडीली
तीन वनं वलांडीली, तीन वनं वलांडीली
चौथ्या पाचव्या वनाला, चौथ्या पाचव्या वनाला
लागलं वारूळ दिसाया, लागलं वारूळ दिसाया
गेली वारूळा जवळी, गेली वारूळा जवळी
लावलं हाळद् नि कुंकू, लावलं हाळद् नि कुंकू
नागा पवतं घातिलं, नागा पवतं घातिलं
नागा लाह्या बा वाहिल्या, नागा लाह्या बा वाहिल्या
नागा निवद् दावीला, नागा निवद् दावीला
नागा पाया बा पडिली, नागा पाया बा पडिली
हाताला हात बा धरोनी, हाताला हात बा धरोनी
एक फेरी घातली, एक फेरी घातली
दोन फेऱ्या बा घातील्या, दोन फेऱ्या बा घातील्या

तीन फेऱ्या बा घातल्या, तीन फेऱ्या बा घातल्या
चौथ्या पाचव्या फेरीला, चौथ्या पाचव्या फेरीला
एक कुंकवाचं बोट, एक हळदीचं बोट
लागलं वैनीच्या कासायी, लागलं वैनीच्या कासायी
सारजा झाली काळीमोरी, सारजा झाली काळीमोरी
आली रडत फुंदत, आली रडत फुंदत
आली वाड्याला निघोनी, आली वाड्याला निघोनी
तुमी सर्वाजनी आहे, माजी आस्तुरी कुठं आहे
आसल आत व बाहेरी, आसल आत व बाहेरी
आसल बाहेर भितर, आसल बाहेर भितर
आसल गाईच्या गोठ्यात, आसल गाईच्या गोठ्यात
घेतली खाटनी वाकळ, गेली घोड्याच्या पागंला
टाकला अंगावला शेला, टाकला अंगावला शेला
हाडबडूनी जागी झाली, हाडबडूनी जागी झाली
कुणी बोटानं खुनविलं, कुणी बोटानं खुनविलं
तेचं बोट मी काढीन, तेचं बोट मी काढीन
कुणी डोळ्यानं खुनविलं, कुणी डोळ्यानं खुनविलं
त्येचा डोळा मी काढीन, त्येचा डोळा मी काढीन
कोणी पदरानं पालविलं, कोणी पदरानं पालविलं
त्येचा पदर मी काढीन, त्येचा पदर मी काढीन
नाही बोटानं खुनविलं, नाही डोळ्यांनं खुनविलं
नाही पदरानं पालविलं, तुमच्या पाठीच्या बहिनीनं
तुमच्या पाठीच्या बहिनीनं, माझ्या कासयी नासविली
तिला वनात नेवावी, रक्त कुंड्यात धरावं
त्यात कासयी बुडवावी, सुर्या किरनी वाळवावी

त्याची घडी बा घालावी, शेल्या पदरी बांधावी
मला आनून दावावी, मग मी येथून उठीन
होय म्हणोनी बोलला, आला वाड्याला निघोनी
आग तू आंबी का ग माता, आग तू आंबी का ग माता
आला बाळीचा सांगावा, आला बाळीचा सांगावा
तिच्या कांताला ग जड, तिच्या कांताला ग जड
तिला नेऊन घालवावी, तिला नेऊन घालवावी
होय म्हणोनी बोलीयीलं, होय म्हणोनी बोलीयीलं
गेली चाट्याच्या आळी, गेली चाट्याच्या आळी
चांगलं चांगलं लुगडं घे तू माता बाई
चांगलं चांगलं लुगडं घे तू माता बाई
आम्हाला परतून येणं नाही, आम्हाला परतून येणं नाही
अशी का ग म्हणतीस तू बाळा बाई
अशी का ग म्हणतीस तू बाळा बाई
सुबान बंधू संगं हाय, सुबान बंधू संगं हाय
बंधू नव्हं तो वईरी, बंधू नव्हं त्यो वईरी
घात करी वाटेवरी, घात करी वाटेवरी
त्येच्या कंबरेला सुरी, त्येच्या कंबरेला सुरी
गेली शिंप्यायाच्या आळी, गेली शिंप्यायाच्या आळी
चांगली चांगली चोळी घे तू माता बाई
चांगली चांगली चोळी घे तू माता बाई
आम्हाला परतून येणं नाही, अशी का ग म्हणतीस तू बाई
सुबाना बंधु संगं हाय, सुबाना बंधु संग हाय
बंधू नव्हं तो वईरी, बंधू नव्हं तो वईरी
त्येच्या कंबराला सुरी, घात करी वाटेवरी

गेली कासाराच्या आळी, गेली कासाराच्या आळी
चांगली चांगली काकणं घाल तू माता बाई
चांगली चांगली काकणं घाल तू माता बाई
आमाला परतून येणं नाही, आमाला परतून येणं नाही
सुबाना बंधु संगं हाई, सूबाना बंधु संगं हाई
त्येच्या कंबराला सुरी, तेच्या कंबराला सुरी
घात करी वाटेवरी, घात करी वाटेवरी
आली वाड्याला निघूनी, आली वाड्याला निघूनी
पाणी बाळीला ठेवीयलं, चांगलं पाणी घाल तू बाई
आमाला परतून येणं नाही, आम्हाला परतून येणं नाही
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
सुबाना बंधु संगं हाई, सुबाना बंधु संगं हाई
बंधु नव्हं तो वईरी, बंधु नव्हं तो वईरी
त्येच्या कंबरेला सुरी, त्येच्या कंबरेला सुरी
घात करी वाटेवरी, घात करी वाटेवरी
चांगली चांगली बुत्ती कर तू माता बाई
चांगली चांगली बुत्ती कर तू माता बाई
आम्हाला परतून येणं नाही, आम्हाला परतून येणं नाही
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
आम्हाला परतून येणं नाही, आम्हाला परतून येणं नाही
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
अशी का म्हणतीस तू बाळाबाई
सुबाना बंधू संगं हाई, सुबाना बंधु संगं हाई

बंधू नव्हं तो वईरी, बंधू नव्हं तो वईरी
त्येच्या कंबराला सुरी, त्येच्या कंबराला सुरी
घात करी वाटेवरी, घात करी वाटेवरी
नेशयिली साडी चोळी, नेशयिली साडी चोळी
कुंकू बाळीला लावीयलं, कुंकू बाळीला लावीयलं
वटी बाळीची भरीयली, वटी बाळीची भरीयली
नंदीवरी स्वार झाली, नंदीवरी स्वार झाली
जातो म्हणोनी बोलईली, जातो म्हणोनी बोलईली
निघाली वाड्याच्या बाहेरी, निघाली वाड्याच्या बाहेरी
निघाली वेशीच्या बाहेरी, निघाली वेशीच्या बाहेरी
लागली वनाच्या मारगी, लागली वनाच्या मारगी
एक वन वलांडीलं, एक वन वलांडीलं
दोन वनं वलांडीली, दोन वनं वलांडीली
तीन वनं वलांडीली, तीनं वनं वलांडीली
चौथ्या पाचव्या वनायाला, चौथ्या पाचव्या वनायाला
आरं तू सुबाना रं बंधू, आरं तू सुबाना रं बंधू
माझी सासऱ्याची वाट नव्हं, सासऱ्याची वाट न्हवं
केळीयाचं बन दाट, केळीयाचं बन दाट
येडी झाली ग बाळा, येडी झाली ग बाळा
चैताच्या उन्हानं झालं तुळशीचं खराटं
चैताच्या उन्हानं झालं तुळशीचं खराटं
तितनं म्होरं झडाकली, तितनं म्होरं झडाकली
आरं तू सुबाना रं बंधू, तान आम्हाला लागली
बान हितंच मारावा, पाणी हितंच काढावं
होई म्हणोनी बोलाईला, होई म्हणोनी बोलाईला

नंदीवीन खाली केला, शेला बाळानं हातरला
झोप बाळीला लागीयली, काढली पळसाची पानं
त्येचा दुरून बनविला
एक दुरून उषाला, एक दुरून पायथ्याला
काढली कंबराची सुरी, शीर बाळीचं उतरीलं
रक्त कुंड्यात धरईलं, त्यात कासायी बुडविली
सूर्या किरनी वाळविली, तिची घडी घातईली
शेल्याच्या पदरी बांधईली, नंदीवरी स्वार झाला
आला वाड्याला निघोनी, टाकला अंगावरला शेला
हाडबडूनी जागी झाली, दावली कासायी आनून
मग तेथून उठयीली, आली वाड्याला निघूनी

## ३

*संग्राहक : आचार्य प्र. के. अत्रे*

मी आठ दहा वर्षाचा असताना आमच्या खेडेगावात दुपारच्या वेळी एक भिकारी आमच्या घरासमोर येऊन गाईवरचे एक गोड गाणे म्हणत असे. मी आणि माझी आई ते गाणे पुन्हा पुन्हा त्यांच्याकडून म्हणवून तन्मयतेने ऐकत असू. इतकी वर्षे झाली त्या गोष्टीला पण अजूनही ते गाणे माझ्या अंतर्मनामध्ये घुमत आहे.

गाई भरून गाईची शिंगे
जशी महादेवाची लिंगे
गाई भरून गाईचे कान
जसे नागवेलीचे पान

गाई भरून गाईचे डोळे
चकचकीत हिऱ्याचे गोळे
गाई भरून गाईचे दात
जसा आंबेमोहराचा भात
गाई भरून गाईची पाठ
जशी पंढरपूरची वाट
गाई भरून गाईचे पोट
जशी कापसाची मोट
गाई भरून गाईची पोळी
जशी रेशमाची मोळी
गाई भरून गाईचे पाय
जशी दुधावरची साय
गाई भरून गाईचा सडा
जसा अमृताचा वडा
गाई भरून गाईचे नाव
भवसमिंदराची नाव

## ४

*संग्राहिका* : सौ. शरदिनी मोहि

(१)

गावा आल्याती गव्हार
गेली जईता पाह्याला
जईता देकीली दिरानं
दीर कुरंदानं दाटला
त्यो ग सभंचा उठला
गेला आपल्या वाड्याला
बोलं आपल्या आईला
आवो आवो मातोसरी
घ्यावी झारी द्यावं पाणी
सासू बोलली सुनेला
अग अग जईता सुनं
घ्यावी झारी द्यावं पाणी
नको आम्हा तिचं पाणी
जईता जोगव्याची राणी
आली वर्साची पंचमी
आई बोलली लेकाला
आरं तूं सुभाना रं बाळा
आली वर्साची पंचमी
जावं जईताला आणाई
तितनं सुभाना उठला

गेला घोड्याच्या पागेला
शेलका वारू शिणगारिला
आला वाड्याच्या भाईरी
लागला वनाच्या मारगी
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली
चवथ्या पाचव्या वनाला
लागलं नगर दिसाया
आला नगरा जवळी
आला वाड्याच्या आत
आवो आवो आत्तीबाई
आली वर्साची पंचमी
आलो जईताला निय्याला
आरं तूं सुभाना रं बाळा
जईता वली बाळातीन
जईता कणकीची केली
पुतळी हळदीची केली
घोड्यावरी बैसवीली
गेला गावाच्या भाईरी
गेला येशीच्या भाईरी
गेला शिवंच्या भाईरी
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली

चवथ्या पाचव्या वनाला
लागली यमुना दिसाया
भाऊ बोलं भैनीला
आगं आगं भैनाबाई
का ग बोलंनाशी झाली
भाऊ बघतो भैनाला
पुतळी हळदीची दिसं
भैना कणकीची दिसं
भाऊ कुरुंदानं दाटला
घोड्यावरनं ढकलीलं
गेला आपल्या वाड्याला
आई बोलली लेकाला
आरं तूं सुभाना रं बाळा
असा का तूं रानभैरी
काय सांगू मातोसरी
जईता आपलीया घरी
जईता पाटंची उठली
दळण दळाया बैसली
पैली पैली माझी ववी
बया माझ्या भागीरतीला
दुसरी दुसरी माजी ववी
पित्या माज्या दौलताला
तिसरी तिसरी माजी ववी
बंधु माज्या राजसाला
चवथी चवथी माजी ववी

भैना माझ्या सुंदरीला
माता पाटंची उठली
आरं तूं सुभाना रं बाळा
माझ्या जईताचा गळा
बाळ सुभाना उठला
हिंडला वं धाई दिशा
जईता दुबळ्याच्या घरी
जईता भावानं देकीली
अगं अगं भैनाबाई
धाय मोकलीती आई
भैन भावानं आणीली
जईता आईला भेटली

( २ )

देवाचा तो देव शंकर
भिल्लिणीला ग भुलला
ऐशी धुरंधर माया
तिनं ठकवीलं देवाला
देव पार्वतीव रुसला
निघून आरण्याशी गेला
हिमाचल पर्वतावरी
जाऊन तपाशी बैसला
इकडं पार्वती विचार करी
विचार आपल्या मनाला

आता समजावूनी येते
शिवशंकराला आणीते
अशा रूपानी जाऊ मी कशी
शाप देईल देव मला
मोरपंकीचा ग घागरा
नेसली टिकली कपाळाला
चोळी लावीली अंगाला
उपराटा बुचडा बांधीला
नाकी मोरणी घालुनी
शिणगार बहुत केला
भिल्लीणी गेली वनाला
पुसत बसली ज्येला त्येला
लोकं सांगती ग तिला
न्हाई सदाशीव दिष्टी पडला
देवाचा देव तो शंकर
भिल्लीणीशी वो भुलला
शंकराचं राज दीन तुला
शंकर बोलला पार्वतीला
माळ घाल गे मजला
राज दीन माजं तुला
पैलीचा लावावा शेवट
मग दुसरीची करा वाट
तुझी बायकू देवा नावानं
मोडीत असंल बोटं
पांयी पैंजण वाजू लागलं

नाद लागला घुमाया
देवानं उघडिले डोळे
पाहिले असे चहुकडे
भिल्लीणीच्या रूपानं ग
देव मोहितच झाला
म्हणे कोण कुणाची तूं
नार सांगशी मजला
आसन सोडुनी उठला
देव भिल्लीणीजवळ आला
तिनं शंभूला झिडकारीलं
नको झोंबुसा बोलली
ऐशी धुरंधर माया
तिनं ठकाविलं देवाला

५

संग्राहक : श्री. ना. रा. किलेकर

आली बाई वर्साची पंचमी
आली वर्साची पंचमी
अरे सुभाना रे बाळा
जा रे बाळाई बोलावू
लोकाच्या लेकी माहेरात
आमची बाळाई सासऱ्यात

अगे अंदी माझ्या माते
अगे अंदी माझ्या माते
कर गे तान्हेयेचे लाडू
कर गे भुकेयेचे लाडू
बांध गे शेल्याच्या पदरी
बांध गे शेल्याच्या पदरी
केलीन तान्हेयेचे तर लाडू
बांधलिन शेल्याच्या पदरी
जा रे सुभाना रे बाळा
जा रे बाळाई बोलावू
लेवला मखमली अंगी
बांधल्यान् जरीचा गे फेटा
नेसला जरीकाठी धोतर
लेवला जरपटी वाहणा
गेला घोड्याच्या पागेत
गेला घोड्याच्या पागेत
घेतल्यान पांढरा ग घोडा
गेला बाळाई बोलावू
पडला वेशीच्या बाहेर
पडला वेशीच्या बाहेर
एक वन ओलांडिलं
गेला दोनव्या वनाला
दोन वन ओलांडिलं
गेला तीनव्या वनाला
बाळाईचं नगर दिसू लागलं

गेला बाळाईच्या वेशी
गेला बाळाईच्या वाड्या
बाळाईची सासू दारी उभी
बाळाईची सासू दारी उभी
घेतलीन उजव्या हाती पाणी
घेतलीन डाव्या हाती पाट
सुभाना दाराशी गे आला
मामी तुम्ही का हो पाणी
आमची बाळाई कुठं गेली
गेली असेल शेणाला
सुभानानं पायसे धुतीलं
आली बाळाई धावून
अरे सुभाना रे बाळा
तुझा पांढरा रे घोडा
बांध रे माझ्या या खांबाशी
काढ वहाणा दाराशी
तुझा जरीचा रे फेटा
ठेव जरा या खुंटीशी
बाळाईनं स्वैयंपाक केला
तिला आनंदसे झाला
अरे सुभाना रे बंधू
चल रे भोजन कराया
सुभानानं भोजनसं केलं
बाळाईनं भोजनसं केलं
चल गे बाळाई गे भैनी

मामी बाळाई पाठवून देवा
अगे बाळाई गे सुने
जा गे बंधू बोलावू आला
जातो जातो गे आक्कानू
जातो जातो गे व्हंजीनू
जा गे बाळाई गे सुने
लौकर परतूनी ये गे सुने
बाळाई बाहेर पडली
गेली वेशीच्या बाहेरी
एक वन ओलांडीलं
गेली दोनव्या वनाला
दोन वन ओलांडिलं
गेली तीनव्या वनाला
तीन वनं ओलांडिली
गेली चौथ्या वनाला
सुभानाचं नगर दिसू लागलं
बाळाई मन भरून आलं
बाळाई गेली वेशीत ग
गेली आपुल्या वाड्या ग
बाळाईची आई दारी उभी
बाळाईची आई दारी उभी
घेतलीन उजव्या हाती पाणी
घेतलीन उजव्या हाती फणी
अगे बाळाई गे लेकी
घे गे पायसे धुवून

बाळाईने पायसे धुतले
तिने आंघोळीसी केली
तिने भोजानासी केले
तिने भोजानासी केले
अगे आंदी माझ्या माते
जाते खेळ खेळायला
जातो नाग बघायाला
जाते झोके खेळायला
खेळाया जात्या लेकी
नेसाया काही नाही
नेस जा वहिनीची गे साडी
लावली माळ्यास गे शिडी
काढलिन वहिनीची गे साडी
काढलिन वहिनीची गे साडी
नेसली वहिनीची गे साडी
घेतलीन लाह्या गे भिजाणे
घेतलीन पानाचा गे विडा
गेली खेळ खेळायाला
गेली नाग बघायाला
गेली सोनाराच्या वाड्या
अगे सोनाराच्या पोरी
चल गे खेळ खेळायाला
चल गे नाग बघायाला
गेली पाटलाच्या वाड्या
अगे पाटलाच्या पोरी

चल गे खेळ खेळायाला
चल गे नाग बघायाला
गेल्या नाग बघायाला
गेल्या खेळ खेळायाला
बाळाई पाळणा खेळू लागली
आला मावेचा पाऊस
भिजली वाहिनीची गे साडी
बाळाई रडोसी लागली
तिच्या हातातला तांब्या
निसटूनी गे पडला
आई मला शकुन झाला
कशाला शकुन लेकी
आपल्या सासऱ्या जायाचा
लावून देवू संगं
मुराळी बंधू हायी
बंधू नव्हे तो वैरी
त्याच्या कंबरेला सुरी
बाळाई भोजन करू लागली
हातचा घास निसटून पडला
आई मला शकुन झाला
कशाचा शकुन लेकी
आपल्या सासऱ्या जायाचा
लावून देवू संगं
मुराळी बंधु हायी
बंधु नव्हे तो वैरी

त्याच्या कंबरेला सुरी
जातो जातो गे आयानू
जातो जातो गे बायानू
जाती व्हय गे तू बाळाई
संगे मुराळी बंधु हायी
बंधु नव्हे गे तो वैरी
त्याच्या कंबरेला सुरी
पडल्या उंबऱ्या बाहेरी
आडवं मांजरसी गेलं
आई मला शकुन झाला
कशा शकून लेकी
आपल्या सासरी जाण्याचा
गेली वेशीच्या बाहेर
आडवं कुत्रंसं गेलं
एक वन ओलांडीलं
गेली दोनव्या वनाला
दोन वनं ओलांडिली
गेली तीनव्या वनाल
अगे बाळाई गे वहिनी
चल गे भोजन करूया
दोघे भोजनासी केलं
बाळाई पाणी पिवूस गेली
तिथंन गेली गे नदीवर
बाळाई पाणी पिऊ लागली
काढल्यान कंबरेची सुरी

घातल्यानं भैणीच्या मानेवरी
उडल्या रक्ताच्या गे धारा
त्यानं खाडीशी धुतली
चांद सूर्यासी वाळविली
बाळाई पडली मरून
झाला चकित सुभान
त्यानं देखिलं निरखुन
तिथं उभं फूलझाड

६

*संग्राहिका* : प्रा. सुमन पाटील

कांडून कूटून केली पंचमी
पंचमीचा लागला डोळा
आणिक आला पोळा साजणीबाई

या ग पोळ्याची आकडी
गणपतीची सोंड वाकडी
साजणीबाई

अग हा गणपतीचा लाडू
लक्षुम्यांना सांगून धाडू
साजणीबाई

अग ह्या लक्ष्मीच्या गाठी
पितरानी केली दाटी
साजणीबाई

अग ह्या पितराचे ताट
दसरा आला गजेघाट
साजणीबाई

अग ह्या दसऱ्याच्या माळा
दिवाळी आली काळंकाळा
साजणीबाई

दिवाळीचा लावते दिवा
सटवाई घेते धावा
साजणीबाई

अग ह्या सटीचा रोडगा
सक्रांत आली कोडगा
साजणीबाई

सक्रांतीचे पुजते सुगड
माव्याची पौर्णिमा आली दुगड
साजणीबाई

माव्याची मळते कणीक
शिवरात्र आली आणिक
साजणीबाई

शिवरात्रीचे सोडते पारणं
शिमग्यानं धरलं धरणं
साजणीबाई

शिमग्याचा उधळला गुलाल
पाडवा आला दलाल
साजणीबाई
पाडव्याची उभारली गुढी
आकीतीनं टाकली उडी
साजणीबाई
आकीतीचा केळी कळस
झाला सणांचा कळस
साजणीबाई

७

---

*संग्राहिका* : सौ. वत्सला मोरे

आकाड बेंदूर पहिली पंचीम
घ्या ग पंचमीचा नाग
गणोबाला आला राग साजनी बाया
घ्या ग गणोबाची खीर
गवरीला भाजी चीर साजनी बाया
घ्या ग गवरीची पोळी
दसऱ्यानं दिली हाळी साजनी बाया
घ्या ग दसऱ्याची घाटी
शिलंगण्याला पडली मिठी साजनी बाया
घ्या ग शिलंगण्याचं सोनं

दिवाळीचं क्येलं लेणं साजनी बाया
ध्या ग दिवाळाची आरती
संक्रात आली रातोराती साजनी बाया
ध्या ग संक्रांतीची वसा
शिमगा राहिला दूर देसा साजनी बाया
ध्या ग शिमग्याची बोंब
पाडवा म्हणतो आलो थांब साजनी बाया
ध्या ग पाडव्याची गुडी
आकितीनं घातली उडी साजनी बाया
ध्या ग आकितीचं आळं
बेंद्राचं काय फळ साजनी बाया

८

---

*संग्राहिका : सौ. शहाबाई पवार*

आन् त्या कुयराचं चांगुलपन
बागबाईचं मागयीनं
बागंमंदी ग वैरायीळ
आंब्या वैला धनी व्हईल
लिंबूळी बसाय टाकी पाट
पेरवानं केली फूट
डाळिंब कुरवली नटं
नारळी बाईला न्हाई वाट

पुरान वाटाती वाधीयीटी
पोळ्या लाटीती चिंबूयीटी
हळदी बाभळीच्या हाती
वराड कोन कोन याचं
आकळनी टाकळनी
डोंगराच्या बाराजनी
हिवर डोलाखाली येतू
शेकंचा त्यो खोडवा घेतू
खैर डोलाखाली येतू
गुळवन्याची चरवी घेतू
तरवाडाचं लई चित
भाताचं त्यो वाडी शीत
निरगुडीची गडबड किती
पोळ्याचं टोपलं तिच्या हाती
पिपरन हासत आली
माजी खीर ग्वाड झाली
पिपळाची लई तारांबळ
पान्याची वाडीतो चूळ
समदं वराड जेवीयीलं
तुमी सर्वी दिसतायी
झिंजारडं का आलं न्हाई
केकतीच्या संगं न्हाई
समदं वराड जेवीयीलं
वड झालाय वरबाप
सई झालीया वरमाई

नवरा झालाया पुंड्या ऊस
नवरी केळीचं फणूस (फणी)
लगीन लागलं झोकायीत

९

संग्राहक : श्री. ना. वि. पांडे

(१)

| | |
|---|---|
| एक होतं कुणब्याचं पोर | कुणब्याचं पोर |
| सकायी उठलं | उठलं गा |
| झाडा झटकासी गेलं | झटकासी गेलं गा |
| मुख मदन केलं | मुख मदन |
| नमस्कार केला सूर्या | नमस्कार केला |
| पायी खडावू टाकले | पायी खडावू |
| खाद्यांवर घोंगड्याची घडी | घोंगड्याची घडी |
| हाती नेतवाची काडी | नेतवाची |
| बैलाच्या कोठ्याशी गेला | बैलाच्या कोठ्याशी |
| त्यायनं नांगर काढला | त्यायनं नांगर |
| त्यायनं नांगर जुतला | त्यायनं नांगर |
| रावण पोहन बैल दोन | रावण पोहन |
| चंद्र सूर्य त्यायच्या झुला | चंद्र सूर्य |
| त्यायचा रेसमी कासरा | रेसमी |
| नंदी धुरीशी जुतले | धुरीशी |

| | |
|---|---|
| वाट मारगी लागले | मारगी लागले |
| आले वावराच्या घुऱ्या | वावराच्या घुऱ्या |
| सुर्यासमोर उभे केले | उभे केले |
| त्यायनं काढवण काढले | काढवण काढले |
| नांगर हाणाया लागले | हाणाया लागले |
| असे तास हाणले पाच | असे तास |

( चाल बदल )

नवलु तुल्या घेऊन धावला
गायकी तुल्याने मारला...गायकी गा
धरणीवर पडला गायकी गा
तो काय पोहन वारा सुटला

( २ )

| | |
|---|---|
| भारीत भारी कुलुप बारी | हरिरामा राघोबा रे |
| मेला सर्प नेला बारी | हरिरामा राघोबा रे |
| इख पडले धरणीवरी | हरिरामा राघोबा रे |
| तय हात्ताचा केला बाण | हरिरामा राघोबा रे |
| लहीयाचा केला दांडा | हरिरामा राघोबा रे |
| बोटायाची केली लाठ | हरिरामा राघोबा रे |
| नाग धरले तीनशे साठ | भगवाना जी ... |
| ते टाकले घाण्यात | भगवाना जी ... |
| त्यायचं काढलं तेल | |
| तेला भरल्या घागरी | |
| नेल्या भिलटेक बाजारी | गा |

त्यायनं पसोरे मांडले गा
तेल घ्या घ्या रे म्हणते
बाया बायाचा बाजार
तेल पुसाया लागल्या रे
तेही तेल बागस्याचे रे
तेल नवकोडी नागाचे
मग त्या नागीणी पद्मीणी
आंग धरणीवर टाकले भगवाना जी ...
आमचे बंधू का मारले
येता दिवायीच्या मास
आम्हा नेईन कोण रे
साडी चोइ घेईन कोण
त्यायनं दऊत कलम बलाऊन
त्यायनं पत्रिका लेहली गा
त्यायनं सरड्या गयाले बांधली भगवाना जी ...
सरडा जाय तू वनस्थयी गा
सरडा तिथून निघाला
आला गायीच्या गोठाणी भगवाना जी ....
हात जोडे त्या देवाले भगवाना जी ....
वाट मारगी लागला हरिरामा राघोबा रे
एक डोंगर चढला हरिरामा राघोबा रे
एक डोंगर उतरता
सरडा गेला पाताळ नगरी भगवाना जी ....
हस्तक बसले सिंहासनी भगवाना जी ....
त्यायची समाधी लागली भगवाना जी ....

गयाची पत्रिका वाचली हरिरामा राघोबा रे
हस्तक फार क्रोधावले हरिरामा वाघोबा रे
सरडा संगाती घेऊन
एक डोंगर चढता
एक डोंगर उतरता
साप आले घाण्याच्या जवळ
मग श्या नागाणी पद्मीणी
गुरू समोर धावल्या
लेट चरणावर मारले
नाग घाण्यातून काढले
खांड खांड जमा केले
त्यायच्या संगं हनुमंत
नळ नीळ रे जांबूवंत
ज्यायचे त्यायचे जोडले
अमृता भरली करंगायी
डावी कणगाई कापली
सर्व्या शेषावर शिपली
शेष सजिवंत झाले हरिरामा राघोबा रे
लेट चरणावर धावले हरिरामा राघोबा रे
हस्तक तेथून निघाले हरिरामा राघोबा रे
एक डोंगर चढता हरिरामा राघोबा रे
दुसरा डोंगर उतरता हरिरामा राघोबा रे
हस्तक गेले सिंहासनी हरिरामा राघोबा रे

# १०

*संग्राहिका :* **कु. अरूणा जाधव**

(१)

शंकरपाळी टीकेट काढी
बीसकीट कोणी खाल्ली
हां हां बीसकीट कोणी खाल्ली
सुजाता सारखा नवरा मिळाला
फोंड्याच्या देशाशी आली
फोंड्याचे वाले बेलबोटम वाले
हवे गे आई मला
हां हां हवे गे आई मला

(२)

पाच होड्यांचा होड्यांचा नाव डोले
पाच होड्यांचा नाग डोले
नाग नाचतो नाचतो आपल्या भूमी
नाग नाचतो आपल्या भूमी
नाग धावला धावला सखूचे घरी
नाग धावला सखूचे घरी
सखूनं मारीली मारीली एकच बडी
सखूनं मारीली एकच बडी
नाग पडला पडला आपल्या भूमी
नाग पडला आपल्या भूमी

सखू धावली धावली वैजावडी
सखू धावली वैजावडी
वैजावडी नाहीसा नाहीसा झाला
वैजावडी नाहीसा झाला
सखू धावली धावली रानात वनात
सखू धावली रानात वनात
सखूनं काढली काढीली भाजीपाला
सखूनं काढीली भाजीपाला
सखू धावली धावली घरी आपल्या
सखू धावली घरी आपल्या

११

संग्राहिका : सौ. रोहिणी जोशी

आली आखाडी सण हांकारी
दुजली पुजली जीवती
नागोबा लिहिला भिंती
नागोबाची केली पूजा
पोवती आली दुजा
पोवतीचं पोवतं घातलं शिरी
कान्होबा देव देखीला दारी
कान्होबाचा केला मानमोळा
सहज आला पोळा

पोळ्याची केली तजवीज
सहज आली काजळ तीज
काजळ तीजेचं दिलं वाण
गणेश मागे आपला मान
गणेशाची ऐकली कहाणी
जेष्ठा आल्या पाहुणी
जेष्ठेस केलं अमृतफळ
अनंत आला खेळत माळत
अनंत पुजून घातला गळा
आड्यावर पितर देखला डोळा
पितरास घातलं जेवू
चला जाऊ राजगुरू पाहू
राजगुरू बसले आसनी
नवमीच्या केल्या सासनी
नवमीचा कुळाचार झाला
सहज दसरा आला
दसऱ्यास मारला वैरी
आसीन आली सामोरी
आसनीची मांडली पारी
सहज आली आठवी
आठवीचा चन्द्र ओवाळी
सहज आली दिवाळी
भावास बहिणी भेटली
तुळसाबाई नेटली ।
तुळशीचं केलं वऱ्हाड

पांडीनं मागितलं बिऱ्हाड
पांडीनं खाल्लं पानपाठी
मग झाली धीट वीट
सनांची झाली विश्रांत
सहज आली संक्रांत
संक्रांतीस खाल्ला गोड घास
मग न्हाली धनुर्मास
धनुर्मास न्हात होती
देव बैसले रथी
महाशिवरात्रीचा केला उपास
धूलीवंदनाचा लागला ध्यास
शिमग्याची केली ऐशी रूढी
नंतर दारी बांधली गूढी

## १२

*संग्राहिका :* सौ. अनूताई लिम

### (१) भवळागाईचे गाणे

साता नंदाचं देऊळ
गाई जन्मिली भवळ
चारा नेहरी[1] चरली
पाणी प्याया उतरली

१. किनाऱ्यावर

देखिली वनीच्या वाघांनी
वाघ —
"खावं खावं भवळा तुला"
"नको खाऊ वाघा मला
घरी माझा डुबा[1] तान्हा
त्याला देईन पहिला पान्हा
मग खा रं वाघा मला"
भवळा वासराकडे गेली
भवळा तेथून निघाली
लागली वनाच्या वाटेला
एक वन वोलांडिलं
दुसऱ्या वनाला लागली
दोन वनं वोलांडिली
तिसऱ्या वनाला लागली
तीन वनं वोलांडली
चौथ्या वनाला लागली
चौथ्या पाचव्या वनाला
डुब्या बाळानं देखिली
तोडलं सोनीयाचं दावं
उपटली रूपीयाची नख
डुबा कोपानं उडाला
जाऊन कासेला भिडला
वाचा फुटली डुबियाला
डुबा —

१. वासरू

"अग अग भवळाबाई
रोजचा पान्हा अमृताचा
आजचा पान्हा रगताचा"
भवळा —
"काय सांगू डुब्या बाळा?
चारा नेहरी चरले
पाणी प्याया उतरले
देखिलं वनीच्या वाघानं
खाऊ खाऊ भवळा तुला
नको नको खाऊ वाघा मला
घरी माझा डुबा तान्हा
त्याला देईन पहिला पान्हा
भवळा डुबा दोघेहि
वाघाकडे गेली गेली
डुबा तेथून निघाला
लागली वनाच्या वाटेला
एक वनं वोलांडिलं
दुसऱ्या वनाला लागली
दोन वनं वोलांडिली
तिसऱ्या वनाला लागली
तीन वनं वोलांडिली
चौथ्या वनाला लागली
चौथ्या पाचव्या वनाला
गेली वाघाच्या जवळी
डुब्या बोलतो वाघाला

डुबा —
आधी खा रं वाघा मला
मग खा रं भवळाला
भवळा —
आधी खा रं वाघा मला
मग खा रं डुबियाला।
वाघ भवळाला खातो –
वाघ किराण[1] साधलं
नरडं भवळाचं फोडीलं
डुबा रडूंही लागला

( डुबा आईवरून गाणे गातो )

माझ्या भवळाची शिंगं
महादेवा तुझी लिंगं
माझ्या भवळाचे कान
नागिली ग तुझे पान
माझ्या भवळाचं कपाळ
आत निजले गोपाळ
माझ्या भवळाचा गळा
जसा तेलीयाचा नळा
माझ्या भवळाची पाठ
जशी पंढरीची[1] वाट
माझ्या भवळाचं पोट
जशी कापसाची मोट
माझ्या भवळाची कास

१. नेम

तिला पिळी रामदास
माझ्या भवळाच्या धारा
सोनियाच्या तारा
माझ्या भवळाची शेप
नागीण टाकी झेप
माझ्या भवळाच्या मांड्या
जशा पालखीच्या दांड्या
माझ्या भवळीचं दूध
जेवण माझं झालंय सूधं
माझ्या भवळाचं दही
जेवण माझं झालंय लई
माझ्या भवळाचं तूप
जेवण मला झालंय खूप
माझ्या भवळाचं ताक
जेवण मला झालंय पाक
माझ्या भवळाचं शेण
सारवील चारी कोनं
माझ्या भवळाच्या गोमुतानं
देव झालं पैतार[1]

### (२) भारजा

"आली वर्षाची पंचम
आत्या[2] मी जाते वारूळाला[3]
सासू—

१. पवित्र. २. सासू. ३. नागपूजेला.

"वेडी झालीस भारजा
मणभर गहू दळायचे
पति वंजाजा[1] जायाचे"
मणभर या गव्हाचा
याचा केला एक घाणा[2]
भारजा—
"आली वर्षाची पंचम
आत्या मी जाते वारूळाला
सासू —
वेडी झालीस भारजा
मणभर साळी सडायाच्या
पति वंजाजा जायाचा"
मणभर या साळीयाचा
याचा केला एक घाणा
भारजेचा शृंगार—
भारजा न्हायाला बसली
भारजा आंघोळ करून उठली
नेसली चक्राचा[3] पाटाव
ल्याली मदमाका काचोळी
ल्याली सर्व अलींकार[4]
ल्याली नवरत्नाचा हार
गेली गावामधी
भारजा—
"वाण्या बामणाच्या मुली

१. विक्री करायला. २. एका बैठकीत दळण उरकले. ३. चक्राकार चित्रांचे लुगडे. ४. अलंकार.

वारूळाला येता कुणी ?
तेल्या तांबूळ्याच्या मुली
वारूळाला येता कुणी ?
साळ्या कोष्टयाच्या मुली
वारूळाला येता कुणी ?
म्हार मराठ्याच्या मुली
वारूळाला येता कुणी ?
भारजा पूजा करते—
साऱ्या सया मिळवून आणल्या
आली आपल्या वाड्याला
घेतल्या थाळीभर लाह्या
घेतलं लोटीभर दूध
घेतला हळदीचा ओंडा
घेतलं नागाला पोवतं[1]
निघाली वाड्याच्या बाहेरी
खेळत गेल्या वारूळाजवळी
भारजानं वारूळ पूजिलं
वाह्यल्या थाळीभर लाह्या
वाहिलं लोटीभर दूध
वाहिला हळदीचा ओंडा
वाहिला कुंकवाचा करंडा
वाहिलं नागाला पोवतं
भारजानं फेरजी धरीला
एक फेरजी फिरल्या

१. श्रावणीपोर्णिमेस देवाला अर्पण करावयाचा दोरा.

दोन फेरजी फिरल्या
तीन फेरजी फिरल्या
चवथ्या पाचव्या फेराला
भारजाचा हार तुटतो
तुटला गळ्यातील हार
भारजानं फेरजी सोडिला
लागली मोती वेचायाला
सया निघून गेल्या घरला
मोती वेचता झाली रात्र
भारजानं मोतीजी वेचिले
वाट मारगी लागली
आली आपल्या वाड्याला
हाका मारली सासूला
"आवो आवो सासूबाई
मला घरामधी घ्यावं"
"आमची कवाडं सायाची[1]
कुलपं निघना तांब्याची
एवढ्या रातचं काय ग काज?
जा माहेरी कर जा राज"

(याप्रमाणे सासरा, दीर, जाऊ यांच्याशी बोलून भारजा तेथून निघाली. पतीच्या महाली जाते पण प्रत्येकाकडून तेच उत्तर मिळाल्यावर वनाच्या वाटेला लागून ती पण माहेरी जाते)

---

१. सागवानी.

भारजा तेथून निघाली
वाटं मारगी लागली
आली वेशीच्या बाहेरी
लागली वनात वाटेला
एक वनं वलांडिलं
दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली
चौथ्या पाचव्या वनाला
आलं भारजाचं माहेर
गेली वेशीच्या आत
गेली बापाच्या वाड्याला
अरं अरं माझ्या बापा
माझा बापची होशील
मला घरामधी घेशील
आमची कवाडं आंब्याची
कुलपं निघंना तांब्याची
येवढ्या रात्रीचं काय ग काज

(याप्रमाणे भारजा आई, भावजय, बहीण या सर्वांकडे जाते व तिला उत्तर मिळते.) अखेर आत्महत्त्या करण्यास निघते—

एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलं
तीन वनं वलांडिल
चौथ्या पाचव्या वनाला

भेटली हत्तीची खिल्लारं
अरं अरं खिलाऱ्यादादा
येवढा शिनगार[1] देते तुला
अंजनडोह दाव मला
"येवढा शिनगार नको ग बाई
अंजनडोह ठावं नाही"

(याप्रमाणे घोडचांची, उंटाची, म्हशींची, बैलांची, गाईची, मेढचांची खिलारं भेटतात व प्रत्येक खिलाऱ्याशी हाच संवाद होतो अखेर–)

तिथनं म्होरंच निघाली
भेटली शेळ्यांची खिलारं
अरं अरं खिलाऱ्यादादा
एवढा शिनगार देते तुला
अंजनडोह दाव मला
"एवढा शिनगार देग बाई
अंजनडोह ठावं हाई"
काढला सारा शिनगार
त्याचं गाठोडं बांधीलं
दिलं खिलाऱ्यादादाला
"तूच जन्माचा मायबाप"
गेली डोहाच्या जवळी
घातली आपली कास[2]
दंडी पदर सावरीला
बांधली केसाची जुडी

---

१. शृंगार. २. कासोटा.

आधी टाकीला खडा
मग टाकिली काडी
मग घातयीली उडी
पंचमी भोवली भारजाला
पराणाचा घात झाला . . .

## ( ३ ) शिवपार्वतीचा डाव

सारंग पाट[1] डोंगरावरी तेथे खेळे भीमाशंकरी
तिथं येवश्या[2] आल्या सत्वरी कळ रचिलाचि फारी
पारवती म्हणतेच शिवा डाव पैजेचा मांडावा
डाव पहिला गीरजेचा नंदा हीराऊनी घेतला
सारंगपाट खेळली गिरजा जिंतिलाची शंभु राजा
धरी शंकराच्या हाताला जावा म्हणती वनवासाला
शंकर क्रुद्धानं[3] दाटला शंकर निघून चालला
मार्गी नारद भेटला हकीगत नारदाला
सारंगपाट खेळली गिरजा जिंतिलाचि संभू राजा
मला म्हणती वनवासाला जावा नारद बोले वचनी
आग लागो द्या खेळाला द्यावी सोडून या गिरजाला
तुम्ही जावं पाशी वनाला धुनी घालुनी बसवा
बारा न बारा वर्सं झाली आठवण झाली गिरजाला
आग लागो या खेळाला धनी कैलासाला गेला
कुणी येवशीन फितवुनी नेला गिरीकंदरी जाऊन बसला
मन्नाचा घट केला[4] वेस[5] भिल्लिणीचा घेतला
चोळी उरफाटी अंगाला बाणाचा भाता पाठीला

१. सारीपाट. २. वेश्या. ३. क्रोध. ४. मन खंबीर केले. ५. वेष.

हाती तीरकमठा घेतला चुन्याची टिकली गालाला
निघाली शोधावयाला रणवन शोधून जीव दमला
हिमंचाल पारवताला गेली त्याच वनाला
शंकर पाहिले दूरचे दूर भिलणीचं हरपलं मन
तिनं शंकर देखिला धुनी घालून बैसला
गेली शंकराजवळी तिनं गायन मांडिलं
तिचं मंजुळ ऐकून शानी नेत्र उघडिलं शिवानी
शिव पाही नेत्र उघडून भिलणीचं चांगुलपण[1]
शंकराचे हरपले मन करी भिलणीशी भाषण
तू हाईस कुणाची कोण वन्नाची भिल्लीण अज्ञान
मी आले तुमच्या कारणं शंकराचे हरपले मन
मागं म्होरं नाही कोण आपण होऊ ग गोसावी
शिवशंकर चैतान[2] झाला हात भिलणीवर टाकला
सोड सोड झिंझाडा दिला भिल्ल हायतं साठ वनाला
मारत्याल आपल्या दोघांला हातात घालून हात
भिल्लीण करी भाषण वाईट तुमचे गुण
पारवतीसारखे रतन तुम्ही आलेत टाकूनशान
दोघांचा मनोरथ पुरला वेस भिल्लणीचा टाकला
पारबती उभी शिवाला निघून गेले कैलासाला

१. सौंदर्याला "चांगुलपण" हा शब्द नेहमी वापरला जातो. २. उत्तान.

## ( ४ ) चंद्रावळी

अड्याल बाओी एक खडी पड्याल बाओी एक खडी[१]
मधी गवळ्याची वाडी त्या गवळ्याच्या दोघी लेकी
राई आणि चंद्रावळी राई दिली कान्हा घरी
चंद्रावळ दिली गवळ्याघरी दोघींची लग्ने लागली
राई गेली कान्हा घरी चंद्रावळ गेली गवळ्याघरी
चंद्रावळ कायच बोलली दहीदूध साठवीलं
तूप लोणी साठवीलं दुधाच्या बासरी[२] भरल्या
जाईन मदुराच्या हाटी[३] त्याचा विकरा करीन
राई बहिणीला भेटीन तवाचं[४] माघारा परतीन
सासू कायच बोलली? "नको ग नको चंद्रावळी
मदुरेचा कान्हा आखाळी[५] नारी पुरूषाच्या भोगितो"
चंद्रावळ ऐकेनाशी झाली दही दूध साठवीलं
तूप लोणी साठवीलं दुधाच्या बासऱ्या भरील्या
आणलं साथीशीनदी[६] ओढलं रेशमी पटाड
घेतल्या सोनीयाच्या मेखा[७] घेतली रेशमांची दावी
तिनं लगडीजी[८] लादिल्या मागं साथीच्या गौळणी
निघाली मदुराच्या हाटा निघाली येशीच्या बाहेर
लागली वनाच्या मारगी एक वनं वलांडिलं
दोन वनं वलांडिली तीन वनं वलांडिली
चौथ्या पाचव्या वनाला नगर दिसू बा लागलं

१. टेकडी. २. चरव्या. ३. बाजाराला. ४. तेव्हांच. ५. अरोगर. ६. घेतला. ७. शृंखला. ८. ओझी.

गेली येशीच्या जवळी "अरं तू येशीराख्या दादा
"आहेस कुणाईचा कोण ? "मी कान्हाचा नोकर"
"तू कुणाईची कोण ?" "मी गवळ्याची चंद्रावळ"
उघड म्हणाली येशीची झडप गेली मदुराच्या हाटा
भरल्या कवलारी पेटी चंद्रावळ निघून चालली
तिनं लगडी उतरील्या नंदी पागेला लाविला
विक्री कराया बैसली
"गवळण मोठी झाक[1] आली
अशीलदान[2] घेऊन या जा"
अग अग तू गवळणी अशीलदान तूं देवावा"
होऊं दे दह्याचा विकरा होऊं दे लोण्याचा विकरा
होऊं दे तुपाचा विकरा उरूं दे बेरी[3]ना वा शेरी
मग घालीन तुझ्या तळहातावरी
उठा साथीच्या गवळणी द्या ग तोंडीच्या तोंडी
उपटा माथीयाची शेंडी धावल्या साथीच्या गवळणी
दिली तोडीयाच्या तोंडी उपटली माथीयाची शेंडी
गेला कान्हाच्या जवळी "आहो आहो तुम्ही कान्हा
नको तुमची चाकरी नको तुमची भाकरी
उठल्या साथीच्या गवळणी दिले तोडीयाच्या तोडी
उपटली माथीयाची शेंडी नगं तुमची चाकरी
नगं तुमची नोकरी"
हिनं दहीदूध विकरा केला हिनं लगडीजी लादिल्या
म्होरं साथीच्या गवळणी मागं साथीच्या गवळणी
गेली येशीच्या जवळी

१. सुंदर. २. जकात. ३. लोण्याची खालची खरवड.

"अरं तू येशीराख्या दादा उघडी येशीची झडप
तू कुणायाचा कोण ?"
"मी मथुरेचा कान्हा अग तू ग चंद्रावळी
नको जाऊ तुझ्या गावाला जा तुझ्या बहिणीला भेटाया
पाणी लोणी घालील बुती भाकरी बांधील
मग तुला वाटं लावील"
चंद्रावळ ऐकेनाशी झाली "माझा गवळी लई खट[1]"
तुझा गवळी मला ठावं शिळं ताक खायाचा
म्हशीमागं जायाचा"
चंद्रावळ ऐकेनाशी झाली निघाली येशीच्या बाहेरी
आली आपल्या नगरीला
कान्हा बोलतो राईला "अग तू राई ग अस्तुरी
सर्वा शृंगार द्यावा मला जातो गोकुळी नाचायाला
बांधू भूक तान लाडू बांधू बुतीची भाकरी"
राईवाणी सुरत दिसू बा लागली निघाला येशच्या बाहेरी
एक वन वलांडिलं दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली चौथ्या पाचव्या वनाला
आडवी शेळ्यांची खिलारं
"अरं तू शेळीराख्या दादा शेळ्यांची खिलारं कुणाची ?"
" चंद्रावळी या बाईची"
चंद्रावळीला सांगा जा राई तुझी बहीण आली"
तेथून म्होरंच निघाला आडवी उंटाची खिलारं
तेथून म्होरंच निघाला पानवाठ्याला आला

---

१. द्वाड

पाणवठ्यांच्या[१] बायानो चंद्रावळीला सांगा
राई तुमची बहीण आली"
गेला तिच्या वाड्याला लाजून बसू बा लागला
गवळी काय च बोलला "चंद्रावळी तुझी बहीण आली
शेज भोज कर जा ग हितगुज बोल जा ग सांगितलं बायकोला

(मग राईरूपी कृष्ण व चंद्रावळ एका पलंगावर झोपतात व कृष्ण आपले रूप प्रकट करतो.)

सहा महीन्यांची केली रात भोग देऊन निघाला
निघाला गावाच्या बाहेर साऱ्या अंगावरले कपडे जाळून
गोसावी ग गेला होऊन युगत लावाया चंद्रावळी
तिच्या कपाळी हात बा लावला गौळी काय बोलता झाला
"चंद्रावळी तुझा नूर का कोमेला दारी तुळस वाळली
काय झाले सांग मला"
काही नाही झालं मला गोसाव्याने युगत लावली
त्याचा हात बा लागला ...

१. पाणोठा.

# १३ गंधारीचा वसा

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

( १ )

कळ नारंदाची खोटी तीन ताळाच्या[१] तळवटी[२]
सोन्याची बिघडली भटी राजअंतरी पडल्या तुटी
कस्तुरीत पडली हिंगाची चिठी वडील गंधारी कुंती धाकली
म्होरं लागलं अस्तीनापूर तिथं काही कैराव चतुर
तिथं नांद कैराव चतुर बंधु एकागळ शंभर
दुष्ट या शंभराची नदर त्यानी काय बसून केला विचार
नाही पाहिलं दूरवरी आता गेली वौसून गंधारी
मर्तकीचा[३] बनविला हत्ती त्याला काय बनवलं सुती
रंग दिला भवयागती जशी काय चित्रं काढली भिंती
लंबी सोंड त्याला शोभती गळ्याघाट सर दोहेरी
आता गेली वौसून गंधारी हत्तीवर घातली अंबारी
अंबारीला खांब सोनेरी सोन्याच्या टिका चमकती वरी
गंधारी बसूनी हौद्यात वान[४] देती नगरनारीला
जाती कुंतीच्या वाड्याला डाव्या पायाच्या अंगठ्यानं[५]
तिनं दरवाजा कुंकू लाविलं शेजेचं उसनं सवाई देणं[६]
नाही दिला तिच्या प्रभु झाला ऊन
बसा घ्या तीळगुळ वसा काय पुसून मातली कळ

१. त्रिताळ-स्वर्ग, पृथ्वी व पाताळ. २. खालच्या भागात. ३. माती. ४. वाण. ५. अपशकुन किंवा अपमान करण्याकरता डाव्या पायाच्या अंगठ्याने कुंकू लावते. ६. शेजारणीचे उसनेदेखील परत करावयाचे असते.

कळ उत्पन्न केली खरी आता गेली वौसून गंधारी
कुंती बोलं धाव श्रीहरी आता गेली वौसून गंधारी
भिवबा बाहेरूनी आला माता का तुझा चंद्र कोमेला
माता भिवबाला बोलती आग लागो तुझ्या चंद्राला
आता गेली वौसून गंधारी मला
भीम म्हणे झाली शिमा[1] तिच्यावरून हत्ती आणीन मी दिमा[2]
भीम गेले जमुनास्थळी तिथं काय जाऊन डगरी[3] ढासळली
बंद झाली कैराव आळी वाट मिळेना झाली हरळी[4]
चिकलाचं बनविलं गोळं चिकलाची गोष्ट नाही बरी
आता गेली वौसुन गंधारी
सडसुध[5] बनाचा बनविला भीम इंगुन[6] वरती गेला
इंद्रजिताला रामराम केला इंद्र थरथरा कापला
भीम काहो येणं केलं हत्तीकारणं येणं केलं
हत्ती डांबेशी बांधला हत्ती[7] दुरून दाविला
त्यांनी धरून आणिला साज मारीला बगलेला
हत्ती डोईवर घेतला मेघ होऊनी वरनं आला
काचबंदी[8] अंगणामधी मातीनं आटा केला
साजासकट हाती झेलला
भीमा म्हणे झाली शिमा माता कसा ग झेलीला
माता म्हणे भीमायाला नऊ महिने वागवीला
पाच ज्योतीच्या पंचात्रीनं[9] मातेनं भीमाला ओवाळला
हत्तीवर घातली अंबारी अंबारीला खांब सोनेरी
सोन्याच्या कडा वरी

---

१. सीमा हद्द झाली. २. डीम-ठमकारा. ३. मोठ्या आवाजात. ४. हरळ मोठा चर. ५. सडा-नाडा. ६. चढून ७. इंद्राचा ऐरावत. ८. कांचेचे तुकडे बसविलेली जमीन. ९. पंचारती.

कुंती बसून हौद्यात वाण काय देती नगरनारीला
वाण देती नगरनारीला जाता गांधारीच्या वाड्याला
डाव्या पायाच्या अंगुठ्यानं तिनं दरवाजा कुंकू लाविलं
शेजेचं उसनं सवाई देणं नाही दिला तेच्या प्रभु झाला ऊन
वसा घ्या तीळगुळ वसा काय पुसून मातली कळ
कळ उत्पन्न झाली खरी आता गेली वौसून गंधारी

(२)

चल ग सये वारूळाला नागोबाला पूजायाला
हळदकुंकू वहायाला ताज्या लाह्या वेचायाला
या ग या गडायिनी या ग या मैतरणी
तेल्या तांबूळ्याच्या बाई वाण्या बामणाच्या बाई
जमूनिया साऱ्याजणी जाऊ बाई न्हवणां
जिथं पाय ठेवू बाई तिथं उठल् दवणा
पंढरपूरचा ग दामाजी सोनार
त्येनं घडविला बांगडीचा जोड
लेग लेग लेकी कशी लेवू सांग दादा
घरी माझ्या नंदाजावा करतील हेवा दावा

(हे गीत सर्व दागिने गुंफून होईपर्यंत असेच लांबते)

अनुक्रम :—

१. श्रीमंत गं. ना. उर्फ आबासाहेब मुजूमदार

२. श्रीमती मालती दांडेकर

३. श्री. राजा यावलीकर

४. श्रीमती कुमुदिनी रांगणेकर

५. श्रीमती राधाबाई कुलकर्णी

# नागपंथी दंतकथा

संग्राहक : श्री. गं. ना. उर्फ आबासाहेब मुजूमदार

## वारूळ

म्हातार देवाचे स्थान पूर्वी शिरापूर या गावाच्या हद्दीत होते. घाटशिरस हे गाव शिरापुराखालचे. ती एक वाडी होती. या गावाची गुरे या देवालयात चरण्यास जात असत. एकदा गुराख्यांना या ठिकाणी एक गाय दिसली. ती कोणाची गाय म्हणून गुराख्यांनी तिचा पुष्कळ तपास केला. परंतु त्याचा शोध लागला नाही. ही गाय नदीकाठी एक वारूळ होते त्याच्या जवळ येऊन बसत असे. दररोज ही गाय गुराखी या ठिकाणी पहात असत. परंतु तिचा तपास लागेना. त्यांनी ही गोष्ट गावात सांगितली. दरम्यान गावातील एका भाविक गृहस्थास दृष्टांत झाला व त्यास देवाने स्वप्नात येऊन सांगितले की, मी या ठिकाणी गुप्तरूपाने राहातो. त्यावरून गावकरी तेथे आले. त्यांनी देवाच्या गुप्तस्थानाचा तपास चालविला. परंतु तपास लागेना. म्हणून ते या गाईपाशी आले व तिला उठविले. ही गाय या वारूळापाशीच का बसते अशी त्यांना साहजिकच शंका येऊन त्यांनी ते वारूळ फोडण्यास सुरुवात केली. त्यावर कुदळ टाकताच त्यातून दुधाची धार निघाली. मग गावकऱ्यांनी हेच देवाचे गुप्त स्थान आहे हे ओळखून ते वारूळ मोकळे केले. ते दगडाचे होते. त्याच्या माथ्यावर गोपद्माच्या आकाराचा एक खळगा असून तेथून ही धार निघत आहे, असे त्यांच्या दृष्टीस पडले.

## नागीण व नागकूळ

नाथपंथाच्या योगपरिभाषेत कुंडलिनी शक्तीस नागिणी, सर्पिणी, अशी नावे दिली आहेत, "ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्य चक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ।। जे शून्यलिंगाची पिंडी ।

जे परमात्मया शिवाची करंडी । जे प्रणवाची उघडी । जन्मभूमी ॥" (ज्ञानेश्वरी ६.२७२–७३ ) अशी ही जगदंबा नागीण सर्पीण अशा नावाने उल्लेखलिली आहे. "नागिणीचें पिलें । कुंकमें नाहलें । वळण घेऊनि आलें । सेजे जैसें ।। तैशी ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली असे ॥" ( ६.२२२-२३ ) हे ज्ञानेश्वरीचे वर्णन आहे. ही नागीण जेथे शेजेस येते, जेथे निद्रा करते, त्या स्थानास "वारूळ" हेच नाव यथार्थ होय. गोरक्षसिद्ध-सिद्धान्तपध्दति या ग्रंथात शक्तिचक्राचे वर्णन देताना कुंडलिनीसह शक्ति–पंचक सांगितले आहे व त्यांना धारण करणारा तो परमशिव असे शिव स्वरूप दर्शविले आहे. शक्तींना नागीण हेच नाव असल्याने त्या नागीणी ज्या स्वरूपात वास्तव्य करतात त्या परमशिवास "वारूळ" म्हणणे युक्त होईल. या दृष्टीने पाहिल्यास वारूळ हे नाव ही नाथपंथी शब्दकूट ठरते व तेच नाव प्रथम गोस्वामीने दिले होते. मच्छेंद्रनाथांनी ते बदलून म्हातारदेव हे नाव रूढ केले.

## नागपंचमी

वास्तविक यात नागपूजेचा संबंध असावा असे दिसत नाही. या प्रांतात नागपंचमीस नेहमी नागरपंचमी म्हणतात व तेच नाव यथार्थ आहे. ही नागाची पंचमी नसून नागरांची पंचमी आहे. आदिमायेच्या निरनिराळचा शक्तीस नाथपंथाने नागिणी, सर्पिणी, नागकन्या, सर्पांची पिले इत्यादी नागकुलदर्शक नावे दिली आहेत. ही सर्व सांकेतिक नावे असून योगपरिभाषेप्रमाणे त्यांचा अर्थ करावयास पाहिजे. तेथे नागाचा अगर सापाचा मुळीच संबंध नाही. मुळारंभी नाथपंथी स्वतःस नागर म्हणवीत असत. त्या शब्दामुळेच "नाथ-संकेतीचा दंश" निर्माण झाला. गोरक्षनाथांनी हे नामाभिधान बदलून त्यास हेमाळरूप दिले. नगरात राहणारा तो नागर असा जरी अर्थ असला तरी नाथ-पंथी संकेतात विरुद्ध अर्थ करण्याची प्रथा मुळारंभी असल्याने नाग म्हणजे पर्वत, त्यात राहणारे ते नागर, असा सांप्रदायिक अर्थ आहे. हे गूढ उकलले म्हणजे नागरपंचमीचा उलगडा होतो. ती नाथपंथी योग्यांची पंचमी आहे. ते नागरकुळ ज्या वारूळात अधिष्ठित झाले, ज्याने त्यास आश्रय दिला, त्या

वारुळाची आदिशंकराची ती पंचमी आहे असे म्हणावे लागते. मूळ वारूळ गोस्वामीने प्रगट केले. त्यासच मच्छेंद्रांनी "म्हातारदेव" हे नाव दिले. परंतु त्या वारूळाच्या प्रीत्यर्थ जो सण सुरू झाला तो अद्याप घरोघर पाळण्यात येतो. त्या वारूळातील नागकुळास अद्यापही गोमाऊलीचे दूध पाजण्यात येते. मूळ रहस्य मात्र लोपले.

## नागपंचमी

*संग्राहिका : श्रीमती मालती दांडेकर*

नागपंचमीचा सण महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. नागाला देव समजून त्याच्या रांगोळीच्या आकृति रेखतात वा मातीचे नाग करून त्यांची पूजा होते. याबद्दल एक कहाणी आहे ती अशी——

पूर्वी एका शेतकऱ्याने जमीन नांगरली, तेव्हा नांगराचा फाळ लागून एका नागाची पिल्ले मृत्यू पावली. नाग खूप संतापला. नागिणीला तर इतका राग आला की, ती रात्री पाताळातून वर आली व तिने शेतकऱ्याच्या घरातल्या सर्व मंडळींना ती झोपेत असतानाच दंश केला व बिचारे ते कुटुंब मृत्यू पावले. यातली एक मुलगी मात्र लग्न होऊन सासरी गेली होती. नागासारखा डूक धरणारा कोणी दुसरा प्राणी नाही. नागीण त्या मुलीलाही मारायला तिच्या सासरगावी गेली. पहाते तो काय ? त्या मुलीने नागांची पूजा केली होती व त्यांच्या पुढे दूध ठेवलेले होते. नागिणींचा कोप शांत झाला व तिने त्या मुलीला शेतकऱ्याचा अपराध व आपण त्यांना दिलेला मृत्युदंड याची सगळी हकीकत सांगितली. मुलीने नागिणीची प्रार्थना केली व त्यांना जीवदान दे म्हणून वर मागितला. तशी नागिण खूष झाली व तिला अमृत दिले. ते सिंचन करताच तिचे माहेरचे लोक सजीव झाले. हा दिवस नागपंचमीचा होता. तेव्हापासून लोक नागपूजन करू लागले.

नागपंचमीची दुसरीही एक कहाणी आहे ती अशी—

आटपाट नगरात एक ब्राह्मणास पाच सुना होत्या, श्रावणात सासुरवासी मुलींना माहेरचं बोलावणं येताच वडील चौघीजणी सुना आपापल्या माहेरी गेल्या. कुणाचा काका तर कुणाचा मामा, कुणाचा भाऊ तर कोणाचा भाचा त्यांना न्यायला आले होते. धाकटी सून, तिला माहेरचं कोणीच नव्हतं. तिला न्यायला कोण येणार अन् कुठे नेणार? नागपंचमीच्या दिवशी बापडी वाईट वाटून घेत होती. मनात म्हणत होती.—

माझे आप्त, नातेवाईक सगळे काही नागदेवच आहेत. तो मला न्यायला येईल. मनात ती नागाची प्रार्थना करीत होती. ती ऐकून नागराज शेषाला खरोखरच या मुलीची दया आली. त्यानं ब्राह्मणाचा वेष घेतला व मी तुमच्या सुनेचा मामा, तिला माहेरी न्यायला आलो असे ब्राह्मणास सांगितले. सूनही हा मामाच आहे म्हणाली. तशी ब्राह्मणाने तिला शेषाबरोबर पाठवून दिले.

नागाने खरोखरच तिला आपल्या घरी नेलं, माहेरपणही नीट केलं. सर्वांना ताकीद दिली की, ही माझी मानलेली मुलगी. हिला कुणी चावू नका. तेथे ती आनंदाने राहिली.

एकदा हिच्या हातून हातातला दिवा खाली पडला व नागिणीची नुक्ती जन्मलेली दोन पिल्लं, होती त्यांची शेपटे भाजली. नागीण रागावली पण शेषाने तिची समजूत घालून, द्रव्य वगैरे देऊन मुलीची सासरी पाठवणी केली. पिल्लांची शेपटे मात्र तुटून पडली.

मोठेपणी पिल्लांनी चौकशी केली, आमची शेपटे तुटली कशानं? त्यांना सगळं नागिणीनं सांगितलं. ती दोन्ही नागपिल्ले आता चांगले मोठे नाग झाले होते. खूप राग आला त्यांना व त्याचा सूड घ्यायला ते ब्राह्मणाच्या घरी आले.

आणि काय गंमत बघा. तो दिवस नागपंचमीचाच होता. धाकट्या सुनेनं नागमाहेराची आठवण ठेवून पाटावर, भिंतीवर, नागांच्या रांगोळ्या काढल्या होत्या. पूजा केली होती. फुटाणे लाह्या व दूध यांचा नैवेद्य दाखवला होता. उकडीचाही नैवेद्य दाखवून ती म्हणत होती–"जय नागदेवा जेथे माझे दोन्ही लहान नागभाऊ लांडोबा पुंडोबा असतील तिथं खुशाल असू देत!" ही प्रार्थना ऐकताच नाग राग विसरले. लांडोबा व पुंडोबा म्हणजे तेच दोघे! त्यांनी तेथे रात्री वस्ती केली, पूजेतले दूध प्राशन केले व पहाटे दुधाच्या भांड्यात नव-रत्नांचा हार ठेवून ते परत गेले. मुलीला सारं कळलं. तिला नागदेव प्रसन्न झाले होते.

तेव्हापासून नागपंचमीला नागपूजन करण्याची रीत चोहोकडे फैलावत गेली. ती आजही दिसून येते.

## भोगाचे नागमंदिर

*संग्राहक : श्री. राजा यावलीकर*

कथा ही भोगाची. भोगामधल्या त्यागाची. त्यागातल्या भव्य दिव्य नाग-मंदिराची.

हजारो वर्षांपूर्वीची कथा. बारसपूर नगरीत एक गरीब भोगा आला. व्यापार करून तो भीक्षाधीशाचा लक्षाधीश झाला. दहापाच मळ्याचा मालक बनला. लोक त्याला भोगाशेठ म्हणू लागले. त्याने रहाण्यासाठी मोतीमहल बांधण्याचे योजिले. नगरीतला एक मोठा जुनावाडा खरेदी केला. मोतीमहला-साठी जुन्या वाड्याची पाडापाड सुरू झाली. वाड्यात होते मोठेसे वारूळ. वारूळ म्हणजे नागोबाचे राऊळ. राऊळ पाडावे कसे? पण भोगा म्हणाले असे, वारूळ मुळासकट पाडा नि तिथेच माझा दिवाणखाना करा खडा!" झाले!

वारूळावर घाव पडू लागले. अनेक नाग पिले नाग ठेचले गेले! इकडे तिकडे सगळीकडे नागाचे तुकडेच तुकडे! मोतीमहल बांधला. दिवाणखाना सजला. तिजोरी ठेवली नि भोगाची स्वारी गादीवर बसली. तिजोरी उघडली. तिजोरीत नोटांची पुडकी म्हणजे नागांची वळवळती मुंडकी! तिजोरीतील रोकड म्हणजे फणाधारी खवळलेले नाग फक्कड! गादीवर बसले तरी अंगाला चावे कसले? अंगाची आग का? भोगाला काही सुचेना, काही रूचेना! अन्नपाणी गोड लागेना, कसल्याशा चिंतेने मनोमनी जळू लागला. एक दिवस तो एकांतात पुरोहितास म्हणाला, "माझी अशी का दशा?" पुरोहित म्हणाले, "तुम्ही कारण झालात नागांच्या नाशा. आता मोतीमहलाला लाजवील असे नाग मंदिर बांधा, सुवर्णाचा कळस सांधा म्हणजेच सरेल ही बाधा. एवढे करा आधी म्हणजे तत्क्षणी संपेल ही व्याधी."

भोगाने लाखो रूपये वेचले नि वैशिष्टयपूर्ण नागमंदिर उभारले. नागदेवास वेदोक्त प्रस्थापिले. नागराजा की जय बोलिले! तेव्हाच त्यांचे हाल संपले. सुखी झाले. अलोट धन वाढले. दिवाणखान्यात भोगा बसे नि ते नागमंदिर दिसे. नागदर्शनाशिवाय एक क्षणही जात नसे. आजही नगरीतील वृद्ध भाविकजन या मंदिरी नागदेवासमोर नतमस्तक होतात, तेव्हा मनोमन बोलतात की, हेच भोगाच्या भोगातून साकारलेले नागमंदिर! भोगमंदिर होय! नागदेव की जय! भोगदेव की जय!! ...

## श्रावण मास

*संग्राहिका : श्रीमती कुमुदिनी रांगणेकर*

श्रावण महिना हा निसर्गाचा मोठा लाडका महिना आहे. पावसाळा सुरू झाल्याला दीड दोन महिने झालेले असतात. त्यामुळे चहूकडे कसे हिरवेगार दिसत असते! इंद्रधनुष्यात दिसणाऱ्या मुख्य सात रंगात हिरवा रंग हा

डोळ्यांना सुखविणारा असतो. म्हणूनच जिथे तिथे हिरवेगार दिसले की, डोळ्यांना सुख होते आणि मनाला आनंद वाटतो.

सृष्टित सगळीकडे जणू उत्साह भरलेला दिसतो. आणि म्हणूनच की काय, ह्या महिन्यापासून आपल्या सणांनाही बहर येतो.

शिवाय, श्रावण हा फार पवित्र महिना मानला जातो. चातुर्मासाच्या चार महिन्यातला हा विशेष महत्त्वाचा महिना.

ह्या महिन्यामधला पहिला सण नागपंचमीचा आहे. श्रावण शुद्ध पंचमीला तो येतो. या दिवशी घरोघर नागाची पूजा करतात. लहान मुले मातीचा किंवा पिठांचा नाग तयार करतात. आणि मोठी माणसे वारूळाजवळ जाऊन नागाची पूजा करतात किंवा गंध, हळद, कुंकू, चंदन, केशर ह्या पाचांच्या मिश्रणाने पाच फडी नाग पाटावर काढून त्याची पूजा करतात. "नागोबाला दूऽऽध" असे ओरडत गारूडी त्या दिवशी गावातून हिंडतात नि घरोघरी माणसे नागाला दूध, लाह्या व पैसा देतात. कथा सांगतात. त्यापैकी एक कथा अशी ––

श्रीकृष्ण आपल्या सवंगड्याबरोबर खेळत असताना त्याचा चेंडू यमुना नदीच्या कालिया डोहात पडला. आणि तो काढण्यासाठी म्हणून कृष्णाने डोहात बुडी मारली. वास्तविक त्या डोहातील कालिया नागाच्या विषाने तेथील पाणी विषारी झाले होते तेव्हा कालिया मारून हे विष नाहीसे करण्याचा कृष्णाचा बेत होता. पण एकदम कालियावर चाल करून जाणे त्याला आवडेना. म्हणून त्याने आपला चेंडू डोहात टाकला आणि तो काढण्याचे निमित करून त्याने डोहात उडी मारली व कालियाला जिंकले.

कालिया नागाच्या फडेवर उभ्या राहिलेल्या कृष्णाला पाहून गोकुळातल्या लोकांना वाटले की, कालियाने कृष्णाला संभाळून वर काढला आणि त्यांनी मोठ्या आदराने त्या नागाला दूध पाजले व त्याची पूजा केली. तो श्रावण शुद्ध पंचमीचा दिवस होता. म्हणून त्याला नागपंचमी म्हणू लागले व त्या दिवशी नागोबाची पूजा करण्याची पद्धत सुरू झाली.

*श्रीमती राधाबाई कुलकर्णी*

एक होता गरीब ब्राह्मण. त्याला एक मुलगी होती. तिला दिली सावकाराच्या घरी. त्याला चौघीजणी सुना. चौघी माहेरी गेल्या. हिला माहेर नव्हतं. तिला वाईट वाटलं. देवानं मला एकतरी भाऊ दिला असता तर मी पण माहेरी गेले असते म्हणाली. मग भिंतीवर नाग काढून तिनं पूजा केली. म्हणाली, "देवी, देवी मला एक भाऊ दे." नाग संतुष्ट झाला. ब्राह्मणाचं रूप घेतलं. हिच्या सासरी आला. म्हणाला, 'बाळ दार उघड' हिला वाटलं कोण आलं? ना आई ना बाप, ना भाऊ ना बहीण. कोण आलं? बाळ म्हणालं? पडली कोड्यात. पुन्हा आवाज आला. दार उघडलं, पहातेय तर दारात ब्राह्मण! माहेरी चल म्हणतेला! ही हारखली. माहेरी गेली. नागानं रूप टाकलं न् बिळात शिरला. "मागं ये" म्हणाला. ही घाबरली, पण तशीच गेली. तर नागीण बाळंतीण झालेली नागीण म्हणाली, "दिवा धर" हिनं तसं केलं. बघतेय तर नागमुलं वळवळ करतेली. ही घाबरली. दिवा पडला खाली! नाग मुलांची शेपटं जळली.

होता होता ही मुलं मोठी झाली. म्हणाली, नागाला शेपूट, आईला शेपूट आम्हाला का नाही? तशी झालं गेलं सांगितलं. ह्यांना राग आला. सूड घेतो, म्हणून निघाले. लांडोबा पुंडोबा ही नाग मुलं रागावली. जाऊन दंश करून मारून टाकतो म्हणाली.

इकडे ही न्हाऊन धुवून पंचमीला पूजेला बसलीवती. गंधाचे नाग काढले होते. (नाग, नागीण, लांडोबा, पुंडोबा) दूध, लाह्या, फुलं. हात जोडलेवते. प्रार्थना केली, " माझे आईवडील, लांडोबा, पुंडोबा सुखी असू दे. जिथं असतील तिथं, देवा त्यांना सुखी ठेव." इतक्यात नागमुलं नागरूप टाकून माणसाचं रूप घेऊन आत्या आत्या करीत आली. अशानं असं आहे म्हणाली. हिला आनंद झाला. पूजा पाहून खूष झाली. राग गेला. संतुष्ट झाली.

दूध तूप प्याली. लाह्या घेतल्या. खोबरं खाल्लं. नमस्कार करून गेले. नागिणीला झालं गेलं सांगितलं. चावलो नाही म्हणाले. आनंदी आनंद झाला.

# सकरू बुवा

संग्राहक : डॉ. मधुकर वाकोडे

श्रावण येतो तोच मुळी आपले गणगोत घेवून. सोबत आनंद अन् उत्साह लेवून. एखाद्या गारूड्याप्रमाणे तो आपला पुंगीपेटारा घेवून येतो. त्या पुंगीवर तो सर्वांना डोलवितो. विशेषत: तो त्यांना बावाजी सारखा वाटतो आणि तोही त्यांना न कुरबुरता आपल्या कडेखांद्यावर मनसोक्त खेळू देतो.

श्रावणाचे आगमनच मुळी बुलढाणा जिल्ह्यातील घाटमाथ्याला मोहून टाकते. तो येण्यापूर्वीच त्याच्या स्वागताची जंगी तयारी चाललेली असते. कुवारपोरीपासून लेकूरवाळीपर्यंत त्याची आतुरतेने वाट पहात असतात. कारण येणाऱ्या नागपंचमीस सकरूबुवाभोवती फेरावरची गाणी गावयाची असतात.

सकरूबुवा हा नवसाचा. जिच्या घरी नवसाला देव पावला तिच्या घरी हा सोहळा. वारूळाची माती आणून कुंभाराकडून सकरूबुवा घडविला जातो. साधारणत: पाटावर एक किल्ला बांधतात. त्याला चार कोपऱ्यावर चार बुरुज असतात आणि त्यांनाच दीपमाळाही म्हणतात.

किल्ल्यावजा मखरात दिवा पेटविलेला असतो. आत खोंड्यावर बसलेली सकरूबुवाची मृण्मयमूर्ती असते. या प्रतिकात्मक सकरूबुवाभोवती बाया फेर धरतात आणि गाणी गातात. या गाण्यामध्ये विशेषत: शिराळराजा, चांगुणा-राणी व चिलीया बाळाची कथा गुंफलेली असते. आणि त्यामुळेच शिराळाचे सकरूबुवा असे अपभ्रष्ट रूप बनले असावे असे कित्येकांना वाटते.

सकरूबुवा किंवा सकरोबा दुसरा तिसरा कुणी नसून नागभूषणे धारण केलेला शंकर होय. पशूपती व गणपती ह्या नागकुळांच्या प्राचीन देवता असल्याने नागपंचमीस शंकराची प्रतीकात्मक पूजा होणे स्वाभाविकच वाटते.

घोड्यावर आरूढ झालेला व नवसाला पावणारा हा शंकर मोठा अपूर्व वाटतो. वीर देवतेसारखी त्याला प्रतिष्ठा लाभलेली दिसते.

वातावरण चैतन्याने फुलून गेलेले असते. सृष्टी एक प्रकारच्या लयबद्ध-सुरांनी आकर्षित झालेली असते. गावातील झाडांना पाळणे टांगले जातात व दुपारपासून बायांची झोके घेण्याची धमाल उडते. लयीतच झोका वर चढतो आणि गाण्यांची रिमझिम बरसात सुरू होते अन् एखादी तरूणी झोका घेता घेता सूर धरते.

आली वर्साची पंचमी
बाई मी खेळायला जाते
काय नेसून जासील बाई
नेते भाभींची कासई

खेळायला जाण्याकरिता साऱ्या सुवासिनी नटलेल्या असतात. ह्यावेळी त्या शेलक्या अलंकारांनी मढून गेलेल्या असतात. एखाद्या कुवार पोरीला आपल्या वहिनीचे महागडे पातळ नेसायचे असते. ती वहिनीकडे मागणी घालते. पण वहिनी वेगवेगळी कारणे सांगत सुटते. अशा आशयाचे गीत वातावरण भारून टाकते –

भाभी भाभी कासई द्याना
मांडी उट्टे फिरून याना
भाभी भाभी कासई द्याना
खुटीवर पडली घेवून जाना
हात नाही पुरत काढून द्याना
भाभी भाभी कासई आना

कुणाचा किनरा आवाज, कुणाचा मंजूळ आवाज. चैतन्याचा नुस्ता पूरच! अशा प्रकारे गीतांची खैरात चालते. सकरूबुवाच्या गाण्याच्या पुन्हा रात्री तालमी.

पंचमीच्या दुसऱ्या दिवशी सकरूबुवाचा उत्सव. हा उत्सव म्हणजे परंपरेचा महोत्सव.

दुसऱ्या दिवशीची दुपार झालेली असते. वायकांचा साजशृंगार सुरू होतो. उंची उंची शालू नाटचा बाहेर पडतात. सौंदर्याची मूर्तिमंत स्पर्धाच. सकरुबुवाच्या भोवती बाया हातात हात घालून फेर धरतात नि हळूहळू गाणे गात गोल गोल फिरू लागतात. जसजसा गाण्याचा सूर चढत जातो तसतसा त्यांचा नूरही बदलत जातो. अशावेळी त्यांच्या अंगात एक आगळाच उत्साह संचारलेला असतो.

वातावरण मंत्रमुग्ध होवून जाते. घराच्या छपरावर बसलेली वानरेही हा खेळ पाहण्यात तल्लीन झालेली असतात ! खेळता खेळता एखादी दमून गेलेली असते नि –

खेळून खेळून दमले ग सई
कुकाचं बोट अंजन नाई

त्यातील एखादी कमी झाली की दुसरी ती जागा भरून काढतेच. आणि

हिरवी हराळी पिवळे ठसे
गिरजाई म्हन्ते माहेर दिसे
दिसला ग दिसला सोनारवाडा
गिरजाई म्हन्ते तोडे घडा
आता कायले लेवू ग आई
शिराळ राजा चालत न्हाई

अशी सूरावट छेडली जाते. अलिकडे मात्र ह्या फेरात पारंपारिक गीतांची पिछेहाट होत असून बाजारू गीतांची चलती होत आहे !

यावेळी कुणीतरी गीताचा पदर धरते––

उंच कपाळ नासिका सरळ भुवया कमानीदार
बाई मला लागले देवाचे ध्यान
राम येईना, चैन पडेना, सुचला नाई काम
बाई मला लागले देवाचे ध्यान
रामलक्ष्मुन तिसरी सीताबाई, पुढे चालले हनुमान
बाई मला लागले देवाचे ध्यान
पानोपानी हरीनाम, बाई मला लागले देवाचे ध्यान

वाऱ्यावर झाडं डोलावीत तशा बायका आता डोलू लागतात. परमेश्वराच्या सानिध्यात गेल्यानंतर जो साक्षात्कार होतो तो त्यांना होत असावा. गीतांची अखंड झाडी लागलेली असते. एवढ्यात कुणी सकरूबुवाची तुळस गाऊ लागते.

वृंदावनी तुळस हरी सांग कुणी लावली
वारीयाच्या झुळकीनं हळूच डोलली

तुळस डुलो अथवा न डुलो ऐकणारा मात्र निश्चितच डोलू लागतो. नाग बीन वर, माड वाऱ्यावर तशा सुंदर सूरावर मंद मंद डोलू लागतात. आणि–

अंजनीच्या पोटी बाळ जन्मले जग जेठी
कटी सोन्याची लंगोटी मुखी राम राम
नको जावू रे मारोती थोडा थांब थांब
जाऊ म्हनतो लंकेभेटी सीता माऊलीसाठी
तिथं राक्षसांची दाटी फार घान् घान्
रावणाची मंडोदरी तिथं गेले ब्रह्मचारी
सीता रत्न गेले चोरी कुठे ठेविले सांग सांग

अशा कथागीतांनी वातावरण निर्मिती झालेली असते. त्यामुळे हळूहळूच शिराळाची कथा आकार घेवू लागते.

देव आले रूशीकेशी
आले सब पायासी
बोले चांगुना मनासी
एक पुत्र आहे तुज त्याचे घालावे भोजन
बाळ कांडून कुठून त्याचे केलं शिवभोजन ...

कंठ गहिवरतात–फेरी झडतात आणि चांगुणेच्या कथा पाडारतात—

तिन योग झारे पवळीला
चांगुना अस्तुरी ग त्याला
बाळ चिलिया वंशाला
कापून पुत्र फराळ केला
सैपाक निरमळ
भोजनास बसले घननीळ

अशा गीतांच्या फेरी झडता झडता दिवस मावळतीकडे झुकलेला असतो. नंतर सुरु होते तयारी ती सकरूबुवाला बोळवण्याची. सकरूबुवा जातो तो वाजत गाजत. मारोतीच्या देवळापुढेही फेर धरला जातो. आता दिवस जरी मावळलेला असतो तरी बायकांचा उत्साह मात्र मावळलेला नसतो. सकरूबुवाची बोळवण सुरू होते.

आला श्रावण शुद्ध महिना
माझा पितांबर झाला जुना
घडी पैठणीची आना

रात्र झालेली असते. बत्त्या पेटविल्या जातात आणि उजेडात बायांचे चेहरे पुन्हा उजळून निघतात. मग –

धुरपती म्हने बंधू भगवान
देवा करते बोळवण

लुगडं न् चोळी मेहकरीची बारीक शेळी
दृष्टीसृष्टी घालून घडी खांबाताची चोपडी

अशा थाटात नदीवर सकरूबुवाची बोळवण होते. परंतु अजूनही बायांचा उत्साह संपलेला नसतो, त्या दिवशी त्यांच्या अंगात एवढा जोम असतो !

माघारी जाताना ज्याच्या ज्याच्या घरासमोरून त्या जातात त्यांची थट्टेनं टिंगल करण्यासही त्या कमी करीत नाहीत !

खेळून खेळून दमले ग सई
कुक्राचं बोट अजून जाई
कुकाचा बैल खरेदी केला
गावचा पाटील जामीन दिला
देनं आलं म्हणून पळून गेला

असा हास्याचा कल्लोळ उठतो. थट्टेची कारंजी थुईथुई उडतात. पण अशा प्रसंगीही त्यांना सकरूबुवाची आठवण हैराण करून सोडते. बायांचा स्वभावच भारी हळवा. आठवण उफाळते––

खडे बाई खडे या वाटेनं गेले माया शिराळाचे घोडे
झिलप्या बाई झिलप्या या वाटेनं गेल्या शिराळाच्या पालख्या
खूट बाई खूट या वाटेनं गेले माया शिराळाचे ऊट

बायांचा तांडा यजमानीन बाईच्या घराकडे वळलेला असतो. ज्याच्या घरचा नवसाचा सकरूबुवा असेल त्याच्या घरी ह्या उत्सवानिमित्त जेवण असते. त्यावेळी जेवतानाही एखादीला गाण्यांची तल्लफ येतेच–

आठवं आठवं दाळ ग
निठवं निठवं गहू ग
जेवन झालं बाई ग
राजगुरूच्या घरी ग

# शिराळशेठ (अल्ली बस्साप्पा)

संग्राहिका : सौ. सुमन रमेश गंजीकर

चिखलाच्या चकत्या एकावर एक ठेऊन त्याला वरच्या बाजूला निमुळता आकार द्यायचा. वरच्या बाजूला त्याला नाक डोळे, तोंड या सर्वांचा आकार द्यायचा. डोळे म्हणून करंट्याच्या वेलाच्या बिया लावून त्याला काजळ लावायचे. सर्व भागाला झेंडूची लहान फुले टोचून त्यांचे पूर्ण शरीर झाकून टाकायचे, त्याच्या समोर रांगोळ्या काढायच्या. मग सर्व मुलींनी धरून एकादा पदार्थ आणायचा व त्या सर्व पदार्थांचा नैवेद्य शिराळशेटला दाखवून आरती, धुपारती म्हणायची, निरांजनानी ओवाळायचे आणि मग हा प्रसाद सर्व मुलींनी वाटून खायचा.

ह्या शिराळशेटची सुरवात बेळगावाकडे दीपावलीच्या नरकचतुर्थीपासून होऊन त्याची सांगता देव दीपावली म्हणजे मुख्य दीपावलीच्या महिन्यानंतर पर्यंत चालते व देव दीपावलीला तो शिराळशेट वाजत गाजत नेऊन नदीमध्ये विसर्जन करण्यात येतो. हा कुमारीकांचा एक आवडता सण आहे.

(१)

अप्पारती धुपारती कालच्या रात्री करीयाती<br>
शिरी गौरा केल्यानी कौल केल्यानी कौल<br>
तुझे पैंजन माझे पैंजन ठेवल्या घरी नेल्या चोरी<br>
संग सग्याच्या (नवरा) भंग मोत्याच्या<br>
हिरवी साडीसे लालू मैना घुम्मासे घालू घुम्मासे<br>
अप्पारती धुपारती कालच्या रात्री करीयाती<br>
शिरी गौरा केल्यानी कौल केल्यानी कौल<br>
तुझे तोडे माझे तोडे, ठेवल्या घरी नेल्या चोरी

संग संग्याच्या अंग मोत्याच्या
हिरवी साडीसे लालू मैना घुम्मासे घालू घुम्मासे

(२)

या तळ्यात त्या तळ्यात काय झगमगे गे
झगमगे झगमगे सोनेरी फोडे (मणी) गे सोनेरी फोडे गे
गणोबा (गणपती) पाळी माझी शंकरोबा (शंकर) पाळी गे
शंकरोबा पाळी माझी मंगळाईची पाळी गे मंगळाईची पाळी गे
मंगळाईची पाळी होऊन यशवन्त झाला गे यशवन्त झाला गे
यशवन्त होवोनी नागरी गेला गे नागरी गेला गे
नागरीच्या बायकानी काय आनंद केला गे काय आनंद केला गे
हळद लावूनी पिवळा केला गे पिवळा केला गे
धूप जळे धुपारती कापूर जळे कापूराती
(फू ऽ फू ऽ फू ऽ सर्वजणी फुगड्या घालतात)

(३)

तीळाचं फूल एक मणी, एक मोती गे मणी एक मोती गे
गौराई सुनेला बोलावू कौन जाते गे बोलावू कोन जाते गे
आईलू जाईलू तिचाही सासरा गे, तिचाही सासरा गे
सासऱ्याने बापुड्या काहीसं आणीलं काहीसं आणीलं
आनलं आनलं कुड्याचे जोड गे, कुड्याचे जोड गे
कुड्यांचे जोड मी घालायची न्हाय गे सासऱ्या संगे
जायची न्हाय गे, सासऱ्या संगे जायची न्हाय गे
तीळाचं फूल एक मणी, एक मोती गे मणी एक मोती गे
गौराई सुनेला बोलु कोन जाते गे बोलू कोन जाते गे

जाईल जाईल तिचीही सासू गे, तिचीही सासू गे
सासवेने बापुड्या काहीसं आणीलं काहीसं आणीलं
आणीलं आणीलं बांगड्यांचे जोड गे बांगड्यांचे जोड गे
बांगड्याचे जोड मी घालायची न्हाय गे, सासू संगे जायची न्हाय गे
तीळाचं फूल एक मणी, एक मोती गे मणी एक मोती गे
गौराई सुनेला बोलू कोन जाते गे, बोलू कोन जाते गे
जाईल जाईल तिचीही ननंद गे, तिचीही ननंद गे
ननंद बापुड्या काहीसं आणीलं, काहीसं आणीलं
आणीलं आणीलं बाजूबंद जोड गे, बाजूबंद जोड गे
बाजूबंद जोड मी घालायची न्हाय गे, ननंद संगं मी जायची न्हाय गे
तीळाचं फूल एक मणी, एक मोती गे, मणी एक मोती गे
गौराई सुनेला बोलू कोन जाते गे, बोलु कोन जाते गे
जाईल जाईल तिचाही दीर गे, तिचाही दीर गे
दीराने बापुड्या काहीसं आणीलं, काहीसं आणीलं
आणीलं आणीलं नथनीचे जोड गे, नथनीचे जोड गे
नथीचे जोड मी घालायची न्हाय गे, दीरासंगं जायची न्हाय गे
तीळाचं फूल एक मणी, एक मोती गे मणी एक मोती गे
गौराई सुनेला बोलु कोन जाते गे, बोलु कोन जाते गे
जाईल जाईल तिचाही नवरा गे, तिचाही नवरा गे
नवऱ्याने बापुड्या काहीसं आणीलं, काहीसं आणीलं
आणीलं आणीलं मंगळसूत्र जोड मंगळसूत्र जोड गे
मंगळसूत्र जोड मी घालायची हाय गे, घालायची हाय गे
नवऱ्यासंगं जायाची हाय गे, नवऱ्यासंगं जायाची हाय गे

(४)

सात घरी भिमाबाई देऊ कुणा घरी गे, देऊ कुणा घरी गे
देऊया देऊया ब्राह्मण घरी गे, ब्राह्मण घरी गे
नको गे आई मला ब्राह्मण घरी गे, अंघोळ करता जन्म जाईल गे
सात घरी भिमाबाई देऊ कुना घरी गे, देऊ कुना घरी गे
देऊया देऊया पाटील घरी गे, पाटील घरी गे
नको गे आई मला पाटील घरी गे, गाव चालवताना जन्म जाईल गे
सात घरी भिमाबाई देऊ कुणा घरी गे, देऊ कुणा घरी गे
देऊया देऊया सुतार घरी गे, सुतार घरी गे
नको गे आई मला सुतार घरी गे, लोखंड बडवताना जन्म जाईल गे
सात घरी भिमाबाई देऊ कुणा घरी गे, देऊ कुणा घरी गे
देऊया देऊया हरिजना घरी गे, हरिजना घरी गे
नको गे बाई मला हरिजना घरी गे झाडलोट करता जन्म जाईल गे
सात घरी भिमाबाई देऊ कुणा घरी गे, देऊ कुना घरी गे
देऊया देऊया शेतकऱ्या घरी गे शेतकऱ्या घरी गे
नको गे बाई मला शेतकऱ्या घरी गे शेताला जाताना जन्म जाईल गे
सात घरी भिमाबाई देऊ कुणा घरी गे देऊ कुणा घरी गे
देऊया देऊया घारगुऱ्या घरी गे, घारगुऱ्या घरी गे
दे गे आई, मला घारगुऱ्या घरी गे, ढोलक वाजवताना मौज येईल गे

# दीड दिवसाची माहेरवाशीण

सांगितलं तर खरं वाटणार नाही. पण एक गोष्ट खरी की, देवादिकांना पण संसार असतो. घरप्रपंचाचं पहावं लागतं. त्यामुळं पार्वतीसारख्या महादेवीला देखील देवा शंकराची परवानगी काढून माहेरी यावं लागतं! आणि ते देखील फक्त दीडदोन दिवसांच्या बोलीनं न् कुठं कोणतं तर कुठं कोणतं असं निराळं रूप घेऊन!

खानदेशातलं या महादेवीचं माहेरपण साजरं होतं ते तिला कानबाई किंवा राणादेवी समजून. श्रावणमासातल्या ऊनपावसाच्या खेळात रंगलाल होत ती यावेळी झिरमिरत्या पावलांनी येते. नारळाचं रूप धारण करीत चौरंगावर येऊन बसते. केळीच्या खांबाच्या मखरात तिचं लावण्यरूप उभं ठाकतं. पानाफुलांच्या शिणगारात ती उठून दिसते. साक्षात लक्ष्मीच तिच्या रूपानं अशावेळी घरात अवतरते असं मानतात. त्यामुळं धूपदीपांनी तिची पूजा केली जाते. पुरणावरणाचा महानैवेद्य होतो. नवस सायास फेडले जातात. माहेर-वाशिणींच्या घोळक्यात खेळगाणी होतात.

कोकणात न् देशावर महालक्ष्मी गौरीचा जसा डामडौल तसाच या कान-बाईचा खानदेशात रुवाब! मिष्ठान्न भोजनानं तिचं स्वागत. गीतनृत्यांनी तिची आराधना. वाजत गाजत तिची पाठवणी.

वास्तविक कैलासपतींची ती भार्या. तिला काय कमी तिच्या घरी? तिच्या स्नानासाठी शंकरांनी सोन्याच्या दोरानं पाणी शेंदावं अशातलं तिचं तिथं कोडकवतुक! पण तरीदेखील माहेर ते माहेर. त्याची सर तिथल्या वैभवाला येणार काय कुठं? म्हणून ही महाराणी आवर्जून माहेरी येते. केळीच्या पानावर तिच्यासाठी वाढलेल्या सुवासिक भाताची दरवळ तिला अशी भूल पाडून टाकते की, "तू गेल्यावर मला कसं करमेल?" या धास्तीनं

शंकरांनी तिचा पदर धरीत तिला जाऊ नको म्हटलं तरी ती "आता एवढ्यात जाऊन येते" असं म्हणीत माहेरच्या वाटेला लागते तर! तिची माहेरची ओढच भारी अपूर्वाईची. गणगोतांची आगत तिला दांडगी. त्यामुळं तिचं असलं माहेरपण देखील मोठं धामधुमीचं न् आगळं!

अनुक्रम :

१. सौ. सरला मुधोळकर

२. प्रा. दा. गो. बोरसे

३. सौ. कमल उटावदकर

४. प्रा. शं. क. कापडणीस

# कानबाई

लेखिका : सौ. सरला मुधोळकर

श्रावण महिन्यात पहिल्या रविवारी संध्याकाळी चौरंगावर तांब्या भरून पाणी ठेवायचे. त्यामध्ये पाच विड्याची पाने खोचायची किंवा आंब्याच्या पानाचा डकसा ठेवायचा. त्यावर सुके नारळ ठेवून त्याची देवी म्हणून पूजा करायची. त्यावेळी नारळाला कुंकू लावून त्याला नथ घालतात. खण पांघर-तात. चौरंगाला केळीचे खांब बांधतात. पूजेचे सर्व साहित्य घेऊन यथाशास्त्र पूजा करतात. सर्व तऱ्हेच्या झाडांची पाने (पत्री) व फुले वाहातात. घरी दळलेल्या गव्हाच्या कणकेच्या पुरणपोळ्या करतात. कानवाईस नैवेद्य दाख-वून चौरंगाजवळ ताट झाकून ठेवतात.

रात्री आप्तेष्टांसह मिष्ठान्न भोजन करून देवीपुढे भजन व देवादिकांची गाणी म्हणून जागरण करतात. दुसरे दिवशी कानवाईस दहीभाताचा व कानाल्यांचा[1] नैवेद्य दाखवून वाजत गाजत मिरवणुकीने देवीचे विसर्जन कर-तात. कानबाई (किंवा राणादेवी) ही पार्वतीचा अवतार मानतात. ती एका रात्रीसाठी माहेरी म्हणून आलेली असते. ती मंगलमूर्ती असून तिच्या पूजनाने सर्व संकटे दूर होऊन घरादारात धनधान्याची समृद्धी होते अशी भाविकांची श्रद्धा असते.

१. करंजी, कानवला.

# कानबाईचे रोट

लेखक : प्रा. दा. गो. बोरसे

श्रावण महिन्यात सर्व खानदेशात हिंदु लोक कानबाई देवतेची पूजा करतात. नागपंचमी झाल्यावर येणाऱ्या रविवारी कानबाईची स्थापना करतात व सोमवारी कानबाईला रोटाचा नैवेद्य दाखवून व्रताची सांगता करतात. हे रोट कणकेचे असतात. काही कुळात साध्या कणकेच्या रोटाऐवजी पुरणाचे रोटही नैवेद्याला दाखवितात. रोटासाठी घ्यावयाची कणिक ठराविक असते. कोणी सव्वाशेर कणिक घेतात, तर कोणी सव्वापायली कणिक घेतात. रोट फक्त कुळातीलच व्यक्तींनी खावयाचे असे बंधन असते. "कानबाईचे रोट" हा कुलाचार आहे. हा ऋग्वेदी यजुर्वेदी ब्राह्मणात जसा आढळतो, तसाच समाजाच्या तळागळातील विविध वर्गातही आढळतो.

कानबाई देवता म्हणजे धातूचे अगर लाकडी मुखवटे असतात. कोकणात महालक्ष्मीचे जे महत्व तेच कानबाईला खानदेशातही असते.

कानबाईबरोबर रानबाई या देवतेचीही पूजा होत असते. या व्रताच्या वेळी कानबाई–रानबाई अशा जोड देवतांचा उल्लेख होतो. श्री. भा. रं. कुलकर्णी यांच्या मताने कानबाई–रानबाई देवता म्हणजे वेदात उल्लेख केलेल्या रण्णासण्णा देवता होत. पूर्वीच्या कहाणीतील आदित्यराणूबाईशी या रानबाईचा संबंध दिसतो.

ज्यांच्या येथे हे रोट नसतात, त्यांची रोट या शब्दावरून, कानबाईसंबंधाने निरनिराळ्या प्रकारची भ्रामक कल्पना झालेली असते. मुसलमानांच्या मोहरम सणाच्या वेळीही रोट करतात. त्यामुळे कानबाई ह्या कुलाचारावर मुसलमानी

संस्काराची छाप असावी अशी समजूत काही ठिकाणी आहे, ती चुकीची आहे. कारण मुसलमान लोक मूर्तिपूजक नसल्याने व कानबाई या मूर्तीची स्थापना होत असल्याने हा मुसलमानी संस्कार आहे, हे केवळ पिराचे रोट व कानबाईचे रोट यातील समान अशा रोट शब्दावरून कल्पना करून घेणे चुकीचे आहे. तसा खुद्द रोट शब्दही देशी आहे व मुसलमानांच्या आगमनापूर्वी तो प्रचारात होता.

कानबाई नवसास पावली असल्यास तिचा "मान" वाढविण्यासाठी म्हणून रोटासाठी घ्यात्रयाच्या कणकेत वाढ करतात. कानबाईचा नवस फेडणे याला मान म्हणतात.

कानबाईसमोर ठेवलेला नारळ हा सर्व साधारणपणे जेथे कानबाई बसलेली असते तेथे "परणून" घेतात. (परणून घेणे–कानबाईपुढे ठेवून पूजा करून आणणे) अर्थात नव्याने जे कानबाई बसवितात त्यांनाच परणलेल्या नारळाची आवश्यकता असते. ज्यांच्या घरी वंशपरंपरेने कानबाई असते ते गेल्या वर्षाचा नारळ कानबाईसाठी उपयोगात आणतात व त्याच वेळी दुसऱ्याही नारळाची पूजा करतात. म्हणजे हा नारळ पुढील वर्षी चालतो. मागील नारळ न फोडता यावेळी नदीत सोडून देतात. ज्यांना कानबाईचा उत्सव साजरा करण्याची ताकद नाही ते ज्या ठिकाणी कानबाई बसलेली असते त्या ठिकाणी जाऊन आपला नारळ परणून आणतात व "माझे जर पुढील वर्षी सुखाचे दिवस आले तर मी आनंदाने पुढील वर्षी तुला बसवीन" असे म्हणतात.

कानबाईची स्थापना झाल्यानंतर कानबाईपुढे समई सतत तेवत ठेवलेली असते. नवरात्रातील दिवे ज्याप्रमाणे न विझण्याची दक्षता घेतली जाते, त्याचप्रमाणे कानबाईपुढील तेवती ज्योत विझून जाऊ नये अशी काळजी घेतली जाते. कारण दीप विझणे अशुभ मानतात. काही ठिकाणी समईबरोबरच शिजवलेल्या कणकेचा दिवा लावतात व अशा दिव्याबरोबरच लहान लहान दिवे करतात. या दिव्यांची संख्या विषम असते (५, ११ किंवा १७) उद्यापनाच्या वेळी हे दिवे पेटविले जातात व कानबाईची आरती करतात. नंतर

कुलातील मंडळीच (सगोत्रीय) हा आरतीचा नैवेद्य (रोट) खातात. हे दिवे पुरण घालूनही केले जातात. कुलाव्यतिरिक्त असलेल्या अगर बोलावलेल्या मंडळींना कानवाईच्या या रोटाव्यतिरिक्त अन्य नैवेद्य खाण्याची मुभा असते. हे सर्वच रोट त्या दिवशीच खाण्यासंबंधाचे बंधन असते. काही ठिकाणी तीन दिवसांच्या आत ते खाण्याचा प्रघात असतो.

काही ठिकाणी कानबाई नागपंचमी झाल्यावर येणाऱ्या पहिल्या रवि-वारीच बसवितात असे नाही तर श्रावण महिन्यातील नागपंचमीनंतर येणाऱ्या कोणत्याही रविवारी तिची स्थापना करतात. स्थापना केल्यानंतर कानबाईच्या समोर कलशावर नारळ असतो. कानबाईच्या पूजेच्या वेळी ह्या नारळाचे फार महत्व असते. काही ठिकाणी कानबाई नवस म्हणून नव्याने बसवितात व नंतर हा कुलाचार वंशपरंपरेने सुरू होतो. ज्या ठिकाणी मुखवटे नसतील तेथे कलश व नारळ हेच असतात व त्याला कानबाई मानतात.

कानबाईच्या रोटाच्या वेळी कानबाईची स्थापना ब्राह्मणास बोलावून करण्यात येते व व्रताचे उद्यापनही ब्राह्मणाच्या हस्तेच होते. रविवारी ही स्थापना होते यावरून ह्या व्रताचा संबंध सूर्याशी असावा असे दिसते.

## कानबाईची गाणी

कानबाई गावात एकदा कोठेही बसली म्हणजे कानबाईची गाणी म्हणणारे शाहीर अगर भाट यांच्या रात्री बैठकी होतात व या बैठकीत कानबाई देवतेसंबंधी गाणी म्हटली जातात. ही कानबाईची गाणी आख्यानात्मक अस-तात. तशीच आध्यात्मिकही असतात. प्रकृति-पुरूष संबंध या गाण्यात दाखविलेला असतो. या फडामध्ये स्पर्धाही सुरू होतात. ज्याला कानबाई नवसाला पावलेली असते तो कानबाईच्या या भाटांना निरनिराळ्या गावाहून

बोलावितो व मग स्पर्धा सुरू होते. कूटप्रश्नात्मक गाणी म्हटली जातात व त्यांचे उत्तर दुसऱ्या फडांनी द्यावयाचे असते. त्यामुळे अशा फडांना खूप रंग चढतो.

ब्राह्मणाबरोबरच कानबाईच्या भगतालाही मान असतो. मात्र कानबाई खालच्या लग्नाच्या वेळी जो मान भगताना असतो तो मान त्यांना या वेळी मिळत नाही. ब्राह्मणाकडेच हल्ली सर्व पूजा-अर्चा सोपविलेली असते. ह्या भगताकडेच कानबाईसंबंधीच्या वह्या असतात व या वह्या वंशपरंपरेने जपून ठेवलेल्या असतात.

कानबाईची गाणी म्हणण्याची पद्धती शाहिरी गाण्यापेक्षा वेगळी असते. चरणाचे उपान्त्य अक्षर तालासाठी लांबविले जाते. अंतराचरण द्रुतगतीने म्हटले जातात. पालुपद वारंवार म्हणतात. गाणी म्हणणाऱ्यांचा गळा चांगला असल्यास लोकांवर छाप पडते.

कानबाईच्या वर्णनात कानबाईला दागिन्यांचा सोस फार आहे असे वर्णन केलेले आहे. कानबाईच्या रोटाच्या वेळी कानबाई–कन्हेराच्या लग्नाची गाणीही म्हटली जातात. कानबाई पद्धतीच्या लग्नाच्या वेळेस म्हटली जाणारी गाणी व श्रावणातील कानबाईची गाणी वेगवेगळी असावीत. तथापि आता सर्रास सरमिसळ पद्धतीने शाहीर ही गाणी म्हणतात.

कानबाईच्या वेळी म्हटली जाणारी इतर गाणी पडताळून पाहता या गाण्यांना अहिराणी व मराठी भाषेच्या दृष्टीने निश्चित महत्व आहे.

कानबाईची गाणी ज्याप्रमाणे पुरूष म्हणतात त्याप्रमाणेच हिंदोल्यावर बसून स्त्रियाही म्हणतात. या उत्सवानिमित्त कानबाईच्या गाण्यांबरोबरच आख्यानात्मक हिंदोली गीतेही म्हटली जातात.

श्रावणात भाविक लोक या कानबाईला नवस फेडण्यासाठी "चढ" चढ-वितात. अर्थात् चढ म्हणजे अंगठी, नथ, इत्यादि दागिने असतात. परि-स्थितीप्रमाणे हे सोन्या-रूपाचे असतात. भगतही स्थापना झाल्यापासून बैठक मांडून कानबाईसंबंधाने भजने, आख्यायिका भाविकांना सांगतो. कानबाई

आदल्या दिवशी बसते व नंतर दुसऱ्या दिवशी उठते. काही ठिकाणी कानबाई रविवारी बसली तर दोन दिवसांनी अगर तीन दिवसांनी उठवितात. कानबाई उठते त्या वेळेस वाजत गाजत गावातील सर्व मंडळी कानबाईची मिरवणूक काढतात व भाविक लोक पूजा करतात.

## कानबाई-कन्हेर लग्नविधि

नाशिक जिल्ह्यातील बागलाण, मालेगाव, कळवण, नांदगाव या तालुक्यात व पूर्व खानदेश–पश्चिम खानदेश जिल्ह्यात व मराठवाड्यातील नांदगाव, चाळिसगाव, पाचोरे तालुक्याजवळील भागात कानबाईखालची सामूहिक लग्नपद्धती रूढ आहे. अहिराणी भाषा बोलणाऱ्यांची संख्या याच भागात पुष्कळ आहे. अहिराणी नाव ज्या लोकांवरून पडले त्या अहिरात ही लग्न-पद्धती रूढ असावी. अहीर संस्कृतीचे द्योतक जे काही प्रादेशिक रीतिरिवाज रूढ आहेत त्यामध्ये कानबाई खालचे लग्न ही पद्धति प्रमुख आहे. सौराष्ट्रा-तील अहिरातही अशा प्रकारची सामूहिक लग्नपद्धति रूढ आहे. गुजरतेत या लग्नपद्धतीस रांभस म्हणतात. खानदेशात या सामूहिक लग्नपद्धतीस कानबाईचे लग्न अगर कानबाईचे खालचे लग्न म्हणतात.

कानबाई देवता वैदिक असावी, असे खानदेशातील राजवाडे संशोधन मंदिरात काम करीत असलेले सुप्रसिद्ध संशोधक श्री. भा. रं. कुलकर्णी यांचे मत आहे. ऋग्वेदात रण्णा-सण्णा देवीचे वर्णन आलेले आहे. कहाणी वाङ्मय-यातही आदित्य राणूबाईची कहाणी असा प्रकार आहे. यावरून कानबाई-रानबाई देवतांचा सूर्य देवतेशी निकटचा संबंध असावा, असे त्यांचे म्हणणे आहे. ( अहिराणी भाषा व संस्कृति, पृष्ठ ५३–५५ ). या देवतेचे लग्न सूर्याबरोबर लागते. आभीरांना भारतात शेवटी आलेला आर्यांचा जथा असे मानल्यास— अहिरात वैदिक चालीरीती रूढ असणे साहजिक आहे. स्थानिक अर्यांखेरीज

ग्रीकांसारख्या आर्यांनाही भारतातील स्थानिक आर्य म्लेंच्छ मानीत. इराणातील सूर्यपूजक आर्यही भारतीय आर्यांच्या मताने म्लेंच्छच होत. आभिरांचाही ठिकठिकाणी उल्लेख म्लेंच्छ असाच आलेला आहे. तथापि ते वैदिक देवतेचे विशेषतः सूर्यदेवतेचे उपासक होते, हे आपणास कानबाई लग्नपद्धतीतील व कानबाईचे रोट या व्रतसमारंभातील सूर्यपूजेवरून लक्षात येते.

कानबाई देवतेची स्थापना शुक्रवारी अगर मंगळवारी समारंभाने करण्यात येते. मात्र "कानबाईचे रोट" या कुलाचाराच्या वेळी कानबाईची स्थापना श्रावणात नागपंचमी झाल्यानंतर येणाऱ्या रविवारी करण्यात येते. यातही रविवार हा सूर्यदिन निवडलेला आहे. कानबाईचे लग्नही काही ठिकाणी शुक्रवारी स्थापना होऊन रविवारी लावण्यात येते. कानबाईचे लग्नाचा सोहळा आपल्या लग्नाप्रमाणेच असतो. इतकेच नव्हे तर हळद वगैरे समारंभ देखील असतो. मंगळवारी कानबाईचे नदीवर विसर्जन करण्यात येते. विसर्जनास कानबाई बोळविणे असे म्हणतात. कानबाईचे लग्न सकाळीच लागते.

ज्यांनी आपल्या मुलामुलींचे लग्न कानबाईच्या समोर लावण्याचा निश्चय केलेला असतो, अगर ज्यांच्या घराण्यात पूर्वापार या प्रकारची लग्नपद्धति रूढ आहे, अशांच्या घरीच कानबाईची स्थापना होऊ शकते. मागील सालचा कानबाईपुढे ठेवलेला नारळ व ब्राह्मणांनी अगर भगतांनी मंत्र म्हणून पवित्र केलेला नारळ कानबाईच्या स्थापनेस आवश्यक लागतो. अशा प्रकारच्या नारळास कानबाईपुढे परणलेले नारळ असे म्हणतात. ज्यांना नव्याने कानबाई आपल्या घरी पूजेसाठी बसवावयाची असेल ते लोक भगताजवळ कानबाईपुढे परणण्यासाठी नारळ आणून देतात. कानबाईचे विसर्जन झाल्यानंतर हे नारळ नेतात व देवापुढे वर्षभर जपून ठेवतात. या ठिकाणी नारळास देवत्व येते. कारण कानबाईचे लग्न सकाळी या नारळाशीच लागले जाते. सूर्यदेवतेचे प्रतीक म्हणूनच नारळाचे महत्व अधिक आहे.

कानबाईची स्थापना करण्यासाठी कानबाईचे मुखवटे करण्यात येतात. हे मुखवटे विशिष्ट मानाच्या, विशिष्ट कारागिरांकडून करून घेण्यात येतात.

भाद्रपदात बसणाऱ्या महालक्ष्मीप्रमाणेच हे मुखवटे असतात. मात्र हे मुखवटे लाकडी अगर मातीचेही असू शकतात. श्रावणात बसणाऱ्या कानबाईशेजारी रानबाईचीही स्थापना करण्यात येते. मात्र लग्नप्रसंगीच्या कानबाई शेजारी रानबाईचा मुखवटा नसतो. लग्नप्रसंगी बसविल्या जाणाऱ्या कानबाईची स्थापना वैशाखातच होते. श्री. भा. रं. कुळकर्णी यांच्या मताने रण्णादेवीचीच स्थापना होते (अहिराणीय भाषा व संस्कृति, प्र. ५३) कानबाईचे लग्न लागण्यापूर्वी काळी बकरी अगर मेंढी सोडण्यात येते. तिला काळी पाठ म्हणतात. कानबाईच्या लग्नात काही अरिष्ट येऊ नये हा हेतु या बलिदानाच्या मुळाशी असतो. मात्र काळी पाठ मारीत नाहीत. नंतर घरभगत कानबाईची विधिपूर्वक स्थापना करतो.

कानबाईच्या स्थापनेसाठी १०८ वनस्पतींची पाने आवश्यक असतात. ५ किंवा ७ नद्यांचे पाणी आणतात. तसेच आसपासच्या गावांची, शिवेची अगर नदीकिनाऱ्यावरील मातीही आणण्यात येते. तिला कस्तुरी म्हणतात. त्या मातीवर सात प्रकारचे धान्य पेरतात व त्यावर कानबाईची स्थापना करण्याचा मान घरभगताचा असतो.

नंतर सर्व विधी सांगण्याचा मान गावभगताचा असतो. ब्राह्मणाला विशेष महत्व नसते. अलीकडे मात्र कानबाईची स्थापना झाल्यानंतरचे पूजाअर्चादि विधी ब्राह्मणाकडूनच करून घेण्याची पद्धत सुरू झालेली आहे. भाविकांकडून कानबाईपुढे टाकल्या जाणाऱ्या दक्षिणेवरचा अगर धान्यादिकावरचा अधिकार गावभगताचा असतो.

स्थापना करण्यापूर्वी या सात नद्यांच्या पाण्याने कानबाईस स्नान घालतात. स्नान झाल्यानंतर कानबाईस हिरवे लुगडे व हिरवा चुडा भरण्यात येतो. कानबाईच्या करवल्यांना पाचारण करण्यात येते. या करवल्या निरनिराळ्या गावच्या असतात. त्यांना गवरणी म्हणतात. या गवरणी सुवासिनी असतात. मात्र त्या अक्षतयोनि असतात. काही ठिकाणी गवरणेही बोलवितात. हे

कानबाईच्या नवरदेवाचे सवंगडी समजले जातात. तथापि कानबाईच्या या लग्नात गवरणींचे प्रस्थ अधिक असते.

कानबाईची स्थापना झाल्यानंतर रात्री गवरणी स्नान करतात. हे स्नान कानबाई असते त्या घरातच करावयास पाहिजे. त्या कानवाईस स्नान घालतात.

हा न्हाऊ घालण्याचा कार्यक्रम पहाटेपर्यंत चालतो. नंतर कानबाईस समज चढवितात. कानबाईची स्थापना होते त्या ठिकाणी निरनिराळ्या नद्यांच्या पात्रातील वाळू पसरण्यात येते. कानबाईस जितका वस्त्राभरणाचा साज असेल तितकाच या गवरणींचा असावा लागतो. पाटल्या, ठुशी, पोयकल्ला, वज्रटीक पुतळ्या इत्यादि दागिने, सर्वांचेच शुद्ध सोन्याचे अगर शुद्ध चांदीचे असावे लागतात. नकली दागिने अगर पितळी दागिने कानवाईस अगर तिच्या गवरणींना घालण्याचा रिवाज नाही. घरभगत व गावभगत कानबाईचे विधि यथासांग करण्याची दक्षता घेतो. थोडीशी जरी या विधित चूक झाली तर वंशदीप विझेल अशी सर्वांची समज असते! कानबाईपुढचा तुपाचा नंदादीप सतत तेवत ठेवलेला असतो, तो याच कारणाकरिता. गवरणी अक्षतयोनि असाव्या लागतात, हा उल्लेख वर आलेलाच आहे. मात्र कानबाईच्या लग्नप्रसंगी प्रथमतः अक्षतयोनि असून पुढे मुलबाळे झाली तरी अशांनाही गवरणी बनण्याचा हक्क काही ठिकाणी असतो. गवरणींचा गौरीशी संबंध असावा, "अष्टवर्गं भवेत् गौरी" हे सुभाषित सर्वश्रुतच आहे. अहिरांच्या आगमनाच्या वेळेस (इ. स. चौथ्या-पाचव्या शतकापासून) बालविवाहाची पद्धत सुरू झाली असावी, याचे द्योतक तर ही चाल नसेल? या गवरणींचा संबंध गवळणींशीही लावता येईल. मात्र मग कानबाई-कन्हेर देवतेचा संबंध रूक्मिणी-कृष्णाशी लावावा लागेल!

कानबाईचे सकाळी लग्न लागण्यापूर्वी पहाटेस कानबाईस भोजन देण्यात येते. हे भोजन विशिष्ट प्रकारचे असते. कानबाईबरोबरच गवरणीनाही भोजन देण्यात येते. कानबाईच्या लग्नात या भोजनाचे महत्व विशेष असते. कारण कानबाईला भोजन देईपर्यंत घरधनी व घरधनिणी यांना कडकडीत उपवास

असतो. हे भोजन "सवाई" मापाने असते कोणी १। शेर, १। पायली, १। मण गव्हाचे पीठ व हरभऱ्याची डाळ वापरतात व पुरणाचे भोजन असते. सूर्योदयापूर्वीच भोजन घेऊन गवरणींनी निघून जावयास पाहिजे असा शिरस्ता असतो. या गवरणींची मोठ्या थाटाने सवाद्य मिरवणूक काढण्यात येते. नवरी बोळविताना ज्याप्रमाणे पहिलीची शृंगारलेली गाडी व बैल वापरतात, त्याचप्रमाणे या गवरणींना बोळविताना गाडी वापरण्यात येते. ठिकठिकाणी या गवरणींचा सन्मान होतो. कानबाईच्या लग्नप्रसंगी या करवल्यांना का राहू देत नाहीत हे गूढच आहे. कानबाई-कन्हेर मीलनाच्या वेळी करवल्यांची अड-गळ असू नये असा कदाचित हेतु असावा. सूर्योदयाच्या वेळी कानबाईचे लग्न कन्हेर या देवतेशी लावण्यात येते. गवरणे हजर असतात. हे गवरणे लग्न झालेले असतात किंवा कुंवारही असतात. त्यांना लग्नप्रसंगी फेटा व नारळ मिळत असतो.

कन्हेर देवता सूर्याचेच प्रतीक असावी, असे श्री. भा. रं. कुळकर्णी यांचे मत आहे. कानबाईच्या गाण्यातूनही ही देवता निश्चित कोण असावी याचा बोध होत नाही. कदाचित ही देवता कृष्ण असावी. कानबाईस, कानोड, कानड, कान्हळ असेही म्हटले जाते. कानबाई गीतामध्ये तिला खेळण्याचा नाद असतो व दागिन्यांचा फार सोस असतो, असे प्रतिपादिलेले आहे.

कानबाईस हळद लागल्यानंतर हळदीची थाळी कानबाईपुढे ठेवण्यात येते. ज्यांना आपल्या मुलामुलींची लग्ने या पद्धतीने व्हावी असे वाटत असेल, अगर ज्यांनी कानबाईखाली मुलामुलींचे लग्न लावू असा नवस केला असेल, अगर ज्यांना वाईट आर्थिक परिस्थितीमुळे कानबाईची स्वतःच्या घरी स्थापना करता आली नसेल असे लोक कानबाईची ही उष्टी हळद नियोजित वधू-वरांना लावण्यासाठी वाजत गाजत घेऊन जातात. या हळदीप्रीत्यर्थ घरधन्यास फक्त एक आणा दक्षणा द्यावी लागते. तीही काही घरधनी स्वीकारीत नाहीत. नंतर लग्नाची तिथी शुक्रवारी, कानबाईची स्थापना झालेली असल्यास रविवारी अगर सोमवारी धरण्यात येते. मंगळवारी स्थापना झालेली असल्यास बुधवारी अगर गुरुवारी धरण्यात येते. प्रथमतः कानबाईचे कन्हेराशी लग्न

लागते. कानबाईप्रमाणे कन्हेराचा मुखवटा नसतो. विधीपूर्वक कलशावर ठेवलेल्या नारळासच कन्हेर मानण्यात येते व ब्राह्मण मंगलाष्टके म्हणतो. त्या वेळेस घरभगत व गावभगत उपस्थित असतात. नंतर सायंकाळी गोरज मुहूर्तावर ज्यांच्या घरी कानबाई बसलेली असते. त्यांचा प्रथमतः कानबाईपुढे लग्न लावण्याचा मान असतो व नवसाच्या नवरदेवाबरोबर मानाचे इतर चार नवरदेव असतात. यांची लग्ने सामूहिक पद्धतीने कानबाईपुढील खास अंतर्भागातील मंडपात लागतात. नंतर ही जोडपी घरभगत, गावभगत, ब्राह्मण व आप्तेष्ट यांच्या पाया पडतात. हा विधि झाल्यानंतर सामूहिक लग्न लावण्यास मोकळीक मिळते. कानबाईपुढील सभामंडपात जशी जागा असेल त्याप्रमाणे वधूवरांच्या जोडया बसलेल्या असतात.

सभामंडपात पुरेशी जागा असल्यास एका वेळेस २००–२५० जोडपी बसू शकतात. वधूवरांचे मामा पाठीशी असतात. ब्राह्मण या सर्वांसाठी मंगलाष्टके म्हणतो. काही ठिकाणी या सर्व जोडप्यासाठी एकच अंतर्पाट असतो व एकच पोयते असते. तर काही ठिकाणी प्रत्येक जोडीनिहाय अंतर्पाट व पोयते असते. मंगलाष्टके झाल्यानंतर नवरदेवास नवरीचे मामा तेथेच फिरवतात. तत्पूर्वी नवरी नवरदेवाच्या गळयात हार घालते. वरील सप्तविधि झाल्यानंतर लग्न लागले असे समजतात. तत्प्रीत्यर्थ शिंग, तुतारी सारख्या वाद्यांचा गजर होतो. ही वधूवरांची तुकडी गेल्यानंतर दुसरी तितकीच वधूवरांची जोडपी लग्नासाठी कानबाईच्या सभामंडपात उपस्थित राहतात. अशा रीतीने हा लग्नाचा सोहळा रात्रीपासून जो सुरू होतो तो कानबाईची बोळवण नदीकिनारी होईपर्यंत चालतो.

नदीकिनाऱ्यावरही बोळवण होण्यापूर्वी भाऊगर्दीने काही जोडपी येतात व नदीकिनारी लग्न सोहळा उरकून घेतात. या लग्नपद्धतीत नोंदणी-रजिस्टर लग्नापेक्षाही कमी खर्च असतो. कानबाई ज्या गावात बसली असेल तेथून २५ मैलांवरील नवरदेव सायंकाळपर्यंत शेतात काम करीत असतो व वरवधूंच्या आईवडिलांच्या आप्तेष्टांच्या मनात आज रात्री लग्न उरकून घ्यावे असे असल्यास रात्रीच गाडया जुंपतात व कानबाई ज्या घरी बसली असेल

त्या घरी ते दाखल होतात. उष्टी हळद घेतात व प्रथम नवरदेव नंतर नवरीस लावून त्याच रात्री सामूहिक लग्नाच्या जोडप्यासमवेत नवरदेव-नवरीस बसवून लग्न उरकून घेतात. या विधीस नवरी परणणे म्हणतात. गोरज मुहूर्ताच्या एकाकी लग्नात अशौचादि अनेक अडथळे येतात व लग्नतिथि वारंवार बदलावी लागते. ते अडथळे टाळण्यासाठी ही तडकाफडकीची व कमी खर्चाची लग्नपद्धति अत्यंत इष्ट अशी असते.

ज्यांना ऐपत अगर हौस अशी मंडळी कानबाईखाली लग्न लावून नवरी परणून नेल्यानंतर एरवीच्या लग्नात होणारे व्याही-विहिणीचे सर्व सोपस्कार करतात. केलेच पाहिजेत असा मात्र नियम नाही. तेथे मांडवबेळी ( मांडवपरतणी ) झाल्यानंतर व सत्यनारायण झाल्यानंतर वधूवरांची थाटाने मिरवणूक काढण्यात येते. नंतर मुलीस "मूळ" लावतात. या विधीस "वाळणे" म्हणतात. नंतर नवरीस घेऊन जातात.

कानबाई जोपर्यंत बसलेली असेल तोपर्यंत हौशी मंडळी विशेषत: स्त्रिया कानबाईविषयक गाणी म्हणतात. लहान लहान मुली तर गाणे झोपाळ्यावर बसून म्हणतात व नाचतात. कानबाई ज्यांच्या घरी असेल तो घरधनी कानबाईची गाणी म्हणणाऱ्या भगतांना व शाहिरांना पाचारण करतो.

हे फडही त्यांच्यात चुरस लागल्याने गाजतात. एक फड विशिष्ट अध्यात्मिक आडाखे ( कूट प्रश्न ) घालतो व दुसरा फड त्याच्या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करतो. कलगी-तुऱ्याच्या लढतीप्रमाणेच हा सामना रंगतो व शेवटी कानबाईची स्तुती करतात. कानबाईसमोर मुली जे नृत्य गीत म्हणतात ते खाली दिलेले आहे.

**आवढीशी कानबाई ठुमुकनी माय ठुमुकनी**
**आंबाना बागमान येई पडनी**
**चांगलाच आंबा तोडनाय माय तोडनाय**
**कन्हेर राजा डोलना**

आमना कन्हेर साजिंदा माय साजिंदा
परणी कन्हेर आवंदा
आमी ग साऱ्या वऱ्हाडनी माय वऱ्हाडनी
कानड रानीन्या सई बहिनी
आवढीशी कानबाई ठुमुकनी माय ठुमुकनी
आवढीशी कानबाई ठुमुकनी
कशी मी येऊ कानबाई माय कानबाई
सोनानी येनी मी तुले वाही
मायीननी सई बहिन आवडामाय आवडा
कानबाई भवताले दाम्हेंडा
मुखडा दपाडे गुजरीन माय गुजरीन
कानडनी तू खरि संगतीन
माय बाई गोपीले पावनी
करोठ्या संग रवनी
करील्या आमी मुखरनी माय मुखरनी
करसुत खेसर गोपीनी

आमची कानबाई लहान पण देखणी आहे. तिचे या वर्षी शोभिवंत कन्हेर-राजाशी लग्न आहे, आम्ही सर्व तिच्या करवल्या आहोत. आज कानबाई पाटलाच्या गोपीलाहि पावलेली आहे. त्यामुळे आम्ही सर्व मनसोक्त गोपीची थट्टा करू–असा या गीताचा आशय आहे.

माझी कानड राजसावानी । हाती गोण्याची फणी
डोई विचरे कानड रानी

नऊ पदरांची येनी
बहु चतुर गुंफुनी
ऐसी धुतकारा ठाके नागीन । जग मोहिला सारा हिनं
अहो चैतन्य साडी नेसोन
ब्रह्म काचोळी घातली तिनं
गळ्यात गरसोळी बांधली तिनं
इला मुखरा साजे
बहु प्रकाश गाजे
अहो हाती एक कंगन बांधुन । जग मोहिला सारा हिनं
कांकण बांधुन नवरी झाली
कानाडे मांडवाच्या दारी गेली
सारा आभ्रंग लेउन न्हाली
राजा कन्हेर परणुन नेई
मंडप दिले ठायी ठायी
ब्रह्म लावून देई लग्न । जग मोहिला सारा हिनं

सदर गीतात कन्हेर-कानोडाचा उल्लेख रूपकाने करण्यात आलेला असून त्यात आध्यात्मिक दृष्टिकोन दिसून येतो. जग मोहणारी आदिमाया लग्नास उद्युक्त झालेली असून तिचे लग्न पुरुषाशी खुद्द ब्रह्मा लावतो. प्रकृति पुरुषाच्या या मीलनानें सर्व जगात चैतन्य संचारले आहे असा या गीताचा आशय आहे.

कानबाईसाठी जे नारळ लागतात ते परणलेले असावे लागतात. कानबाई-पुढे अनेक नारळांच्या जोडचा पोयत्यांनी गुंडाळून ठेवलेल्या असतात. त्यामुळे नारळ परणले जातात असा समज आहे. नारळ या ठिकाणी देवतास्वरूप मानला जातो. कानबाईच्या पूजेसाठी नव्याने प्रतिष्ठापना करावयाची असल्यास त्यासाठी हे नारळ आवश्यक असतात. काही ठिकाणी कानबाईची

बोळवण शुक्रवारी अगर मंगळवारी न करता सोमवारी करण्यात येते. कान-बाईला देवीचे महत्त्व आल्यानेच कानबाईच्या या कुलाचारात देवीला प्रिय असे मंगळवार व शुक्रवार हे वार निवडले असावेत. कानबाईचे हे परणलेले नारळ गहाळ झाल्यास अगर भंग पावल्यास त्या जागी परणलेले नवे नारळ आणावे लागतात. कानबाईपुढे हे नारळ परणले गेल्यानंतर नवस करणारे लोक भगतास व ब्राह्मणास यथाशक्ति दक्षणा देतात.

कानबाईचे विसर्जन होण्यापूर्वी कानबाईसंबंधाचे सर्व विधि यथासांग झाले किंवा नाही हे घरभगत व गावभगत पाहात असतो. कानबाईपुढे पुऱ्यांचा फुलवरहि चढविण्यात येतो. मंगळवारी अगर शुक्रवारी कानबाई बोळवण्याच्या वेळी घरधनी उपस्थित असतो. तो कानबाईची मूर्ती हातात घेतो. त्याच्या अंगावर लोकरीची घोंगडी असते. त्याची बायको झाले घेते. नंतर कानबाईस डोक्यावर घेऊन मिरविण्यात येते. दोघांनी मागे फिरून पाहू नये असा दंडक असतो. कानबाईची मिरवणूक निघाल्यानंतर सुवासिनी कानबाईच्या पुढे भर-लेल्या पाण्याच्या घागरी ओततात. ह्या घागरी ओतण्याचा कार्यक्रम व पूजेचा कार्यक्रम प्रत्येक गल्लीत होत असतो. सकाळी कानबाईची मिरवणूक निघाल्या-नंतर रात्री १०-११ वाजताही कानबाईचे गावातील नदीवर विसर्जन कर-ण्यात येते. कानबाईचे लग्न ज्या नारळाशी लागते तो नदीत सोडण्यात येतो व कानबाईस स्नान घालून नंतर तिचा साज उतरवून मुखवटयावर आच्छादन टाकण्यात येते. पुढील वर्षासाठी परणलेले नवे नारळ मात्र जपून ठेवण्यात येतात.

अशा प्रकारची सामूहिक लग्नपद्धति प्रामुख्याने खानदेशातील ब्राह्मणा-खेरीज इतर सर्व जमातीत आहे. विशेषत: माळी, मराठा इत्यादी समाजात अधिक प्रमाणात रूढ आहे. इतर जमातीतही काही घराण्यात कानबाई लग्न-पद्धति हा विशेषपूर्वापार–कुलाचार रूढ आहे. जे सामूहिक लग्न कानबाईसमोर लावतात ह्यांना जरी कमी खर्च येत असला तरी ज्यांच्या घरी कानबाईची स्थापना होते त्यांना बराचसा खर्च येतो. घराण्याच्या प्रतिष्ठेसाठी व कान-बाईसाठी लग्न न लावल्यास कानबाई-कन्हेर या देवतांचा कोप होईल या

भीतीने व केव्हा केव्हा कानबाईवरील नितांत आदरामुळे हा खर्च करण्यास ते उद्युक्त होतात. कानबाईच्या स्थापनेपासून तो विसर्जन होईपर्यंत विधि यथासांग पार पाडण्यासाठी ते व त्यांचे भाऊबंद झटत असतात. कानबाईचे विसर्जन केल्यानंतरही काही घराण्यात ज्यांना कानबाई साहत असेल अशांच्या घरी एक वर्ष जेवण घ्यावे असा दंडक असतो. नव्याने कुरडई, पापड, शेवया करीत नाहीत. केरसुणी वगैरे खरेदी करत नाहीत. कानबाईखालची लग्ने इतरांना जरी अल्पखर्चाची वाटत असली तरी कानबाईच्या बारीकसारीक विधीकडे पुढे लक्ष पुरवावे लागते.

# रोट (कानबाई)

लेखिका : सौ. कमल उटावदकर

खानदेशात सणांचा राजा मानला गेलेला रोटांचा सण प्रत्येकाच्या मनात एक नादमधुर धुंद आनंदी आनंद उभा करतो असे ह्या सणाचे महत्त्व आज पावेतो टिकून आहे. धार्मिक व शास्त्रीय दृष्टीनेही विचार केल्यास वर्षाऋतुतील श्रावण मासी शेवटच्या आठवडयात पावसाचा वेग कमी होऊन शेतातील पिके डौलाने उंचावित असताना त्या धुंद मधुर स्वच्छ हवेतून, हिरव्यागार शेतातून, नटून थटन साक्षात लक्ष्मी रूपाने ग्रामीण मनाला आनंद देण्यासाठी कानबाई नावाने घटस्थापना करून रोटाच्या दिवसाला सुरवात होते.

कानबाई साक्षात लक्ष्मी घरी येत आहे ही भावना वर्षानुवर्षे पुरातन काळापासून जतन करून ठेवलेली असल्यामुळे ग्रामीण भागातून आपल्या सासुरवाशी मुलीला गृहलक्ष्मी रूपी साकारलेल्या सुनेला आपल्या घरी आणले जाते. लग्न होऊन कामधंद्यानिमित्त बाहेर गेलेल्या नवदांपत्यास पहिल्या रोटा-साठी घरी येणे अत्यंत आवश्यक असते.

पहिल्या दिवशी कानबाईची स्थापना करण्यापूर्वी एक सप्तापूजन सूर्यो-दयाच्या अगोदर होते. त्या पूजनासाठी शेतात उगविलेल्या व सहज उपलब्ध होणाऱ्या किल्लु-पोकळा ह्या हिरव्या पाले भाज्यांची जाड रोटी म्हणजेच तेलतूप न वापरता शेकलेला कोरडा रोट होय.

असा हा सव्वापाव, सव्वा किलो, अडीच किलो असा दर माणसी सव्वा पटीने कणीक घेऊन शेकलेला रोट दुपारपर्यंत सर्वांनी संपवावयाचा असतो. हा कोरडा रोट-भाजी संपल्यावर कानबाईची स्थापना होते. पुरणाच्या रोटाची तयारी सुरू होते. वरील सव्वापाव पट पद्धती प्रमाणेच मुख्य रोट

बनविले जातात. पुरणपोळ्या बनवून पुरणांचे दोन मोठे दिवे एक कानबाई-साठी व एक घरातील सर्वांना प्रसादासाठी बनविले जातात.

संध्याकाळी कानबाई समोर धूपदीप पूजा करून तुपाचे भरलेले हे दोन पुरणाचे दिवे ठेऊन, सर्व स्वयंपाक समोर ठेऊन, नैवेद्य दाखवून नंतरच घरातील सर्व मंडळी एकत्र एकाच वेळी जेवणास बसून पुरणपोळी-खीर-भात आमटी अशा पक्वानांनी जेवणास सुरवात करतात. हा रोट कुटुंबात मानलेला असल्या-मुळे तो कुटुंबातील व्यक्तींनीच संपवावयाचा असतो. पाहुणे मंडळीस वेगळा स्वयंपाक करावा लागतो.

रात्री वाडीतील स्त्रिया एकत्र जमून कानबाई समोर गाणी, झिम्मा, फुगडी इत्यादी कार्यक्रम करून रात्रभर हास्य विनोदाने जाग्रण करतात.

सप्ता पूजन करून कोरडा रोट पूजा होत असतानाच घरातील लहान व शाळेकरी मुले घुंगरूमाळ, घुंगरू चांगटचा, बैलांच्या घंटा, घोगर इत्यादी कमरेला बांधून आनंदाने थयथय नाचत बाहेर धूम पळत जातात. आणि सर्व छुणछुणू घणघण आवाजात एकत्र जमून "कानबाई कानबाई पिकू दे। मला खूप शिकू दे ।। कानबाई कानबाई लक्ष्मी देवी । पुरणनी पोई खाईसन जाय ।।" अशा प्रकारे गीत गात त्यांच्या बालबुद्धीने एखादी ओळ जुळवून मारोतीच्या भोवती फेऱ्या मारून नाचून रहातात. दौड घेत रहातात. सगळीकडे आनंद निर्माण होतो. दिवसभर मुले पाखरांसारखे बागडत रहा-तात. रात्री रोट संपविण्यास चांगला हातभार लागतो.

रोटाचा दुसरा दिवस उजाडतो सुखस्वप्नातून. न उठविता उत्साहाने उठलेली बाल गोपाळ मंडळी अन्यन्य भावाने कानबाईचे दर्शन घेऊन कमरेला घुंगरू घोगरे बांधण्याची घाई करीत असतात. अंघोळ पूजा-दर्शन नवे कपडे घालून पहिल्या दिवसाप्रमाणे मुले बाहेर पळत जातात. मुली कानबाई समोर गाणी-झिम्मा-फुगडी कार्यक्रम होऊन वाजत गाजत घराघरातील कानबाई घट उठवून नदीवर ताल टिपऱ्यांच्या खेळात विसर्जीत करतात. लाकडी कानबाई

धुवून पुसून माघारी आणून ठेवतात. अशा प्रकारे कानबाई ( महालक्ष्मी ) सणाला रोट पद्धतीला अत्यंत महत्त्व आहे. मुला माणसात नवचैतन्य व उत्साह निर्माण होतो. रोट वंशवृद्धी होऊन वाढावेत अशी मनोकामना मानली जाते. पारपट्टी विभागात म्हणजे जळगावच्या उत्तरेस तापीपाट असलेल्या चोपडे ते यावल ह्या पलीकडील आदिवासी भिल्ल, मुसलमान आदी सर्वच समाजात रोटाची पद्धति वर्षानुवर्ष पुरातन काळापासून चालू आहे. हा खरा आनंदी सण. सर्व सणांचा राजा असा हा सण, नैसर्गिक आनंदातून दिसलेला पहिलाच सण होय.

# कानुबाई संबंधी थोडेसे

लेखक : श्री. प्रा. शं. क. कापडणीस

नासिक जिल्ह्याच्या उत्तर भागात (कळवण, बागलण, मालेगाव तालुक्यात) धुळे जिल्ह्यात आणि जळगाव जिल्ह्याच्या काही तालुक्यात, फाल्गुन आणि वैशाख ह्या महिन्यांमध्ये कानुबाईची प्रतिष्ठापना केली जाते. कानुबाई हे दैवत कायमस्वरूपी एकाच ठिकाणी स्थानापन्न झालेले नाही. तसेच या देवाची कुठेही एकाच ठिकाणी यात्रा-जत्रा भरत नाही. किंवा भरविली जात नाही. कानुबाई ही एक मानलेली व नवसाला पावणारी देवता मानली जाते आणि ज्याने कोणी नवस केला असेल आणि त्याच्या नवसाची परिपूर्ती झाली असेल तर तो भक्त किंवा भाविक आपल्या घरी कानुबाईची प्रतिष्ठापना करतो. म्हणूनच कानुबाईचा देव्हारा हा सतत फिरता असतो. कधी या गावी तर कधी दुसऱ्या गावी तिची प्रतिष्ठापना केली जाते. कानुबाईची वहीण रानबाई आहे.

काही माणसांना संतती प्राप्त होत नाही ती माणसं नवस करतात, "मला मुलगा झाला तर मी तुझी प्रतिष्ठापना माझ्या घरी करीन आणि तुझ्या दरबारासमोर त्याचा मी विवाह करीन". या स्वरूपाचा नवस केल्यावर आणि सुदैवाने संबंधित भाविक दांपत्यास मुलगा झाल्यावर कानुबाईची मनोमन पूजा होऊ लागते. कानुबाई हिचे नेमके वास्तव्याचे ठिकाण एकाच्च ठिकाणी नसल्याने आपल्या घरात तिची प्रतिष्ठापना होईपर्यंत तिला कबूल केलेल्या नवसातून मुक्तता होत नाही. नवसायासाने झालेला मुलगा मोठा होऊ लागतो आणि वयात आलेल्या मुलाचे लग्न ठरविले जाते. साधारणपणे लग्न करण्याचे फाल्गून व वैशाख हे दोनच महिने मराठी संस्कृतीत महत्त्वाचे मानले जातात. म्हणून या दोनच महिन्यात कानुबाईची प्रतिष्ठापना केली

जाते. तिचा उत्सव व गौरव सोहळा साजरा होतो. हा गौरव सोहळा साजरा करताना नाना तऱ्हेचा नाच, विविध गाणी खेळ आदी प्रकार आनंदाने नि बेभानपणे व तितक्याच भक्तीभावाने सादर करण्याची प्रथा आहे. या प्रसंगी जी गाणी गायिली जातात ती सर्व अहिराणी भाषेत आढळतात. त्याचे कारण कानुबाईची प्रतिष्ठापना अहिराणी बोल भाषा असलेल्या प्रदेशातच केली जाते. अहिराणी भाषिक भाग सोडला तर इतरत्र कुठे कानुबाईची प्रतिष्ठापना होत नाही व तिचा सोहळापण साजरा केल्याचे दिसत नाही.

कानुबाईची प्रतिष्ठापना फाल्गून किंवा वैशाख या लग्नांच्या महिन्यात मंगळवारी किंवा शुक्रवारी केली जाते. मंगळवारी स्थापना झाली तर शुक्रवारी तिची बोळवण केली जाते. शुक्रवारी स्थापना झाली तर मंगळ-वारी बोळवण केली जाते. कानुबाईचा मुखवटा घडण्याचे काम सहसा कुंभार करीत असतो. मातीचा मुखवटा किंवा धातूचा मुखवटा असू शकतो. कानु-बाईच्या सजावटीसाठी सुतार, शिंपी, कुंभार, मांग, सोनार आदि बारा बलुतेदार आणि आलुतेदार यांच्याकडून निर्मिल्या जाणाऱ्या वस्तूंचा उपयोग केला जातो. कानुबाईची प्रतिष्ठापना करण्याचा नवस ज्या कोणी भाविकाने केला असेल त्या भाविकाने कानुबाईच्या नावाने नवस केल्या दिवसापासून कानुबाई निधी ( गंगाजळी ) एका हंड्यात साठवावा लागतो. दररोज एक पैसा, दोन पैसे किंवा कुवतीनुसार पैसे त्या हंड्यात वा गाडग्यात टाकावेत असा संकेत आहे. शिवाय दर मंगळवारी किंवा शुक्रवारी कुवतीनुसार पैसे टाका-वयाचे असतात. आणि अशा प्रकारे कानुबाईच्या प्रतिष्ठापनेच्या दिवसापर्यंत जेवढा संचय होईल तेवढा संचयित निधी मानला जातो. हा पैसा कानुबाईच्या उत्सवासाठी खर्च केला जातो. प्रखर भक्तीवादातून या गोष्टी सहज शक्य होतात.

कानुबाईची प्रतिष्ठापना झाल्यावर तिच्या समोर चार पाच दिवस दिवे जाळले जातात. या दिवसात दिव्यांसाठी एरंडीचे तेल वापरले जाते. दुसरे तेल कानुबाईला वर्ज्य आहे असे मानतात, म्हणून भाविक सव्वामण एरंडीचे तेल आधीच तयार करून ठेवतो आणि मग त्या एरंडीच्या तेलाचा दिव्यांसाठी

उपयोग केला जातो. कानुबाईच्या प्रतिष्ठापनेनंतर तिच्या साजशृंगाराला सुरूवात होते. तिला विविध वस्त्रांनी आणि अलंकारांनी सजविले जाते. तिच्या नावाने काही कानुबाईचे पुजारी व भक्त येतात. ते कानुबाईची खास पूजा करतात, गाणी म्हणतात तिच्या काही गवळणी मागविल्या जातात. त्या गवळणींना "गवरण्या" असा रूढ शब्द आहे. या नऊ गवरण्या असतात. त्यात एक लहान मुलगी असते तिला "आळीभोळी" म्हणतात. दुसरी थोडी मोठी असते तिला "काळी चोळी" असे म्हणतात व इतर सात ह्या मोठया वयस्कर व प्रसंगी वृद्धही असू शकतात. यांचा विशेष करून थाटमाट असतो. यांच्या आंघोळी, भोजने यांना विशेष महत्त्व असते कानुबाई व गवरण्यांच्या भोजनाच्या कोणत्याही पदार्थात मीठ घातलेले नसते. चौथ्या दिवशी यांची मिरवणूक निघते.

अनुक्रम : —

1. सौ. सरला मुधोळकर
2. श्री. भा. या. कुलकर्णी
3. श्री. तापीराम पवार
4. सौ. गंगूताई वैद्य
5. सौ. शुभा वाजपेयी
6. श्री. बाजीराव पाटील
7. श्री. शं. बा. राजभोज
8. कु. मीनाक्षी टोकेकर
9. श्री. शं. क. कापडणीस
10. प्रा. सदाशीव माळी

१

*संग्राहिका : सौ. सरला मुधोळकर*

( १ )

उतरू उतरू कानबाई तुना भाऊ शे
उतरू उतरू कानबाई तुना बापू शे
उतरू उतरू कानबाई तुनी माई शे
माय तुना माहेरी पंच ग नगरी ओ माय

( २ )

मन्या घरी पाहुणी कानबाई
तो जागु सारी रात माता जागु सारी रात
केळी खांबले गाडी धाडनी
होई गयी आधी रात माता
कानबाई चालली तेलंग्या देशीला
तेलंग्या देशीचं काय काय लेणं
त्या पुतळीचं निर्मळ सोनं

( ३ )

कानबाई मायना लाल धजा[१]
तिथून निघना[२] गोरख राजा
गोरख राजानी काय काय करणी
नारळ भरणी नारळ भरणी
आहेरल्या तुम्ही कानबाई बहिणी
काय करू तुमले आहेर ले
जासु मी मने माहेरले
तुन्या माहेरनी काळी पाठ
बरस्र भोजन ना थाट
भोजनना थाट वर तुपनी धार
उतर कानबाई पाहिले पार

( ४ )

माझ्या ठुशीचा जोड ग्रा तुझ्या गळी
माझी कानबाई सासुरवाशी
चढ्न यावे की रंगमहालावरी
घेई पैठणी नेशी साडी काळी चिल्लाई[३]
गळ्यामधी की जडावी ठाशी ठुशी
मना कान्हेर[४] की मोठा गुलहौशी
कमरी करदोटा बांधूनी सोन्याचा

---

१. ध्वजा, पताका. २. निघाला. ३. एक प्रकारची साडी.
४. कानबाईचा नवरा.

डाल्या गडे की, मनगटी तोड्या ह्या
याच्या दंडावर सोन्याचा ताईत
शिरी बांधून मंदिले जरतारी
झालर पडली कानावरी तुरा लाविला त्याच्यावरी
पायी मोजे की, सुंदर चाल चाले की नखरेबाज
कानी तोंगल[1] की चारी भिकबाळीचा जरावरी
हातामधे रूमाल की हौशेचा येवढा शिनगार त्या देव कन्हेराचा

( ५ )

कानबाई वाणीन बामणीन व माय
हाती झुरकालानी फणी व माय
बाल विंचरे अंगणी व माय
इना बालनी घोंगडी व माय
सूर्य झाका चहुकनी व माय
कोणा घरनी गाडी ऊनी
कन्हेर घरनी गाडी ऊनी
पिवळा पितांबर नेसली
अंग जरनी काचोळी
नाकी नथ सरजानी
डोळे काजळ झिरिमिरी
कपाळ कुंकू लल्लाटी
भांगी गुलाल ना भरी
खोळ[2] नारळनी भरी

---

१. झुपका २. ओटी

कानबाई चालली मूळकरी
कोणासारखा धूरकरी[१]
कन्हेरसारखा धूरकरी
वेणी रंगीत वळियेली
यान्या ताबुदान्या झुला व माय
कानबाई चालली मूळकरी
बारा कोसानी उजाडी
कानबाईन माहेर फुलझाडी
लाल पाणीनी बावडी
झिऱ्या[२] खालनी शेवडी

( ६ )

कानबाई चालली गंगेवरी
काय लयेनी थाळाथरी
नारळ लयनी थाळाथरी
येवढा नारळ कसं पुरी
मने कानबाईले गोत भारी

( ७ )

कोण्या दारशी झिरा खंदाया
झिरमळा झिरमळा पाणी व माय
भाऊना दारशी झिरा खंदाया

१. गाडीवान २. झरा

कानुबाई बसली नहायाला
येते झुमकडानी वेणी व माय
समुद्र भवता बाग लावा
बिजोराना बंद व माय
बिजरा तोडू साबडा भरू
माता पुंजाले जाऊ व माय

( ८ )

समुद्र काठनं सोनं पिकं, रत्न टीक, मनी कानबाई माय
पायी तोडा वर कलडा वोपदेती कानबाई माय
हाती वेल्या वर वाक्या वोपदेती कानबाई माय
गळा पुतळा वर चितांग वोपदेती कानबाई वो माय
गळे ठुशी वर वज्रटीक वोपदेती कानबाई वो माय
कानात बाळ्या नाकात नथ वोपदेती कानबाई वो माय

( ९ )

तापी गिरणाबाईना मिळे
तिथे काय बंगई टांगली व माय
तिथे काय कानुबाई बसली व माय
झोका खाता सरी तुटल्या व माय
मोती पवळ्यानी रोदई व माय
वाण्या बामण्याना पोरी व माय
मोती वेचून भरल्या गोणी

गोणी डाल्या नंदीवरी व माय
वंजीना सोनार कारागिरी
गळ्या मा पुतळी ना हार व माय
मोर तो करे कन्हेरे व माय
हार लेनार कानबाई व माय
आईना गळ्यामधी नेला व माय

## २

---

संग्राहक : श्री. भा. या. कुल

कानबाई मायना जतरे जाऊ माय जतरे जाऊ
कानबाई मायनी जतरा दाट जतरा दाट
देव दरसननी लांभी वाट लांभी वाट
राही दोडा राही दोडा कानबाई नारजी
करनली परनली नारळामा नारजी
नारळाचा उच्चामाचा मध्यम झाली रातजी
मध्यम झाली रातजी तं कापूर लावा ज्योतजी
राही दोडा राही दोडा कानबाई नारजी
करनली परनली खारीक नारजी
खारकीचा उच्चामाचा मध्यम झाली रातजी
मध्यम झाली रातजी तं कापूर लावा ज्योतजी
राही दोडा राही दोडा कानबाई नारजी

करनली परनली बदाम नारजी
बदामाच्या उच्चामाचा मध्यम झाली रातजी
मध्यम झाली रातजी तं कापूर लावा ज्योतजी

## ३

*संग्राहक : श्री. तापीराम पवार*

( १ )

काया घोडानी काई कानबाई व माय काई कानबाई
इना भरतार चाले ठाई ठाई व माय चाले ठाई ठाई
गेली सोनाराच्या दारी व माय सोनाराच्या दारी
सोनार उठला घाई घाई व माय उठला घाई घाई
चितांग काढीला लवलाही व माय काढीला लवलाही
काया घोडानी काई कानबाई व माय काई कानबाई
गेली सुताराच्या दारी व माय सुताराच्या दारी
सुतार उठला घाई घाई व माय उठला घाई घाई
चौरंग काढला लवलाही व माय काढला लवलाही
काया घोडानी काई कानबाई व माय काई कानबाई
इना भरतार चाले ठाई ठाई व माय चाले ठाई ठाई
गेली वानीयाच्या दारी व माय वानीयाच्या दारी
नारय काढीलं घाई घाई व माय काढीलं घाई घाई

नारय दिलं लवलाही व माय दिलं लवलाही
काया घोडानी काई कानबाई व माय काई कानबाई
इना भरतार चाले ठाई ठाई व माय चाले ठाई ठाई
गेली शिंपीयाच्या दारी व माय शिंपीयाच्या दारी
शिंपी उठला घाई घाई व माय उठला घाई घाई
अंबर काढला लवलाही व माय काढला लवलाही
काया घोडानी काई कानबाई व माय काई कानबाई
इना भरतार चाले ठाई ठाई व माय चाले ठाई ठाई

( २ )

चैत वैशाखाचं ऊन व माय वैशाखाचं ऊन
खडके तपूनी झाले लाल व माय तपून झाले लाल
आईच्या पायले आले फोड व माय पायले आले फोड
तिथे कशीयाचा बन व माय कशीयाचा बन
तिथे नारियाचा बन व माय नारियाचा बन
तिथे सावली घमाघोर व माय सावली घमाघोर
तिथे कानबाई रमनी घटकाभर व माय रमनी घटकाभर
पायी बेगडी वाव्हना व माय बेगडी वाव्हना
पिवया पितांबर नेसली व माय पितांबर नेसली
आंगे काचोई घातली व माय काचोई घातली
कपाय कुंकूयानी चिरी व माय कुंकूयानी चिरी
डोळे काजय झिरी मिरी व माय काजय झिरी मिरी
मुखे नागेनिना विडा व माय नागेनिना विडा

( ३ )

अरे तू नागोजी सुतार गेला डोंगर परवत व माय गेला डोंगर परवत
खांदे घातल्या कुऱ्हाडी व माय घातल्या कुऱ्हाडी
उंचा चंदन निवाया व माय चंदन निवाया
चंदन धरनीवर पाडला व माय धरतीवर पाडला
चंदन गाडे बैले आना व माय गाडे बैले आना
टाका सुताराच्या दारी व माय सुताराच्या दारी
यानी पाट्याज किसल्या व माय पाट्याज किसल्या
यानी बंगई घडली व माय बंगई घडली
बंगईले रेसमना दोर व माय रेसमना दोर
बंगई आंगने टांगली व माय आंगने टांगली
झोका गगनले जाती व माय गगनले जाती
तठे काय बसनी कन्हेर कानबाई व माय कन्हेर कानबाई
कानबाई कन्हेरनी लाडकी व माय कन्हेरनी लाडकी
डोये काजयनी कोर व माय काजयनी कोर
कपाय कुंकूनी भवरी व माय कुंकूनी भवरी
मुखे नागेनीना विडा व माय नागेनीना विडा

४

---

*संग्राहिका : सौ. गंगूताई वैद्य*

(१)

दारी खंदला आड त्याला झिरमिर झिरमिर पानी व
कानूबाई बसली न्हायला सिर गोंड्यानी वेनी व

न्हाता न्हाता पूर चालना समिंदर ऊना भरी व
त्या समिंदरना काठे व नारयना झाडे व
त्या नारयले फय लागन लागन अपरूक नारय व
त्या नारयनी भरज्या माये कानूबाईनी खाये व

( २ )

हा काय नागोजी सुतार डोई भांदली भाकर
खांदी घातल्या कुऱ्हाडी गेला डोंगर परवडी
गेला डोंगर परवडी चंदन तोडीले निवाडी
अस्सल चंदन तोडशी कड्या चांदीच्या लावशी
या काय सोन्याच्या पिंपळी आईची बंगई टांगली
तिला काय रेसमाची दोरी कानूबाई बसली त्यावरी

( ३ )

कानबाई गोरी बसली व माय कानबाई गोरी
पिवळा पितांबर नेसली व माय पिवळा पितांबर
अंगी जरीची काचोळी अंगी जरीची काचोळी
डोळा काजळ झिरमिरी डोळा काजळ झिरमिरी
कपाळी कुंकाची चिरी कपाळी कुंकाची चिरी
भांगी गुलाल भरी भांगी गुलाल भरी
नाकी नथनीचा झोक नाकी नथनीचा झोक
नथनी हिरीयाची टिक नथनी हिरीयाची टिक

(४)

कोन गाव जाशी रे मुकुंदा मारवाडी
धुये जासू व कानबाई शेलाटी
माले काय लयशी रे मुकुंदा मारवाडी
बाजोट लयसू व कानबाई शेलाटी
कोन गाव जाशी रे मुकुंदा मारवाडी
नासक जासू व कानबाई शेलाटी
माले काय लयशी रे मुकुंदा मारवाडी
घागर लयसू व कानबाई शेलाटी

(५)

आठे नी घोडा हबकना माय व आठेनी घोडा
सुतारनी जागे थबकना माय व सुतारनी जागे
सुतारदादा थरथर कापे, सुतार दादा
आईना बाजोट लैलै नाचे मायना बाजोट
आठे नी घोडा हबकना माय व आठेनी घोडा
सोनारनी जागे थबकना माय व सोनारनी जागे
सोनारदादा थरथर कापे सोनार दादा
मायना घोडा लै लै नाचे माय ना
हाठे ना घोडा हबकना माय व हाठेना घोडा
कासारनी जागे थबकना माय व कासारनी
कासारदादा थरथर कापे कासारदादा
आईना चूडा लइलई नाचे आईना चूडा

आठेना घोडा हबकना माय व आठेना घोडा
बामननी जागे थबकना माय व बामननी जागे
बामनदादा थरथर कापे बामनदादा
आईनी पूजा लईलई नाचे आईनी पूजा

( ६ )

काळी घागर मोरनी तं वरती लाया गुंजा व
उघाड कानबाई कवाड तं स्वामी आला तुझा व
सहा मईन्याची रात गेली तं करमलं कसं हो
वाणीयाच्या दुकानी मी तं बसलो होतो तीथे ग
नारळाच्या गोण्या मी तं खरेदी केल्या सात ग
कुंकवाचे पोते मी तं खरेदी केले सात ग
सुपारीच्या गोण्या मीतं खरेदी केले सात ग

५

---

*संग्राहिका :* सौ. शुभा

( १ )

आता चालली कानबाई
आरती करु लवलाही
पाया पडा घाई घाई
मला जानं सींगणापुरी करु गत काही

कधी येतील कानोड बाई
भेट देऊन जाई
भगताशी बोलले नाही
रथ सवारा लवकरी
पूजा करा हो झडकरी
कान्होड चालली शिंगणापुरी

( २ )

चुटकी वाजता पेना कांते आठ
आठ पेनाचा एक बसर अचाट भिंगरे केले
कातून कातून तीनशेसाठ
माझी कानबाई उकले ताना
चारी वर्णाचा एक पुंजा जाणा

६

*संग्राहक : श्री. बाजीराव पाटील*

कानुबाई लेक लाडाची मायबाई लेक लाडाची
सोन्याच्या शिपलीनं दुध पाजीतो
रेशमाच्या घळीन[1] तोंड पुशीतो

१. घडीने.

कानुबाई लेक लाडाची
डोईवर पळकी फुलाची
कन्हेर नवरे झाले माय झाले
मायबाई नवरे झांले माय झाले
कानुबाई बसल्या चवरंगी · माय बसल्या चवरंगी
गुळफुल तुझ्या भोजाला
चाल चाल कानुबाई तेलंगना
चाल चाल मायबाई तेलंगना
गेली सुताराच्या वाडा माय
तथून घोडा फिरवला माय
पुढेच केली चाल व माय
गेली अताराच्या वाडा माय
तथून घोडा फिरवीला माय
पुढेच केली चाल
गेली कसाराच्या वाडा माय
तथून घोडा फिरवीला माय
पुढेच केली चाल
गेली कुंभाराच्या वाडा माय
तथून घोडा फिरवीला माय
पुढेच केली चाल
कुंभारदादा कुंभारीनबाई अजून रत्न झाले की नाई
कुंभारदादा थर थर कापे
रत्न घेऊन आंगणी नाचे
उरल्या सुरल्या माळानं घाला माय बन्हाळाच्या गळा

कानुबाई लेक लाडाची माय
डोईवर घागर रत्नाची माय
कानुबाई लेक लाडाची माय
डोईवर फळकी फुलाची माय

## ७

*संग्राहक : श्री. शं. बा. राजभोज*

कानबाई म्हणे सनबाईले चला जाऊ आपला माहेरले
आपला माहेरनी काळी पाटं भर भोजनना थाट
चैत वैशाखन उन्ह व माय वैशाखनं उन्ह
हिच्यापायी आले फोड व माय पायी आले फोड
कानबाई रमनी घडी भरव माय रमनी घडी भर
तिघं काय बिजोरानं झाड व माय बिजोरान झाड
राह्य राह्य काव बाई तुले येळा घड सू
नही व फुयजी मना माहेरले जासू
राह्य राह्य कानबाई तुले नय घड सू
नही व बाईजी मना माहेरले जासू
राह्य राह्य कानबाई तुले तोडा घाडसू
नही व आत्याबाई मी माहेरले जासू
राह्य राह्य कानबाई तुले बांगड्या नय घड सू
नही व मायबाई मी माहेरले जासू

# ८

*संग्राहिका :* कु. मीनाक्षी टोके

( १ )

आईचा जलम कुठूनी ग
कुठूनी ग माय
सात समुद्रापासूनी व माय
सात समुद्रापासूनी
आई आली घोड्यावर बसूनी व माय
घोड्यावर बसूनी
पिवळा पितांबर नेसूनी व माय
पितांबर नेसूनी
जराची काचळी व माय
जराची काचळी
कुंकवाची चिरी कपाय व माय
कुंकवाची चिरी
हाती तलवारीची धार व माय
तलवारीची धार
पायी बेल्यांचा झंकार व माय
बेल्यांचा झंकार

( २ )

ऊंचा गझना मसरू, हलवाई कारागीर
घ्या बाई पारखून

गझ लावून कातर मी तुकडे केले चार
चोली शिवरे बांझरा किती घालू हरजरा
चोळी घातली अंगात आई आली रंगात
चोळी शिवली सैयाने सांगून द्या भैयाले
नगरे नाचती नाचती नारायण
बायट निंद्य व सुताराची नारी
आईले जावानी जलरी
बाजट लाव लवकरी
नगरे नाचती नाचती नारायण
बायर निंद्य व शिंपीयाची नारी
मायले जावानी जलदी जंपर लाय लवकरी
नगरे नाचती नाचती नारायण
बायर निंद्य व मारवाड्याची नारी
मायले जावानी जलरी साडी लाय लवकरी
नगरे नाचती नाचती नारायण
बायर निंद्य व वाणीयाची नारी
मायले जावानी जावानी जलरी
नारयानी गोणी लाव व लवकरी

( ३ )

सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
सोनार माझा भाऊ बसली व्हती तठे व
नथायाची जोड मीने खरदी केले दोनी व

सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
वाण्या माझा भाऊ ते बसली तठे व
नारळाची गोणी मीने खरदी केल्या दोनी व
सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
सुतार माझा भाऊ ते बसली व्हती तठे व
बाजो ठानो जोड मीने खरदी केले दोनी व
सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
मारवाडी माझा भाऊ ते बसली व्हती तठे व
साडी याना घड्या मीने खरदी केल्या दोनी व
सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
तांबोळी माझा भाऊ ते बसली व्हती तठे व
लिंबूयाच्या गोणी मीने खरदी केल्या दोनी व
सौ महिनानी रात्र गेली
गेली व्हती कुठे व ?
गावरान् बार बेनाती सामी आल्या तुझ्या हो

( ४ )

कोनता दिससी आयी व माता
खेल रणूबाई झालरीया
तेने झालरीने जयजय मोती व माता
खेल रणूबाई झालरीया

तेने झालरीने नारळीना गोटा
खेल रणूबाई झालरीया
तेने झालरीने जयजय मोती व माता
खेल रणूबाई झालरीया
तारू कपत सुधियानी तेज व माता
खेल रणूबाई झालरीया
तारा डोळत निंबूना पुडी व माता
खेल रणूबाई झालरीया
तारा नाकुती तलवारनी धार व माता
खेल रणूबाई घागरीया
तारा हातनी केळीना खंबा व माता
खेल रणूबाई झालरीया
तारा पेट्टती कणीक ना गोळा व माता
खेल रणूबाई घागरीया
तारा बूटती चवयीना सेंगा व माता
खेल रणूबाई झालरीया
तारा पगते वखरना रांड्या व माता
खेल रणूबाई झालरीया
तारा झालरने जयजय मोती व माता
खेल रणूबाई झालरीया

# ९

संग्राहक : श्री. शं. क. कापडणीस

( १ )

समदीर परमळे मग मग
समदीर खालता पंचेवाद्य
बाहेर निघा हो कानबाई नारी
तुम्हले वना तो कन्हेर मुळकरी
आहेर ल्या तुम्ही कानुबाई नारी
तुना आहेर तुना तुले
जासू मना मी माहेरले
मना माहेरऱ्या काय काय रीती
केशर कस्तुरी सारवल्या भिती
आळा भोळा ह्या भगत व्हती
आर्धी रातन्या गवरण्या येती
डोईना पदर खांदी येती
कडेना बाळके निजरा घेती
पायेना पवलर झणकार देती
सव्वा खंडीना भोजने भरती
काळी पाटण्या दावणी दीती
समदीर परमळे मग मग

( २ )

कानबाई सोधे रानबाईले
तारा कोठे दिसी हो
तारा दिसू वारा दिसू पाटीलना घर हो
पाटीलनी बाज मोठी कुळवंत नार हो
कुळवंती नार हिनं बसन टाक दार हो
बसन टाक दार हिनी लायात समया चार हो
लायात समया चार हिनी मोतीऱ्या लडा कयात चार हो
सुखसमाने राहो तुना शेजना भरतार हो
मांडव येले जावो तुना व्हवो पोटना इस्तार हो

( ३ )

कानबाई वाघनी वाघीण हो
रानबाई वाघनी वाघीण हो
पाच फणानी नागीन हो
मनी मालनले डचणी हो
कानबाई लहऱ्याच दिये हो
भक्तीन आणा "गहूबाई" हो
गहूबाई लहरा ते उतारे हो
मालन हसाले लागी गयी हो
सई मनी हसा लागी गयी हो

( ४ )

माळीना मळात माळी तो एकला
जाईच्या फुलाने गजरा गुंफला
एवढा गजरा कोणाया करता
एवढा गजरा कानबाई करता
माळीन एकली भाऊ माळीन एकली
जाईच्या फुलाने भाऊ कंचोळी गुफली
एवढी कंचोळी कोणायासाठी
एवढी कंचोळी मालनसाठी
एवढी कंचोळी कानबाईसाठी

( ५ )

आज काय सई ना मंगळवार
कापूर साठी जाऊ बजार
कापूरनी आरती गजरे घेऊ
सई कानबाईना जतरे जाऊ
हाई मालनना मोठा थाट
हिना दर्शनले मिळे ना वाट
सईना दर्शनले मिळे ना वाट

( ६ )

काळीच कानबाई महूर घोडी
सोनारना वट्टा जाय चढी
चांगलाच मुकुट लय काढी
काळीच कानबाई महूर घोडी

वाण्याना वट्टा जाय चढी
शेंडीना नारळ आण काढी
तुनाज नारळनं काय घिसी
मनाज नारळना नव लाख घिसू
तवळज नारळ हातात दिसू
काळीच कानबाई महूर घोडी
शिंपीना वट्टा जाय चढी
चांगलीच साडी आण काढी
तुनीज साडीनं काय घिसी
मनीज साडीना नव लाख घिसू
तवळच साडी हातात दिसू
चोळी शिवरे बिजोरा
किती घालू येरझारा
चोळी टाकली अंगात
कानबाई आली रंगात

( ७ )

मध्यम रातऱ्या मदन पडती
सव्वाज खंडीना भोजने भरती
मध्यम रातऱ्या गवरण्या येती
लालज तांबड्या गवरण्या न्हाती
सूर्यज उगवता गवरण्या जाती

(८)

माळीना मळात बागजे लाविला
नारिंगीचा बाग एवढाजे बाग
एवढाजे बाग तोडिले नारिंग
एवढं नारिंग कानबाईना दरबार
माळीना मळात लाविले नारळ
एवढं नारळ कानबाईना दरबार
माळीना मळात लावली निंबून
तोडिले निंबून भरल्या पाट्या
एवढ्या पाट्या मालनसाठी
माळीना मळात खारीकना बाग
तोडिले खारीक भरल्या पाट्या
एवढ्या खारका मालनसाठी
एवढ्या खारका कानबाईसाठी

(९)

कानबाई सांगे रानबाईले
चाल जाऊ आपल्या माहेरले
पाय आपल्या माहेरनी हवा
नारळ्या बाग लाया नवा
कानबाई सांगे रानबाईले
चाल जाऊ आपल्या माहेरले
पाय आपल्या माहेरनी हवा
निंबना बाग लाया नवा

कानबाई सांगे रानबाईले
चाल जाऊ आपल्या माहेरले
पाय आपल्या माहेरनी हवा
खारीकना बाग लाया नवा

(या प्रमाणे विविध फळांची नावे योजून गाणे लांबविणे शक्य आहे तेवढे असेच लांबवितात.)

(१०)

घाटवरला वाण्या भाऊ तू
वाटंवर का उभा रे
नारळसऱ्या गोणी तू का
पल्लागणती घेस रे
एवढ्याच का रे गोणी तू
कानबाईले देस रे
घाटवरला वाण्या तू
वाटंवर का उभा रे
गुलालऱ्या गोणी तू का
पल्लागणती घेस रे
एवढ्याच कारे गोणी तू
कानबाईले देस रे
घाटवरला वाण्या भाऊ तू
वाटवर का उभा रे

नारळसऱ्या गोणी तू का
पळागणती घेस रे
एवढ्याच का रे गोणी तू
कानबाईले देस रे
मनी मालनले देस रे

(या प्रमाणे कापूर, खारीक, खोबरे आदींची नावे घालून गाणे लांबवित

# दौ ( दव )

संग्राहक : प्रा. सदाशीव माळी

(धुळे जिल्ह्यात सोनगीर या तालुक्याच्या ठिकाणी गावाबाहेर एका भर दुपारी हा कार्यक्रम पाहिला. त्या परिसरातील धनगर समाजात हा कुळाचार म्हणून मानतात.

वडिलधारा एखादा माणूस मृत झाला म्हणजे मिठाच्या ढिगाऱ्यात मृतदेह ठेवून तो पुरलेला असतो. हा दफनविधी झाल्यापासून बरोबर ११ महिन्यांनी या मृतदेहाचे मुखावलोकन करण्याचा धार्मिक समारंभ. सर्व जातिबांधवांसह मोठ्या प्रमाणात साजरा केला जातो. मृतदेह गळ्यापर्यंत उघडला जातो त्याला पांढरा फेटा बांधला जातो. भगतगण नाचत राहतात. ढोल, तुताऱ्या वाजत असतात आणि जातिबांधव विड्याच्या पानावर हळदीकुंकू गुलाल, फूल अक्षता व वात लावून मृतदेहाला ओवाळतात व मुखावलोकन करून नमस्कार करतात. सभोवताली सर्व समाज देवीची गाणी म्हणत असतो. त्यातील काही नमुने पुढे दिले आहेत. दुपारनंतर सर्व मंडळी ज्याच्या घरी हा "दौ" कार्यक्रम साजरा झाला त्यांच्या घरी भोजनास जातात. सामिष आहार तयार करावा लागतो. मद्यपानही रीतीने मानले व केले जाते. धनगर जमातीत श्रीमंतीचे निदर्शक म्हणून हा कुळाचार मानला जातो.)

(१)

वयली गाऊ वई वई मी कोनाला गावली ग कानबाई माता
पयली गाऊ वई वई मी कन्हेरला गावली ग कानबाई माता
सव्वा मन थाट नि मारी घर देवाची आरती ग कानबाई माता

तेतीस कोटि देव सब लोग तमाशा पाहिल ग कानबाई माता
माझे मनवे घळ मी मागती पुत्रू फळ ग कानबाई माता
दुसरी गाऊ वई वई मी कळसाला गावली ग कानबाई माता
सव्वा मन थाट मारी ग देवाची आरती ग कानबाई माता
तेतीस कोटि देव सब लोग तमाशा पातील ग कानबाई माता
तिसरी गाऊ वई वई मी नारळला गावली ग कानबाई माता
माझे मनव घळ मी मागती पुत्रू फळ ग कानबाई माता

(२)

आईचा ऊगुन कोठूनि नि बाई ऊगूम कोठून
साती समुद्रापासूनी समुद्रापासूनी
आली रथावर बसूनी नि बाई पीतांबर नेसूनी
चोळी जरीनी घातली बाई जरीनी घातली
कपाळ कुंकू यानी चीरी आई कुंकू यानी चीरी
डोळे काजळ झीरीमिरी बाई काजळ झीरीमिरी
भांग गुलाल ना भरा बाई गुलाल ना भरा
बाल मोत्यान सवारी बाई मोत्यान सवारी
बाई ना कन्हेर धुरकरी बाई कन्हेर धुरकरी
कानबाई जाशील कोण्या वाडी बाई जाशील कोण्या वाडी
कानबाई जाशील धनगर वाडी जाशील धनगर वाडी
कानबाई हासत काय मागे बाई हासत काय मागे
कानबाई हासत बाजोट मागे बाई हासत बाजोट मागे

(३)

कानबाई वाण्या बामननी नि बाई वाण्या बामननी
बाल विचरूनी कै घोंगडी बाई विचरूनी कै घोंगडी
ईनी काय झुंमुक्यानी वेणी बाई झुंमुक्यानी वेणी
न्हाई घोई आसने बसनी बाई आसने बसनी
कानबाई रातनी पावनी बाई रातनी पावनी
आईला दुधे तुपे धवा बाई दुधे तुपे धवा
कुकू तांदूळ आचा बाई तांदुळ कुकू आचा
जोत कापुर नी लावा बाई कापुरनी लावा
जाईल मायावरी धरा बाई मायावरी धरा
बाईले दोन्ही हात जोडा बाई दोन्ही हात जोडा
बाईना जयजयकार करा बाई जयजयकार करा
बाईले नमस्कार करा बाई नमस्कार करा

(४)

लटकशी चाल व झटकती बाल माता लटकशी चाल
बसाले चंदन पाट व माता बसाले चंदन पाट व
नेस्तले निळा घाट व चोळी जरीना काट माता चोळी जरीना काट
सोना रूपानं थाट माता भोजन दही भात व
भोजन दही भात गोजऱ्या गोजऱ्या हात व
गोजऱ्या गोजऱ्या हात माता का पुरनी लाऊ जोत व
कापुरनी लावू जोत माता मोठाल्या नी लेक व
मोठाल्यांनीं लेक माता कीर्तीन सारी रात व

( ५ )

काय म्हणू कानबाई काय उनी ठाती व माय
काय म्हणू राती न काय लेनं व माय
काय म्हणू रातीना दसांग लेनं व माय
हाती धरी तलवार समदीर काठी व माय
समदीर काठी न लखलाई मोती व माय
सोनार भाऊ तू जडी दे राती बा

( ६ )

आरे तू लालाजी लालाजी सुतार
तुम्हन सोनान सोनान किकर
तुम्हन चांदीन चांदीन बारूल
डोके बांधल्या बांधल्या भाकरी
एक डोंगर डोंगर उतरीला
दोन डोंगर डोंगर चढीला
खोदे घातल्या घातल्या कुऱ्हाडी
आसील चंदन चंदन ढाईल
टाका लव्हार लव्हारच्या दारी
बंगई घळी दे घळी दे सुतार
हालकड्या लाई दे लाई दे जिनगर
दोर रेशमी रेशमी लाईला
कानबाई न्हाई धोई न्हाई धोई बसनी

भंडग गुलाल गुलाल भरी
कपाय कुंकूयानी चिरी
डोळे काजळ काजळ झिरीमिरी
कानबाई बंगई व बंगई वर बसनी
झोका दियेना दीयेतुना देर
झुला आगन गगनले जाये

( ७ )

कानबाई माता व तार बारन उघाड
तारी बार ने सारा सुतार भेजाव
सुतार भाई रे सारा बाजोट घडी लाव
लाऊ लाऊ व माता जबना मझार
जबनी हाते व माता कन्हेर न झाड
हडाही हाते व माता आंबेरी तलवार
कानबाई माता व तार बारन उघाळ
तारी बाई ने सारा कसार भेजाव
कसार भाऊ रे सारा मुकुट भेजाव
लाऊ लाऊ व माता जबसा मझार
जबनी हाते व माता कन्हेरन झाड
डाही हाते व माता आंबेरी तलवार
म्हनी घर कानबाई पावनी ते दुनी घर दुसांग परमोये
तुन घर दुसांग परमोये तुनी घर दुसांग परमोये
आगास बरन्या तीन चांदण्या तीसरी चांदनी निरमोये
म्हनी घर कानबाई पावनी ते तुनी घर नारळ

परमाये तुन घर नारळ परमोये तुन घर नारळ परमोये
आगास बरन्या तीन चांदण्या तीसरी चांदणी निरमोये
म्हणी घर का कानबाई पावनी तुनी घर कापुर परमोये
तुनी घर कापुर परमाये तुन घर कापुर परमाये
आगास बरन्या तीन चांदण्या तीसरी चांदणी निरमोये

# आमच्या घरी मंगळागौर

मागल्या पुढल्या दारीच्या झाडांवर न् अवतीभोवतीच्या कुंपणावरील वेलांवर रंगीबेरंगी सुगंधी फुलांना मस्त बहार आलावता. त्यामुळं देखण्या फुलांचा भडिमार करून सोडतेल्या वृक्षवेलींशी गुजगोष्टी साधीत जाळीच्या परडीत फुलं वेचावीत असा मोह त्या दिवशी मला फारच झालावता...म्हणून घाईगर्दीनं पुढं पुढं येतीली कामं भराभरा उरकून त्या दिवशी मी अंगणात आलेवते खरी पण जीव कसा कावराबावरा झालावता. काही तरी जिवा-भावाचं हरवलं म्हणजे ते शोधताना नजर भिरभिरावी तसं झालंवतं...उगीचच मी इकडून तिकडं न् तिकडून इकडं पहात राहिलेवते...सुंदर सुंदर फुलं वेचून परडी भरगच्च सजवावी म्हणून पुढं होतेला हात मी मागं घेतलावता...

"काग आक्का, आज फुलं नाही का तोडायची?...घरात मंगळागौर ना तुमच्या आज?...मग?"...फुलाकडं खुळ्यागत बघतेल्या मला गदागदा हल-वीत आमच्या शेजारच्या पुष्पानं मला हाटकली पण मग मी बोललेच नाही. नुसतंच 'हं !' केलं न् सरळ घरात आले...

श्रावण निघालावता न् मंगळवार उगवलावता म्हणून मंगळागौर होती यापलीकडं त्यातलं काहीच घरात दिसत नव्हतं!...जिवापाड हौसमौज जपतेल्या मला त्यामुळं खुळ्यागत झालंवतं. पण मी काहीच करू शकत नव्हते!...दुसऱ्यांच्या घरात लुडबुडायचा मला अधिकार नव्हता न् शिकलेल्या लोकांच्या घरी वाडवडिलांची चालरीत सजवीन म्हटलं तरी ती खपणारी नव्हती.

आमच्या थोरल्या मावशीच्या घरी मी आलेली...का? तर तिच्या लेकीचं लगीन ह्यावर्षी झालेलं तर सगळे सणवार झोकात व्हावेत ही आमच्या आईची न् मावशीचीही दांडगी इच्छा होती. म्हणूनच मी तडातापडीनं आलेली.

पण आल्या आल्याच "मला तसलं काही आवडत नाही पूजेबीजेचं" असं मावशीच्या लेकीनं, संगीतानं, सांगावा दिल्याकारणानं सगळ्यांचाच हिरमोड झालावता....उरीपोटी दाटून येतेल्या आमच्या मनातल्या हौसेमौजेला त्यामुळं तडा गेलावता न् म्हणून मी खुळ्यागत साऱ्या घरभर नुसती येरझाऱ्या घालीत फिरत होते. खरं सांगायचं तर माझा जीव उडून गेलावता न् कशातच माझं मन रमत नव्हतं...

संगीता शिकलीसवरलेली. महाविद्यालयात लेक्चरर म्हणून नावारूपाला आलेली. देखणी, हुशार, चुणचुणीत. पण...पण बदलत्या कालमानाप्रमाणं तिच्या आचारविचारांत एवढा बदल झालावता की, रीतीरिवाजाप्रमाणं वागणं तिला गावंढळपणाचं, वेडेपणाचं, वाटत होतं...तिचं म्हणणं, "लग्ना-नंतर नवऱ्याला जर कसले कुळाचार पाळावे लागत नाहीत तर मग बायकोवर काय म्हणून ही सक्ती असावी ? कशासाठी ?"

आमच्याजवळ याला उत्तर नव्हतं. पिढ्यान् पिढ्यांनी घालून दिलेल्या चालीरीती पाळताना सगळे गणगोत एकत्र येऊन मनसोक्त सुखसंवाद साधता येतो हीच आमच्या मनाची धारणा. निसर्गाशी तादात्म्य पावताना लग्नानंतर येणाऱ्या पोक्तपणाला शोभेसं बाळपण चिकटवीत बरोबरीच्या मुलीबाळीं-बरोबर हसत खिदळत पोटभर खेळावं, नाचावं, गावं न् खाणपिणं मनसोक्त करीत मजा मारावी ही आमची मनोभावना...म्हणून तर मी आवर्जून आलेली...एवढंच नाही तर ––

घ्या घ्या कुऱ्हाडी
चला जाऊ वऱ्हाडी
चंदनी लाकडं तोडायला बाई तोडायला
गणपतीचं देऊळ बांधायला बाई बांधायला
गणपतीच्या देवळात
गजानन वसे गजानन वसे

## आली आली पार्वती
## टाकील फासे टाकील फासे

लाडूझिम्म्याचं हे गीत तोंडपाठ करून झिम्मा खेळायला मजा यावी म्हणून एकेका हातात चांगल्या पाचपाच काचेच्या बांगड्या न् मागं पुढं सोन्याचे बिलवर लेवून मी आलेली...शिवाय मंगळागौरीची पूजा बांधताना सोळा प्रकारची पत्री कशी गोळा करायची, नाना प्रकारची फुलं कशी मिळवायची, त्याच फुलांचे देवीचे हात कसे करायचे, तिची वेणी कशी गुंफायची, चोळीचा खण कसा मांडायचा, काजळतीट कशी सजवायची यातला बारकावा ध्यानात धरलेला...झालंच तर मावशीच्या घरी धांदल गडबड तेव्हा खोळंबा नको म्हणून काळीपोत न् बांगड्या बरोबर आणलेल्या...

चौरंगावर मांडलेल्या देवीला दही, दूध, तूप, मध न् साखर यांच्या घुसळणानं तयार होतेलं पंचामृतही लक्षात ठेवलेलं...

पण इथं पहातेय तर त्यातला कशाचाच मागमूस देखील नव्हता! जणू काही आपण या गावचे नाहीच म्हणावं एखाद्यानं अशातली गोष्ट घडून येतेली.

त्यामुळं नदीवरून अगर विहिरीवरून आणलेली पाच खड्यांची गौर पिठाच्या अलंकारांनी सजवीत वषेरीनं, "देवी देवी, तुला घे पिठाचे, मला दे सुवर्णाचे" असं म्हणत उपभोगायची मजा पण गेलीवती पार कुठल्याकुठं! साहजिकच मग बरोबरीच्या वषेरी पोरींना निमंत्रणं गेली नव्हती का देवीच्या पूजेनंतर पुरणपोळीचा, गव्हल्याच्या खिरीचा, वरणभाताचा, साजूक तुपाचा, तऱ्हेतऱ्हेच्या कोशिंबिरीचा महानैवेद्य पण घरात शिजण्याची गोष्ट इथं निघतच नव्हती! म्हणून तर मला कसं उभं वारं सुटलंवतं!

संध्याकाळच्या फराळासाठी म्हणून ओल्या नारळाच्या करंज्या न् कांदा पोहे मी झक्कास चवदार करून देईन म्हणून घरून येताना मारलेली ऐटी रसातळाला गेलीवती! . . .आणिकं––

लाट्या बाई लाट्या चंदनी लाट्या
मामांनी दिल्या मला सारंगी पेट्या
आई मी ल्हान केतकीचं पान
मामांना सांग मला कंबरपट्टा आण
एक सूं सूं दोन सूं सूं
आपण दोघी मैत्रिणी हिरव्या साड्या नेसू

पैंजणवाळे घालून हे गीत गात लाटण्यांचा खेळ खेळायचा हा मनानं घेतले
हेका पण पार कोमेजून गेलावता...आपला खेळ मस्त व्हावा म्हणून येत
घरून आणलेल्या चंदनाच्या घमघम वासाची लाटणी मी कुणाला दाख
नाहीत आल्या आल्या ते बरं झालं बाई ! नाहीतर केवढा फजितवाडा झ
असता नाही का ?

संगीताला मेलीला कसली हौसच नाही असली. म्हणते कशी, "तु
संस्कृती बुरसटलेली म्हणूनच असले छंद तुम्हाला !"...अग जा ! नाही
नाही. इथं तरी कुणाचं नडलंय तुझ्या विनवण्या करायला ? नाही खेळग
केली तर मंगळागौर थोडीच रुसणार आहे ?...या गोष्टी सगळ्या ह
मौजेच्या, तालेवारीच्या, जिवाभावाच्या मैत्रिणींच्या सहवासात मिळण
आनंदाच्या.

आम्हाला असलं आवडतं. ज्याची त्याची आवड निराळी. गोष्ट खरी.
इतरांच्या मनाचाही थोडा विचार असावा की मी म्हणते ? सगळं आप
चालवून कुठं काही होतं काय तेव्हा ?

पण हे बोलायचं कुणी न् कुणाला ? एवढी आमची मावशी हे करीन
ते करीन म्हणणारी पण बसलीय मऊसूत होऊन ! जाऊं दे. हे ठाऊक अ
तर मी तरी कशाला येतेय इकडं ? मावशीनं आधीच नाही का कळवाय
आमच्या शेजारघरी मंगळागौर होती तिथे गेले असते की मी खु
खेळायला ? ...

ही मंगळागौर म्हणजे देवी पार्वती. लग्न झाल्यानंतर तिच्याप्रमाणं आपणही अखंड सौभाग्यवती व्हावं म्हणून व्रतस्थ होऊन तिची पूजा करायची. पण संगीताला हा खुळेपणा वाटतो.

तिचं म्हणणं, "नवरा का नाही व्रतस्थ होत? आपणच कशाला हे खेकटं गळ्यात घ्यायचं?" आहे की नाही म्हणजे? मी म्हणते नसलं प्रस्थ पूजेचं तर असू दे पण सासरमाहेरचा प्रवास तरी घडू दे की त्या निमित्तानं? कोड-कवतिक तर घे की म्हणावं करून? खेळगाण्यात भाग घ्यायला कोणती हर-कत आहे? बरोबरीच्या सख्यासाजणींशी हसत खेळत हितगुज साधलं तर बिघडतं कुठं?

मावशीनं हिला म्हणे भरजरी साडी घेतलीय. जडावाचं मंगळसूत्र केलंय. तेव्हा ही आलीच नाही म्हणजे केवढा हिरमोड बिचारीचा?

म्हणे मी कॉलेजात शिकवायला जाते. जात असशील? म्हणून काय कुळाचारांना मूठमाती द्यायची असते का?...आणि वडिलधाऱ्यांचा अपमान करायचा असतो का असली नकारघंटा वाजवून? बघा तरी खरी!

पाच-दहा मिनीटांचा प्रश्न. हळदी कुंकू देत घेत देवीला नुसता नमस्कारही करायचा नाही म्हणजे? पूजाबिजा आम्ही मांडली असती? आलं गेलं आम्ही पाहिलं असतं? आवडत नाही म्हणजे?

रागाच्या भरात नको ते विचार मनात घुसळण घालायला लागले तशी मी ठरवून टाकलं की, आपण या घरात असं धुमसत बसण्यापेक्षा पलिकडल्या घरी जावं आणि तिथल्या पोरींबरोबर खेळावं. तिथं पण मंगळागौर आहे. खूप मजा येईल.

म्हणून मावशीला हाकारा घालीत मी ओसरीवरून स्वैपाकघराकडं वळले, तशी दारात टांगा थांबल्याचा आवाज आला. त्याकारणानं कोण आलंय ते बघावं म्हणून दरवाज्याकडं डोकावले तर संगीताच टांग्यातून उतरत सामान काढून घेतली!...

"अगोबाई ! ... मावशी ऽऽ संगीता आली ऽऽ" तिला पाहिलं तशी आरडाओरड करीत सारं घर जणु जागं केलं मी न् वाऱ्यागत पुढल्या दारी धावले.

"अच्छा ! आणि तू केव्हा आलीस ?"

मला पाहताच संगीतानं माझी चौकशी केली. तशी तिच्या हातातली बॅग मी आपल्या हातात घेत तिला विचारलं, "याला किती पैसे द्यायचेत ?"

"दिले पैसे !... आई कुठाय ?" संगीता भराभर घरात शिरली. तिच्या पाठोपाठ मीही पळाले तर मावशी आम्हाला सामोरी येत बोलली, "दर-वाज्याशी थांबा !" म्हणताना आम्ही पुढं गेलेलो मागं वळलो न् दाराशी थांबलो. तशी मावशीनं आमच्या पायांवर कोमट पाणी ओतलं. आमच्या-वरून शिळ्या भाकरीचा तुकडा ओवाळून बाहेर फेकला न् मग हसून म्हणाली, "आता या आत."

आम्ही आत गेलो. तशी संगीता म्हणाली, "आई ग !... गाडी फार लेट झाली. उशीर झाला. मी रात्रीच येणार होते ! पण"...

"असू दे ! बरी आहेस ना ?" मावशीनं लेकीला पोटाशी धरली. दोघींचे डोळे आनंदाने पाणावले. माझी पण नजर ओलावली.

"मला वाटलं तू येत नाहीस !" मावशीनं मनातली खंत बोलून दाख-विली. त्यामुळं संगीता हसली. म्हणाली कशी, "रजा मिळाली तर आले... किती रागावतेस बघू म्हटलं येत नाही कळल्यावर ?"

"चल ! फाजील कुठली !" मावशीनं संगीताचा गालगुच्चा घेतला न् मग ती सैपाकाला लागली. पुरणावरणाचा बेत ठरला... आम्ही पण दोघीजणी तिच्या हाताखाली कामाला लागलो...

चहापाणी झाल्यावर संगीतानं मला विचारलं, "पूजेची तयारी केली ?"

"अं हं! तू येणार नव्हतीस ना? मग?" खरं होतं ते मी बोलले.

"जा मग! आता आलेय ना?" गोळा कर जा पत्री न् फुलं. मी तोवर स्नानबिन उरकते."

"आणिक मुली? पूजेला लागतात ना?"

"जाऊं दे? आपण उरकून घेऊ. संध्याकाळी पहाता येतील सारे सोपस्कार.'-

"आलेच मी!" संगीता म्हटली म्हणून मी घरातली फुलांची परडी उच' लली न् बागेत पळाले...

नुकताच पावसाचा शिडकावा झाल्यानं टवटवीत झालेली पानं फुलं मग मी भराभर खुडीत सुटले...मधूनच एका झाडाखाली उभी राहिले. कमरेवर हात ठेवून न् खाली वाकून डावीकडून उजवीकडं वळत पिंगा घातला ... बडबडही केली ...

"माझा पिंगा ग जातो म्हमई आणतो समई पोरी पिंगा ऽ ऽ"...

माझ्या खुशीनं उसळी खाल्लेली. काय करू न् काय नको झालेलं ... म्हणताना माझा आवाज ऐकून शेजारघरच्या पोरींनी डोकावत विचारलं, "संगीता आली काय ग?" तशी मी हुंकार घालीत माझा मनमोर डुलू दिला... वारं प्यालागत मी इकडून तिकडं न् तिकडून इकडं केलंच केलं!... हां हां म्हणस्तोवर पूजेची तयारी झाली ...

"अगोबाई! तू का ही?" भरजरी साडीचोळीतील अन् शेलक्या ठळक अलंकारातील संगीता बघून माझा माझ्याच डोळ्यावर विश्वास बसेना. म्हण-ताना ती हसून म्हणाली, "तुला न् आईला हवंय ना सगळं? घ्या मग! " त्यासरशी मावशीनं मीठमोहऱ्यांनी तिची दृष्ट काढली.

बघता बघता पोरी आपल्या मनानं गोळा झाल्या. पूजाबिजा झाली. हसत खेळत महानैवेद्य दाखवला गेला. आम्ही गोष्टी करीत करीत पोटभर जेवलो खावलो ..

पण खरं सांगायचं तर मी फक्त हूं ला हूं करीत होते. माझ्या डोक्यात नाना प्रकारचे खेळ घोळत होते न् ओठांवर त्या त्या खेळाची गीतं येऊ पहात होती! मी जशी आपल्याच नादात होते हं!

एका पायाचा अंगठा न् त्याच्या शेजारचं बोट. त्यात दुसऱ्या पायाचा अंगठा पकडीत कमरेवर हात ठेवून डाव्या-उजव्या अंगाला झोकात उडी घेत "काच-किरडा" कसा खेळायचा, दोघी दोघींनी आपापले पदर दोन्ही हातात पदराची दोन टोकं धरून डोक्यावर पुढं घेत एकमेकींचे हात धरीत कमरेतून वाकत उड्या घेत घेत 'सो ऽऽ मी ऽऽ सो ऽऽ मी ऽऽ चा खेळ कसा रंगवायचा, दोघींनी दोन्ही हातांनी एकमेकींच्या दंडाला गच्चम धरीत उजव्या पायाला डावा पाय लावीत दंडफुगडी खेळताना जोरात कसं दणकारायचं, एक गुडघा जमिनीवर ठेवून त्या बाजूचा हात गुडघ्यावर घेत दुसऱ्या हातानं ऊन लागताना पुढं हात धरावा तसा धरीत चटकन् टाळी वाजवून बैठक बदलून दुसरी बैठक घालीत "किकिचं पान जाई की ऽऽ की ऽ" चा कसा भडिमार उडवून द्यायचा याच तंद्रीत मी गुंतलेली!

त्यामुळं एकमेकींना खेटून गोलाकार उभं रहात "खुर्ची का मिर्ची" म्हणत उड्या घेत टाळ्या वाजवून नववधूला मध्ये घेत कसं खेळायचं यातली भाषा दुसऱ्या पोरी बोलत होत्या तरी मी आपल्याच नादात! म्हणताना संगीतानं मला विचारलं, "गाठोडं खेळशील का गोफ विणूया?" तेव्हा कुठं भानावर येत मी "हं! काहीही खेळूया!" असं उत्तर केल्यावर सगळ्याजणी खदखदून हसलोच हसलो ...

संगीता वेळेवर आल्याकारणानं घरादाराचा आनंद एवढा उफाळून आला होता की, बोलायची सोय नाही! बिचाऱ्या मंगळागौरीनं देखील कोणतं एक मागं पुढं झालं तरी चालवून घेतलं तिथं बाकीच्यांची काय कथा?

संध्याकाळी "आगोटापागोटा" सकट सारे खेळ आम्ही पोटभर खेळलो न् अखेर शेवटी फेर धरला त्यावेळी मावशीनं गीत दिलं न् आम्ही तिच्या मागून

म्हणत सुटलो ! ... त्यावेळी साक्षात गोकूळ नजरेपुढं आलं जसं ! ... आणि म्हणून मग ...

**आज मथुरेचा बाजार झाला उशीर**
**गौळणीचं न्हाणं धुणं**
**उद्या बाजाराला जाणं**
**अडविलं त्या गोविंदानं**
**सोडा हरी पदर ...**

या गीतानं अशी धमाल उडवून दिली की, आमच्या मावशीचं सारं घरदार संगीतमय झालं न् अव्वल पहाटेला कोंबडं आरवलं तरी आम्ही आपल्या खेळतोयच म्हणावं असली गंमत ! ...

अनुक्रम : —

# मंगळागौर : एक महादेवी

लेखिका : श्रीमती सरस्वतीबाई गोखले

मंगळागौर ही एक देवी आहे. हिचे देऊळ काशीत आहे. हिची पूजा नव-विवाहित मुली लग्न झाल्यानंतर ओळीने पाच वर्षे करतात. हिची पूजा श्रावण महिन्यात प्रत्येक मंगळवारी असते. हे एक सुवासिनींचे सौभाग्यव्रत आहे.

या व्रताची सुरुवात सोमवारपासून होते. श्रावणातील दर सोमवारी शंकराला शिवामूठ घालायची. तिचा क्रम असा – पूजेला गंध, अक्षता, बेल, फुले, उदबत्ती, निरांजन, नैवेद्याला दूध, हळदकुंकू, पंचामृत, हे साहित्य लागते. शिवाची पंचामृती पूजा करून मग शिवामूठ व्हावयाची. यासाठी जी शिवामूठ वहाणार तिने मूठ चिमूट ( एक मूठभर व एक चिमटीभर ) तांदूळ घेवून ते शंकराला वहायचे. यासाठी पहिल्या सोमवारी तांदूळ, दुसऱ्याला तीळ, तिसऱ्याला मूग, चौथ्याला जवस व पाचवा सोमवार आला तर सातू, असा वहाण्याचा क्रम आहे. मात्र श्रावण महिना मंगळवारी सुरू झाला तर फक्त मंगळागौर पुजायची, शिवामूठ नाही. कारण त्या दिवशी आषाढातील आवस असते.

**पूजेचे साहित्य :** या पूजेला १६ प्रकारची पत्री लागते. म्हणजे प्रत्येक प्रकारची १६ पाने. त्यांची काही नावे पुढीलप्रमाणे : जाई, जुई, शेवंती, चाफा, कण्हेर, बेल, दूर्वा, तुळस, आघाडा, धोतरा इ. आहेत. ही पत्री आदले दिवशी तोडून ठेवतात. सकाळी वसोळी मुलगी ( जी मंगळागौर पुजते ती ) तिला न्हायला घालतात. पूर्वी जेवढ्या वसोळ्या मुली बोलावीत तेवढ्यांनासुद्धा न्हायला घालीत.

पूजेसाठी चौरंग मांडून, चौरंगाभोवती रांगोळी घालून, आजूबाजूस पाट मांडतात. पूजेला पंचामृत ( दूध, दही, तूप, मध व साखर ), गंध, अक्षता, फुले, शेंदूर, बुक्का, काजळ, बांगड्या, गळेसर, ताडपत्र ( पंख्याचा तुकडा ). साळीडाळी ( मुगाची डाळ १६ दाणे, जिरे १६ दाणे, तांदूळ १६ दाणे ),

सूतपुतळ्या वस्त्रे ( कापसाची वळी करून मधे मधे हळद कुंकवाने पाण्याचे हाताने पीळ द्यायचा, असा पीळ पाच वेळा दिला की ५ बोंडे होतात. ती सूतपुतळी व एका बोंडाला दोन बाजूंनी पीळ दिला की, ते वस्त्र होते. याला कार्पासवस्त्रे म्हणतात.) उदबत्ती, निरांजन, नैवेद्य प्रत्येकीचा दुधाचा व घरचीचा महानैवेद्य (जे पदार्थ करतात ते वाढलेला), पत्री, कापूर व काडवाती ( तुळशीच्या काडयांना टोकाला कापूस पिळून लावायचा व त्या तुपात भिजवून पेटवायच्या), नंतर आरती करायची. यात घरच्या वसोळीने देवीला लेणारत व्हायची. तिची पद्धत पुढीलप्रमाणे:– कणीक हळद घालून घट्ट भिजवायची, तिचा चौरंग, लोड, चार बाजूला उभ्या वळया ठेवायच्या, मागे कणकीची वाटी करून त्यात दूध घालून त्यावर एक कणकीची चकती ठेवायची, तो हराडेरा. कणकीची लांब वळी करून वेणी गुंफायची, वेढी, बिरवल्या वाटोळ्या करायच्या. एका वळीला १ व दुसऱ्या वळीला २ असे कणकीचे तुकडे चिकटवायचे, हे मणी मंगळसूत्र. ताह्मनात देवीची पंचामृती पूजा सर्वांनी करायची. नंतर देवी वरीलप्रमाणे केलेल्या कणकीच्या चौरंगावर ठेवायची. चौरंगामागे हराडेरा ठेवायचा. पुढे सर्व पूजेला सुरुवात करायची. यावेळी सौभाग्य अलंकार वाहून झाल्यावर घरचीने लेणारत व्हायची. आरतीला वर लिहिलेल्या कणकीतले ५ दिवे व त्याजवळ दोन मुटकुळी, ताम्हनात फुलवाती व तूप घालून लावायचे. त्यावर थोडे कुंकू घालावे. वसोळी एखादी देशस्थाची असते तिला पुरणाची आरती लागते. त्यात कोणी फुलवात, कोणी बोटवाती (बारीक पिळ घातलेल्या १६ वाती) घेतात. आरती झाल्यावर कहाणी सांगायची. पूर्वी सर्वांची कहाणी पाठ असे. आता एकजण कहाणी वाचते व ती ऐकताना दुसऱ्या वसोळ्या चौरंगावर फुलांची सजावट करतात. चौरंगाला केळी, कर्दळीचे खुंट बांधतात. पाने वाढून झाल्यावर वसोळ्या मुली देवीला भंडार वाहतात. (हळदीच्या-कणकीच्या चकतीला मुरड घातली म्हणजे त्याचे नाव भंडार). तीर्थ घेतात व पानावर बसतात. जेवताना मुलींनी बोलायचे नाही, मुक्याने जेवायचे. आंचवल्यावर तुळशीपत्र तोंडात घालून मग बोलायचे, हळदकुंकू, विडे घेऊन वसोळी आपल्या घरी परत जाते.

मंगळागौरीचा सोहळा दोन्ही सांज असतो. संध्याकाळी व सोळच्या मुली व आळीतल्या ओळखीच्या मुली, सुना, सासू यांच्या मैत्रिणी फराळाला बोलावतात. रात्री धान्यफराळ करायचा. याची पद्धत म्हणजे तुरीची डाळ, तांदूळ भाजायचे व मग शिजवायचे. तसेच कणीक, पिठी, तेलावर भाजायची किंवा कणीक दुधात भिजवायची. रात्री तांदूळ, उसळ, एखादी भाजी, वाटली डाळ, कोशिंबीर, चटणी, आमटी (दोडका किंवा मुळा घातलेली) करंजी, कडबोळी, दशम्या (दुधात भिजविलेली, की ती निर्लेप होते धान्यफराळाजोगी), दशमीला सुधारस, मोरंबा, वाढतात. असे सर्वसाधारण पदार्थ असतात.

रात्री जेवणे झाली की, खेळायला सुरुवात. फुगडच्या, झिम्मा, नाच ग घुमा, खुर्ची का मिर्ची, सोमी गोमी, लाटच्या बाई लाटच्या, काचकिरडा, पागोटा, अपाटाका झपाटा, गोफ, कोंबडा, वाकडा झिम्मा, खालचा वरचा झिम्मा, लाडू झिम्मा, हे खेळाचे प्रकार आहेत. जरा खेळून दमल्या की, मधे गाणी. नावे घेणे (नवऱ्याचे), झोपाळ्यावरील ओव्या, हे कार्यक्रम चालतात.

## उखाणे

(१) अंबाबाईच्या गळयात कोल्हापुरी साज × × × रावांचं नाव घेते, मंगळागौरीपुढे आज.

(२) गोठ पाटल्या पुढे ताशीव तोडे, × × × रावांचं नाव घेते मंगळागौरीपुढे.

(३) श्रावणात पडतो पुष्कळ पाऊस, × × × रावांचं नाव घेते सासुबाईनी मंगळागौरीची केली हौस.

(४) वसंतात कोकिळेचे गाणे, ग्रीष्मात उन्हाचे करपणे, वर्षात पडतो पुष्कळ पाऊस, शरदात चांदण्यात फिरायची मौज, हेमंतात थंडीची कमाल, शिषिरात वर्षाच्या कामाची धमाल, अशा ऋतुचक्रात फिरता फिरता वर्षे गेली ५२, मुला सुना नातवंडात संसार झाला पावन, आता जगदंबेजवळ एकच मागणे, × × × रावांना दीर्घायुष्य, न् मला सौभाग्याचे लेणे.

(५) कन्या म्हणून जन्मले, सून म्हणून सासरी आले, पत्नीची घेतली दीक्षा कन्यापुत्राची मिळाली भिक्षा, मातेच्या कर्तव्याचा उचलला भार, गृहिणी-पदामधून पडले पार, गृहमंत्रीपदावर झाले आरूढ परंतु त्यांच्या कर्तव्याचे उकलले नाही गूढ. स्त्रीला नाही पेन्शन, स्त्रीला नाही निवृत्ती, × × × रावांची सेवा घडो, हीच राहो माझी वृत्ती.

## फुगडीचे उखाणे

(१) वडे बाअी वडे, डाळीचे वडे, राव बसले चुलीपुढे ताअी मारते खडे.

(२) सार बाई सार, नारळाचे सार, रावांनी सांगितले खेळू नको फार.

(३) पांगारा बाई पांगारा, रानोमाळी पांगारा, राव आले कचेरीतून, ताई लावी अंगारा.

(४) काचा बाई काचा, रानोमाळी काचा, बिजवराच्या वायका तुम्ही डोक्यावर नाचा.

(५) चहा बाई चहा, पहिल्यावहिल्या बायका तुम्ही धाकात रहा.

(६) सुया बाई सुया, परातभर सुया, आपण दोघी फुगडी खेळू नणंदा भावजया.

(७) चुना बाई चुना, रानोमाळी चुना, गोठ तोडे घालू आपण गोखल्यांच्या सुना.

## नवी आरती

जय जय मंगलगौरी माते । करितो आरती ही
अखंड रक्षी सौभाग्याते । जगदंबे आई ॥ धृ ॥
श्रावणमासी मंगळवारी । आपण जमुनीया आपण ।
सखयानो या प्रेमे पूजू हिमाद्रीची तनया ।
संमार्जन हे करूनी रंगवल्या काढूया ।
कर्दळी लावुनी चौरंगाला सुशोभित करूया ।
षोडशपरीची पत्री गडे ग मिळवूनी आणूया ।

जाई जुई अबअी चाफा दुर्वा तुळशी या । सुमने प्रेमाने
परिची आणू ही । गुलाब, चाफा, बकुल, मोगरा शेवंती जाई ॥ १ ॥

पंचामृताचे स्नान घालुनी प्रेमाने तुजला ।
चिरकंचुकी नेसवूनि या लावू गंधाला ।
हळदीकुंकू अक्षत सुमने अर्पू अंबेला, अर्पू गौरीला ॥
धूप दीप नैवेद्य ताटी रुप्याच्या आणिला ।
भात केशरी जिलबी लाडू मोदक कानवला
कर्पूर आरती करुनिया मग वर हा मागितला ।
सौभाग्यातेही दिन आम्ही लीनही झालो करितो विनंती ही ॥ २ ॥

कर जोडोनी नम्र होउनी तुजला विनवीते ।
रक्षी रक्षी कृष्णेसी या हिमालय-दुहिते ।
वंदीत तुजला ही वंदीत तुजला ही ।
भवसिंधू हा उतरोनीया पैलतीरी ॥ ३ ॥

## जुनी आरती

मंगळमूर्ती उपजली माय सुफळ द्यावया शतायुषी राया ।
तिष्ठली राज्य करी अहेवपण द्यावया ।
आरती मंगळा गौरी ॥ १ ॥

नाहोनी माखोनी मौनी बैसली नाना परीचे अलंकार ल्याली ।
पाटावाच्या चोळ्या हिरे झोक नेसली ।
आरती मंगळागौरी ॥ २ ॥

आणोरे माळ्यानो जाईजुईच्या कळ्या १६, त्रिकुटी १६,
दुर्वा १६ परीची पत्री जाई जुई अबई शेवंती नागचाफे,
पूजेजवळी आणिती ।
आरती मंगळागौरी ॥ ३ ॥

अम ढुम ढुम ढुम वाजंत्री वाजती, काळे बाई कांकण अंबेला शोभती ।
कानी कापाचे गाभे हिरे झोक अंबा ल्याइली साजे ।
आरती मंगळागौरी ॥ ४ ॥

साळीचे तांदुळ, मुगाची डाळ, आळणी खिचडी रांधीते
नार आपल्या पतीकारणे । सेवा करिते फार ।
आरती मंगळागौरी ॥ ५ ॥

कुंकवाचा करंडा, हळदीची वाटी, एवढा प्रताप अंबाबाईसाठी
केला मी मनोभावे, त्यासी प्रसन्न व्हावे ।
आरती मंगळागौरी ॥ ६ ॥
चांदीच्या ताटात गौरीला नैवेद्य, खाजीया करंजीया भूक लाडू मोदक
साखरेचा पाक विस्तारिले ताट,
आरती मंगळागौरी ॥ ७ ॥

दूर न दिसते अंबाबाईचे देऊळ । तुळया तुळवर आत सोन्याची मूर्त ।
आरती मंगळागौरी ॥ ८ ॥

खिरीची पातेली बाहेर टाकली, सासू सासऱ्याच्या चरणी लागली ।
काय मी पुण्य केले, माझे बाळ वाचले ।
आरती मंगळागौरी ॥ ९ ॥

हा सर्व सोहळा आमच्या लहानपणी भरपूर प्रमाणात होत असे. सध्या धकाधकीचा मामला सुरू झाला. मुली नोकरी करू लागल्या, जागेची अडचण भासू लागली, त्यामुळे ह्या गोष्टी मागे पडत गेल्या.

# मंगळागौरीचे खेळ

लेखिका : सौ. ताराबाई साठे

## खुर्ची का मिर्ची

दहा वीस जणींनी या खेळासाठी चटकन एकत्र यावयाचे. एकमेकींला चिकटून चिकटून उभे रहात गोल करावयाचा. त्याचवेळी एखाद्या नववधूला गोलामधे पकडावयाची असते, म्हणजे मग लगेच खेळाला सुरुवात होते.

घेरातील सर्व भगिनींनी टाळी वाजवून पुढे वाकावयाचे आणि तोंडाने प्रश्न करायचा –

सर्वजणी – जाशील कैशी ?
घेरातील भगिनी – सासू मारीते
सर्वजणी – वरं करीते

आतील भगिनी वाकत, नाचत व टाळी वाजवत म्हणते –

"खुर्ची का मिर्ची"

बाहेरच्या घेरातील भगिनी टाळी वाजवीत विचारतात –

"जाशील कैशी ?"

आतील मुलीने तक्रार करायची व घरच्या सर्वांची नावे घेत घेत घेर फोडून बाहेर जायला वाट पहायची. योग्य संधि मिळाल्यावर ती पटकन बाहेर येते व खेळ संपतो.

## सूपनृत्य

खुर्ची का मिर्ची या खेळातल्या सारखाच बाहेर अनेक भगिनींनी घेर धरून नाचायचे.

आतल्या भगिनीजवळ सूप असते. एकीकडे नाचत बोलत ती सूप या हातातून त्या हातात उभे धरून हातानी फट फट आवाज करीत उडवीत असते.

बाहेरच्या घेरातील भगिनी म्हणतात, "नाच ग घुमा" आतली भगिनी विचारते, "कशी ग मी नाचू ?" "गोठ नाहीत मला, तोडे नाहीत मला, कशी ग मी नाचू ?" बाहेरच्या भगिनी पुन्हा म्हणतात. "नाच ग घुमा" नंतर आतील भगिनी विचारते, "कशी मी नाचू ?" "आल्या गावचा, पाल्या गावचा सोनार नाही आला, साज नाही मला, कशी ग मी नाचू ?"

निरनिराळ्या दागिन्यांची नावे घेऊन ते मला नाहीत अशी तक्रार करावयाची व पुन्हा पुन्हा उंच स्वरात विचारावयाचे "कशी ग मी नाचू ?" असा हा मजेदार खेळ आहे.

## काचकिरडा

एका पायाचा अंगठा व त्याचे शेजारचे बोट यात दुसऱ्या पायाचा अंगठा पकडावयाचा व कमरेवर हात ठेवायचे.

उडी मारायची आणि दोनही पाय एकदम डावे बाजूस ९० अंशाचे कोनात व नंतर उजवे बाजूस ९० अंशाचे कोनात फिरवायचे. पाय हालवायचे त्या वेळी कमरेवरचा भाग मुळीच हलवायचा नाही.

उडी मारून पाय फिरवीत असताना तोंडाने म्हणावयाचे की, 'काचकिरडा, पाय मुरडा, पायावरून पाय गेले, पाय लंगडा.' हा खेळ खेळायला फारच अवघड आहे.

## पिंगा

हा खेळ व्यक्तिशः एकेकीनेच खेळावयाचा असतो. वाटल्यास अनेकजणींनी त्यात सामील व्हावे.

दोन हात कमरेवर ठेवायचे, पाय एकमेकांपासून लांब ठेवायचे, काचकिरड्यात कमरेच्या वरचा भाग हलवावयाचा नसतो, तर पिंगा खेळताना कमरेच्या खालचा भाग हलवावयाचा नसतो.

प्रथम कमरेपासून डोक्यापर्यंतचा भाग पुढे करावा. तो जमिनीशी समांतर ठेवावा. नंतर उजवे बाजूस, ह्यानंतर मागे व नंतर डावे बाजूस असे वर्तुळाकार फिरावयाचे. असे वर्तुळाकार फिरत असताना तोंडाने म्हणावयाचे –

माझा पिंगा जातो काशी आणतो म्हशी
माझा पिंगा जातो वाई आणतो गाई
माझा पिंगा जातो साताऱ्या आणतो म्हाताऱ्या

## सोमी – गोमी

दोघींनी आपापले पदर दोन हातात दोन टोके धरून डोक्यावरून पुढे घ्यायचे व एकमेकींचे हात धरावयाचे. दोघींच्याही तोंडावर यावेळी पदराची जणू छत्रीच येते व त्यामुळे खेळणाऱ्या भगिनींची तोंडे दिसत नाहीत. खेळ खेळताना कमरेखालचा भाग फारसा हालत नाही. दर वेळी दोन पायांनी उडी मारायची, पण त्याच जागेवर पाय घ्यावयाचे. अशा उड्या मारीत असतानाच कमरेतून दोघींनीही एकेकदा एका बाजूस व नंतर दुसऱ्या बाजूस वाकावयाचे असते. हे सर्व करीत असता सोऽमी ऽऽ गोऽमी ऽऽ असे तोंडाने म्हणावयाचे.

## दंडफुगडी

दोघींनी दोन हातांनी एकमेकींच्या दंडास धरावयाचे. एकमेकीनें उजव्या पायाला उजवा पाय व नंतर एकमेकीच्या डाव्या पायाला डावा पाय लावावयाचा. तो प्रथम हळू हळू लावावा व नंतर वेग वाढवावा. कोणी कोणी असे पाय न लावता सरळच फुगडी घालतात. हे करीत असताना तोंडाने म्हणावयाचे –

दंडफुगडी दंडाची बाइल माझी पिंडाची
पिंडावरून जाइन ग पाच पानं खाईन ग
दिवाळीला बोली केली तर दसऱ्याला येईन ग

## लाटण्यांचा झिम्मा

दोघींनी दोन लाटणी घ्यावयाची. लाटण्यांची टोके दोन हातांच्या मुठीत धरावयाची. कमरेत किंचित वाकावयाचे. एकाच वेळी दोनही पाय एकदम उडी मारून पुढे घ्यावयाचे आणि आपल्या हातातील लाटणे दुसरीच्या हातातील लाटण्याच्या मध्यावर फुली करून मारावयाचे. अशा पद्धतीने लाटणी फिरवायची. म्हणजे हातांना पण निरनिराळ्या कोनात फिरवावे लागते यावेळी पायांचे नाचणे उडी मारून पुढे व मागे दोनही पाय एकदम घेणे, लाटण्यांचा हात बदलणे, लाटण्यांचा मोठ्याने आवाज करणे, हे मोठे मनोरंजक वाटते. या सर्वांचा वेग हळू हळू वाढवीत न्यावयाचा असतो. काहीजणी हा खेळ खेळताना तोंडाने पक्वाही घालतात. या खेळात जरा चूक झाली तर दुसरीस लाटण्याचा फटका बसण्याचा फार संभव असतो.

## सवतीसवतींचे भांडण

दोन भगिनींनी समोरासमोर उभे राहावयाचे. नंतर कमरेत वाकून, एकमेकींकडे रागाने पहात, पोकळ हाताने मोठमोठ्याने टाळ्या वाजवीत हा खेळ सुरू करतात. दोघीही एकमेकींस विचारतात,

"अग ? का ग ? का ग ? अग माझ्या सवती का ग ?
बिलवर बांगडी भरलीस का ग ? .... का ग ? का ग ?"

एकमेकींसमोर मधले अंतर तेच कायम ठेवून, एकदा एका बाजूस व नंतर दुसऱ्या बाजूस पण सरळ रेषेत यावेळी नाचावयाचे असते.

तू हा अमुक दागिना का ग एकटीने घातलास अशा विचारण्याच्या आविर्भावात एकमेकीने एकमेकीस 'का ग ? का ग ?' म्हणावयाचे व वेग वाढवावयाचा तसतसा आवाज पण चढवावयाचा असतो. शेवटी ओरडून ओरडून व नाचून नाचून हसू येऊ लागते व मग हा खेळ संपतो.

## आगोटा– पागोटा

एक दोघींनाही हा खेळ खेळता येतो. परंतु अनेकजणी यात सामील झाल्या तरीहि चालते. ह्या खेळासाठी लुगडयाचा काचा मारून घ्यावा लागतो. खेळणारांनी प्रथम ताठ उभे राहावयाचे, नंतर खेळताना डाव्या पायाची टाच उजव्या गुडघ्यापर्यंत येते व उजव्या पायाची टाच डाव्या गुडघ्यापर्यंत आली पाहिजे. पाय हलवीत असतानाच दोन हात खांद्याच्या रेषेत ताठ करून डोक्यावर पुढे घ्यावयाचे. नंतर दोन हातांची चार चार बोटांच्या मागच्या बाजू एकमेकास चिकटवावयाच्या. यावेळी तोंडाने दोघींनी म्हणावयाचे —

आगोटा ऽ पागोटा ऽ घालि शिंगोटा ऽऽ
मथुरेच्या बागेत जाईन म्हणते ऽऽ जाईन म्हणते ऽऽ
लाल साडी नेशिन म्हणते ऽ नेशिन म्हणते ऽऽ

हा खेळ खेळताना पायांचा व हातांचा आवाज होता कामा नये.

## किकीचं पान बाई की ऽ की ऽऽ

हा खेळ समोरासमोर येत दोघीजणी अगर अनेकजणी खेळू शकतात. एक गुडघा जमिनीवर ठेवून त्या बाजूचा हात गुडघ्यावर ठेवावयाचा. त्याच वेळी दुसऱ्या पायाचा गुडघा वर असेल व त्या बाजूचा हात कपाळावर आंगठा टेकून आडवा धरावयाचा. (ऊन लागत असलं म्हणजे आपण जसा धरतो तसा) मग खेळ लगेच सुरू होतो. चटकन् वेळी टाळी वाजवावयाची व खाली असलेला गुडघा वर करावयाचा व वरती असलेला खाली टेकवायचा. अर्थात हातही यावेळी बदलावयाचे. ही बैठक चटकन बदलावी लागते व त्यावेळी उडी मारावी लागते. त्यामुळे सर्व आंगाची हालचाल होते. अशावेळी तोंडाने म्हणावयाचे –

पहिली बाजू — किकीचं पान बाई की ऽ की ऽऽ
दुसरी बाजू — सागर मासा सूं — सूं

पहिली बाजू —  आल्या ग बाई गुजरणी
दुसरी बाजू —  कापूस घ्या हो पिंजरणी
पहिली बाजू —  कापूस माझा सरकीचा
दुसरी बाजू —  पाऊस पडला मोत्याचा

टाळी वाजवून हे गाणे म्हणत असता एक प्रकारचा सुंदर ताल निम
होतो.

### कोंबडा

एक, दोन वा अनेक व्यक्ती हा खेळ खेळू शकतात. प्रथम एक गुड
जमिनीवर टेकवून पाय मागे घ्यावयाचा, पण पाऊल सबंध न टेकव
चवड्यावर टेकवावयाचे. दुसरा पाय पहिल्या गुडघ्याच्या पलीकडे ठेवावया
गुडघ्यावर दोन हात एकावर एक ठेवावयाचे आणि उड्या मारीत सगळीक
पट्पट् फिरायचे. त्याच वेळी तोंडाने म्हणावयाचे.

सईबाईचा कोंबडा आला माझ्या दारी
घालीन चारा पाजीन पाणी

### गाठोडे

खाली बसून पावलाला पाऊल जुळवावयाचे आणि उजव्या हाताने उजव
पायाचा आंगठा व डाव्या हाताने डाव्या पायाचा अंगठा धरावया
त्यानंतर पाठ–त्याच स्थितीत जमिनीवर टेकवावयाची. मग कमरेचा म
धरून डोके उचलून धरून सर्व शरीर गोलात टेकवावयाचे व लगेच उचल
वयाचे. याप्रमाणे स्वत:भोवती फिरता फिरता पृथ्वीच्या गतीप्रमाणे म
गोल रिंगण फिरावयाचे. एकाच वेळी अनेकजणी फिरू लागल्या तर मो
गंमत दिसते.

# खेळगाणी

*लेखिका : श्रीमती उषा मुंगी*

श्रावण महिना जेवढा मनोहारी तितकाच मनाला आनंद देणारा. सृष्टीदेवी हिरव्यागार शालूत गुरफटलेली तर माणसे सणावारात गुतलेली. किती सण किती व्रते ! हे सर्व पार पाडता पाडताच सर्व महिना कुठे निघून जातो हे कळत नाही.

सर्वांत मजा आणणारे व्रत म्हणजे मंगळागौरीचे. ह्या मंगळागौरीच्या वेळी गडबड उडते. नवविवाहित मुली, सासुरवाशणी, माहेरवाशणी अशा एकत्र जमतात. जिचे मंगळागौरीचे पहिले वर्ष असेल (मंगळागौरीचे व्रत लग्न झालेल्या वर्षापासून पाच वर्षे करतात.) तिच्याकडे सर्वजणी जमतात. मंगळागौरीची पूजा करतात व हे सर्व आटोपल्यावर रात्री जागरणाचा मोठा गंमतीशीर कार्यक्रम असतो.

त्यावेळी मुली काही खेळ खेळतात. त्यांची ही थोडक्यात माहिती व नावे अशी – खुर्चीका मिर्ची, तळचात मळचात, भुईफुगडी, झिम्मा, गोफ, कोंबडा, गाठोडे लाह्या पिंगा, लाटणी, सूप. ह्या शिवाय भेंड्या उखाणे असतात.

## खुर्चीका मिर्ची

पूर्वी मुलींना सासुरवास होत असे. त्या मूग गिळून, मूकमनाने स्वस्थ बसून सहन करीत असत. परंतु खेळताना हा सासुरवास व्यक्त होतो. ह्या खेळात मुली फेर धरतात व मध्ये एका मुलीला घेतात. ही मधली मुलगी टाळी वाजवून व उडी मारून फेरातील एका मुलीजवळ जाऊन म्हणते, 'खुर्ची का मिर्ची" बाकीच्या मुली म्हणतात, 'जाशील कैशी ?'

मधली मुलगी सांगते– सासू मारीते
बाकी मुली उत्तर देतात– बरं करीते

| | |
|---|---|
| मधली मुलगी– | नणंद चहाडी करीते |
| बाकीच्या मुली– | बरं करीते |
| मधली मुलगी– | दीर खोडचा करीतो |
| बाकी मुली– | बरं करीतो |
| मधली मुलगी– | सासरा रागावतो |
| बाकीच्या मुली– | बरं करीतो |
| मधली मुलगी– | नवरा मात्र प्रेम करीतो |
| बाकीच्या मुली– | मग तर फारच बरं करीतो |

अशा रीतीने प्रत्येक मुलगी मध्ये नाचून आपलं सुख दुःख व्यक्त करते.

## तळ्यात मळ्यात

ह्या खेळाला बऱ्याच मुली लागतात. एक मुलगी सूचना करण्यासाठी व बाकी मुली गोल करून उभं राहण्यासाठी खडूने एक मोठा गोल आखतात. खडूच्या आतील गोल म्हणजे तळे व रेघेच्या बाहेर मळे. सूचना देणाऱ्या मुलीवरच ह्या खेळाची गंमत आहे. ती कधी सावकाश तर कधी भरभर तळ्यात व मळ्यात असे म्हणत राहते व काही मुली गडबडीने तळ्यात म्हटल्यावर मळ्यात रहातात व बाद होतात. तर काही मुली मळ्यात म्हटल्यावर तळ्यात रहातात व बाद होतात.

## भुईफुगडी किंवा बैठी फुगडी

ही फुगडी फार मजेशीर खेळली जाते. दोन मुली समोरा समोर ठराविक अंतर ठेवून उकिडव्या बसतात.

एक मुलगी दुसरीला विचारते,

‘एवढंसं काय?’

दुसरी मुलगी उत्तर देते – ‘वांगं.’

पहिली मुलगी विचारते – ‘त्याला काय?’

दुसरी मुलगी उत्तर देते – ‘देठ.’

तुझी माझी लवकर भेट.

फूऽऽफूऽऽ करून फुगडीस सुरवात होते.

नंतर दुसऱ्या मुलींची जोडी येते. त्याही वरीलप्रमाणे समोरा समोर बसून एकमेकींना पुढील प्रश्न विचारतात--

पहिली मुलगी विचारते– 'माझ्या हातात काय ?'
दुसरी मुलगी सांगते– 'छोटीशी डबी.'
पहिली मुलगी विचारते– 'त्यात काय ?'
दुसरी मुलगी सांगते– 'कुंकू'
'चल एकमेकींना लावू'
फूऽऽफूऽऽ करून फुगडीस सुरवात होते.

अशा तऱ्हेने निरनिराळे प्रश्न विचारून मुलींच्या केलेल्या जोड्या संपविल्या जातात.

### लाह्या

जितक्या मुली जास्त तितकी या खेळाला गंमत जास्त. एक मुलगी मध्ये बसते व तिच्या भोवती अनेक मुली गोल करून बसतात.

मधली मुलगी प्रथम आपली नखे वाजवून विचारते, (त्यावेळी बाकीच्या मुलीही नखे वाजवीत असतात.)

'ह्या लाह्या कशाच्या ?'
मुली उत्तर देतात, 'राजगीऱ्याच्या'.
मधली मुलगी हाताने बांगड्या बाजवीत विचारते,
'ह्या लाह्यां कशाच्या ?'
बाकीच्या मुली उत्तर देतात, 'बाजरीच्या'.
मधली मुलगी हाताने चुटक्या वाजवीत विचारते,
'ह्या लाह्या कशाच्या ?'
बाकीच्या मुली उत्तर देतात, 'जोंधळ्याच्या'.

मधली मुलगी गुडघे टेकून बसते व आपल्या मांडीवर हाताने वाजव
विचारते, ' ह्या लाह्या कशाच्या ?'

बाकीच्या मुली उत्तर देतात, ' मक्याच्या '.

आणि अशा तऱ्हेने ह्या लाह्या अशा काही फुलतात की, मुलींचे लाल ह
पहातच रहावेत. सगळ्यांत जास्त लाह्या मक्याच्या फुटतात बरं का ? प
पहा एकदा फोडून म्हणजे विकत पाकिटे मिळतात ती आणायला नकोच !

## लाटणी

पोळ्या लाटायची लाटणी घेऊन हा खेळ खेळतात. दोन मुली आपल
हातात लाटणी घेऊन गोल गोल करून एकमेकींच्या लाटण्यावर मारतात
ही लाटणी मारीत असताना म्हणतात–

काग ?... काग ?... अग माझ्या सवती
माझ्या बांगड्या चोरल्यास काग ? ..का ग ? ..

दुसरी म्हणते, का ग ? .. का ग ? .. अग माझ्या सवती
माझ्या पाटल्या चोरल्या काग ? ..का ग ? ..

अशा रीतीने सर्व दागिने, भारी वस्तू, साड्या इत्यादींबद्दल चोरीचे अ
घेऊन ही लाटणी फारच मारामारी करतात व शेवटी उरतो फक्त ल
ण्यांचा जोरदार आवाज.

## सूप

धान्य पाखडण्याचे सूप दोन्ही हातात धरून नाचवयाचे असते.
नाचवताना एकदा डावा पाय कृष्ण उडी सारखा होतो व एकदा उजवा
उडवता उडवता मुली पुढील गाणी म्हणतात––

सूप नाचवणारी गाणे गात मध्ये असते व तिच्या भोवती मुलींचा फेर अस

या गावचा त्या गावचा माळी नाही आला
वेणी नाही मला
कशी मी नाचू ?

बाकीच्या मुली तिला सांगतात–

नाच ग घुमा
या गावचा त्या गावचा सोनार नाही आला
पाटल्या नाही मला
कशी मी नाचू?

बाकीच्या मुली नाच ग घुमा
या गावचा त्या गावचा कासार नाही आला
बांगड्या नाही मला
कशी मी नाचू ?

बाकीच्या मुली नाच ग घुमा

या प्रमाणे न नाचण्याची विविध कारणे गाण्यात सांगून ती नाचायला नकार देते खरी पण तरी सुद्धा सगळचा मुली तिला नाचायला सांगतातच !

अनुक्रम : —

१. सौ. सुधा दामले

२. कु. सुलोचना सप्तर्षि

३. पं. महादेवशास्त्री जोशी

# झिम्मा - मंगळागौरीचा

संपादिका : सौ. सुधा दामले

(१)

भजनाला चला तुम्ही राधा कृष्ण बोला
सांगते मी दोघा वेगळे निघा
वेगळे निघून संसार बघा
संसार करता शिणले बहू
मामांजी विकुनी आणले गहू
संसार करता शिणले बहू
आता विकाव्या सासूबाई
संसार करता शिणले भारी
आता विकावे दीर चारी
संसार करता शिणले भारी
आता विकाव्या नणंदा चारी
संसार करता शिणले अती
आता विकावे आपुले पती
सांगते मी दोघा वेगळं निघा
वेगळं निघूनी संसार बघा

(२)

या गो दांड्यावरी नवरा कुणाचा येतो
या गो दांड्यावरी नवरा कुणाचा येतो

त्याच्या करवल्या ग करवल्या नाजूक साजूक
त्यांनी माळल्या ग माळल्या सायलीच्या वेण्या
त्या नेसल्या ग नेसल्या पैठणी शालू
त्यांचे भाऊबंद ग भाऊबंद फेटेवाले
त्यांनी उडवले ग उडवले दारू गोळे

(३)

साळुंकी सालकी तुझी माझी पालखी
रामाची जानकी फुगडी फूं बाई फुगडी फूं
गेले होते विहरी
विसरले दोरी
फुगडी फूं बाई फुगडी फूं
गेले होते राना
विसरले काना
फुगडी फूं बाई फुगडी फूं
गेले होते माडी
विसरले साडी
फुगडी फूं बाई फुगडी फूं
गेले होते माडी
विसरली कुडी
फुगडी फूं बाई फुगडी फूं
साळुंकी सालकी तुझी माझी पालखी
फुगडी फूं बाई फुगडी फूं

फेराचे गाणे

आज मथुरेचा बाजार झाला उशीर
गौळणींचं न्हाणं धुणं
उद्या बाजाराला जाणं
अडविलं त्या गोविंदानं
सोडा हरी पदर

का बा धरलिस माझी वेळ
घरी आहे तान्हं बाळ
रडुन रडुन करील गोंधळ
सोडा हरी पदर

का बा धरलिस माझी वाट
घरी आहे सासू खाष्ट
करील कामाचा बोभाट
सोडा हरी पदर

# मुलामुलींचे खेळ व गाणी

*संग्राहिका :* **कु. सुलोचना सप्तर्षि**

खेळ म्हणजे करमणुकीसहित व्यायाम होय. खेळांचा प्रधान हेतु करमणूक हा असतो. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या प्रकारचे खेळ असतात. खेळाची प्रवृत्ति मनुष्यामध्ये स्वभावतःच असते. प्राचीन काळापासून खेळांची परंपरा सर्वत्र अव्याहत चालत आली आहे. खेळांचे वर्गीकरण करायचे म्हणजे स्त्रियांचे खेळ वेगळे व पुरुषांचे खेळ वेगळे. खाली काही खेळ दिले आहेत, ते मंगळागौरीचे जाग्रण करतांना खेळतात. ह्या खेळांपैकी काही खेळांचा धर्माशी निकट संबंध असे. जुन्या खेळांपैकीही काही खेळ खाली देत आहे.

### लाटण्यांचा खेळ

ह्या दोन मुलींचा खेळ आहे. दोन मुलींच्या हातांत एकेक लाटणे द्यायचे व टिपऱ्यासारखे दोघी मुलींनी नाचून लाटण्यांचा टिपऱ्यांसारखा खेळ खेळायचा व खेळत असताना पुढील गाणे म्हणायचे –

लाट्या बाई लाट्या चंदनी लाट्या
मामांनी दिल्या मला सारंगी पेट्या
कृष्ण गुजरी हरि गुजरी
खुंटीवरचा हार माझा सोळा पदरी

हे गाणे सारखे म्हणत नाचावयाचे व खेळायचे.

### कारस्काऱ्याचा खेळ

मुले दोन रांगा करून समोरासमोर उभी राहतात व मग प्रश्न-उत्तरे विचारतात.

"कारस्काऱ्या ?" —
"काय म्हणतो नाऱ्या ?"
"तुझा बैल शेत खातो."

"आजच्या दिवस खावूं दे, उद्यांच्या दिवस खावूं दे, परवांच्या दिवशी काळचा खुंटचाला बांधून टाकूं" याप्रमाणे म्हणत म्हणत समोरची कारस्काऱ्याची ओळ सर्व हात बांधून उलटीकडे तोंड फिरवून उभी राहाते व नाऱ्याची रांग, "काळी खुंटी मोडली, आंब्याची पाटी झोडली, वाटा नका, घाटा नका ?" म्हणत म्हणत त्या हात बांधलेल्या रांगेतून नागमोडी फिरतात व मग त्यांचे हात सोडतात.

### कोंबडा क्र. १

हा खेळ फक्त मुलीच खेळतात. एक गुडघा खाली टेकून व दुसरा गुडघा उभा ठेवून उडया मारीत खेळतात. व्यायाम फारच चांगला होतो.

"आईबाईचा कोंबडा, कोंबडा, टोपलीखाली झाकीला
सोन्यारुप्याचा बटवा, निळ्या दांडीला तटवा
घे घागर, घे चुंबळ, चल ग बाई पाण्याला
राघु माझा तहानेला तहान तहान म्हणूं दे
एवढीच खेप आणूं दे एवढीच खेप फुटली
नवऱ्याने बायको कुटली मी गेले सोडवायला
मलाच लागला बडवायला"

असे म्हणत कोंबडा खेळतात व पक्वा घालतात.

### कोंबडा क्र. २

"सईवाईचा कोंबडा, आला माझ्या दारा । घालिन चारा पाजिन पाणी । ठुस मोगरा ठुस मोगरा ।" म्हणत खेळणे.

## सारवणाची भुइफुगडी

पूर्वी बहुतेक घरांना फरशी नसे व सारवण घालावे लागे. त्या वेळी काम
ओझे हलके वाटावे म्हणून हा खेळ निघाला असावा.

### भुइफुगडी क्र. १

"सारवणाची भुइफुगडी" दोन बाया समोरासमोर बसून खेळतात.

पहिली : "सारवू बाई सारवू का !" दुसरी : "सारवा की."
पहिली : "दाणे वाळू घालू का ?" दुसरी : "घाला की."
पहिली : "चिमण्या खातील ना ?" दुसरी : "खावू द्या."
पहिली : "मामंजी रागं भरतील ना ?" दुसरी : "भरू द्या."
पहिली : "माझ्या लेकीच्या गावाला गेलता का ?"
दुसरी : "हो ! हो !"
पहिली : "काय झालं ?" दुसरी : "मुलगी."
पहिली : "खरं खरं सांगा, मोराभर ताक देते, चाटुभर कण्या दे
दुसरी : "मुलगा."
पहिली : "खेळायला कोठे जातो ?" दुसरी : "सुताराच्याघ
पहिली : "सुतार काय देतो ?" दुसरी : "विटीदांडू."
पहिली : "विटीदांडू कुठे ठेवतो ?" दुसरी : "माळणीच्या इथे
पहिली : "माळीण काय देते ?" दुसरी : "झेंडूचे फूल."

मग दोघी जणी उभ्या राहतात आणि हात व पाय पाळीपाळीने पु
नाचवीत म्हणतात —

"दे ग माळणी, झेंडूचे फूल !"

### भुइफुगडी क्र. २

हा खेळ दोघीजणी एकमेकींसमोर उभे राहून खेळतात.

किस बाई किस दोडका किस

दोडक्याचे पाणी कवळ्या आठुडं केलं
गठुडं केलं सवत्या सुनेनं लपवून ठेवलं
आतां काय करू बाई घुशीनं नेलं

### भुइफुगडी क्र. ३

सारवू बाई सारवू पाच खडे मांडू
एक खडा मोठा सई आली पोटा
सईच्या कानी बुगड्या आपण खेळू फुगड्या.

### भुइफुगडी क्र. ४

सारवू बाई सारवू पाच खडे मांडू
एक खडा उडाला गंगेत जाऊन बुडाला
गंगेला आला लोंढा भिजला माझा गोंडा
गोंड्याच्या पदरी काडी भिजली माझी साडी
साडीच्या पदरी रुपाया भाऊ माझा शिपाया
भावाने केली बायको ती गेली ताकाला विंचू डसला नाकाला

### पिंगा क्र. १

कमरेवर हात ठेवून वरचे शरीर गोलार्धात फिरवीत हा खेळ खेळतात.

पिंगा बाई पिंगा चवळीच्या शेंगा
चवळीच्या शेंगेला दाणाच नाही
मामाच्या लेकीला नाकच नाही
माझा पिंगावेशी वळतो म्हशी
तुझा पिंगा माझा पिंगा गेला वढ्या वळतो घोड्या
तुझ्या पिंग्याला माझ्या पिंग्याला झाली दृष्ट उतरा मीठ

### पिंगा क्र. २

माझा पिंगा जातो काशी आणतो म्हशी
माझा पिंगा जातो पुण्या आणतो कण्या
माझा पिंगा जातो गिरी आणतो मिरी

## मोराचा खेळ

एक पाय वर घेऊन एका पायावर नाचत हा खेळ खेळतात.

मोरा मोरा पाणी कित्ता ? (हात वर करून) पाणी इत्ता इत्ता – मोरा मोरा खातो काय ? बारीक तांदुळाचा भात, लोणकढं तूप। पहा मोराचं रूप॥ मोरा मोरा विडा कसा खातो ? पिकलेले पान, कळीचा चुना, बारीक सुपारी, पुणेरी कात । पहा मोराचे दात ॥ मोरा मोरा, राजाची राणी म्हणते की धाकटचा बहिणीला भेटून ये । दांडीवरच्या पाखराला मारून ये ॥ (किंवा) मोरा मोरा, सूपभर मोती घेऊन जा, माझ्या अंगणी पक्वा घालून जा ॥

## झिम्मा

हा खेळ दोघींना किंवा गोलाकार करून हाताने टाळ्या वाजवून पुष्कळ मुलींना खेळता येतो.

### झिम्मा क्र. १

आंबा पिकतो रस गळतो
कोकणचा राजा माझा झिम्मा खेळतो

### झिम्मा क्र. २

सर सर गोविंद येतो ग मजवरी गुलाल उधळीतो
त्याच गुलालाच भार आमच्या वेण्या झाल्या लाल
आमच्या वेण्या मोकळ्या मोकळ्या सोनियांच्या साखळ्या
घडवघडव रे सोनारा माणिक मोत्यांचा डोलारा
डोलाऱ्याला खिडक्या खिडक्या आम्ही बहिणी लाडक्या लाडक्या
पण थोराच्या कानी बुगड्या बुगड्या मोराच्या
लाड सांगू बापाला बापाला मोती लावूं कापाला कापाला

### झिम्मा क्र. ३

झिम्मा खेळू झिम्मा, झिम्मा खेळू रात्री,
देवियाच्या ज्योति राजा बोलावीतो कंगण्या घडवितो

आजी इथे बसा आजी तिथे बसा साखर शेले नेसा
चंदनाच्या खोडावर पाय कसा देवू बाई पाय कसा देवू
मामांना लेक झाला, नाव काय ठेवूं बाई, नाव काय ठेवू
हातभर खणाची कुंची काय शिवू बाई, कुंची काय शिवू
मुठभर साखरेचे माप काय देवूं बाई, माप काय देवूं
नांव ठेवा गोपाळा, गोपाळा, चंदनाचा झोपाळा, झोपाळा

### आड

ह्या खेळात प्रथम चार मुली घ्यायच्या व नंतर एकमेकींच्या पायात एकेका मुलीने पाय अडकवायचा व चारी मुलींनी टाळ्या वाजवायच्या व खेळास सुरुवात करायची. गाण्यानेच खेळाची सुरुवात होते. ते गाणे असे——

आड बाई आड ग सुपारीचं झाड ग
सुपारीला आल्या शेंगा धर ग पोरी पिंगा
एकीचा का दोघींचा भार पडला चौघींचा
मामाची लेक गोरी हळद लावा थोडी
हळदीचा उंडा रेशमकाठी गोंडा
रेशमकाठी हालती चिंचेखाली डुलती
चिंच बाई गोड ग जिभेला आला फोड ग
फोड काही फुटेना दारचा पाहुणा उठेना
जिभेचा फोड फुटला दारचा पाहुणा उठला

वरील गाणे संपल्यावर एका मुलीने जमिनीवर हात ठेऊन वाकायचे. दुसऱ्या एका मुलीने ती वाकल्यावर तिला विचारायचे ——

पहिली मुलगी : का ग सई वाकली ? दुसरी मुलगी : कंबर मोडली
पहिली मुलगी : काय हरवलं ? दुसरी मुलगी : नथ हरवली.
पहिली मुलगी : मी येऊ का सईला पाठवू ?
दुसरी मुलगी : सईला पाठव.

नंतर दुसऱ्या व तिच्यानंतर तिसऱ्या मुलीने खाली वाकायचे व जमिनीवर हात ठेवून वाकलेल्या परिस्थितीत थांबायचे व वरच्या प्रमाणेच प्रश्नोत्तरे करावयाची. शेवटी

पहिली मुलगी : मी येऊ का सईला पाठवू ?

तिसरी मुलगी : तूच ये.

नंतर ती चवथी मुलगी हात खाली जमिनीवर ठेवून वाकते व चौघी वाकलेल्या व पायात पाय अडकवलेल्या मुली थोड्या चालतात. नंतर खेळ संपतो.

## फुगड्यांचे उखाणे

(१) आपट्याचं झाड माझ्या झपाट्याखाली, नीट खेळशील खेळ नाही तर घेतें लाथेखाली.

(२) फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी, माझ्याशी फुगडी खेळते लेकुरवाळी.

(३) बटाट्याच्या भाजीला खोबरे घालते किसून, तू हो मोटार मी जातें बसून.

(४) सुया बाई सुया परातभर सुया, लांब लांब केसाच्या गुजरीण बया.

(५) केळीच्या पानावर ठेवला खवा, ठेवला खवा, नीट फुगडी खेळ माझा चंद्रहार नवा.

(६) ओलं खोबरं किसनीने किसू, किसनीने किसू, आपण दोघी मैत्रिणी खुर्चीवर बसू.

(७) अंबाड्याच्या भाजीला पळी पळी तेल, पहा पहा सासुबाई सूनबाईचा खेळ.

(८) आपण दोघी मैत्रिणी हिरवा शालू नेसू, हिरवा शालू नेसू, मेव्हण्याच्या पंक्तीला फराळाला बसू.

(९) विठोबा रखुमाई पुण्यात ग, पुण्यात ग, आपण दोघी मैत्रिणी जिन्यात ग.

(१०) चांदीच्या ताटात ठेवला हार, ठेवला हार, शिवू नको पोरी मला मंगळवार.

(११) राम म्हणू राम कोणत्या देशात ग, कशी जन्मली खडीसाखर ऊसात ग.

(१२) फुगडी खेळू दणदण, रुपये मोजू खणखण, बाभळीची साल माझी पाची बोटं लाल, भाऊ सुभेदार, भावाच्यां बायकोला चाबकाचा मार, मला मोत्यांचा हार.

(१३) आपण दोघी मैत्रिणी माडीवर ग, गुलाबाचं फूल माझ्या वेणीवर ग.

(१४) आयरी खाली पायरी, पायरीखाली गडू नको वहिनी रडू तुला शिमग्याला धाडू.

(१५) विरोदीची दांडी, लसनाची कांडी, हरबऱ्याचा घाटा, माझ्या फुगडीला मोठा ताठा.

# गौरीस्वयंवर

संग्राहक : पं. महादेवशास्त्री जो

## प्रसंग पहिला

पहिले दंडवत देवा लंबोदरा । मग वंदियले शारदा सुंदरा ।
गुरुप्रसादे गाईन गौरीहरा । श्रोते सावधान कथा अवधारा ॥ १ ॥

पर्वतांचा राजा हिमालयगिरी । त्यासी उपमा नाही पृथिवीवरी ।
जैसा कनकाचा मेरु म्हणू जरी । तळी हो पूरता विस्तारला वरी ॥ २ ॥

असे संतती संपत्तीचा सागर । नवही चुंबित ध्वजा वरी कल्पोत्तर ।
नवही रत्ने माणिके पाषाणी गंभीर । सप्तै धातु श्रृंगी आणिक भंडार ॥ ३

अष्टै कुळाचळी कैशी द्यावी सरी । एकालागी एक दिशा अधिकारी ।
याचे परिवार सकळ हे गिरी । तोच शैलपति नांदे पृथिवीवरी ॥ ४ ॥

अहो येथुनी आरंभीले गौरीसैंवर । गात्या-आईकत्यां रमे मनोहर ।
दक्षाचिये कुशी उपजली शक्ति । नाव दाक्षायणी पुराणी बोलती ॥ ५ ॥

पूर्वी शंकराला त्याने दिली होती । यज्ञ कारणे माहेरा आली प्रीती ।
शिव नंदीला पितयाने तेच काळी । निंदकाच्या वीर्ये स्वये उपजली ।
म्हणुनी अग्नीकुंडामाजी गुप्त झाली । त्याच हिमवंता पोटी जलमली ॥ ६

## प्रसंग दुसरा

ती नवरी अनुपम दिसे शेल्यबाळी । त्रिभुवनी लावण्याची शोभा झाली ॥ध्रु

काय वर्णू हिचे लावण्य चांगले । हिच्या रूपालागीं जगत्र आटिले ।
वेदीं वाखाणीता मुख पल्लाटले । इथे मंदमति काय बोल बोले ॥ १ ॥

मुख देखुनी चंद्रासी लाज वाटे । नेत्र विशाळ साजिरी नासापुटे ।
अधरी पाहता अरुणप्रभा भेटे । दंत हिरे झळकती तेज मोठे ॥ २ ॥

गुड गुल्फ केस सुकुमार चाचरे । वाय्या कठिण उत्तम रातोत्पले ।
मानस सरोवर जैसें हृदय दिसे । माजी हेम कमळकळी कुच तैसे ।। ३ ।।

केश सुकुमार सोनिळ चाचर । मुक्ताशुक्ति ऐसे श्रवण पातळ ।
कंठ साजिरा दिसताहे वर्तुळ । दंड बाहू हृदय आरक्त कर्दळ ।। ४ ।।

मध्य देखुनी केसरी हेवा करी । कटिप्रदेशाची पहा केवी सरी ।
जघन वर्तुळ जंघा शोभते अंतरी । कासे पीतांबर वेष्टिला परिकरी ।। ५ ।।

ब्रम्हा विष्णु इंद्र वंदिती सकळ । हिच्या मुगुटावरी प्रभेचा झळाळ ।
नखी चंद्ररेखा शोभती अंगुली । राजहंस तिची शिकावया चाळी ।
चतुरपण मागावया रति आली । तिथे सरस्वती बोलू विसरली ।। ६ ।।

ऐशी सामुद्रिके सर्वांगी संपूर्ण । तिच्या गोरेपणा भाळो सुवर्ण ।
अग्नीमाजी तप मांडिले दारुण । तप झाल्यावरी वाखाणिती जन ।। ७ ।।

## प्रसंग तिसरा

हिमवंतरायें केल्या तपराशी । कन्यारूपे शक्ति उपजली त्याशी ।
झाली उपवर प्रिय प्राणवसी । मनीं विचारीतो देऊ कवणाशी ।। १ ।।

ते सभेसी प्रधानासी पुसतसे राव । अंबेसाजे ऐसा वर विचारा हो ।।धृ.।।
दोन्ही कर जोडूनी विनवीती प्रधान । म्हणती कन्यारत्न नव्हे हे सामान्य ।
हिच्या रुपातुल्य वर नाहीसे कोण । चंद्र म्हणाल जरी कृष्णपक्षी क्षीण ।। २ ।।

कश्यपाचा सुत सूर्य म्हणू जरी । हिंडे वायुचक्री एकला अंबरी ।
त्याशी सावकाशी नाही क्षणभरी । अस्त उदयाते पावे निरंतरी ।। ३ ।।

इंद्र बरवा म्हणू कैशी अंगी भगे । परदारी ऋषी श्रापीयेला रागे ।
त्याने छेदीयेली पर्वताची शृंगे । त्याचे सोहिरीके कैसे मन रंगे ।। ४ ।।

ऐसा सभेमाजी करिता विचार । तिथे पातले ते नारद सत्वर ।
राये उठूनिया केला नमस्कार । आसन देवूनिया मांडिले ऊपचार ।। ५ ।।

मधुपर्के पूजा राये शीघ्र केली । मग विनविले जोडुनी अंजुळी ।
कोठुनि येणे झाले स्वामी कृपा केली । धन्य आजी दिन भेटी आम्हा झाली ।।६।।

तुम्हा चौदा भुवने आहे जी गमन । सदा वसतसे तुमचे हृदय ध्यान ।
आम्हा कुळी एक आहे कन्यारत्न । हिच्या रूपा तुल्यवर सांगा कोण ।। ७

इतुके आइकूनी बोले नारदमुनी । आपली कन्या ऐशी नका धरु मनी ।
हा तो आदिमाया त्रैलोक्यस्वामिनी । एवढा प्रपंच हा झाला इसपासूनी ।।

## प्रसंग चवथा

कोण म्हणाल जरी वैकुंठीचे हरी । रूपे मेघश्याम पितांबर धारी ।
शंख चक्र गदा पद्म वाहे करी । सुकुमार शेषावरी निद्रा करी ।।१।।
त्या नारदे रायाप्रती सांगितला वर। हाचि जोडेल जरी तुमचे भाग्य थोर।।ध्रु.

लक्ष्मी चरणसेवा निरंतर करी । त्याचे आरूढन गरुडस्कंधावरी ।
त्याचा वास क्षीरसागरा माझारी । रक्षी शरणागता भक्तांचा कैवारी ।। २

ध्वज वज्रांकुश सामुद्रिके पाही । जंघा वर्तुल तोरडचा गरजती पायी ।
कासे पितांबर विजू जैसा पाही । कटी माणिक सुत्रे रचिली ठायी ठायी ।।

गळा वैजयंती कौस्तुभ झळाळी । श्रीवत्सपदक शोभे वक्षस्थळी ।
मुखी मंदस्मित मृगनाभि भाळी । शिरी मुकुट श्रवण शोभती कुंडली ।। ४

यज्ञ पृथिवी धर्म गाई द्विज पाळी । भजती त्यांचे जन्म-मृत्यु टाळी ।
आम्हा विचारिता हे या ब्रम्हागोळी । एक नारायण दुजा चंद्रमौळी ।। ५ ।

सगराने कन्या विष्णूप्रती दिली । शिव नवरा ऐशी मात आइकिली ।
यासी देई कन्या न धरी संशय । शुद्ध दिन आजि करा का निश्चय ।। ६ ।

ऐशी आयकोनी नारदाची मात । राजा म्हणे स्वामी बोलती उचित ।
परि या अंबिकेचे शिवतत्वी चित्त । तिशी मानलिया देऊजी विश्रांत ।। ७

## प्रसंग पाचवा

अंबा शिवतत्वी वितरली जरी । शिव निर्विकारी कैसा अंगीकारी ।
शब्द निश्चयाशी नये क्षणभरी । आलिंगन देता बहु पळे दुरी ।।१।।
तो नारद सांगतसे शिवाची दूषणे । अंबे आइकिल्या होताती भूषणे ।। ध्रु.

घेता चुंबन अधरी रुची नाही । अंगी परिमळ न लागे जो काही ।
भस्म उधळण करीतसे देही । त्यासी वरिलिया संसारी सुख नाही ।। २ ।।

त्यासी रहावयालागी भूमी नाही । सदा वसतसे स्मशानाचे ठायी ।
त्याची वृत्ति पुसाल तरि मी सांगू कायी । भिक्षा दारोदारी मागतो प्रत्यही ।।३।।

त्यासी नेसावया न मिळते चीर । लोक म्हणताती तया दिगंबर ।
गळा रुंडमाळा वासुकीचे हार । गजचर्म परिधान व्याघ्रांबर ।। ४ ।।

रूपे भव्यांवर बरवा न दिसे काही । आठी अवयव सांगताती देही ।
लोक म्हणताती–पंचवक्त्र पाही । तीन डोळे त्यासी मायबाप नाही ।। ५ ।।

एक म्हणताती कर्पूरा ऐसा गौर । देती उपमा तयासी सिंधुक्षीर ।
कोटी चंद्रक्षीर साधू जैसा खरा । त्यासी निर्धारिता नयेची निर्धारा ।। ६ ।।

त्याणें ब्रह्मेयाचा शिरच्छेद केला । निज श्वशुराच्या घाता प्रवर्तला ।
माये अविद्येचा घात त्याणे केला । अवघा ब्रह्मगोळ वायांची जाळीला ।। ७ ।।

एकादश रुद्र स्वयें रौद्र झाला । भूते खेळविता कोपे खवळला ।
महा हळाहळ गिळूं जो लागला । कंठी राहिले तै नीळकंठ झाला ।। ८ ।।

इतुके आइकूनी नारद बोलले । राये नारदाते मागुते विनविले ।
द्यावी माधवाशी ऐसे चित्ता आले । आता तरी देऊ तुमच्यानी बोले ।। ९ ।।

## प्रसंग सहावा

अंबा सभेआड बैसोनी सादर । ऐके सभेमाजी वर्तला विचार।
तो त्या नारदाचे बोलणे साचार । मानूनिया विष्णू निर्धारिला वर ।। १ ।।

ती अंबिका आईकोनी मनी दचकली । काय करू ऐसे सखीते बोलली ।। धृ. ।।

गौरी म्हणे सखी तूं ग प्राणवशी । तरि तूं इथुनी मजला घेवूनिया जासी
परम शिवपद मज दाखविशी । तरी होतिल तुझ्या उपकारांच्या राशी ।। २ ।।

सखी म्हणे का ग उतावीळ होशी । तुजला नेईन मी जिथे तू सांगशी
मान न देशी का पितृ वचनासी । हे तू मजप्रती सांगे विस्तारशी ।।३।।

सखी म्हणे विष्णूघरी काय उणे । विपरीत तुजला सांगीतले कोणे ?
येरी म्हणे वेदाअंती काय उणे । हे तू विचारानी पाहे तेची खूणे ।।४।।
गौरी म्हणे सखे सांगते मी पाहे । युग चौक दहा शतवेळा जाये ।
तो त्या ब्रह्मयाचा एक दिवस होये । तिसा दिशी ऐसा एक मास लाहे ।।५।।
ऐसा बारा मासी दुवत्सर होये । नव्हे दुश्चित ग अगणित लेखा पाहे ।
शतां संवत्सरी ब्रह्मा पावे लय । लक्ष ब्रह्मे तेव्हा विष्णू घटिका होय ।। ६ ।।
विष्णू बारा ऐसे दोन्ही वेळा जाती । तो त्या ईश्वराची निमिषाची स्थिती
माझ्या सौभाग्याची कोण करिल गणती । सखी विचारून दृढ पाहे चित्ती ।।७।।
शिव वरिलिया अधिक पुण्य झाले । वासनेचे मूळ ठायीच निमाले ।
गौरी म्हणे सखे बरवे त्वां पूशिले । तुजला सांगते मी ऐक एका बोले ।। ८ ।।

## प्रसंग सातवा

ऐसे सखीते गौरीने सांगितले । भ्रांति फेडुनिया समाधान केले ।
तिचे अंतःकरण ईश्वरी रतले । दोघी मिळूनिया प्रस्थान आरंभिले ।। १ ।।
ती पार्वती सखीसवे वनाप्रती गेली । काया वाचा मने तपे आरंभिली ।।धृ.।।
करुनी प्रातःस्नान विभूतीलेपन । लिंगपूजा दंडवत जपध्यान ।
काम क्रोध मोहे विवर्जिले मन । अधोमुखी करितसे धूम्रपान ।। २ ।।
देवालयी सडेसंमार्जन करी । चौक रांगोळीया घाली नानापरी ।
मंत्र पंचाक्षरी वदनी उच्चारी । करी रुद्राक्षांची जपमाळ धरी ।। ३ ।।
शिव अष्टोत्तर शत नामावली । दहा शतें जपीतसे नित्यकाळी ।
वातपर्ण जळ कंदमूळ फळी । क्षुधानिवारण करीते वेल्हाळी ।। ४ ।।
पार्वतीचे तप वाढले अद्‌भुत । पंचमहाभुते जाहली संतप्त ।
देवगण ऋषी झाले भयभीत । ब्रह्मा विष्णू कूर्म शेष चिंताक्रांत ।। ५ ।।
स्वर्गीं देवराया गुरुप्रती पुसे । का हो ब्रह्मगोल तापलासा दिसे ।
शिव तिसरा नेत्र उघडीला असे । नकळे मंडळी काय वर्तलेसे ।। ५ ।।

गुरु सांगतसे सुरपतीपुढे । हिमाचळी गौरी तप करी गाढे ।
शिव भ्रतार पाविजे या निक्रोडे । शिव निर्विकारी प्रपंची न पडे ॥ ७ ॥
ह्यासी काय उपाय ऐसे इंद्र पुसे । कन्यारत्न शिव अंगीकारी केसे ।
येरू म्हणे कामा धाडा ह्या उद्देशे । त्याणे विंधिल्या तो वरिल अनायासे ॥ ८ ॥

## प्रसंग आठवा

मदनाची राणी रती आली होती । तुम्ही न जावे त्या भूमंडळाप्रती ।
शिव कोपलिया करील विभूती । एवढा माझा शब्द तुम्ही धरा चित्ती ॥ १ ॥
तो मदन शिवाप्रती देवे पाठविला । वनी शोभला तो वसंत पुढे झाला ॥धृ.॥
पंचबाण तेथे पातला त्वरित । सर्वे वनितांचा मेळा अगणित ।
त्यांच्या अंगी वाढला अद्भुत । पाहिले वय त्याचे अति अप्रमित ॥ २ ॥
त्याणे पुष्पजाती फुलविल्या बहुत । तेथे कोकिळेचा स्वर शोभे मंजुळ ।
भ्रमर झेपावुनी सेवितातो महू । परिमळ घेवूनियां संतोषले शिवू ॥ ३ ॥
सर्व अलंकार हेममय दीसती । चिरे सपूरती नेसल्या अति प्रीती ।
कुंकम केशरे त्यावरी शिंपीताती । त्यांचे अवयव प्रगट दिसती ॥ ४ ॥
एक सप्तस्वरे करीती गायने । एकवीस मूर्च्छना धरीताती स्थाने ।
वीणा टाळ श्रुती मृदंग नाचणे । थैयै नाचताती इंद्रिये दाखविणे ॥ ५ ॥
वसंताचा खेळ देखोनिया डोळा । गौरी वरावया शिव पुढे झाला ।
तंव गौरीमागे कंदर्प देखिला । म्हणे कोपुनिया इथे कैचा आला ॥ ६ ॥
त्याणे मग वर मोकलीले बाण । स्थिर चंचळ ते केले अंतःकरण ।
शिवे उघडीला तृतीय नयन । कोपे भस्म केला रतीचा रमण ॥ ७ ॥
पूर्व ध्यान स्थिती ईश्वर बैसले । भाव भक्तीवीणे देव कैसा पावे ।
युक्ती प्रयुक्ती ईश्वरी न चाले । म्हणुनी गौरी उग्र तप आरंभीले ॥ ८ ॥

## प्रसंग नववा

जप तप श्रुत अदृश्य हो झाले । पहा पार्वतीने इतुके हे केले ।
कर जोडुनिया उभी काय बोले । नका उपेक्षा करू तुम्हा शरण आले ॥ १ ॥
तो शंकर पार्वतीच्या भक्तीसी भाळला । भाव जाणुनिया अनुग्रह केला ॥ धृ ॥

इतुके ऐकुनिया उमेचे वचन । कृपा केली शिवे विसर्जिले ध्यान ।
तुझ्या सेवेने मी तृप्त झालो जाण । आता मागसी ते देईन वरदान ।। २ ॥
गौरी म्हणे प्रसन्न जाहलेत जरी । तरी अर्धांगी या बैसवा त्रिपुरारी ।
आपणा वेगळी नका करु क्षणभरी । म्हणुनी मस्तक हा ठेवी चरणावरी ॥३॥
शिवे उचलुनी अलिंगन दिले । जैसे गंगेमाजी लवण मेळविले ।
तेव्हा जिवा शिवा समाधान झाले । परस्परा सुख अनुभवासी आले ॥ ४ ॥
सावधान ऐशी ध्वनी आईकिली । आदित्याने घटिका होती प्रतिष्ठिली ।
पंचमहाभूते साक्षीभूत झाली । माया अंतरपाट घेवूनीया आली ॥ ५ ॥
देवी पुष्पवृष्टी तयेकाळी केली । महा दुदुंभी निशाणे वाजिन्नली ।
एवढ्या गौरीप्रती शंभू काय बोले । चाल कैलासाशी जाऊ शल्यबाळे ॥ ६ ॥
गौरी म्हणे मातापितया वेगळी । कैशी येऊ जन हासती भूतळी ।
तुम्ही यथाविधि मागा तयाजवळी । अस्तु वर देवूनी गेले चंद्रमौळी ॥ ७ ॥
शंभु कैलासासी जाउनी तेच काळी । महा हरिव्दारे मुळे पेल्हावली ।
देवगण ऋषी वृंदे बोलाविली । इथुनि विवाहाची स्तुती आरंभिली ॥ ८ ॥

## प्रसंग दहावा

तंव येरीकडे हिमवंताघरी । रावे नारदासी नेले अभ्यंतरी ।
दृष्टी घालवाया अंबिका नोवरी । तव न दिसे ती मंदिराभीतरी ॥ १ ॥
तो हिमवंत पार्वती वियोगे कळवळी । म्हणे शोधा माझी अंबा कुठे गेली ॥धृ॥
कुठे गेली माझी अंबा गुणराशी । हिये वाचूनि मज घडी ऋमे कैशी ।
अंबावियोगे राजा कासाविशी । शोधावया लोक धाडी दाही दिशी ॥ २ ॥
कुठे गेली असेल भुखाळ । कुठे कोणाजवळीं मागेस कवळ ।
दु:खे व्यापला तो नयनी वाहे जळ । जवळी स्तंभित किती मंत्रीयांचे मेळ ॥३॥
कुठे गेली किंवा व्याघ्रदृष्ट झाली । की हो गंधर्वांनी हिशी चोरुन नेली ।
की हो इंद्रे इंद्रजाल विद्या केली । एवढ्या भूतलामाजी गुप्त झाली ॥ ४ ॥

राजा प्रधान ते शोधी मही स्थळ । म्हणे मी केव्हा देखिन माझे बाळ ।
चरण सुकुमार रुतती अरळ । दुःखे व्यापला तो पिटी वक्षस्थळ ।। ५ ।।

असे शोधीता श्रमले बहुत दिन । तंव गंगेतीरी असे एक स्थान ।
जवळी वालुकेच्या लिंगाचे पूजन । तिथे एक पार्वतीचे पद्मासन ।। ६ ।।

दिव्यधूप दिव्य विभूती सर्वांगी । दिव्य माळा शोभती सुतनू अंगी ।
देखुन विस्मय वाटे हिमवंतालागी । मंत्री म्हणताती रंगली शिवरंगी ।। ७ ।।

राधे उचलूनी आलिंगिली बाहें । गहिवरुनी स्नेहे मोकलिली धाये ।
बाळे कोठूनीया आलीस ये ठायी । चल घरा जाऊ आता लवलाही ।। ८ ।।

## प्रसंग अकरावा

कन्या घेऊनी हिमवंत घरा आला । सकळ जना थोर आनंद वर्तला ।
तव येरीकडे विष्णु लोकपाळा । अवघे मिळूनिया विचार आरंभिला ।। १ ।।
तो सोहळा आरंभिला उमा महेशांचा । मनोरथ सिद्ध झाला सकळांचा ।।धृ।।
कन्या मागावया सप्त ऋषीश्वर । देवी पाठवीले चालती सत्वर ।
शीघ्र जाती तिथे हिमवंताचे घर । राये उठूनिया केला नमस्कार ।। २ ।।
कर जोडूनिया स्वागत पुशिले । धन्य दिन आमुचे भाग्य फळा आले ।
आसन देऊनिया उपचार केले । काय अपेक्षीता सांगा मज वहिले ।। ३ ।।
भोळा देव आदि देव त्रिपुरारी । अवघ्या भक्तांची वचने अंगीकारी ।
तुमची कन्या मागावया इथेवरी । आम्हा येणे झाले ये हो अवसरी ।। ४ ।।
भोळा शिवशंभु उदार चक्रवर्ती । अष्टमहासिध्दी दास्यत्व करीती ।
नऊ निधी निरंतर मोविन्नाती । सकळहि जाणताती आहे सर्वांभूती ।। ५ ।।
काय वानू शिव शंभूचे वैभव । वेदा नकळे त्याच्या रूपाचा उद्भव ।
आज्ञा वंदिताती ब्रह्मादिक देव । स्तविता सहस्त्रफणी धरी मौन्यभव ।। ६ ।।
ऐसा सहसंवाद करुनी हिमगिरी । जाऊनि राणीप्रती पुसे अभ्यंतरी ।
म्हणे अंबिका ही झाली उपवरी । ऋषी नवरा सांगू आले त्रिपुरारी ।। ७ ।।
आता सुकृताप्रती हिचे कन्यादान । इतुके आयकोनी पतीचे वचन ।
हास्यमुख राणी विनत्री कर जोडून । तुम्हा मानले ते आम्हा कोटी गुण ।।८।।

## प्रसंग बारावा

ऐसा निश्चय करूनी हिमाचळ । बाहेर येऊन ऋषी पूजिले सकळ ।
त्यांसी पांघरविले शेले सोनेसळ । सर्वें विप्र दिले नवरेयासी मूळ ॥ १ ॥
तो निश्चय हिमवंते तेच काळीं केला । अंबेलागी शंभू वर निर्धारिला ॥ धृ. ॥
जाऊनि वृत्तांत सांगती हरिहरा । म्हणती नवरीचा निश्चय केला खरा ।
वर प्रस्थानासी हाची मुहुर्त बरा । सैन्य पालवी पालणी शीघ्र करा ॥ २ ॥
इतुके ऐकुनी आनंदले सदाशिव । गरुड स्कंधावरी चढले माधव ।
नंदीवरी आरूढले सदाशिव । वाद्ये एकानादी त्रहाटीली सर्व ॥ ३ ॥
निज वहानी आरुढले लोकपाळ । अष्ट नायक किन्नर कन्या मेळ ।
भाट ब्रीदे पढती ध्वनीचे कल्लोळ । तुरे भेरी शिंगे वाजती अपार ॥ ४ ॥
आदरेंसी पुढे झाला हिमाचळ । यावे यावे तुम्ही वऱ्हाडी सकळ ।
परस्परे भेटी पुशिले कुशल । जानवसा दिला अती रम्य स्थळ ॥ ५ ॥
तेल हळदी घेतली शंकराने । उष्णोदके संपादिली मंगल स्नाने ।
देवप्रतिष्ठेची केली अनुष्ठाने । अष्ट वर्ग संपादिले थोर माने ॥ ६ ॥
वरवे सुमनांचे जडितांचे अलंकार । शंकराते लेववीति मनोहर ।
अति प्रीतीने शृंगारिती वर । नवरा शोभिवंत दिसे कर्पुरगौर ॥ ७ ॥
विष्णु शिवाप्रती बोलती उत्तर । गळा रुंडमाळा वासुकीचे हार ।
कोटी भुतावळ त्रिशूळ व्याघ्रांबर । याचा चारी दिवस करावा अव्हेर ॥ ८ ॥

## प्रसंग तेरावा

शिवे वेताळांसी आज्ञा दिली ऐशी । तुम्ही भूते न येऊ द्यावी मंडपाशी ।
यथास्थानी सूचना केली सकळांशी । शेवते रुखवत आले तयापाशी ॥ १ ॥
तो नवरा शंकर मंडपा चालिन्नला । नाद थोर मंगळ तुरांचा वर्तला ॥ धृ. ॥
सोनसळा शेला पासोडीला पाटी । बरवी मेळविली देवांगनांची घटी ।
आल्या पतिव्रता आरती घेउन ताटी । राजपत्नी न्यहाळूनी पाहे दृष्टी ॥ २ ॥

इतक्या हिमवंताचे विप्र तेथे आले । वर प्रस्थानासी चला म्हणती वहिले ।
इतुके ऐकुनी सकळीक ऊठिले । वेगे पालणा पालणा शीघ्र झाले ॥ ३ ॥

गुढ्या तोरणे मखरे उभविली । आले चंद्रचूड मंडपाजवळी ।
आल्या पतिव्रता कुरवंडी केली । शिव सिंहासनी सभा घनवटली ॥ ४ ॥

तव येरीकडे हिमवंता घरी । वरवी विवाहाची स्थिती संपादिली ।
लोड गादिया घातल्या बहुतांपरी । बैसाकार दिले महाराजद्वारी ॥ ५ ॥

कन्यार्थी होऊनी आले हे ईश्वर । कुशासनी चरण धुवी गिरिधर ।
अर्घ्य आचमन वस्त्रे अळंकार । अर्पुनि दधिपात्र करी नमस्कार ॥ ६ ॥

मधुपर्क पूजा राये शीघ्र केली । बरवी विवाहाची स्थिती संपादिली ।
शिव आले पुढे घटिका प्रतिष्ठिली । येरीकडे अंबा नवरी शृंगारिली ॥ ७ ॥

## प्रसंग चौदावा

पायी अंगुष्ठले जोडवी पोल्हारे । बिरवलिया वाळे वाजती गजरे ।
जोड कडसूत्री झळकती हिरे । कासे क्षद्रघंटा मिरवे सपुर चीरे ॥ १ ॥
त्या हिमवंते साळंकृत कन्यादानकाळी । नाना अलंकारी नोवरी शृंगारेली ॥ धृ. ॥

गळा अक्षय सत्र मोतियांचे सर । पदक एकावळी रत्नजडित हार ।
अंगी मधवेची काचोळी परिकर । हाती अक्षय चूडे शोभताती कर ॥ २ ॥

कानी तानीवडे कर्णफुले नग । मासबाळच्या मुक्ताफळे शोभे भांग ।
गोंड राखडी मूद माणिक मोतीलाग । नेत्री काजळ मुखी तांबूल सुरंग ॥ ३ ॥

नाकी मुक्ताफळ शोभे अमोलीक । विश्वकर्म्या हातिचे कोंदण सुरेख ।
भिवया शोभती जैशी चंद्ररेख । शेस मुक्ताफळी भरली सुरेख ॥४ ॥

चंद्र तारा रचना पूर्णिमेची जैशी । नानावर्ण वाटिका फुलली जैसी ।
सर्व अलंकारी अंबा शोभे तैसी । अंत्रपटाआड धरिली संभ्रमेसी ॥ ५ ॥

करी धरुनी हिमवंत कन्यारत्न । देव ऋषेश्वर म्हणती सावधान ।
गौरी पहावया उतावीळ मन । अंत्रपटावरती शंभू करिती मान ॥ ६ ॥

गौरी पहावया शंभू उंच होती । ऋषीश्वर अंत्रपट उचलीती ।
तंव गौरीचरण प्रगट दिसती । काम उभ्दवला ब्रम्हेयाचे चित्ती ।। ७ ।।
मदने झाकुळले वीर्य उसळले । तेथे साठी सहस्र बालखिल्य झाले ।
त्याहो विधात्याचे कर्म ओढवले । देवे कर्म अनुष्ठान भिन्न केले ।। ८ ।।

## प्रसंग पंधरावा

वेदमंत्रध्वनी विप्रे उच्चारिली । कन्या उचलूनी शिवाकरी दिली ।
आड अंत्रपट भ्रांति निवटली । वाद्ये एका नादे अवघी वाजीन्नली ।। १ ।।
त्या शंकरे पार्वतीचे पाणिग्रहण केले । हिमवंत राये कन्यादान दिले ।। धृ. ।।
वेदध्वनी म्हणती ऋषीश्वर । बाहेर झाला मंगळतूरांचा गजर ।
ढोल दुंदुभीचे नाद होती फार । तुरे भेरी कहाळा वाजती अपार ।। २ ।।
मृदंग मोगरशिंग गिडबिडचा कासाळा । अवध्या वाजंत्र्यांचा झाला एकमेळा ।
अंबर गर्जतसे धरणी ते वेळा । आले बधिरत्व शेषकर्णस्थळा ।। ३ ।।
सप्ताहि ऋषीश्वर संकल्प सांगती । पार्वतीचे गोत्रत्रय उच्चारीती ।
तुमचे सांगा कवण शंकरा पुशिती । पुसता कवण्या ज्ञाने शंकर बोलती ।। ४ ।।
नाही मायबाप बंधु सहोदर । ठायीच वाढत होतो दिगंबर ।
युक्ति करुनिया तपा ढळविला । मायबाप उच्चारू सांगता कोणाला ।। ५ ।।
ढवळे गाती सवासिणी पतिव्रता । वधूवरांभाळी लाविती अक्षता ।
आंदण धारे हिमवंते घातले हाता । ते ते जे जे काळी देईल सर्वथा ।। ६ ।।
दोन्ही पालवांसी गाठी जी घातिली । लाजाहोम करुनी बहुल्या बैसवीली ।
पार्वतीचे बंधू त्यासी वस्त्रे दिली । मग अरोगणे ताटे विस्तारिली ।। ७ ।।
उमा शंभू बैसविली एके ताटी । सोनेसळा शेला पासाडिला पाटी ।
आल्या पतिव्रता आरती घेऊनि ताटी । राजपत्नी न्याहाळूनि पाहे दृष्टी ।। ८ ।।

## प्रसंग सोळावा

आले तैसे लिंबू झारीची रसाळ । काकडचा करवंदे माइनीचे मूळ ।
आंबे जांभरे नृपत्याचे घड । चिरल्या कोशिंबिरी रायती हो फार ।। १ ।।

त्या मंडपीं जेवितातीं वधूवरांच्या पंक्ती । समारंभे वाढी मेनका निजहस्ती
॥ धृ. ॥

बरव्या वाढिल्या पत्रशाखांच्या ओळी । लवण शाका वाढिल्या तयांजवळी ।
दुधे आटविल्या बोटव्याच्या खिरी । गव्हले बोटवे साखर पचेधारी ॥ २ ॥

घारिया पुरिया उंडवरिया गुळवरिया । खांडे मांडे साखर फेणवलिया ।
वडे पूर्णवडे काय सांगू तुला । जिव्हा नाचत आहे पक्वान्ने देखिल्या ॥ ३ ॥

बरवा वाढिला मोगऱ्यांचा भात । वरी वरण मुगांचे हो अलौकिक ।
वाटचा भरुनिया ठेवियले तूप । तिथे वधूवर जेविती अनेक ॥ ४ ॥

आपोषण घृत वाढिले विपुळ । देव ऋषीश्वर जोवेती सकळ ।
हरहर नामघोष करीती प्रबळ । जेवा सावकाश विनवी हिमाचळ ॥ ५ ॥

उमा महेशांचे पंक्ती जे जेविले । पूर्वी त्यांनी पुण्याचे हो पर्वत केले ।
चवी जाणती ते रुचीने जेविले । येर पोटासाठी अगणित मिळाले ॥ ६ ॥

हेम कळसामाजी लावूनि परिमळ । राये प्राशनासी निवडिले जळ ।
कर प्रक्षाळूनी आंचवले सकळ । त्यासी सर्मपिले कर्पूर तांबूळ ।
उमा शंभू एके आसनी बैसली । पुढे गंधर्वे गायने आरंभिली ॥ ७ ॥

## प्रसंग सतरावा

ऐसे चारी दिवस यथाविधि झाले । देव ऋषीश्वरा राये अहेर केले ।
स्थायिक आगंतुक अवघे सुखी केले । जाऊ कैलासासी ऐसे शिव बोलिले ॥१॥
आहो एथूनी वरात चालिली शंकराची । धन्य नोवरी सवे दुहिता
हिमवाताची ॥ धृ. ॥

गौरी भक्तीरंग तुमची जोडी झाली । बरवी विवाहाची स्थिति संपादिली ।
जाऊ कैलासाशी आज्ञा द्या जी वहिली । इतुक्या राजा राजपत्नी गहिवरली
॥ २ ॥

म्हणती महादेवा परिसा विनवणे । पुत्रा ऐसे केले कन्येचे पाळण ।
आता तुमचे चरणी केली समर्पण । बरवे रीती हिचे करा संरक्षण ॥ ३ ॥

सेवे चुकेल ही कारण विसरेल । बोलूं न कळे ऐसी आहे आमुची बाळ ।
कोप न धरा तुम्ही देवाजी दयाळ । आजी विज्ञापन ऐसे आमुचे बोल ॥ ४॥

इतुक्या प्रत्युत्तर दिले उमेरायें । हिचे सेवे जाण विकला माझा देहे ।
हिचे अधीन झालो निस्संदेह । तुमच्यापरीस माझा हिचे ठायी मोह ॥ ५ ॥

इतके ऐकुनी हिमवता सुख वाटे । म्हणे अंबिकेचे भाग्य आहे मोठे ।
अंबेप्रसादे शंभू आम्हा भेटे । त्याच्या हो दर्शने आमुचे दैन्य फिटे ॥ ६ ॥

इतुके ऐकुनी सैन्ये पालाणिली । उमा-शंभू नंदीवरी आरूढली ।
येथून वरात ही कैलासा चालली । वाद्ये एकानादे अवघी वाजिन्नली ॥ ७ ॥

## प्रसंग अठरावा

दौंदण धारे हिमवंते घातले होते । तेही तितुके दिले पार्वतीसांगाते ।
अव कैलासासी पावले हृष्ट चिते । तेथे सन्मान झाला सकळाते ॥ १ ॥
आहो येथुनी वरात पावली कैलासासी । भक्तिरंगे शिवे प्रणिली पार्वतीशी
॥ धृ. ॥

सप्तहि ऋषीश्वर गंधर्व किन्नर । कर जोडूनीया स्तविती महेश्वर ।
देव दुदुभीचा नाद झाला थोर । तुरा भेरी कहाळा वाजती अपार ॥ २ ॥

गौरी स्वयंवर गावे आयकावे । श्रावणमासी सोमवारी उच्चारावे ।
शिवसहस्त्रनाम मुखी उच्चारावे । वाचे नये त्याणे श्रवणी आयकावे ॥ ३ ॥

गौरीस्वयंवर गाती आइकती । त्यासी गंगा भागिरथी स्नाने होती ।
गया गदाधरी पितर उद्धरती । त्यासी वैकुंठ होईल हो मुक्ती ॥ ४ ॥

गौरीस्वयंवर ऐशी पुण्यकथा । आइकता हरे तापत्रय व्यथा ।
दुःख दारिद्र हरेल मुखी गाता । कमलाकरसुत विनवी लिंगा संता ॥ ५ ॥

# कहाणी

*निवेदन : कुमुदिनी रांगणेकर*

मंगळवारी आक्का, ताईची किंवा वहिनीची, काकूची मंगळागौर. म्हणून देवीच्या नैवेद्यासाठी केलेले छान छान मोदक खायला मिळतात दर मंगळवारी.

पण ह्या मंगळागौरीची कथा ठाऊक आहे का ? ऐका हं! फार पूर्वी कुंडिन नावाच्या शहरात धर्मपालक नावाचा एक ब्राह्मण रहात होता. त्याला मुलगा नव्हता आणि त्या काळी मुलगा नसलेल्या माणसाला मान नसे. एवढेच नव्हे तर त्याच्या हातून भिक्षा घेणे सुद्धा काही साधूंना आवडत नसे.

असाच एक साधू रोज धर्मपालकाच्या घराकडे येई, पण भिक्षा न घेत जाई. त्यामुळे धर्मपालकाला फार वाईट वाटे. अन् एक दिवस त्याने चटकन साधूच्या झोळीत भिक्षा घातली. ते पाहून साधूला राग आला. तेव्हा धर्मपालकाने त्याचे पाय धरून त्याची क्षमा मागितली. साधूचा राग शांत झाला आणि त्याने म्हटले, "निळ्या रंगाचे कपडे घालून व निळ्या घोड्यावर बसून तूं रानात जा. जिथे घोड्याच्या पायाला ठेच लागेल तेथे खण. म्हणजे एक देवी उत्पन्न होईल. ती तुला हवा असलेला आशिर्वाद देईल".

धर्मपालकाने लगेच त्याप्रमाणे केले. निळे कपडे घालून तो निळ्या घोड्यावर बसला आणि रानात गेला. मग घोड्याला ठेच लागताच तो खाली उतरला. तिथली जागा त्याने खणली. त्याला एक देऊळ दिसले. देवळातील देवीची त्याने प्रार्थना केली. देवीने विचारले, "तुला जर पुष्कळ आयुष्य असलेला मुलगा हवा असेल तर तो वेडा खुळा निघेल. आणि शहाणा, गुणी मुलगा हवा असेल तर त्याला आयुष्य थोडे मिळेल. तेव्हा कसला मुलगा हवा ?"

धर्मपालकाने विचार करून उत्तर दिले. "मला गुणी मुलगाच दे. देवी, त्याला आयुष्य कमी असले तरी चालेल."

देवी, " तथास्तु तसेच होईल." असे बोलली अन् नाहीशी झाली.

पुढे देवीच्या प्रसादाने एका वर्षानंतर धर्मपालकाच्या बायकोला अल्पायुषी परंतु गुणी मुलगा झाला. त्याचे नाव शिव असे ठेवले. हळूहळू मुलगा मोठा झाला. त्याचे लग्न करावे असे त्याच्या आईबापांना वाटू लागले. पण आधी काशीक्षेत्राला जाऊन श्रीविश्वेश्वराचे दर्शन घेण्यासाठी ती तिघे काशीला गेली. तिथे देवळातून परत येताना त्यांना एका घराच्या अंगणात काही मुली खेळताना दिसल्या. लहान मुलांच्या पद्धतीप्रमाणे खेळता खेळता त्यांच्यामध्ये भांडण झाले. श्रावण महिन्यात " आता ऊन नि आता पाऊस" असा ऊनपावसांचा खेळ चालतो. त्याप्रमाणे लहान मुले खेळताना, " आता गट्टी तर आता कट्टी " अशी गंमत होते. तसे भांडता भांडता त्या मुली एकमेकींना शिव्यागाळी देऊ लागल्या. अन् एकीने दुसरीला " तू विधवा होशील," अशी शिवी दिली. ह्या दुसऱ्या मुलीचे नाव सुशीला होते. आपल्याला दिलेली ही शिवी ऐकून ती म्हणाली, " तुझ्या असल्या शिव्यांनी माझे कधीच वाईट होणार नाही. कारण माझी आई मंगळागौरीचे व्रत करीत असते. तेव्हा आमच्या कुळात कुणीच विधवा होणे शक्य नाही."

सुशीलेने मोठ्या आत्मविश्वासाने उच्चारलेले हे शब्द ऐकून धर्मपालकाला फार आनंद झाला. त्याच्या मनात आले की, ह्या मुलीबरोबर आपल्या शिवाचे लग्न केले तर ती लौकर मरण्याचे भयच नको, कारण सुशीला कधी विधवा होणार नाही ना ? मग तिचा धव म्हणजे नवरा दिवंगत होण्याची, मरण पावण्याची, नि त्यामुळे ती विधवा होण्याची, जर धास्ती नाही तर शिव तिचा नवरा झाल्यावर तो मरण पावण्याची धास्तीच नको.

नंतर धर्मपालकाने सुशिलेच्या आईवडिलांची भेट घेतली व सुशीलेचे शिवाबरोबर लग्न झाले.

लग्नानंतर श्रावण महिना आला. सुशीला आपल्या आईप्रमाणे दर मंगळवारी मंगळागौरीचे व्रत करू लागली. आणि शेवटच्या मंगळवारी पहाटे स्वप्नात तिला देवी दिसली. तिने सांगितले, " आज रात्री माझी पूजा वगैरे

आटोपल्यावर तूं झोपी जाऊ नकोस. कारण आज तुझ्या नवऱ्याला मृत्यू येणार आहे. एक मोठा नाग त्याला दंश करण्यासाठी येणार आहे. तरी तूं एका घागरीत दूध घालून ठेव नि ते पिण्यासाठी नाग आत शिरला की, तुझ्या चोळीने तू घागरीचे तोंड बांधून टाक. सकाळी तुझ्या आईला ते वायन दे."

मंगळवारी उपास होता. पूजा वगैरे करून सुशीला दमली होती, तरी ती रात्री झोपी गेली नाही. दुधाची घागर तयार ठेवून ती जागत बसली. अन् खरोखरीच एक नाग आला. तो दूध पिण्यासाठी घागरीत शिरताच सुशीलेने घागरीचे तोंड चोळीने बांधून टाकले. दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या आईला ते वायन दिले. तिच्या आईला घागरीत मेलेल्या किंवा जिवंत नागाऐवजी सोन्याचा नाग सापडला नि शिव दीर्घायुषी झाला!

म्हणून आपल्या नवऱ्याला पुष्कळ आयुष्य मिळण्यासाठी बायका हे व्रत करतात. आणि सुशीलेच्या श्रद्धेमुळे हा जो चमत्कार घडला त्याची आठवण म्हणून आईला एक घागर, खण व सोन्याचा नागही देतात.

*निवेदन : डॉ. त्रि. ना. धर्माधिकारी*

## मङ्गलागौरीपूजाविधिः कथा च ।।

अथ मङ्गलागौरीव्रतम् । तच्च विवाहानन्तरं पञ्चवर्षं श्रावणस्थ-भौमवारेषु स्त्रीभिः कार्यम् ।

तत्र विधिः । श्रावणमाहात्म्ये ।

विवाहानन्तरं चाद्ये श्रावणे शुक्लपक्षके ।
प्रथमं भौमवारस्य व्रतमेतत् तु कारयेत् ।।
पुष्पमण्डपिका कार्या कदलीस्तम्भमण्डिता ।
नानाविधैः फलैश्चैवपट्टकूलैश्च भूषयेत् ।।
तत्र संस्थापयेद्देव्याः प्रतिमां स्वर्णनिर्मिताम् ।
अन्यधातुमयीं वाऽपि स्वशक्त्या तत्र पूजयेत् ।।
उपचारैः षोडशभिर्मङ्गलागौरिसंज्ञिताम् ।
दूर्वादलैः षोडशभिरपामार्गदलैस्तथा ।।
तावत्संख्यैस्तण्डुलैश्च चणकानां शकलैस्तथा ।
षोडशोन्मितवर्तिभिस्तावद्दीपांश्च दीपयेत् ।।
दध्योदनं च नैवेद्यं तत्र भक्त्या प्रकल्पयेत् ।
समीपं स्थापयेद्देव्या दृषदं चोपलं तथा ।
एवं कृत्वा तु पञ्चाब्दं तत उद्यापनं चरेत् ।
मात्रे दद्याद्वायनं तु प्रकारं शृणु तस्य च ।
प्रतिमा मङ्गलागौर्याः सुवर्णपलनिर्मिताम् ।
तदर्धेन तदर्धेन शक्त्या वाऽप्यथ कारयेत् ।
तण्डुलैः पूरिते भाण्डे शक्त्या स्वर्णादिनिर्मिते ।
संस्थाप्य परिधानीयं रमणीयां च कञ्चुकीम् ।
तयोरुपरि देव्यास्तु प्रतिमां स्थापयेत् ततः ।
समीपभागे संस्थाप्य दृषदं चोपलं तथा ।।

रौप्येण निर्मितं मात्रे एवं दद्यात् तु वायनम् ।
षोडशाऽपि सुवासिन्यो भोजनीयाः प्रयत्नतः ।
एवं कृते व्रते विप्र सौभाग्यं सप्तजन्मसु ।
पुत्रपौत्रादिभिश्चैव रमते संपदा युता ॥

**अथ पूजाविधिः –**

अद्येत्यादिदेशकालौ संकीर्त्य मम पुत्रपौत्रादिवृद्धये अवैधव्यायुरादिसकल-सिद्धिद्वारा श्रीशिवमंगलागौरीप्रीत्यर्थं पञ्चवर्षपर्यन्तं मङ्गलागौरीव्रतं करिष्ये । तदङ्गत्वेन गणपतिपूजनं च करिष्ये ।

**ध्यानम् –**

कुङ्कुमागरुलिप्ताङ्गां सर्वाभरणभूषिताम् ।
नीलकण्ठप्रियां गौरीं वन्देऽहं मङ्गलाह्वयाम् ॥

**आवाहनम् –**

अत्रागच्छ महादेवि सर्वलोकसुखप्रदे ।
यावद्व्रतमहं कुर्वे पुत्रपौत्रादिवृद्धये ॥

**आसनम् –**

रौप्येण चासनं दिव्यं रत्नमाणिक्यशोभितम् ।
मयानीतं गृहाण त्वं गौरि कामारिवल्लभे ॥

**पाद्यम् –**

गन्धपुष्पाक्षतैर्युक्तमर्घ्यं संपादितं मया ।
गृहाण मङ्गले गौरि सर्वान् कामाँश्च पूरय ॥

**अर्घ्यम् –**

गन्धपुष्पाक्षतैर्युक्तमर्घ्यं संपादितं मया ।
गृहाण पुत्रपौत्रादीन् प्रसन्ना भव सर्वदा ॥

**आचमनम् –**

कामारिवल्लभे देवि कुर्वाचमनमम्बिके ।
निरंतरमहं वंदे चरणौ तव पार्वति ॥

**पञ्चामृतम् –**

पयो दधि घृतं चैव मधु शर्करया समम् ।
पञ्चामृतेन स्नपनात् प्रीयतां परमेश्वरी ॥

**स्नानम् –**

जाह्नवीतोयमानीतं शुभं कर्पूरसंयुतम् ।
स्नापयामि सुरश्रेष्ठे त्वां पुत्रादिफलप्रदाम् ॥

**वस्त्रम् –**

वस्त्रं च सोमदैवत्यं लज्जायास्तु निवारणम् ।
मया निवेदितं भक्त्या गृहाण परमेश्वरि ॥

**कञ्चुकीवस्त्रम् –**

कञ्चुकीमुपवस्त्रं च नानारत्नैः समन्वितम् ।
गृहाण त्वं मया दत्तं पार्वति जगदीश्वरि ॥

**गन्धम् –**

कुङ्कुमागरुकर्पूरचंदनं कस्तुरीं तथा ।
विलेपनं महादेवि गंधं दास्यामि भक्तितः ॥

**अक्षतान् –**

रञ्जिताः कुंकुमौघेन अक्षताश्चातिशोभनाः ।
ममैषां देवि दानेन प्रसन्ना भव पार्वति ॥

**सौभाग्यद्रव्याणि –**

हरिद्रा कुंकुमं चैव सिन्दूरं कज्जलान्वितम् ।
सौभाग्यद्रव्यसंयुक्तं गृहाण परमेश्वरि ॥

**पुष्पाणि –**

सेवंतिका–बकुल–चंपक–पाटलाब्जैः
पुन्नागजातिकरवीररसालपुष्पैः ।
बिल्व–प्रवाल–तुलसीदल–मालतीभिस्त्वां
पूजयामि जगदीश्वरि मे प्रसीद ॥

**पत्रपूजा –**

अपामार्गस्य पत्रैश्च दूर्वाधत्तूरसंज्ञकै ।
षोडशैर्दूर्वसंख्याकैर्बिल्वपत्रादि पञ्च च ॥

**अथाङ्गपूजा –**

उमायै नमः पादौ पूजयामि । गौर्यै नमः जङ्घे पूजयामि ।
पार्वत्यै नमः जानुनी पूजयामि । जगद्धात्र्यै नमः ऊरू पूजयामि ।
जगत्प्रतिष्ठायै नमः कटी पूजयामि । शान्तिरूपिण्यै नमः नाभिं पूजयामि ।
देव्यै नमः उदरं पूजयामि । लोकवन्द्यै नमः स्तनौ पूजयामि ।
काल्यै नमः कण्ठं पूजयामि । शिवायै नमः मुखं पूजयामि ।
भवान्यै नमः नेत्रे पूजयामि । रुद्राण्यै नमः कर्णौ पूजयामि ।
महादेव्यै नमः ललाटं पूजयामि । मंगलदात्र्यै नमः शिरः पूजयामि ।
पुत्रदायिन्यै नमः सर्वाङ्ग पूजयामि ॥

**धूपम् –**

देवद्रुमरसोद्भूतो कृष्णागरुसमन्वितः ।
आघ्रेयः सर्वदेवानां धूपोऽयं प्रतिगृह्यताम् ॥

**दीपम् –**

त्वं ज्योतिः सर्वदेवानां तेजसां तेज उत्तमम् ।
आत्मज्योतिः परंधाम दीपोऽयं प्रतिगृह्यताम् ।।

**नैवेद्यम् –**

अन्नं चतुर्विधं स्वादु रसैः षड्भिः समन्वितम् ।
भक्ष्यभोज्यसमायुक्तं नैवेद्यं प्रतिगृह्यताम् ।।

**भूषणम् –**

वज्रमाणिक्यवैडूर्यमुक्ताविद्रुममंडितम् ।
पुष्परागससमायुक्तं भूषणं प्रतिगृह्यताम् ।।

**नीराजनम् –**

नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः ।
नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम् ।।
प्रदक्षिणाः । नमस्कारान् ।

**प्रार्थना –**

पुत्रान् देहि धनं देहि सौभाग्यं देहि मंगले ।
अन्याँश्च सर्वकामांश्च देहि देवि नमोऽस्तुते ।।
ततो वैष्णवपात्रे तु सौभाग्यद्रव्यमाक्षिपेत् ।
अन्नं कञ्चुकिसंयुक्तं सवस्त्रं फलदक्षिणम् ।।

**वायनम् –**

वायनं गौरि विप्राय ददामि प्रीतये तव ।
सौभाग्यारोग्यकामानां सर्वसंपत्समृद्धये ।
गौरी गिरीशतुष्टयर्थं वायनं ते ददाम्यहम् ।।
इति मंत्राभ्यां वायनम् ।
ताम्रे वा वैणवे पात्रे सौभाग्यद्रव्यमाक्षिपेत् ।
लड्डुकञ्चुकिसंयुक्तं सवस्त्रफलदक्षिणम् ।।

मात्रे सुवासिनीभ्यश्च देयं वायनमुत्तमम् ।
जननीं मातृसंबंधिस्त्रियः षोडश भोजयेत् ।।

नीराञ्जनं ततः कुर्याद्दीपैः षोडशसंख्यकैः ।
भोक्तव्या दीपकाश्चाथ स्त्रीभिः सह स्वयं ततः ।
अन्नं लवणवर्जं तु मौनेन भोजयेत् स्वयम् ।।

सुवासिनीश्चापि तथा वस्त्रालंकारभूषणैः ।
पूजयेच्च ततः पश्चात् कुर्याद्गौरीविसर्जनम् ।।

विप्राय प्रतिमा देया रत्नवस्त्राणि भूरिशः ।
एवं कृते विधानेऽस्मिन्नार्यवैधव्यमाप्नुयात् ।।

इति मंगलागौरीपूजाविधिः ।।

अथ कथा ।। युधिष्ठिर उवाच । नंदनंदन गोविंद श्रृण्वतो बहुलाः कथाः । श्रुता, उत्कृष्टपुत्रायुष्करं श्रावय मे व्रतम् ।। श्रीकृष्ण उवाच । अवैधव्यकरं वक्ष्ये व्रतं चारिनिषूदन । श्रृणु त्वं सावधानः सन्कथां वक्ष्ये पुरातनीम् ।। कुंडिनं नाम नगरं ख्यातस्तत्र द्विजप्रियः । आसीद्वणिग्धर्मपालो नाम्ना बहुधनोपि सः । सपत्नीको ह्यपुत्रोऽसौ नास्तीति व्याकुलो हृदि । तस्य गेहे भस्मलिप्तो देहे रुद्राक्षधारकः ।। जटिलो भिक्षुको नित्यमागच्छन्प्रियदर्शनः । न स्वीकुर्वत्योदनं स इति दृष्ट्वाऽबलाऽवदत् । स्वामिन्नयं सदाऽऽयाति भिक्षुको जटिलो गृहे । न स्वीकरोत्यस्मदन्नमिति दृष्ट्वा ममाधिकम् ।। दुःखं प्रजायते नित्यं, श्रुत्वा भार्यां वचोऽब्रवीत् ।। धर्मपाल उवाच । प्रिये कदाचिद्गुप्ता त्वं ससुवर्णांगणे भव । यदा भिक्षार्थमायाति भिक्षोर्वस्त्रान्तरे त्वया ।। तदा तस्य प्रदेयानि सुवर्णानि प्रियेऽनघे । अनंतरं तस्य भार्याऽचीकरत्स्वामिनोदितम् ।। जटिलेन तु सा शप्तापत्यं ते न भविष्यति । श्रुत्वा भिक्षोरिदं वाक्यं दुःखिता तमुवाच ह ।। स्वामिन् शप्ता त्वया पापाच्छापादुद्धर संप्रति । इत्युक्त्वा तस्य चरणौ ववंदे दीनभाषिणी ।। जटिल उवाच । भर्त्तुः समीपे वक्तव्यं त्वया पुत्रि ममाज्ञया । नीलवस्त्रः समारुह्य नीलाश्वं गच्छ काननम् ।। रम्यं पक्षिभिरायुक्तं मृगसंघद्रुमाकुलम् । खननं तत्र कर्तव्यं यत्राश्वस्ते स्खलिष्यति ।। सुवर्णरचितं रत्नमाणिक्यादिविभूषितम् । नानापुष्पैः समायुक्तं

दृष्यं देवालयं ततः ॥ वर्तते तत्रभवती भवानी भक्तवत्सला । आराधयत्व
मनसा यथाविध्युद्धरिष्यति । त्वां भवानीति, वचनं श्रुत्वा भिक्षोः सुखप्रदम्
ववंदे तस्य चरणौ पुनः पुनरुवाच ह । तदैव काले जटिलो स्वंतर्भूतो वभूव
सः । साऽवदत्पतिमत्रेहि शृणु भिक्षूक्तमादरात् । यथोक्तमवदत् भर्ता तच्छ्रुत्वा
वाक्यमब्रवीत् ॥ नीलवस्त्रः समारुह्य नीलाश्वं प्रस्थितो वनम् । गच्छन्
नानाविधान् वृक्षान् पथि पश्यन्भयाकुलः । मृगान् सिंहान् दंदशूकान् पथि
पश्यन्भयाकुलः । ददर्शासौ तडागं च बाहुल्येन विराजितम् । रक्तनीलोत्प-
लैश्चक्रवाकद्वंद्वैश्च राजितम् ॥ स्नानं चकार तत्रासौ तर्पणाद्यपि भूरिशः
पुनरश्वं समारुह्य जगाम गहनं वनम् ॥ स्खलितं वाजिनं पश्यन्नश्वादुत्तीर्य एव
च । चखान पृथिवीं तत्र यावद्देवालयं गतः । ददर्श च महास्थूलं देवालयमसौ
ततः । रत्नैर्मुक्ताफलैश्चैव माणिक्यैश्चापि सर्वतः ॥ पूजयामास जटिलवाक्य
स्मृत्वाऽनिविस्मिताः । सुवर्णयुक्त-वस्त्राणि चन्दनान्यक्षताञ्छुभान् ॥ चंपकादीनि
पुष्पाणि धूपदीपौ विशेषतः । नानापक्वान्नसंयुक्तं रसैः षड्भिः समन्वितम् ।
नानाशाकैः समाक्रांतं सदुग्धघृतशर्करम् । नैवेद्यं करशुद्ध्यर्थं चन्दनं
मलयाद्रिजम् । संपाद्य तुष्टहृदयः फलताम्बूलदक्षिणाः । जजाप मन्त्रान् गुप्तोऽसौ
सगुणध्यानपूर्वकम् ॥ देवी भक्तं तदालोक्य लोभयामास सादरम्
प्रसन्नाऽवददत्रेयं पूजा संपादिता कथम् । येन संपादिता तस्मै ददामि
वरमद्भुतम् । इति श्रुत्वा धर्मपालो देव्यग्रे प्रांजलिः स्थितः ॥ भगवत्युवाच
धर्मपाल त्वया सम्यक् पूजा संपादिताऽनघ । वरं याचय मद्भक्त ददामि
बहुलं धनम् ॥ धर्मपाल उवाच । बहुला धनसंपत्तिर्वर्तते त्वत्प्रसादतः । अपत्य
प्राप्तुमिच्छामि पितॄणां तारकं शुभम् ॥ आयाति भिक्षुको गेहे गृह्णाति न
मदन्नकम् । तेन मे बहुलं दुःखं सभार्यस्योपजायते ॥ इति दीनवचः श्रुत्वा देवी
वचनमब्रवीत् ॥ देव्युवाच । धर्मपालक तेऽदृष्टेऽपत्यं नास्ति सुखप्रदम् ।
तथापि किं याचयसि कन्यां विगतभर्तृकाम् । पुत्रमल्पायुषं वाऽथाप्यंधं दीर्घायुष
सुतम् ॥ धर्मपाल उवाच । पुत्रमल्पायुषं देहि तावता कृतकृत्यताम् । प्राप्नोमि
चोद्धरिष्यामि पितॄंश्च मम घोरगान् ॥ देव्युवाच । मत्पार्श्वे वर्तमानस्य
नाभावारुह्य शुंडिनः । तत्पार्श्ववर्तिचूतस्य गृहीत्वा फलमद्भुतम् ॥ पत्न्यै देय
ततः पुत्रो भविष्यति न संशयः । इति देवीवचः श्रुत्वा गत्वा तत्पार्श्वं एव च ।

नाभिं गजमुखस्याथारुह्य जग्राह मोहत । फलान्युत्तीर्य च ततः फलमेकं ददर्श सः ॥ एवं पुनः पुनः कुर्वन् फलमेकं ददर्श सः । क्षुब्धो गणपतिश्चाथ धर्मपालं स शप्तवान् ॥ षोडशे वत्सरे प्राप्ते अहिः पुत्रं दशिष्यति । धर्मपालः फलं सम्यग्वस्त्रे बध्वाऽगमद्गृहम् ॥ फलं पत्न्यै ददौ सऽपि भक्षयित्वा पतिव्रता । गर्भं सा धारयामास पत्या सह सुसंगता । संपूर्णे नवमे मासे प्रासूत सुतमुत्तमम् । जातकर्म चकारास्य पिता संतुष्टमानसः ॥ षष्ठीपूजां चकारास्य षष्ठे तु दिवसे ततः । द्वादशेऽहनि संप्राप्ते शिवनाम्नाऽऽजुहाव तम् ॥ षष्ठे मासि चकारासावन्नप्राशनमद्भुतम् । तृतीये वत्सरे चूडामष्टमेऽब्दे ह्यनुत्तमम् । कृत्वोपनयनं पार्थ विप्रोऽभूत्तुष्टमानसः । दशमे वत्सरे प्राप्तेऽब्रवीद्भार्या पतिव्रता ॥ भार्या उवाच । बालकस्य विवाहोऽपि कर्तव्यः सुमुहूर्तके ॥ धर्मपाल उवाच । मया संकल्पितं काश्यां गमनं बालकस्य तत् । कृत्वा समायातु ततो विवाहोऽस्य भविष्यति । पुत्रोसौ प्रेषितस्तेन शालकेन समन्वितः ॥ वाराणस्यां प्रस्थितोऽसौ गृहीत्वा वहुलं धनम् । कुर्वन्तौ पथि सद्धर्मं प्रतिष्ठापुरमीयतुः क्रीडन्त्यः कन्यका दृष्टास्तत्र देशे मनोरमे । तासां समाजे गौरांगी सुशीला नाम कन्यका ॥ तया सह सखी काचिच्चकार कलहं भृशम् । गालनं च ददौ तस्यै रंडेऽभाग्ये मुहुर्मुहुः ॥ सुशीलोवाच । सखि त्वया गालनं मे व्यर्थं दत्तं शुभानने । जनन्या मे मानवत्याश्चास्ति गौरीव्रतं शुभम् ॥ तस्य प्रसादात् सकलाः संबंधिन्यः प्रियाः स्त्रियः । आजन्माविधवा जाताः किं पुनः कन्यका ध्रुवम् । वक्ष्ये तस्य प्रभावं किं व्रतराजस्य भामिनि पूजने धूपदीपोऽयं यत्र तत्र सुखं भवेत् ॥ इति श्रुत्वा ततो वाक्यं विस्मयोत्फुल्ललोचनः । मातुलश्चिन्तयामास बालकस्य प्रियं ततः । शतंजीवो भवेदेष एतद्धस्ताक्षता यदि । पतंत्यमुष्य शिरसि इति भाव्य पुनःपुनः ॥ सुशीलामेव पश्यन्स विस्मयोत्फुल्ललोचनः । सुशीला प्रस्थिता गेहे तदनुप्रस्थितावुभौ ॥ स्वगृहं प्राप गौरांगी निकटे तद्गृहस्य तौ । सतडागे रम्यदेशे वासं चक्रतुरादरात् ॥ विवाहकाले संप्राप्ते सुशीलाजनको हरिः । विवाहोद्योगवान् जातोऽयोजयच्च हरं वरम् । असमर्थं हरं दृष्ट्वा तन्मातापितरावुभौ । ययाचतुः शिवं वद्ध्वाजली विनययुक्तकौ । वरपितरावूचतुः । उपस्थितो विवाहो नौ पुत्रस्य शुभया हरेः । सुशीलया कन्ययाऽयमसमर्थश्च दृश्यते ॥ अतो देयः शिवः श्रीमाँल्लग्नकाले

त्वया विभो । लग्नं भविष्यति ततो देयोऽस्माभिः शिवस्तव ।। मातुल उवाच । अवश्यं लग्नकालेऽसौ शिवो ग्राह्यः प्रियंवदः । ततो मुहूर्ते संप्राप्ते विवाहमकरोच्छिवः । तत्रैव शयनं चक्रे ससुशीलः प्रियंवदः ।। स्वप्ने सा मंगला गौरी मातृरूपेण भास्वता । सुशीलामवदत्साध्वी हितं वचनमेव च ।। गौर्युवाच । सुशीले तव गौरांगि भर्तुर्दंशार्थमागतः । महान्भुजंग उत्तिष्ठ दुग्धं स्थापय तत्पुरः । घटं च स्थापयाशु त्वं तन्मध्ये स गमिष्यति । कूर्पासमंगान्निष्कास्य बंधनीयस्त्वया घटः ।। प्रातरुत्थाय देहि त्वं मात्रे वायनकं शुभम् । इति गौरीवचः श्रुत्वा सुशीला क्षणमुत्थिता ।। ददर्शाग्रे निःश्वसंतं कृष्णसर्पं महाभयम् । ततश्चकार गौर्युक्तं प्रवृत्ता निद्रितुं ततः । उवाच वर आसन्नो क्षुल्लग्ना महती मम । भक्षणायाशु देहि त्वं लड्डुकादिकमुत्तमम् । श्रुत्वेति वाक्यं पात्रे सा ददौ लड्डुकमुत्तमम् ।। भक्षयित्वा शिवं हैमे तस्मिन् पात्रेऽङ्गुलीयकम् । दत्त्वा तत्स्थापयामास स्थले गुप्ते शुभाननः । सुखेन शयनं चक्रे पृथिव्यां सर्वकोविदः ।। ततः प्रभातसमये शिव आगाद्गृहम् स्वकम् । स्नानशुद्धा सुशीला सा मात्रे वायनकं ददौ ।। माता ददर्श तन्मध्ये मुक्ताहारमनुत्तमम् । ददौ प्रियायै कन्यायै सहसा तुष्टमानसा । क्रीडाकाले सुसंप्राप्ते हर आगात् तु मंडपे । आदेशयत् सुशीलां तां क्रीडार्थं जननी ततः ।। सुशीलोवाच । नायं वरो मे जननि येन पाणिग्रहः कृतः । अनेन सह मनसा क्रीडनेच्छा तथा न मे ।। इति श्रुत्वा समाक्रांतौ चिंतया पितरौ ततः । अन्नदानमुपायं च विरचेतुरिति द्रुतम् ।। तदारभ्य चक्रतुस्तौ पुराणोक्तविधानतः । सुशीला पादयोश्चक्रे क्षालनं मुद्रिकान्विता । जलधारां ददौ माता चंदनं पुत्रको हरेः । हरिर्ददौ च ताम्बूलं बुभुजुस्तत्र मानवाः ।। इतिरीत्यान्नदानं तत्प्रवृत्तं भिक्षुसौख्यदम् । तावुभौ प्रास्थितौ काश्यां प्राप्तौ काशीं सुखप्रदाम् ।। निर्मलांभसि गंगायाः स्नानं चक्रतुरादरात् । स्वर्गद्वारं प्रस्थितौ तौ कुर्वंतौ धर्ममुत्तमम् ।। पीतांबराणि ददतुर्भिक्षुकाणां गृहे गृहे । आशिषश्च ददुस्तस्मै चिरंजीवी भवेदिति ।। विश्वेश्वरं समायातौ नत्वा स्तुत्वा पुनः पुनः । स्वयं गृहं प्रस्थितौ तौ शिवो मार्गेऽब्रवीदिदम् ।। शिव उवाच । काये मे

किंचिदस्वास्थ्यं मातुल प्रतिभाति हि । ततः प्राणोत्क्रमे तस्य यमदूता उपस्थिताः । मंगलागौरिका चापि तेषां युद्धमभून्महत् । जित्वा तान् मंगला प्राणान् ददौ तस्मै शिवाय च ॥ शिवोऽकस्मादुत्थितोऽसौ मातुलं प्रत्युवाच ह । स्वप्ने युद्धं मया दृष्टं मंगला-यमभृत्ययोः । जितास्ते मंगलागौर्या ततोऽहं शयनच्युतः ॥ मातुल उवाच । यज्जातं शिव तज्जातं न स्मर्तव्यं त्वया पुनः । गच्छाव आवां नगरे पितरौ द्रष्टुमुत्सुकौ । प्रस्थितौ तौ ततस्तस्मात् प्रतिष्ठापुरमापतुः । रम्ये तडागे तत्रैतौ पाकारंभं विचक्रतुः । दृष्टौ तौ हरिदासीभिर्धैर्योदार्यधरौ शुभौ ॥ दास्य ऊचुः । अन्नदानं हरेर्गेहे प्रवृत्तं तत्र गम्यताम् ॥ उभावूचतुः । भो दास्यो यात्रिकावावां गच्छावो न क्वचिद्गृहे । इति श्रुत्वा तयोर्वाक्यं दास्यो जग्मुः स्वकं गृहम् ॥ स्वस्वामिनिकटे वाक्यमवदन् सादरं तदा । सर्वं दासीवचः श्रुत्वा तदर्थं प्रभुरादरात् । प्रेषयाभास हस्त्यादिरत्नवस्त्राणि भूरिशः ॥ तद्दृष्ट्वा विस्मितौ तौ च जग्मतुश्च हरेर्गृहम् । हरिर्मातुलमभ्यर्च्य शिवं पूजितुमागतः । क्षालयंती च सा कन्या चरणौ तस्य सत्रपा । अभूद्वरो मेऽयमिति जननीं प्रत्युवाच ह । हरिः पप्रच्छ साश्चर्यं शिवं मंगलदर्शनम् ॥ हरिरुवाच । किंचिच्चिह्नं तवास्त्यत्र ब्रूहि मे वरदर्शने ॥ शिव उवाच । ममेदं चिह्नमस्तीह इत्युक्त्वा गृहमागतः । तत आनीय तत्पात्र दर्शयामास सादरम् । तत्पात्रं च हरिर्दृष्ट्वा कन्यादानं चकार सः । ददौ रत्नानि वस्त्राणि सुवर्णानि बहून्यपि । तामादाय प्रस्थितौ तौ ददतो बहुलं धनम् । श्रावणे मासि संप्राप्ते व्रतं भौमे चकार सा । भुक्त्वा सर्वे प्रस्थितास्ते योजनं जग्मुरुत्तमाः ॥ सुशीलोवाच । गौरीविसर्जनं चापि दीपमानं विशेषतः । कृत्वा गंतव्यमस्माभिः पितरौ द्रष्टुमादरात् ॥ इत्युक्त्वा आगता यत्र गौर्या आवाहनं कृतम् । ददृशुस्तत्र सौवर्णं देवालयमनुत्तमम् ॥ गौरीविसर्जनं दीपमानं सा च व्यचीकरत् । ततः सर्वे प्रस्थितास्ते पितरौ द्रष्टुमुत्सुकाः । कुंडिनासन्नदेशे तान् दृष्ट्वा विस्मयिनो जनाः । अब्रुवंस्ते धर्मपालं सोत्कण्ठं प्रियदर्शनाः ॥ जना ऊचुः । धर्मपालाद्य ते पुत्रं सभार्यं शालकं तथा । समायातं वयं दृष्ट्वा

अधुनैव समागताः । यावज्जना वदंतीत्थं तावत्सोपि समागतः । नमस्कारां-श्चकारासौ पितृभ्यां पितृवल्लभः ।। मातुलोऽपि नतिं चक्रे भगिनीधर्मपालयोः । सुशीला श्वशुरायापि श्वश्रूं नत्वा स्थिता तदा ।। श्वश्रूरुवाच । सुशीले तद्व्रतं ब्रूहि यद्व्रतस्य प्रभावतः । आयुर्वृद्धिः शिशोर्मे हि जाता कमललोचने ।। सुशीलोवाच । न जानेहं व्रतं श्वश्रु जाने मानवती हरौ । श्वशुरं धर्मपालं च श्वश्रूं च भवतीं तथा । मंगलां देवतां जाने वरं तु युवयोः सुतम् । इत्युक्त्वा च सुशीला सा बुभुजे स्वांतर्हर्षिता ।। कृष्ण उवाच । तस्माद्व्रतमिदं धर्मस्त्रीभि कार्यं सदैव तु ।। युधिष्ठिर उवाच । फलमस्य श्रुतं कृष्ण विधानं ब्रूहि केशव । कृष्ण उवाच । श्रावणे मासि भौमेषु चर्तुर्षु व्रतमाचरेत् । प्रातरुत्थाय सुस्नाता संकल्प्य व्रतममुत्तमम् ।। उपचारैः षोडशभिः पूजयेन्मंगलां तथा ।। युधिष्ठिर उवाच । उद्यापनविधिं ब्रूहि व्रतराजस्य केशव । यतो निरुद्यापनकं व्रतं निष्फलमुच्यते ।। कृष्ण उवाच । वदामि व्रतराजस्य स्त्रीणां कर्तव्यमुत्तमम् । प्रथमे वत्सरे मातुर्गेहे कर्तव्यमेव च ।। ततो भर्तृगृहे कार्यमवश्यं स्त्रीभिरा-दरात् । पंचमे वत्सरे प्राप्ते कुर्यादुद्यापनं शुभम् । श्रावणे मासि भौमेषु ह्युद्यापनविधिं चरेत् । प्रातरुत्थाय सुस्नाता संकल्प्योद्यापनं ततः ।। आचार्यं वरयेत्तत्र वेदवेदांगपारगम् । चतुस्तंभं चतुर्द्वारं कदलीस्तंभमंडितम् । घण्टिकाचामरयुतं कारयेन्मंडपं शुभम् । मध्ये वितानं बध्नीयात् पंचवर्णै-रलंकृतम् । तन्मध्ये स्थापयेत् पीठं दृषदमुपलं तथा ।। रौप्येण कारयेत्पीठं दंडः कांचननिर्मितः । रौप्यहेम्नोरभावे तु पाषाणस्य विधीयते ।। पीठोपरि न्यसेद्देवीं ततोग्रे दृषदं तथा । तस्याग्रे लिंगतोभद्रं लिखेद्रंगैश्च पंचभिः ।। हरिद्रापिष्टकं कृत्वा तन्मध्येऽष्टदलं लिखेत् । तस्योपरि न्यसेद्व्रीहीन् द्रोणेन परिसंमितान् । सौवर्णं राजतं ताम्रं कलशं विन्यसेद्बुधः । पञ्चरत्नानि निक्षिप्य सर्वौषधि-समन्वितम् तस्योपरि न्यसेत्पात्रं ताम्रं वा वैणवं तथा । उमामहेश्वरीं मूर्ति कांचनेन विनिर्मिताम् । तस्योपरि न्यसेद्राजन् पूजयेत् शिवमंगलाम् । गृहा वै इति मंत्रेण मूर्ति पीठोपरि न्यसेत् । तदस्तु मित्रावरुण इत्यावाहनमाचरेत् । गौरी-र्मिमाय मंत्रेण पूजयेन्मंगळां पराम् । गोधूमोद्भवपिष्टेन कारयेद्दीपमुत्तमम् ।। कृत्वा प्रज्वलितो दीपो घृतवर्तिसमन्वितः । उपचारैः षोडशभिर्गंधपुष्पादि-भिस्तथा । पत्रैः पुष्पैः षोडशभिः नानाजातैश्च जीरकैः । तण्डुलैर्धान्यकैश्चैव

स्वच्छैः षोडशसंख्यकैः । अपामार्गस्य पत्रैश्च दूर्वाधत्तूरपत्रकैः । सर्वैः षोडशसंख्याकैर्बिल्वपत्रैश्च पंचभिः । नीराजनं ततः कुर्याद्दीपैः षोडशसंख्यया ।। मात्रे सुवासिनीभ्यश्च देयं वायनमुत्तमम् । भोक्तव्या दीपकाश्चापि अन्नं लवणवर्जितम् । विसर्जनं मंगलाया दीपमालं ततः क्रमात् । पंच संवत्सरेष्वेवं कर्तव्यं पतिमिच्छुभिः ।

इति भ. मंगलागौरीव्रतोद्यापनं संपूर्णम् ।

# श्रावणातील उत्सव पूजा

श्रावण मासातील पहिल्या मंगळवारी ज्या घरी उत्सव व्हायचा, पूजा व्हायची, त्या घरी गल्ली बोळातील पोरीसोरी गोळा होतात. तिथं चालणाऱ्या सात दिवसांच्या उत्सवात मोठ्या आनंदानं भाग घेतात. अशा वेळी विदर्भात अशी चालरीत आहे की, या घरच्या पसरट अशा मोठ्या भांड्यात नदीवरची वाळू भरून आणायची, त्यावर रंगीत फुलांच्या पाकळ्यांची सुंदर रांगोळी सजवायची, तिलाच शंकर पार्वतीचं प्रतिक मानायचं न् तिचीच पूजा बांधायची. त्यासाठी एक दिवस अगोदर एक मुखरीण-मुलगी-घरोघरी जाऊन या उत्सव पूजेला येण्यासाठी निमंत्रण करीत असते.

या पूजेच्या वेळी सर्वजणी–

**खण खण कुदळी मण मण माती**<br>
**देऊळ खचलं मध्यान राती**<br>
**चांदण्या रातीचे माणीक मोती**<br>
**घाल घाल गवराई आपुल्या नाकी**

असली छान छान लोकगीतं म्हणतात. फुगडी झिम्म्यासारखे खेळ खेळून सगळं वातावरण प्रसन्न व वाजतं गाजतं ठेवतात. पाचव्या दिवशी या देवदेवतांचं वाजत गाजत विसर्जन करण्यात येतं. नवस सायास फेडले जातात. सत्य-नारायण होतो. उद्यापन केलं जातं. मुखरीणीला आहेर होतो. मग त्या घरी सुख नांदतं ! आनंदी आनंद होतो असं मानलं जातं. या उत्सवात हौसमौजेला उधाण येतं आणि ही महादेवीची पूजा मनसोक्त अशी पार पडते.

# विदर्भातील एक कलात्मक उत्सव

संग्राहक : श्री. टी. जी. देशमुख

श्रावण महिना आपल्याबरोबर अनेक सण घेऊन येतो. व्रतवैकल्यांची सांगता होते. अनेक खेळ खेळले जातात. घरोघर प्रत्येक वाराच्या कहाण्या सांगण्यात येतात. आणि ऐकल्या जातात. नवविवाहित तरूण मुली पहिली पाच वर्षे दर वर्षी येणाऱ्या श्रावण महिन्यातील प्रत्येक मंगळवारी मंगळागौरीची पूजा बांधतात. श्रावण, भाद्रपद आणि आश्विन हे तीन महिने म्हणजे अनेक सणवार उत्सव आणि आनंदाची लयलूट.

भराडी गौर हा विदर्भातील मुली आणि महिला यांचा अत्यंत कलात्मक असा सामाजिक उत्सव. त्यात कलात्मक पद्धतीने शंकर-पार्वती, महादेव आणि गौर यांची फुलांनी पूजा बांधण्यात येते. गाव लहान असेल, तर त्या गावच्या सर्वच मुली आणि महिला एकत्र येऊन त्यात भाग घेतात. गाव मोठे असेल, तर एकेका गल्लीतील मुली एकत्र येऊन हा उत्सव साजरा करतात. या उत्सवात जागरण करण्यात येते. फुगडी, झिम्मा, पिंगा आदि खेळ खेळण्यात मुली दंग असतात. वडीलधाऱ्या स्त्रिया, सुवासिनी, आपले प्रौढत्व विसरून त्यात भाग घेतात आणि उत्सव संपेपर्यंत उत्साहाला उधाण येते.

हा उत्सव श्रावणाच्या सुरुवातीपासून तीन आठवडे किंवा श्रावणी पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवसापर्यंत साजरा करतात. त्या गावातील किंवा गल्लीमधील एखाद्या प्रमुख बड्या कुटुंबातील मुलीच्या घरी गौर बसविण्यात येते. आदले दिवशी ती सर्व मुलींना निमंत्रण देते. दुसरे दिवशी सर्व मुली व स्त्रिया मिळून गाणी म्हणत नदीवर जातात. नदी नसेल तर तलाव किंवा विहिरीवर जाऊन वाळू काढून किंवा घेऊन तिचा महादेव करतात. "खडक फोडू, माती काढू,

निघा निघा गवराई" असे पाच वेळा म्हणण्यात येते, नदीतून वाळू काढताना जी गाणी म्हणण्यात येतात, त्यापैकी एक असे :-

खण खण कुदळी मण मण माती
देऊळ खचलं चांदण्या रात्री
चांदण्या रातचे माणिकमोती
घाल घाल गवराई आपुल्या नाकी
घालता घालता मोडली दांडी
त्याची केली उपर माडी
उपर माडीवर उभा राहे
गवराई आपले माहेर पाहे
गवराईचे माहेर दिसेना
शंकर काही पुसेना
शंकराने पुसले
गवराईचे माहेर दिसले

वाळूने शंकरपार्वतीचा जोडा काढतात. काही ठिकाणी हळदीचाही महादेव करतात व तो मोठ्या परडीवर थाटामाटाने मिरवत त्या प्रमुख मुलीच्या घरी आणतात. इतरांना निमंत्रण देणाऱ्या या प्रमुख मुलीस मुखरीन म्हण-तात व अशा प्रकारे गौर बसते.

**परड्यांचा जोडा :-**

गौर बसविलेल्या परडीवर इतर मुली आपल्या परड्याचा जोडा फुलांनी गुंफून एकावर एक टाकतात. परड्यांचा जोडा गुंफण्याचा प्रकार अत्यंत कलात्मक आहे. एका परडीवर जाईजुईच्या किंवा निरनिराळ्या फुलांच्या वेगवेगळ्या रांगोळ्या-झेला, कासव, रामलक्ष्मणाची चित्रे किंवा आकृत्या काढतात. त्यांना वेगवेगळ्या रंगांच्या फुलांचे फेर दिलेले असतात. त्यामुळे

आकृत्यांच्या अथवा रांगोळ्यांच्या आकर्षणात भर पडते. या फुलांच्या रांगोळ्यावर लाल भोपळ्याच्या वेलाचे मोठे पान झाकून त्यावर दुसरी परडी झाकतात व झाकलेल्या परडीसह, ती रांगोळी काढलेली परडी उपडी करण्यात येते. त्यामुळे फुलांची रांगोळी किंवा आकृती अलगद भोपळ्याच्या पानावर उतरते. त्या रांगोळीसह भोपळ्याचे पान पूजा बांधलेल्या परडीवर ठेवण्यात येते. या प्रसंगी म्हणावयाची गाणी अशी: –

ताडावरी ताड
गवराई चढूच लागल्या
तिकडून आले शंकर
त्यानी पदर धरिला बाई पदर धरिला
सोडा सोडा शंकरजी
जाऊ द्या माहेरा जाऊ द्या माहेरा
मायबाईचे तोडे
मला आणू द्या ल्यायला

(अशा प्रकारे सर्व दागिणे गुंफून होईपर्यंत हे गाणे चालते.)

अशा रीतीने परड्यावर परड्या टाकण्यात येतात. अनेक मुली आपापल्या फुलांच्या रांगोळ्या टाकत जातात व ती चळत वाढत जाऊन त्याला महादेवाच्या पिंडीसारखा आकार येतो. दररोज दुपारी फुगड्या, झिम्मा, पिंगा वगैरे खेळ या मुली खेळतात. फेर धरून यावेळी म्हणावयाचे गाणे असे –

अंगणी दूध तापे
त्यावर पिवळी साय
गवराबाई लेकी
आज राहून जाय
शंकर वाट पाहे

शंकर घोड्यावरी
गवराई चाले पायी
मधून नदी वाहे
गंगा यमुना दोन
पळसा आले फूल
त्यावरी जो पाय
गवराबाई लेकी
आज राहून जाय

चार चार दिवसांनी रांगोळ्यांच्या या चळतीचे विसर्जन करण्यात येते. चार वेळा विसर्जन केल्यानंतर पाचव्या वेळी शेवटचे विसर्जन होते व हा उत्सव संपतो.

पाचव्या विसर्जनाच्या दिवशी मुखरिणीतर्फे सर्व मुलींना जेवण देण्यात येते निमंत्रित मुली मुखरिणीला आहेर करतात किंवा निरनिराळ्या वस्तू भेट देतात. विसर्जनाची, त्या मुलींची आणि उत्सवात भाग घेणाऱ्या महिलांची, नटूनसजून मिरवणूक निघते. मिरवणुकीत स्त्रियांचे निरनिराळे खेळ चालतात. या खेळात मुली आणि प्रौढ स्त्रिया भाग घेतात. त्यावेळी त्यांचा उत्साह व आनंद ओसंडू लागतो. गौर पाण्यात विसर्जन करताना म्हणावयाचे गाणे असे –

जा बाई गवराई
जा बाई गवराई
बाळ तुमचं भुकेलं भुकेलं
सोनियाच्या दांडावरी
बाळ तुमचं हलविलं हलविलं
पाटावरच्या दांडीवरी

बाळ तुमचं निजविलं निजविलं
जा बाई गवराई
बाळ तुमचं भुकेलं भुकेलं
समुद्राच्या शिंपेवरी
बाळ तुमचं पाजील पाजीलं
जा बाई गवराई जा बाई गवराई

गौर पाण्यात शिरविल्यानंतर घरोघरी पंधरा दिवस ते तीन आठवडे चालू असलेला हा उत्सव आणि जल्लोष संपतो.

# भराडी गौर

संग्राहिका : कु. नीलिमा दाणी

श्रावण महिन्यात पेरणी संपल्याने शेतकऱ्याला आपल्या कामातून सवड मिळते. व्यावहारिक प्रयत्नांना यश मिळावे ही भावना ठेवून आत्मिक शांती-साठी पावसाळ्याचे चार महिने तो ईशस्तवनात घालवतो. म्हणूनच श्रावण महिना डवरलेल्या गुलमोहरासारखा सणांनी नुसता बहरलेला असतो. विविध रंगांची उधळण करून विविध आकारांच्या पुष्पगुच्छांचे अलंकार लेऊन, निसर्ग श्रृंगारलेला असतो. कलासक्त वऱ्हाड तेव्हा जागा होतो. वऱ्हाडीगौरीच्या (अपभ्रंश "भराडी गौरीच्या") निमित्ताने–

श्रावण मासी गौर आली
मुखरीण ल्याली नवा शालू

असे म्हणत श्रावणातील पहिल्या मंगळवारी किंवा शुक्रवारी ह्या गौरीची व "गौरीहरा"ची म्हणजेच शिवलिंगाची एका परड्यावर स्थापना केली जाते. वऱ्हाड कन्यकांचा हा महत्त्वाचा सण, जिच्या घरी गौर असेल ती "मुखरीण". ह्या सणाचं वैशिष्टच म्हणजे इथपासून नवे स्नेहसंबंध बांधले जातात. जिव्हाळ्याने जुळलेली दोन "लेकीं"ची मनं कायमची जोडली जातात "सखूब्रहिणी"च्या शिक्का मोर्तबाने.

शंकरापायी माया मायची तोडीली
सखूबहिन जोडली– गंगूबाई

मुखरिणीच्या कौतुकाला आई-आजींचे हात अपुरे पडतात म्हणूनच की काय तिच्या सर्व मैत्रिणींना "आवतणं" दिलं जातं. त्यातली जी "जिवलग-मैत्रीण" ती सखूबहीण होणार. तिचंही मुखरिणीच्या बरोबरीनं कौतुक केलं

जात. जुळया बहिणीसारखं. सर्वांनी मिळून ह्या शिवलिंगाची अन् गौरीची पूजा करायची. (हे शिवलींग तयार करण्यासाठी "गौर काढणे" हा प्रकार प्रचलित आहे. एकास एक बांधलेले परडे घेऊन नदीवर अथवा तलावावर जायचं. तिथे जाऊन मुखरीण व तिची सखू दोघींनी हातात हात गुंफून तेथील माती मिळूनच उचलायची व परड्यावर ठेवायची. त्या मातीचं अथवा रेतीचं मग शिवलिंग तयार करायचं व वाजत - गाजत घरी आणायचं.) पूजा झाल्यानंतर प्रत्येक उपासिकेने "जोडे गुंफायचे." म्हणजे एक परडा घेऊन त्यावर एखादं मोठंसं पान आंथरायचं व त्यावर निरनिराळ्या फुलांच्या साह्याने रांगोळ्या अथवा चित्रं काढायची. मुलींच्या कलात्मकतेचा आविष्कार येथे घडतो. तो परडा शिवलिंगावर पालथा घालायचा. चित्रं तर न विस्कटता आलं पाहिजे. सर्वांचे परडे "पालथे" पडल्यानंतर एखादं कला प्रदर्शन भरल्याचाच भास होतो.

सासरच्या जाचात करपू पहाणारं आपल्या लेकीचं निसर्गवेडं कलासक्त व्यक्तिमत्त्व कायम ठेवण्यासाठीच ह्या सणाची निर्मिती झाली असावी. तसंच त्याला धार्मिक अधिष्ठान देऊन त्याचं महत्त्व इतरांना पटवून देण्याचा हा प्रयत्न असावा.

पूजेनंतर त्यांच्यातील बालीश वृत्ती उफाळून येतात. "मोठेपणाचे" बंध समवयस्कांच्या सहवासात शिथिल होतात. अन् मोकळ्या पाखरासारखे स्वैर स्वच्छंद खेळ सुरू होतात. फुगड्या, झिम्मा पासून तर आकाशाकडे झेपावणाऱ्या दोरीवरच्या झोपाळ्यापर्यंत उत्साहाला उधाण आलं असतं. उल्हासलेल्या मनाला नकळत काव्य स्फुरू लागतं आणि अक्षर शत्रू असलेल्या ह्या वऱ्हाडी लेकी सहज सुंदरपणे आपलं हृदगत काव्यातून व्यक्त करतात. माहेर-सासर ह्या प्रेमाच्या विचित्र ओढाताणीचं मार्मिक चित्र ती डोळ्यापुढे उभं करते ते असं–

राती दुधाचा पेला त्यावर हीरवी साय
गौराई लेकी आज राहूनी जाय
कशी राहू दादा घरी शंकर आहे
भरला गोठा वाट पाहे

तसंच :

पुडीवर पुडी रचली
एक पुडी घ्यावो गौराई चुडे ल्यावो
कशी लेऊ माय वो घरी नंदा जावा
करतील माझा हेवा
हेवा परोपरी नंदा घरोघरी

हा सासुरवाशिणीचा कोंडमारा विलक्षण हृद्य आहे.

पुडीवर पुडी अलग झाली
अजून नाये गौराई बाई

त्याच गाण्याचा छंद कायम ठेवून सासुरवाशिनीच्या "मायचा" व्यथा बोलकी होते. पण बाकी बहुतेक गाण्यातून दागिन्यांची हौस "माहेर"च्या कौतुकाइतकीच डोकावून जाते.

भिंतीवरचा नागोबा
पडला माझ्या पायावर
मोडले माझे वाकी जोड
घडव घडव रे सोनारा किती करू येरझारा
दारी कुत्रे भुंकती नंदा जावा झगडती
पुडीवर पुडी अलम साडी
अजुन नाये गौराई लाडी (बायको)
येतो बाई येतो ठशी घालून येतो
ठशी माझ्या माहेरची माहेरची

(प्रत्येकवेळी बिंदीपासून बुगडी, सरी, मोहनमाळ, चपलाहार, कंठी वगैरे सर्व दागिन्यांची नाव अगदी जोडव्यापर्यंत ह्याच कडव्यात गुंफून गाणं पूर्ण केलं जातं.)

( ३ )

"ताडावरी ताड गौराई येगूजी लागली
तिकडून आले शंकर त्याने धरीला पदर
सोडा सोडा शंकर मला जाऊ द्या माहेरी
मायाबाईचे तोडे आणू द्या ल्यायला"

पुन्हा एकदा दागिन्यांच्या नावाची उजळणी. पण कधी कधी सखोल भावनांपोटी निर्माण झालेली ही काव्ये फारच सूचक असतात. कधी कधी अतिश्रृंगारिक असली तरी शब्दांची गुंफण योग्य रीतीने झाल्याने तो नर्म श्रृंगारच वाटतो. उदाहरणार्थ--

"हत्याच्या मस्तकी पेरिला मोगरा
उलीसा खुडीला वास नगरा गेला
नगरच्या राजानं खुशामत केली
नेणंती गौराई माडीवर गेली
माडीखाली बाई पहात होतं तळं
आडवी गंगा कशी उतरू माय
पिकलं कारलं चंदनी का गेलं
राजाच्या पोरानं सैंवर मांडलं
पळसा आले पानं त्यावर दे ग पाय
कशी देऊ माय घरी शंकरराय"

पुढील काव्यात एक कठीण प्रसंग मोजक्या शब्दात वर्णिला आहे.

"गेलो मी वारूळा

( वऱ्हाडात स्त्रिया पुल्लींगी क्रियापद वापरतात. )

वारूळच्या नागानं धरला माझा पदर
सांग सांग कारली माशाचं मोलं
जहरी दादा दुरूनि बोल
सोन्याची वाटी रूप्याचा डोल"

तर कुठे जावयाचं ते कौतुक शब्दातून ओसंडतं.

"दारी शंकर जावई विद्या बोला गौराई
हरेक दाणा मोत्याचा गहू घाला सोन्याचा
आना सोनं घाला ताटी गौराई लेकी वानं देती"

"खण खण कुदळी मण मण माती
देऊळ खचलं चांदण्या राती
चांदण्या राती माणिक मोती
घाल घाल गौरी आपल्या हाती
घालता घालता मोडला दांडा
त्यावर उभी राह्य गौराई आपलं माहेर पाह्य"

कुठुनही माहेरावर यायचं हा स्थायी भाव

अगड फोडू दगड फोडू
कारंजाच्या हाटा बाजार जाऊ
कारंजाची लांब दोरी
येता जाता बोरं तोडी
एक बोर उनं लुगडं घेतलं जुनं
चोळी शिवली फाटकी अंगी झाली नेटकी

गाणी गाता गाता फेर धरला जातो. खेळाला गती येते अन् स्वाभाविकच कृष्ण-क्रीडेची आठवण तरळून जाते.

खुळू खुळू वेळूवाची जाळी
कृष्ण खेळे चेंडू फळी
तेथूनि चेंडू झंकारीला
कळमा फांदी अडकीला
कळम फांदी कडाडली
देवकीबाईला बात गेली
काहून रडता देवकीबाई
माहा कृष्ण आला नाही

लय वाढत जाते तशी शेवटी मंदावते ती एखादीच्या "हिरव्या कौतुकाच्या" बातमीमुळे.

आणा आणा पारिस उघडा उघडा काय
आमच्या गौराईचा पहिला मास
पहिल्या माशी सासरा पुशी
सुनबाई तुमचे डोहाळे कैसे
आमचे डोहाळे तुमी काय जाना
नानापरीच्या खारका आणा
आणल्या त्याही खाल्ल्या बाई

प्रत्येक कडव्यातून सासू, दीर, नणंदा, जावा एकेकाला एकेक पदार्थ आणायला सांगितला जातो. नंतर ते "गोड गुपीत" बाहेर येतं ते असं—

पहिलीया मासी आमच्या गवरीले
अन्नाची शिसारी पुढे पानाची पेटारी गौरीबाईच्या
दुसरीया मासी हिला अन्नाची हुलूक
तुझा पानाचा मुलूख गौरीबाई

या मुलींच्या प्रतिभेला खरा बहर येतो तो गौर शिरविण्याच्या दिवशी. गौर मांडल्यापासून चौथ्या मंगळवारी किंवा शुक्रवारी ती नदीवर किंवा तलावावर शिरवायला नेतात, तो सोहळाही प्रेक्षणीय असतो. संकोचाचं कवच त्या दिवशी विरून जातं आणि भारावल्यासारख्या ह्या मुली आपल्याच नादात दंग असतात. रस्त्यावरून ही मिरवणूक निघते तेव्हा मुखरीण (अर्थातच सखीसह वर्तमान) अन् तिची गौर पालखीत बसवितात. इतर मैत्रिणी गाणी म्हणत, टाळ्या वाजवत, नाचत खेळत त्यांच्यासोबत जातात. रस्त्यावरील माणसांवरूनही उखाणे घालून त्या आपल्या शीघ्र कवित्वाचं दर्शन घडवतात.

" ज्याच्या डोक्यास काळी टोपी त्याची बहिण छिनाल मोठी
मुखरींणीच्या मायनं आरती केली मानाची चोळी शिवली खणाची
सुपली फूल तोडत होती आपली वटी (ओटी) भरत होती
आपली ओटी सांडुन गेली राजाच्या लेकानं वेचून नेली "

"सुपली"च्या अब्रूची ही लक्तरं सफाईनं तोडून रस्त्यावर लोंबत ठेवली गेली तरी खिलाडू वृत्तीनं त्यांचं पताकांसारखं स्वागत होतं.

अशा रीतीने नऊवारी पातळाचा घट्ट काचा मारून "वला टाकीत" (वला म्हणजे हात उंच करून कमरेत वाकायचे, मग हात जमिनीला टेकवून उडी मारायची म्हणजे अनुक्रमे हातावर व पायावर चालायचे) एकमेकींना उखाणे घालत जाणाऱ्या ह्या मुलींची मिरवणूकही दर्शनीय असते. गौर शिरविल्यानंतर सामूहिक भोजनाचा कार्यक्रम होतो. सखू-बहिणीचे ऋणानुबंध दृढ होतात. कलेचा अन् जिव्हाळ्याचा स्त्रोत अविरत झरत असतो, निरनिराळ्या आविष्कारांमध्ये पहाणाऱ्याला थक्क करून टाकील असा !

अनुक्रम :—

१. सौ. रोहिणी जोशी

२. कु. नीलिमा दाणी

३. श्री. अनिल कुऱ्हाडे

# भराडी गौर

संग्राहिका : सौ. रोहिणी जोशी

विदर्भात विशेषतः चंद्रपूर जिल्ह्यात "भराडी गौर" बसवितात. कुमारिका मुलींचा हा सण. श्रावणात जिवतीच्या दुसऱ्या दिवशी ह्या गौरीची स्थापना करतात व ललिता पंचमीस विसर्जन करतात. ही गौर फक्त फुलांनीच सजवितात. कलात्मकतेने विविध फुलांनी केलेली रंगीबेरंगी ही पुष्परचना मोठी मोहक दिसते. मग ह्या गौरी समोर गाणी म्हणतात व एक महिन्यानी वाजत गाजत मिरवणूक काढून विसर्जन करतात.

(१)

अरडी परडी घसरंडा
परडी एव्हढ फूल वो
तेही फूल तोडाना
गौराबाई गुंफाना
गौराबाई लेकी
रामराया लेकस
सोनियाचं पाखरू
इरिंग मिरिंग लवंगा तिरिंग
लवंगा तीरचे लाल शोभे
गौराईस शोभे मत्सुरे
शंकराचा निरोप आला
गौराई लागे वाटे

(२)

अंगनी दूध तापे त्यावर हिरवी साय
माय म्हणे गौराई जेवून तरी जाय

कशी जेऊ माय शंकर वाट पाहे
शंकर घोड्यावरी गौराई चाले पायी
आडवी गंगा जमुना कशा उतरू माय
पळसा आले फुलं त्यावर देतो पाय

(३)

आचव्या पाचव्या डावल्या डावल्या
लक्ष्मुण-बाव्हल्या सोळाशा
सासे सासे गोपीशा
आरवट पारवट
केवड्याचा हारा डेरा
बाई कुंकवाचा पुडा
पुडीवर पुडी रचिली
एक पुडी घ्या हो
शंकराचा निरोप आला
गौराई चुडे ल्या हो
मी कशी लेऊ भाऊजी
दारी शंकर आहे जी
अंगणची कळई मंडपा गेली
फिरूनी आली
माय म्हणे आलीस वो बाई
बसायला टाकली नागाची फडी
गळ्यात टाकला विखाचा हार
गौरी माय नमस्कार

# २

*संग्राहिका : कु. नीलिमा दाणी*

**तळ्यावरून वाळू काढताना :**

(१)

खडक फोडू वाळू काढू निघा निघा गौराई गौराई
कोवळी काकडी कशी मी खाऊ माझी सखू रूसली रूसली
घराकडे जाऊ माझ्या सखूची जांगडवेणी
बुरजाखाली घातलं पाणी माझ्या सखूला

**मग गौर घरी आणल्यावर—अक्षवण (औक्षवण) करून :**

(२)

खेळून माळून आल्या पोरी
मुखीणाची माय गं आरती करी
पाट मांडून त्यावर बसली गौराई लेक आज सजली
सई सई खुतळी अंगणी आली पुतळी
सई सई दोरा अंगणी आला भोवरा

**गौर डोक्यावर घेऊन मिरवत आणावयाची असेल तर :**

(३)

दही बाई दही
आमचं दही नाशिरं नाशिरं
फुटक्या हंडी भरीलं भरीलं
फुटक्या हंडी बारू खोल्या पान्यात जाऊ

खोल्या पाण्यात आरोळी लुगडं फाटलं पासोळी
आड्यावर शंकर धोतर धुते धोतर धुते
उठा उठा नानीबाई निम्मन करा, निम्मन करा
निम्मन करता खापराचे वडे खापराचे वडे
त्यावर बसले बालाजी घोडे
बालाजी घोड्याच्या नेट कैसी
ठसे पडले चव चव देशी
ठशा ठशा अंबील गाज
शंक्कर शेला गौराई साजे

(४)

आमची मुखरीण बरवी
भात मांडे चरवी
वरण घाले कशेला (वरणाचं भांड)
दादला आला भुकेला
जेऊ घाला ताटी
विडा द्या हाती
शंकर उभे दारी
खबर नाही घरी

(५)

पुडीवर पुडी अल्लम साडी
अजून नाये गौराई लाडी
येतो बाई येतो "सरी" घेऊन येतो
सरी माझ्या माहेरची माहेरची

("सरी" ऐवजी इतर दागिन्यांचे नाव घालीत हे गाणे पुढे सरकते.)

(६)

ये माय गौरा जाते कुठं वं
जातो मी जातो मी खारका बनं
खारका बनाच्या खारका गोड
येतील गोविंद तोडतील घड

(मग "खारका" ऐवजी सर्व सुक्या मेव्यातील इतर फळांची नावे इथे घालावीत.)

(७)

धारोळी दे सखू धारोळी दे
धारोळी न देऊ पण लेकाची पण लेकीची
सांग चाफ्याचा भांग मोत्याचा कुरळ्या केसाची दुरळ्या देसीची
धारोळी न देऊ पण लेकाची पण लेकीची

(८)

सुपली फुलं तोडत होती आपली ओटी भरत होती
आपली ओटी सांडून गेली राजाच्या लेकानं वेचून नेली
ह्या राजाच्या लेक हाती कंकणाचा झोक
डोक्यावरची टोपी पाठीवर लोंबते
दोघी दोघी बायका काष्ट्याला झोंबते
हातात परडी बायको लाडकी
आमच्या गावच्या पाटलाची पाटलाची
श्रावण मासी गौराई आली
मुखरीण सजली ······ ची

# ३

*संग्राहक* : **श्री. अनिल कुऱ्हाडे**

(१)

ताडावरी ताड
गवराई चढूच लागल्या
तिकडून आले शंकर
त्यानी पदर धरिला बाई पदर धरिला
सोडा सोडा शंकरजी
जाऊ द्या माहेरा जाऊ द्या माहेरा
माय बाईचे तोडे
मला आणू द्या ल्यायला ल्यायला

(२)

अंगणी दूध तापे त्यावर पिवळी साय
गवराई बाई लेकी आज राहून जाय
कशी राहू माय शंकर वाट पाहे
शंकर घोड्यावरी गवराई चाले पायी
मधून वाहे नदी गंगा यमुना दोन
पळसा आले फूल त्यावरी जो पाय
गवराई लेकी आज राहून जाय

# राखी-नारळी पौर्णिमा

सौ. कुमुदिनी रांगणेकर

ह्या पुढला श्रावणातला एक महत्त्वाचा सण म्हणजे श्रावणी पौर्णिमा! ह्या पौर्णिमेला दोन नावे आहेत. नारळी पौर्णिमा व राखी पौर्णिमा.

नारळी पौर्णिमा हा आपल्याकडील विधी आहे. वरूण हा पाण्याचा देव आहे. तेव्हा श्रावणी पौर्णिमेच्या दिवशी वरूणदेवतेची म्हणून समुद्राची पूजा करून त्याला नारळ अर्पण करावा असे शास्त्रात सांगितले आहे.

ह्या पौर्णिमेच्या आधी दोन अडीच महिने पावसाला सुरुवात झालेली असते. ज्येष्ठ, आषाढात फार पाऊस पडत असल्यामुळे ह्या दिवसात आगबोटींची ये-जा थांबलेली असते. कारण समुद्र त्या वेळी मधूनच वादळी होतो व मग बोटी बुडण्याचे भय असते. त्यामुळे दोन अडीच महिने हा पाण्यातला व्यापार बंदच असतो. अर्थातच हा काळ व्यापाऱ्यांना मंदीचा असतो! श्रावणी पौर्णिमेच्या सुमाराला समुद्र शांत होतो व मग त्या दिवशी समुद्रात नारळ टाकला की, आगबोटींची वाहतूक सुरू करण्याचा परवाना मिळाला असे समजतात. त्यामुळे फक्त हिंदूच नव्हे, तर इतर धर्मांचे व्यापारीसुद्धा ही पौर्णिमा महत्त्वाची मानतात. आणि मोठ्या समारंभाने व उत्साहाने समुद्राच्या दर्शनाला जाऊन त्याला नारळ अर्पण करतात.

आता नारळी पौर्णिमेचे जे दुसरे राखी पौर्णिमा असे नाव आहे, त्याचा संबंध मूळ उत्तरेकडील लोकांशी आहे. ते लोक समुद्रापासून दूर रहातात ना? त्यामुळे समुद्रापाशी संबंध असणाऱ्या नारळी पौर्णिमेचे महत्त्व त्यांना कसे कळणार?

ह्या पौर्णिमेच्या दिवशी तेथील स्त्रिया मानलेल्या भावाच्या मनगटावर राखी बांधतात. त्यामुळे त्या स्त्रीला बहीण मानून तिच्या रक्षणाची जबाबदारी तो भाऊ घेत असतो. अशी सुंदर कल्पना ह्या कृतीच्या मागे आहे.

गुजराथ देशाची राणी कर्मवती हिने मोगल बादशाह हुमायून ह्याच्याकडे राखी पाठविली होती व त्याला आपला भाऊ मानला होता. हल्ली आपल्या इथे पुष्कळ बहिणी भावाच्या मनगटावर राख्या बांधतात. पण ह्या राखी-बंधनाच्या पाठीमागे असलेला पवित्र हेतू कोणीच लक्षात घेत नाही ! ज्यांच्या-कडून राखी बांधून घ्यावयाची त्यांच्या रक्षणाची जबाबदारी त्यामुळे आपल्यावर पडते हे विसरता कामा नये ! बहिणीकडून मारे राखी बांधून घ्यावयाची नि तिने अभ्यासात मदत मागितली तर तिच्या अंगावर खेकसायचे ह्यात काय अर्थ ? राखीबंधनाचा हा हेतू ध्यानात घेतला म्हणजे कोणीही दुबळ्या व्यक्तीने दुसऱ्या बलिष्ठ व्यक्तीच्या हातात राखी बांधण्यास हरकत नाही हे कळून येते.

उत्तरहिंदुस्थानात तर नोकर मालकांच्या हातावर राखी बांधतात. गरीब माणसे श्रीमंतांच्या हाताला राखी बांधून त्यांचे हित इच्छितात व आपले हित साधतात. तेव्हा आपल्या लहान भावंडांकडून आपण अवश्य राखी बांधून घ्यावी व आपला मोठेपणा न विसरता त्यांच्याशी वागण्याची शिस्त स्वतःला लावावी.

# राखी पौर्णिमा

सौ. लता डागलिया

श्रावण महिना म्हणजे सगळीकडे आनंदी आनंद. धरणीमाता अंगभर हिरवागार शालू नेसून ह्या आनंदात सामील होते. निसर्गाचे रूप साजशृंगारीत युवतीप्रमाणे मनाला मोहक दिसत असते. ह्या सर्व आनंदात सहभागी होतात हिंदूंचे सण. श्रावण महिना लागताच महिलांना माहेरचे वेध लागतात. नागपंचमीच्या सणाकरिता त्या सासुरवाशीणी चार दिवस माहेरी जातात. नागदेवतेची मनोभावे पूजा करून भावाप्रमाणे रक्षा कर अशी प्रार्थना करतात. त्यानंतर येते राखीपौर्णिमा. वहिण भावांच्या पवित्र प्रेमाचे प्रतीक, अशी ही नारळी पौर्णिमा.

प्रत्येक सणामागे काही इतिहास असतो. राखी पौर्णिमेविषयी अनेक पौराणिक कथा प्रसिद्ध आहेत. देवांचा राजा इंद्र ह्याच्या पत्नीने "शची" सर्व देवांना राखी बांधून एकत्रित केले. त्यामुळेच सर्वशक्तीनिशी देवांनी राक्षसांशी युद्ध केले आणि त्यांचा पराभव केला. प्राचीनकाळी ऋषीमुनी आपल्या साधनेची पूर्ती करून ह्याच दिवशी राजाच्या हातात राखी बांधून त्यांना आशीर्वाद देत होते. भगवान विष्णूने ह्याच दिवशी राजा बलीचा गर्व हरण केला.

महाराष्ट्रात पौर्णिमेला समुद्राची यथासांग पूजा करून त्याला नारळ अर्पण करतात. पूर्वीचे व्यापारी आपले जहाज समुद्रातून प्रवासास निघण्यापूर्वी समुद्राची पूजा करीत होते. घरोघरी नारळी भात केला जातो. त्यामुळेच ह्या पौर्णिमेला "नारळी पौर्णिमा" हे नाव पडले आहे.

राखी पौर्णिमेची चाहूल हा सण येण्यापूर्वीच बाजारातील रंगीबेरंगी राख्या बघून येते. आभाळातील इंद्रधनुष्य आज पृथ्वीतलावर उतरले आहे असेच बाजारातील राखीचे स्टॉल बघून वाटते. बाजारात रेशमी धाग्यापासून तो

सोन्याचांदीच्या अस्सल वर्खापासून तयार केलेल्या राख्या आपले लक्ष वेधून घेतात. प्रत्येक बहीण मोठ्या हौसेने आपल्या भावासाठी राखी घेत असते.

भावाच्या हातामध्ये राखी बांधून त्याच्यासाठी बहीण यश चिंतते तर भाऊ तिला मनपसंत भेट देऊन खूष करतो. केवळ भेट देऊन भावाचे कर्तव्य येथे संपत नाही तर कर्तव्य आणि जबाबदारीची जाणीव राखीच्या बंधनामुळे होते.

प्राणाची पर्वा न करता बहिणीचे रक्षण करणे हेच त्याचे कर्तव्य. विवाहित बहिण आपल्या भावाच्या घरी जाऊन त्याला राखी बांधते, नारळ आणि पेढा देऊन त्याचे तोंड गोड करते. भावाबहिणीच्या सुखदु:खाच्या गप्पात हा सण केव्हा संपतो हेच मुळी कळत नाही.

आज मात्र ह्या सणाचे पावित्र्य नष्ट होत चालले आहे. बाजारातील राखीचे मूल्यावरून बहिणीच्या प्रेमाची किंमत केली जाते. सोन्यामोत्याची राखी बांधली म्हणजे बहिणीचे भावावरील प्रेम वाढले असे मानले जाते. परंतु ते चूक आहे. खरोखरीच राखी केवळ रेशमी धाग्याचीच होती. तिच्यामध्ये एक प्रकारची जादू होती. म्हणूनच ज्यावेळी रजपूत राजाच्या कर्मवती नावाच्या राणीने मोगल सम्राट हुमायू ह्याला राखी पाठविली त्यावेळी तो बहिणीच्या रक्षणाकरिता धावून आला. आजच्या राखीमध्ये ही जादू नाही केवळ दिखावूपणा आहे.

भारत देश अनेक जाती धर्माच्या समन्वयाने तयार झालेला आहे. परंतु राखीच्या एकाच रेशमी धाग्याने तो एकत्रित बांधला जावू शकेल. हिंदू-मुस्लिम, शीख, जैन सर्व बांधव एकाच गोफात विणले गेले तरच खऱ्या अर्थाने राखीपौर्णिमेचे महत्त्व अजूनहि आहे हे लक्षात येईल. बहिण-भावाप्रमाणेच सर्व बांधव एकाच राखीच्या दोऱ्याने एकत्रित बांधले जातील.

# उत्तर भारत का रक्षाबंधन पर्व सनूना (राखी)

*सौ. मालती शर्मा*

महाराष्ट्र की नारळी, पोवती पौर्णिमा उत्तर भारत में रक्षाबंधन का महापर्व है। यह पौर्णिमा राजस्थान, बुन्देलखंड, पंजाव और समस्त उत्तर भारत में राखी, कजरी पौर्णिमा, सावन, सनूना या सलूना आदि विविध नामों से जानी जाती है और बड़े ठाटबाट हर्ष उल्लास से मनाई जाती है। यहाँ के रक्षाबंधन के विधि कृत्यों (रिचुअलस्) गीत, चित्र, रीतियों, कथा एवं अनुश्रुतियों में वैदिक, पौराणिक, जैनधर्म, परक, ऐतिहासिक तथा सामाजिक पुराकथाओं, परम्पराओं का अपूर्व संगम हुआ है। यह त्यौहार जैसे इन परम्पराओं में खिले अमरगंधी फूलों का मनोहारी स्तवक है और उतनी ही मनोरंजक है। वेदोंसे लोक हृदय, तक, भारत से मिश्र तक इसकी यात्रा-कथा।

अपने मूल उत्स में श्रावणी वैदिक पर्व है। "तैत्तरीय संहिता"[1] के अनुसार श्रावण मास का नक्षत्र श्रवण है जिसका वैदिक नाम "श्रोणा" है, देवता है, विष्णु, इसे त्रिविक्रम भी कहते है। कहते हैं तीन तारोंके रूप में विष्णु ने तीनों लोको में अपनी द्युति बिखेरी है। श्रावणी पूर्णिमा को श्रावणी उपाकर्म का विधान है। आज भी सम्पूर्ण भारत में वैदिक रीति से यह उपाकर्म कर विप्र वर्ग नवीन यज्ञोपवीत धारण करता है। अब प्रश्न है कि यज्ञोपवीत के धागों में से राखी के विविध अर्थ आयामी सूत्र कैसे निकले? श्रावणीपर्व और रक्षाबंधन एक ही दिन एकत्र कैसे हो गये? यद्यपि आज भी बंगाल, उड़ीसा, दक्षिण भारत और गुजरात में श्रावणी पर्व प्रमुख है किन्तु देश के उत्तरी भाग में रक्षाबंधन ही मुख्य त्यौहार बन बैठा है।

पुराणों के अनुसार रक्षासूत्र सर्वप्रथम देवासुर संग्राम में विजय के लिये इन्द्राणी ने इन्द्र के श्रावणी पौर्णिमा के दिन बाँधे और उन्होंने असुरराज

१. तैत्तरीय संहिता-३-३

बलि को परास्त किया। पुरोहित पंडित आज भी उसी स्मृति में यह मंत्र पढते हैं :–

" येन बद्धो बलीराजा दानवेन्द्रो महाबलः
तेन त्वां प्रतिबद्धनामि रक्षे माचल माचल"

लेकिन इसकाल में राखी को लोक की व्यापक भूमि प्राप्त नहीं हुई। भविष्य पुराण उसे राजाओं सामन्तों की युद्ध विजय हेतु बताता रहा। राखी को लोक की धरती जैन धर्म में प्राप्त हुई। जैन समाज में राखी का दिन मुनिपूजा दिवस है, उनके समाज में रक्षाबंधन की कथा कुछ दूसरे प्रकार से मुनि विष्णु कुमार की कथाके रूप में प्राप्त है। यह कथा प्रकारान्तरसे बलि वामन प्रसंग ही है। मुनि विष्णु कुमार वामन हैं, विशेष है बलि द्वारा मुनियों को जला कर पुरुष मेघ यज्ञ का आयोजन जिससे आकाश का श्रवण नक्षत्र काँपने लगता है और विष्णु कुमार के तीसरा पग उठाते ही धरती हिलने लगती है तब क्षमा याचना कर वलि यज्ञ बंद करता है। जैन मुनियों की शरीर रक्षा के लिये उन्हें दूध सेंवई खिलाई गई। आचार्य ने धर्मदेशना कर सम्पूर्ण प्रजा को सभी की रक्षा में तत्पर रह श्रावण पूर्णिमा को मुनिपूजा कर रक्षा के लिये सभी को रक्षा बाँधने का उपदेश दिया। जैन विश्वास है कि इससे वर्ष भर रोग, शोक और व्याधि नहीं होती।[1]

**तभी शायद** पुराणोत्तर धर्मशास्त्रों में राखी की महत्ता में मंत्र है :–

" सर्व रोगोपशमनं सर्वाशुभविनाशनम्
सकृत्कृते नादमेकंयेन रक्षा कृतो भवेत्"

किन्तु राखी के इन वैदिक, पौराणिक और जैनधर्मी धागों में बहन की राखी नहीं मिलती जो आज रक्षाबंधन का एकमात्र प्रतीक चित्र है। जिसके द्वारा नरनारी सम्बन्धों में विश्वभर में सबसे उज्वल धवल और पवित्र भाई बहन का सम्बन्ध पुष्प उगा है। **बहन की राखी का यह धागा शुद्ध लोकमानस**

१. ग्वालियर में जैन समाज के मध्य सुनकर एकत्र की गई कथा, स्वयं लेखिका के द्वारा।

**की देन है। यह आर्वजना (टैबू) और निषेध का धागा है। राखी के रक्षा सूत्रों में** वहन की राखी काफी बाद में जुडी **सगोत्री और सपिंडी युवक से विवाह यौन सम्बन्धों की आवर्जना बन कर।**

भारत पर विदेशी आक्रमणों के साथ आई भिन्न संस्कृति से रक्षा के लिये जिसमें विवाह-यौन सम्वन्ध सगोत्री थे, अधिक खुले थे। भारत में यमयमी तो विवाहबद्ध नहीं हुए किन्तु मिश्र के राजकुल में इंका राजाओं में और बर्माथाईलैंडमें तो गत शताब्दी तक सगे भाई बहनों में विवाह होते थे।

इन्हीं का निषेध है बहन की राखी, जिसे बाँध कर कोई भी अज्ञातकुल शील और सपिंडी युवक "राखी बंद भाई" बन कर सहोदर भाई बन जाता है। आज तो उत्तर भारत में यह राखी ऐसी रक्षाकारक है कि अस्त्रशस्त्र, सिलाई–मशीन, तराजू, वाद्ययंत्र सभी उपकरणों के बाँधी जाती है।

उत्तर भारत में राखी को सवसे चटकीले और गीतों भरे रंग दिये हैं, ब्रज, राजस्थान और बुन्देलखंड ने। यहाँ की राखी के विधिकृत्यों (रिचुअलस्) में संश्लिष्टता के साथ लोकवार्ता के विश्व व्यापी तत्त्व है, मानवमन और प्रकृति की एकरूपता है, लोकगीतों की वर्षा से उफनती नदियाँ हैं, हर्षोल्लास रागरंग की छटा, झूलों हिंडोलों की छटा है, सेंवई पुओं की महक है, चुंदरी लहरियों की सरसराहट है, बोली, ठोली, पहेलियों की हमजोली हैं। यहाँ की राखी का **उत्सवधर्मी पक्ष** बडा ही मनोहारी, तरह तरह के मेले, चकई भौंरों के खेल और भुजरियों की शोभा यात्रावाला है। ब्रज का सनूना मुख्यत: विवाहिता लडकियों और जँवाई के सुसराल पीहर आगमन और लाडचाव शोभा शृंगार से रंगा चुंगा है।

सावन लगतेही बेटियाँ पीहर बुलाली जाती हैं। विवाह के पहले वर्ष यह अनिवार्य है। बादल गरजतेही वे प्रतीक्षातुर हो उठती हैं :–

"बारूरेत खिलौना री मोय अनवट पायौ
चढ़ि कोठे पै देखूँ री मेरौ कोई न आयौ
लीलो घुड़िला हींस्यौ री मेरौ भैय्या आयौ"

राखी पूनो को या एक-दो दिन पहले जँवाई अपने भाई भतीजों के साथ सुसराल **बूरा खाने और सोहगी** (सौभागी) लेकर आता है। इस सोहगी में नवपरणीता के लिये सौभाग्य श्रृंगार की सारी वस्तुएँ मेंहदी, चूडी, कंघी आदि, खयेला, राखी, साले सालियो के लिये कपडे, खिलौने विशेषतः भौंरा चकरी और फिरकनी झूला पटली और घेवर (मिठाई) रहते हैं। इनके आने से गाँवभर में चहल पहल का, नये वस्त्रा भूषणों में सजी युवती किशोरियों का मधुमास झूलों पर पेंग भरने लगता है। रसोई घर भी बूरे और पकवानों से महक उठते है, आँगन चौपालें जीजा साली साले, सलहज और नन्दोई के हँसीमजाक पहेली ठिठौली से गूँज उठते हैं, खुशी के कगार टूटते से लगते है।

राजस्थान में तो जँवाई तीज झूलने तीजों पर ही आ जाते हैं लेकिन ब्रज बुन्देलखंड में सनूने पर ही आते हैं। इस दिन महिलाएँ और लड़कियाँ झूला झूलती हैं, सावन के गीत मल्हार गाती हैं, लड़के और पुरुष वर्ग चकई भौंरा फिराता है, कबड्डी खेलता है, महिलाएँ तीज खेलती हैं, चकरी फिरना साधारण कौशल का कार्य नहीं। कभी कभी तो यह खेल दामाद बाबू की परीक्षा ही बन जाता था। ग्वालियर के किले में एक पत्थर की बावड़ी पर चकरी का बड़ा भारी मेला लगता है, जिसमें चकरी उछालने की प्रतिस्पर्धा होती है। मुरैना के पास बड़ोखर में चाँदमारी की प्रतियोगिता होती है। ब्रज के गाँवो में राखी पर दोपहर बाद कबड्डी और कुश्ती की प्रतियोगिताएँ होती हैं, पुरस्कार दिये जाते हैं। मथुरा में वर्षा से उफनती, भरी बढी यमुना में तैराकी की प्रतियोगिता होती है, इसे "तैराकी का मेला" कहते हैं, दूर-दूर से तैराक आते हैं।

पूर्वी उत्तर प्रदेश और बुन्देलखंड में कजली–भुजरियों (उगाये हुए जौ) की शोभा यात्रा बड़ी साजसज्जा से निकलती है। आजके दिन बुन्देलखंड में भी जगह जगह भुजरियों के मेले भरते हैं और नदी तालाबों के कूल कजली गीतों से गूँज उठते है। भुजरियों के इसी जुलूस की तो दैन है आल्हाऊदल के शौर्य का अमर महाकाव्य "आल्हा" जो सावन में विशेषतः अल्है तों द्वारा गाया जाता है।

"हरेरामा बेला फूले आधीरात चमेली भुनसारे, रे हरी" पूर्वी उत्तर प्रदेश के "हरे रामा" "हे हरी" इन विलम्बित टेक स्वरों में गूँथे कजली गीतों का तो कहना ही क्या मिर्जापुर की कजलियाँ सरनाम हैं। ब्रज राजस्थान के सावन–गीत तो जैसे नारी जीवन की महागाथा हैं।

**उत्तर भारतीय राखी के विधिकृत्यों में लोकतात्विक वैशिष्ट्य लिये दो पक्ष बहुत ही प्रमुख हैं – घूँघा जवारे या भुजरियाँ फुलरियाँ उगाना तथा घर के द्वारों की आजू बाजू दीवार पर सरवण या सरपन के थापे की गेरू कुंकू या मेंहदीद्वारा रचना करना।** इन थापों को "**सोना** भी कहते हैं राखी के दिन" इन्हीं की पूजा प्रमुख है, राखी बाँधना तो आनुसंगिक है।

यहाँ नागपंचमी और कई जगह सप्तमी नवमी के दिन दो द्रोण या मिट्टी के सकोरे कुल्हड़ लिये जाते हैं। इनमें विधिसे मिट्टी खादभर का एक में जौ, दूसरे में गेहूँ बोये जातें है। नित्य पानी देकर इन्हें नाँद या भगौने से ढँक दिया जाता है, ताकि पीले रहें। श्रावण की तेरस को लड़कियाँ महिलाएँ मेहंदी लगाती हैं, चौदस को "खजुरिहाई" होती है। मेहंदी रचे हाथों से मीठे खजूरे बनाये खाये जाते हैं। चौदस से ही ऐसा कहा जाता है कि घूँघौ का मूड (सिर) दुखने लगता है, वे बाहर उलर आते हैं।

सुबह श्रावणी पूर्णिमा को द्वारों के आजू बाजू दीवार पर सरवण का थापा गेरू मेहंदी कुंकू से काढ़ा जाता हैं। इनके नीचे नवमी को उगाये गये बालिश्त भर लम्बे हरित पीताभ्र जवारे रखे जाते हैं। खीरसिवंइयोंसे या पूड़ी पुओं से उन्हें और सरवण के थापे को पूजकर सर्वप्रथम घूँघों के राखी बाँधी जाती है और सरवण के थापे से चिपकाई जाती है। इस विधिके बाद ही घर-बाहर किसी के राखी बँध सकती है।

राखी-शाम को लड़कियाँ महिलाएँ इन उगाये जौ गेहूँ को झूले पर झुलाकर किसी जलाशयपर विसर्जन के लिये ले जाती हैं, साथ में चींटी कौर (अनाज या आटा) भी ले जाती हैं। तालाब की पाल से मार कर घूँघे उखाड़ लिये जाते

हैं और दोने सकोरे पानी में बहा देते हैं। कहीं कहीं घूँघे तोडे जाते हैं (जलाशय यदि प्राप्त न हो तो पीपल की जड से मार कर निकाल लेते हैं)।

गाँवो में नारियाँ चींटी को कौर डालती हैं, यह गाते हुए :-

**चेंटी चेंटी कौर लै, घोडा दै, तबेला दै**
**बाप भाई का राज दै, सोने की किवाड दै**

गाँवोमें तालाव किनारे नाच भी होता है। शाम को स्त्री, पुरुष, बच्चे सभी घूँघा कान पर रखते, हाथों में बाँधते है।

अब यह जवारे और सरवण क्या अभिप्राय छिपाये हैं? प्रख्यात लोक-वार्ताविद् फ्रेजर ने हेरोडोटस प्लूटार्क के कथनों तथा डेण्टेरा के भित्ति लेखों से यह प्रमाणित किया है कि जौ गेहूँ बोना शस्य के देवता ओसिरिस की मृत्यु, अंगच्छेदन और उसके पुनरुज्जीवन का प्रतीक है (फ्रेजर, गोल्डन बाउ पृ. ३३७)। ओसिरिस की पत्नी है ईसिस जो उसकी सगी बहन भी है (डिक्शनरी ऑफ फोक लोर पृ. ८३५)। मिश्र की पुराकथा के अनुसार ईसिस ने गेहूँ और बाजरे की खोज की, जिसकी खेती करना उसे उसके पति और भाई ओसिरिस ने सिखाया, दोंनो ने मिलकर जंगली मिश्रको कृषि संस्कृति प्रदान की।[१] ईसिस को हरियाली की निर्मात्री, रोटी और सुरा की देवी कहा गया है। लोकवार्ताविदों ने ईसिस को भारतीय अदिति और पृथ्वीमाता के समतुल्य बताया है। अतः जौ उगाने में बहुत व्यापक अभिप्राय (Motifs) हैं। यह पृथ्वी और शस्य देवी की पूजा है। जौ गेहूँ दोंनो बोने में प्रतीक संगति भी है। कजली कथासे इसका संदर्भ शस्य में अपनी हरित का लिमा छोडने वाली, हरित शस्यों में निवास करने वाली हरिकाली देवी से भी संकेतित होता है। यह कथा बुन्देलखंड में कही जाती है। कजली की कथा है।

ब्रजराजस्थान और बुन्देलखंड में यद्यपि द्वार के आजूबाजू रखे जाते सरवण के थापों में आकृति की विविधता है, अन्तर भी, लेकीन सभी में कंधो पर

१. Helleric Europe by the publishing company, London, page 169.

कावड उठाये मानवकृति का रेखांकन और तीन बिन्दु जोड कर बनाई चिडिया अवश्य मिलती है। राजस्थान में भाई मानावत जी ने इन थापों का सम्बन्ध मातृपितृ भक्त श्रवण कुमार से जुडा माना हैं। मालवा के रामविलास जी के अनुसार सरमन के थापे में श्रवण कुमार नहीं है। जनमानस का प्रकृति से सीधा रिश्ता अभिव्यक्त हुआ है यह आकृति है श्रावण की जिसके कंधौ पर इन्द्र धनुष की कावड है और दोनों पलडो में है जलपूरित मेघ। लेकिन ब्रज का "सोना" शब्द जो वैदिक शब्द "श्रोणा" से बनना सहजही है इससे अधिक सार्थक सम्बन्ध बताता है कि पूर्व उल्लेखित संदर्भ के अनुसार यह श्रावण के नक्षत्र श्रवण और उसके स्वामी विष्णु का चित्र है। जैन मुनि विष्णु कुमार के संदर्भ में देखें तो "श्रमण" से सरमन या सरवण बनना भी कठिन नहीं लेकिन ये विष्णु कुमारभी विष्णु ही तो हैं। अतः निष्कर्षतः यही अधिक संगत प्रतीत होता है कि श्रवणी के थापों में मूलतः श्रवण नक्षत्र और उसके स्वामी विष्णु की नक्षत्र रूप में और पौराणिक रूप में विविध परिकल्पनाएँ ही स्थान भेद से अभिव्यक्त हुई हैं।

# पृथ्वीखंड सावळा

डॉ. सरोजिनी बाबर

मेंदी माखलेल्या पायांनी खुळखुळत्या येळूबाच्या जाळीतून चालताना त्या दिवशी जिवाला कसं एकदम हलकं हलकं वाटलं. चेंडूफळी खेळतेल्या कृष्ण-देवाला शोधून काढीत मनीचा आनंद उसळू द्यावा या हेतूनं जमिनीला न ठरलेले पाय उचलताना पायाखालची वाट मऊ रेशमागत नटली. या झाडाची, त्या झाडाची फांदी नजरेपुढून मागं सारीत कृष्णाला भेटायला निघालेल्या गौळणी वाटेत भेटल्या तर बरं होईल म्हणून नजर दाहीदिशांनी भिरभिरली आणि मन केव्हाच गोकुळात जाऊन पोचलं सुद्धा.

गौळणींच्या घरातील दह्या दुधांचे हारेडेरे फोडीत सगळ्यांची नजर चुकवून पळतेल्या आणि आपल्या मुरलीनं ज्याच्या त्याच्या काळजाचा वेध घेतेल्या कृष्णदेवाला केव्हा एकदा बघीनसं झालेलं. म्हणून आपल्या इष्टमित्रांना घेऊन ह्या राजानं मांडलेला चेंडूफळीचा डाव तरी कुठं दिसतोय का पहावं म्हटलं. तर हवेतून एक काळजाची ठाव घेणारी लकेर कानावर आली ——

माझं सगुण गुणाचं तान्हं<br>
बाळ दिसतं गोजिरवाणं<br>
तुम्ही लटकेच करता गाऱ्हाणं<br>
ग ऽऽ गोकूळच्या तुम्ही ग नारी ऽऽ

तुम्ही लपवून याचा भवरा<br>
आळ घेता का सारंगधरा<br>
तुम्ही बारा घरच्या ग बारा<br>
ग ऽऽ गोकूळच्या तुम्ही ग नारी ऽऽ

श्रीरंग माझा बाई वेडा
यासी नाही दुजा आता जोडा
तुम्ही याचा आता नाद सोडा
ग ऽऽ गोकूळच्या तुम्ही ग नारी ऽऽ

बाई ग ! म्हणजे यशोदेनं ह्याला रवीदोराशी बांधून गौळणींना गप्प बसवायची वेळ येऊन ठेपलीय म्हणायची ? असं ह्यानं केलं तरी काय मी म्हणते ? छे बाई ! व्हायचं नाही तसं ! छट् ! हा कशाला जाईल राधा गौळणींच्या घरी आईनं नको म्हटल्यावर ? आणि ती तरी मेली असली कसली चोंबडी म्हणावी ? कशाला घ्यायचा ह्याचा गळ्यातला नवलाखी हार न् ह्याला भूल तरी कशाला पाडायची घरादाराची ? . . .

हिचंच मेलीचं कारस्थान हं ! चेंडू आणायला म्हणून ह्यानं गौळवाड्यात घरच्या प्रत्येकाला पाठवलं तर म्हणे, " तुमी कशाला आला ? ज्याचं त्यालाच धाडून द्यावा ! " शाबास ! चिचुंद्री बरीच आहे की ? एवढ्याशा बालब्रह्माला एवढ्या कोड्यात टाकायचं हिनं ? आणि ह्याला तरी काय कळतं तेव्हा हा पण गेला ते ? सुपारी नारळीच्या गोण्या दारी पसरल्या म्हणून ? वेडाच आहे बाई हा यशोदेचा बाळ ! काय तर म्हणे ––

न्हाईबाई जोडवी मोडूनी
दयाबाई चेंडूजी गुंफूनी
आगाशी मणी माळ ग
किष्णात घेत्याती लोळूनी

हा प्रकार चाललाय न् झाडून सगळ्या गौळणी गोळा करून सगळ्या रंगाचे फवारे उडवीत स्वारी कृष्णकमळाखाली बसलीय ! एवढंच नाही तर गौळणीसंगं हा म्हणे फुगड्या खेळतोय ! . . ह्याला काही कळत नाही का ? ह्याच्या पायावर ह्या मेल्या गौळणींच्या वेगवेगळ्या रंगांचे जोडव्यांचे ठसे दिसावेत ? का नाही यशोदेला राग येणार ?

खरंच, का नाही संतापणार ती ? एकदा सोडून शंभर वेळा तिनं ह्याला सांगितलं असेल की, "श्रीकृष्णा, तू बाहेर जाऊ नकोस. तुझ्यावर गौळणी कुभांड घेतील !" पण ह्यानं ऐकायला नको ? जिथं बघावं तिथं ह्याच्याएकी तक्रार ––

बाई मी झाडीत होते अंगण
कृष्ण मागीत होता कंगन
कुणी धावा ग धावा
कृष्ण मंदिरी वाजवी पावा....

बाई मी घालीत होते सडा
कृष्ण मागीत होता पेढा
कुणी धावा ग धावा
कृष्ण मंदिरी वाजवी पावा....

बाई मी घालीत होते वेणी
कृष्ण मागीत होता फणी
कुणी धावा ग धावा
कृष्ण मंदिरी वाजवी पावा...

ह्याला करावं तरी काय मी म्हणते ? कशाला खोड्या काढीत फिरतो लोकांच्या पोरींच्या न् स्वत:वर आळ ओढवून घेतो हा राजस बाळ ? पण शिक्षा करायची म्हटलं काही तर सापडायला हवा ना ? आत्ता आत्ता इथं आहे म्हटलं तर लगेच ––

यंगी यमुनेचा घाट
शिरी पाणीयाचा माठ
राधे तुझा रंगपाणी
कृष्णा तरी झाला दंग...

ही आवई उठलीच म्हणा ! अशानं बिचारी यशोदा हैराण होऊन जाते आणि नवरावायकोंच्या वेणीदाढीची गाठ मारून त्यांचा जीव नकोसा करणाऱ्या श्रीरंगाबद्दल तिच्या मनी दाट चिंता डोकावते !... चारी अंगांनी तिच्यावर शिव्यांचा न् तक्रारींचा भडीमार होतो जसा !...

"येश्वदेबाई, तुझ्या दुर्गूणी मुलाला करू तरी काय ? अग, घरात शिरून हा चोरून खातो दुधावरली साय ...." आणि हे सगळं खोटं ठरवीत हे चक्रपाणी यशोदेजवळ त्याचवेळी हट्ट धरून मोकळेही होतात —

कृष्णा लोळण जी घेतीली
आमा अंगी जी शिवावी
काढलं गजनी दिंडं
काढल्या सोन्याच्या सुया
काढले रेशमाचे दोरे
गेले शिंप्यायाच्या आळी
आरं तू शिंपी नामदेवा
अंगी शिव नानापरी
श्री काढावा शिवन्यावरी
काढ गा मुंगळे भुजावरी
चांद सूर्व्या छातीवरी
गरूडपक्षी पाठीवरी

आपलं ते खरं करायची खोडच या सावळ्या परब्रह्माला! आलं मनात की, झालंच पाहिजे. असली अंगी घालीन म्हणजे घालीनच! आणि वर लगेच असंही घडून येईल की,

अंगी घालूनी सावळा
दिसे मदन पुतळा

आला आपुल्या वाड्याला
गाई गोदन सोडीली
गेला जमुनेच्यावरी
डाव चेंडूचा मांडीला
डाव आला कृष्णावरी
फर फर अंगी जी काढिली
नेऊन खडकाव ठेविली
आकस्मात वायदळ आली
अंगी वाऱ्यानं गेली
कृष्णा रडत फुंदत ...

शिवाय खरी गोष्ट सोडून देत काशीच्या कावडी आल्या तर अंगी आंदण दिलं या ह्याच्या थापेनं यशोदेला भुलायला पण होईल! भुजेवर मुंगळे, छातीवर चंद्र सूर्या, पाठीवर गरुड पक्षी अशा अंगीचं दान करायचं नसतं ! म्हणून यशोदेचा जीव उडून जातो. ती कृष्णाला मारायला धावते.... पण तसं होत नाही. मारलं की, हा यशोदेचा बाळ रूसून कुठंही निघून जाईल या धास्तीनं जीव काळवंडून जातो तिचा. पार कोमोजून जाते बिचारी ... नाही नाही ते मग तिला आठवतं न् तिची नजर पार गहिवरून जाते.

मागं एकदा असंच कशावरून तरी बिनसलंवतं. यशोदेनं त्याला बडवून खांबाशी डांबून ठेवलावता तर स्वारी दातांनी दोऱ्या तोडून पळून गेलीवती! कुठं ? तर सात वन ओलांडून ! नदी सागर पार करून. ठेकडचा पहाड चढून! इष्टमित्रांच्या घोळक्यातून भागानगरीला ! दूर दूर....यशोदेला हे कळलं मात्र न् तिचा ऊर दाटून आला. झाडाझुडांना मिठ्या मारीत दिसेल त्याला विचारीत न् चंद्र सूर्यांना सोबतीला घेत तिनं सारी दुनिया पालथी घातली. पण हे सावळं परब्रह्म भेटेल तर शपथ ! अखेर शेवटी बिचारीला पान्हा फुटला आणि तिच्या थानातील अमृत दूध सागराचं रूप धारण करून खळखळलं ! ह्यानं ते मनसोक्त पिवून टाकलं न् मग अवचितच गाईच्या कळपातून

पुढं येत यशोदेच्या कुशीत शिरायचा शहाणपणा केला! ...क्षणार्धात मग आईपुढं दांडगेश्वराचं सोंग घेत गाऱ्हाणं मांडून मोकळा झाला हा लंपट–

हांडी भिवरी पारी काशीला
आग लाव त्या गाईला
जाती कुनब्याच्या रानाला
जुंधळा खाऊनी खुडविला
कुनबी धावत पळत
हाती मेंड घेतीला
धीर माझा ग सुटला
पळतानी काटा मोडीला
कृष्ण बोले यश्वदेला
गाई फुकट दे कोनाला....

पण खरी गोष्ट निराळीच असते. हा पृथ्वीखंड सावळा साऱ्या दुनियेला फेरा घालीत असतो. शिवाय वेगळ्याच प्रकारची गुजगोष्ट चाललेली असते ती पण वेगळीच कुठंतरी ––

फुलांची शेज सुंदरी
कधी येतील राजमंदिरी
भुलले ग बाई घननीळासी घेऊन यायी
करू गत कायी कृष्णाला कडेवर घेई ....

क्षणाक्षणाला निराळे रूप धारण करीत गौळवाड्याला दे माय धरणी ठाय करून सोडावं हाच मुळी ह्याचा स्वभाव! तो जन्मला तशी उभं गोकूळच चैतन्य घेऊन उठलं आणि –

गौळण सांगे गौळणीला
पुत्र झाला येश्वदीला

एकी म्होरं एक धावे
घरीदारी हेल घाले ...

ह्या आनंदात कवतिकाला उधाण आलं. तर आता रागराग करून फायदाच काय होता ? कारण जेव्हा बघावं तेव्हा यशोदेचं एकच सांगणं होतं की––

हरी माझा काळानिळा
संगं गोपाळांचा मेळा
त्येच्या हातीचा ग वेणू
कुणी घ्या ग कुणी घ्या ग...

केवड्याच्या पानागत हिला त्याचं रूप देखणं वाटायचं. ती मग त्याला कुक्कुल्या बाळागत पाळण्यात निजवून झोके देत सगळ्या वायकांना पाळणा म्हणायला लावायची. तशी तक्रार घेऊन येतेल्या गौळणींचा राग मग पार निवळून जायचा आणि त्यांच्या कवतिकाला उधाण यायचं ––

बाळा श्रीकृष्ण पालखी करी निद्रा घननीळा
बाळा जो जो रे
श्रावणमासी अष्टमीशी देवकी कुशी येशी जन्माशी
बाळा जो जो रे
कंसभये वसुदेव ठेवी नेऊनी बाळा गोकुळी
बाळा जो जो रे
मधमुखी घालुनी मधुसूदनाशी नंद बघे निजसूत वदनासी
बाळा जो जो रे
गंगजमुनांनी जातक केले दुसऱ्या दिशी हेलकरी आले
बाळा जो जो रे
तिसरे दिवशी माय उसंगा भेटूनी पाजी पान्हा श्रीरंगा
बाळा जो जो रे

त्याचवेळी मग झालं गेलं विसरून कंसवधाच्या गोष्टी तिखट मीठ लावून रंगविल्या जायच्या. अशा वेळी बोलता बोलताच –

गोकुळामंदी कृष्ण नांदतो बहु आनंदानं
मातेच्या उसन्यासाठी देवानं घेतलं लहानपन...

वैराळाचं रूप घेऊन कंस मामाच्या घरी गेलेल्या ह्या कृष्ण कन्हैयाचं वारेमाप कवतिक करताना त्यांना स्वर्ग दोन बोट उरायचा ! आणि द्रौपदीवरील त्यांच्या प्रेमाची आठवण मग अशी काय रंगायची की, ऐकता ऐकता सगळ्या नगरच्या नारी कृष्णामागोमाग पसार व्हायच्या न् बोलतेली तेवढी एकलीच जाग्यावर उरल्यामुळं तिचं तोंड आवाजही न करता नुसतंच हलायचं !

अशावेळी मदन बाणाचे तीर झेलतेली रूक्मिणी सख्या-साजणींच्या घोळक्यात लाजून मुरकून लालभडक होत कृष्णाची वाट पहात बसलेली असायची न् त्या तिला चिडवायच्या...

नेत्रीचे अंजन हाताची लेखणी
पत्रिका रूक्मिणी लिहीतसे
लिहूनी पत्रिका देऊ कोणा हाती
यावे रातोराती यादवराया...

तर हे मनमोहन सारंगाधर केव्हाच तिकडं पसार झालेले असायचे न् कृष्ण रुक्मिणीच्या विवाहाच्या गोष्टींनी गोकुळ नगरी घुमायला लागायची तर त्या धांदलीत...

कृष्ण देवजी देवजी नवरा झाला
शिरी बाशिंग बाशिंग तुरा या याला
कृष्ण ग देवाच्या देवाच्या नवरीसाठी
पैंजण घडविले घडविले नानायापरी...

यशोदा न् देवकी आईच्या मायेनं एक होऊन अब्दागिरी खालून पान-मळ्याच्या टिपरीखाली जातेल्या शेलक्या वऱ्हाडात सामील व्हायच्या. पण हे वऱ्हाड पोचायच्या आतच इकडे हे भगवान लगीन साज ल्यालेल्या रुक्मिणीचं हरण करीत तिला रथात घेऊन मनोरथाच्या नगरीला भरधाव निघालेले दिसायचे ! त्या रथाच्या धुलीकणांनी वऱ्हाडाच्या समोर अंतरपाट धरलेला असायचा न् आकाशीच्या चंद्रतारकांनी मंगलाक्षता टाकून शुभमंगल साधीत ह्यांचे डोळे केव्हाच दिपवून टाकलेले दिसायचे! तर त्यातली अपूर्वाई आम्ही काय सांगावी न् तुम्ही तरी काय ऐकावी देवा ? त्यातलं काय ते ज्याचं त्यानंच ओळखून समजत भोगावं नाही का ? पण आमचं ऐकतो कोण ? सारखंच सांगा सांगा तुमच्या मनातलं म्हणून तगादा केल्यावर सांगितल्याशिवाय रहावलं तर पाहिजे ? म्हणून आपली वाटली ही खिरापत न् धाडली जिकडं तिकडं महापूजा बांधीत! कृष्ण जन्माचा सुंठवडा सुंठवडा म्हणतात तो यापेक्षा आणखी कसला देणार मी घरी परतल्यावर ?...

# लोकगीतातील परब्रह्म

डॉ. सरोजिनी बाबर

त्या दिवशी उगवतीच्या टिपणाला मी न् आमची थोरली काकू पानमळ्याच्या टिपरीखाली बसलो होतो. दहिवारनं भिजलेल्या लुगड्याच्या निऱ्या झटकून टाकीत चिखलानं रंगल्या पायावरच्या खाणाखुणा पूसून टाकाव्या म्हणत होतो. तर तितक्यात सूर्यदेव आसपासचे पहाड फोडून वर येताना चमकले. पाठोपाठ त्यांची किरणं मळ्यात फाकली. आम्ही उठलो. उगवतीला नमस्कार घातला. तशी काकू मला बोलली, "ह्या उगवतीगत गोकूळचा किष्णदेव जन्मला बघ. लई तेज. देखणं रूप. प्वार असावं तर असं! पण ह्यो कृष्णदेव लई अवकाळ! आख्खा गौळवाडा हालीवला बाळानं! अग, रोजची एकेका गौळणीची कागाळी तर?"

त्या उप्पर मी नुसती हसले. यशोदेच्या या बालब्रह्माची मला ओळख होती. त्याच्याएकी मी खूप ऐकलेलं. भरपूर वाचलेलं. पण म्हणून आमच्या काकूची माहिती त्यातली नसणार नक्कीच या कल्पनेनं मी तिला विचारलं, "यशोदेचं तान्हं तुझं लई लाडकं नाही ग काकू?"

"हं! लई लाडकं. ह्यो कृष्णदेव मजी आख्ख्या दुनियेतल्या देवादिकांचं बाळरूप! त्याच्यात आपुन आपलं बाळ बघावं मजी घरात काय असू नसू पोटभर कवतिक मांडता येतंय! खरं न्हवं?"

"तरीच हं एवढा लाड या श्रीहरीचा? काकू, पण तुझ्या घरी गोकुळ ग कुठाय?"

"अग, माझ्या नजरेला दिसतं ते? किष्णदेवाला पाहिलं की, गौळणी आल्याच! गोकूळबी आलं! बघाय शीक. तुलाबी दिसंल!"

"खरं म्हण की ?"

"अलबत ! हे बघ–

"सूर्व्या उठला बोले लहाटकरी
आईला मागीते न्याहारी
आईनं दिली गालावरी
जेवू वाढीलं न्हाई त्येला
किष्ण सांगितो नंदाला
किष्ण रुसूनी निगूनी गेला
नंदा धुंडील्या चारी वाटा
किष्ण गवळ्याच्या पेठा...."

काकूच्या गोड गळ्यातून बाहेर पडलेल्या या गीतानं मला मोहिनी घातली. कृष्णाचं हे बाळरूप मग खरंच माझ्या नजरेत आलं !... त्यासरशी भुर्रकिनी माझं मन त्या गौळवाड्यात गेलं न् मी बोलून गेले, "तिथं काय कवतिकाला तोटा ? प्रत्येक घरात दह्यादुधाच्या चरव्यांनी ह्याला न्हाऊ घातलं असेल नाही ग काकू ?"

"एकदा नंदराजानं पाक सारा गवळवाडा धुंडला. यमुनेच्या तीरातीरानं फिरला. पण ह्या बाळराजाचा ठावठिकाणा कुठाय ? मग येश्वदामाता गेली जिथं तिथं अन् म्हटली––

अग सयांनू कमळावरी
हरी माजा अवकाळ भारी
नंदं धुंडिल्या चारी वाटा
गेला गवळ्याच्या पेठा
नंदं धुंडिले यमुनातीरी
गवळ्याच्या आला घरी

दारी उभी राधा सुंदरी
कडीवर घेऊनी आली भाईरी
अंगणी आली यशोदा नारी
संबाळ आईजी आपुला हरी
खेळतो बाळ माज्या घरी
माज्या घरी शिरीहरी....”

पुढं सांग. गौळणी काय म्हणाल्या? मी तर ऐकलंय की —

पैलीच गवळण काय ग बोलली
बाई मी काढीत होते दूध
मुरली ऐकून झाले धुंद
ऋशीकेशी का मुरली वाजविशी
नंदापाशी का ग वेणू जाब देशी....

असली गंमत झाली तर ?”

“असूंदे असूंदे, माझा शिरीहरी पाडी, भवरी, पारी, काशी, असल्या गाया घेऊन बनात गेलेला. तशी वाजीवली वेणू. निघाला नाद. आणिक मग जी ती मुरली ऐकून दाराशी आली. तर ह्योनं पाहिलं. सहाजिकच हे दे ते दे म्हटला न् मग——

बाई मी झाडीत हुते अंगण
किष्ण मागीत होता कंगन
कुणी धावा ग धावा
किष्ण मंदिरी वाजवी पावा....

असला बोभाटा झाला. माझ्या देवावर गौळणींनी कुभांड रचलं ! . . आता? राधिकेशी त्येचा मैतरपणा जडला हे जगजाहीर ग पोरी ! त्याकारणानं--

यंगी यमुनेचा घाट
शिरी पाणीयाचा माठ
राधे तुझा रंगपाणी
किष्णा तरी झाला दंग....

असली गंमत." काकू पुढं म्हणाली, "सोळा सहस्र नारी मजी बायका न्हवंत! हा भोग नाय! गोरगरिबांच्या पोरींला अटिंग्यावनात कुणी अडकीवलं असंल भ्रमात तर माझ्या देवानं त्यांना सोडवून आणलेल्या न्हवं ह्या?"

"अरे वा काकू! झक्कास झक्कास तुझा हा अर्थ. एकदम पसंत आपल्याला.
"हं! तर गंमत ऐक–"

पैलीच गवळण
बोले दुसरीला
सारवीत होते चूल
ह्या किष्णानं मागितलं फूल
आता मारील ग माजी सासूबाई
ह्या किष्णाला करू गत काई?...

मजी ह्यांचं चित्त ह्याला बघितल्याव जाग्याव न्हातं का? उगीच आपलं ह्यालाच नावं ठेवायचं मजी?

न्हाई मी जायाचा रानाला
गाया ऐकनात्या मला
संबाळ ग आपली तू गुरं
असे बोले सारंगधर
हात ठेवलाय कानावर
मांडली मोत्याची अक्षरं

गाई वळू मी कुठंवर
आली भवानी मोटंवर
दिली लाथ गुडघ्यावर
जनी सुईरी रानावर
राणी गिरजी ठेक्यावर
संबाळ ग तू आपली वासरं
किष्ण बोले येश्वदीला
न्हाई मी जायाचा रानाला

खरं तर असलं इपरीत घडल्यालं आणिक येश्वदीचा राग माझ्या राजावर! का ग बाई? मग साहजिकच जनलोकांच्या मुखी गीत अवतरतं—

यशोदा म्हणे श्रीहरी
नको जाऊ तू बाहेर
गौळणी कुभांड्या करी
घेती तुफान तुझ्यावरी...

आणि येळूंबाच्या जाळीत किष्णदेव मग चेंडूफळीचा डाव मांडून मोकळा होतो!... काय?...

"हे आपलं सगळ्यात उत्तम!" मी आपली काकूची तारीफ केली तेवढ्यात बारीक मोतीराम किंगरी वाजवीत तिथं आला. त्याला मावशीचा स्वभाव ठाऊक. तर त्यानं किंगरी वाजवीत 'श्रीहरी! श्रीहरी' चा जप मांडला. त्यासरशी काकूनं दंडावरच्या चोळीत मुडपलेले दहा पैसे त्याच्यापुढं केले न् पुन्हा एकडाव सूर्याला नमस्कार घालीत ती तिथून उठली.

एव्हाना सूर्य बराच वर आला होता. शेतीवाडीत वर्दळ चालली होती. तर हा मोठा पक्का माणूस. मावशीच्या मागोमाग जात त्यानं किंगरीच्या सुरावर आपलं आख्यान लावलं...

माझं सगुण गुणांचं तान्ह
बाळ दिसतं गोजिरवाणं
तुम्ही लटकेच करता गान्हाणं
गऽऽ गोकूळच्या नारीऽऽ
तुम्ही लपवून याचा भवरा
आळ घेता का सारंगधरा
तुम्ही बारा घरच्या ग बारा
गऽऽ गोकुळच्या नारीऽऽ...

म्हणताना मावशी माघारी वळली. आम्ही देवळात एका अंगाला बसलो, आणिक मग काय? कृष्णदेवाचं गान्हाणं मावशीनं असं काय उचलून धरलं की ज्याचं नाव ते! गौळणींच्यावर तोंडसुख घेत तिनं या बाळराजाएकीचा कळवळा आमच्यापुढं ठेवला—

माता करिती लिंबलोन
भुक्यालं म्हणती माजं तानं
दळव्या याळूची घे खवा बर्फी
देते बेदाना खारकी
पेढे साखर फेण्या
रेवड्या देते बत्तासू केळं
नारिंग देते कान्हा
घेशी जांभूळ
रामफळ पेरू देते
घे रं सिताफळ
मग देते पुंड्या ऊस
जेव तू बाळा

खिरी बोळील्या मोकरकाळी
दूध साखरी
मग मी देते पुरणपोळी
वरती सांजूरी
देते मी राजा दहीभात
जेव तू निर्चींत...

एकेका गौळणीच्या ढंगारंगाची किमया सांगीत तिनं जेव्हा का कृष्ण देवाच्या लग्नाची गोष्ट काढली तेव्हा बरीक आम्ही पण खरंच तहानभूक हरपून गेलो...

नेत्रीचं अंजन हाताची लेखणी
पत्रिका रूक्मिणी लिहितसे
लिहूनी पत्रिका देऊ कुणा हाती
यावे रातोराती यादवराया
येऊनी उतरावे अंबिकेच्या स्थळी
शिणगार पाठवावा रूक्मिणीशी
माय म्हणे अंबिके नको जाऊ भिमके
नगरात पारके उतरले...

या गीतातले ऊसमळे, पानमळे आंदण दिल्याची वाहवा आणि आंबराई फुलबागांच्या या माहेराची नवलाई तिनं अशा थाटात आम्हाला ऐकविली की आम्ही देखील त्या रुक्मिणीच्या लग्नाला जाऊया म्हणालो तर?

भिमंकी नवरी अंबिकेच्या देऊळा
द्वारकेच्या वाटे रथ देखिला पिवळा ...

अशी गंमत! तर तेवढ्यात मधेच कुणीतरी गुणगुणलं—

दुधा तुपानं भरला हरा
गेली गौळण नटयीत
गोकुळी खेळे किष्ण
झेंडा रवीला वाटयीत

त्या कारणानं काकू पुन्हा गौळवाडयात जाऊन पोचली न् हरदासाची कथा मूळ पदावर घेऊन ठेपली.

किष्ण देवजी देवजी नवरा झाला
शिरी बाशिंग बाशिंग तुरा या त्याला
किष्ण देवाच्या देवाच्या नवरीसाठी
पैंजण घडवीले घडवीले नानापरी...

काकूनं आपल्या मनाला येतील ते दागिने या परीनं सांगितले न् मग ते सगळे या नवरीच्या अंगावर घातले तेव्हा कुठं तिचा जीव खाली पडला...

वाघाचा घोडा करून दे, सापाचा चाबूक आणून दे, घारीची वावडी करून दे आणि चांदणीची लाही फोडून दे म्हणून हट्टाला पेटलेल्या लहानग्या परब्रम्हाचं मग तिनं वारेमाप वर्णन केलं. त्याचं नाव घेतलं की, ध्याईचा उद्धार होतो म्हणाली. श्रीकृष्णामुळं घरात समाधान नांदतं न् ऐश्वर्य खेळतं बोलली.

बोलता बोलता मग ती स्वतःच यशोदा झाली !...तिनं आपल्या ध्यानातच देवकीलाही पाहिलं न् मग दिवस लईच वर येत चालला होता तर भाजी तोडायला म्हणून संगं आणलेला हारा डेरा घेऊन ती जित्रापात शिरली. ऊसमळचात, पानमळचात मग तिची पावलं उमटली. तिच्या पाठोपाठ आम्ही पण लोडण्यागत धावलो. भगवान श्रीकृष्णाच्या कवतिकात आमचं पण मन रमलं न् यंदाची गोकुळाष्टमी झोकात साजरी करायचा बेत पक्का झाला.

तेवढ्यात शेतातल्या उभ्या पिकाची पानं सळसळली. तशी काकूपण गुणगुणली...

राधानं सुवरान रचता
कळलं देवाजीला
गैर हुरदी दाटला
नऊ काय म्हईने झाले राधाईला
तिचा भ्रतार गावा गेला
सुख सांगी ऋषीकेशी रूक्मिणीशी
येळ संपादुनी परदेशी
घर मोडकं न्हाई खाया पातर
अंगी न्हाई वस्त्र ल्यायला
अवो सांगतीया देवाला
रूक्मिण बोलली देवा
एवढं वचन ऐका
अवो भक्तिनायका
भक्तासाठी हाती घेऊनी काठी
देव झाला गाईराखा
गोकुळात भुलविल्या गौळणी
बहु सोंगं भरली ह्येच्या अंगी
किती गुण वर्णू मी तुज कवतिका
देवा तुमी भाविकाचा सका
इतकं उत्तर देवानी ऐकुनी
घातले अलंकार अंगावर
नेसला पिवळा पितांबर

अंगी काय चोळी बुट्टीदार
केस विंचरूनी घातिली वेनी
नंदं गुंपीलं सारं
चारन बोरं आवळं कोईरं
केकत केवडा मुद राकडी माथ्यावर
वर काय जडित्राचा घुंगूर
सोबतो किती मनोहर
जसा काय उगावला दिनकर...

आणिक त्या गीतातला मनोभाव उचलीत वाऱ्याच्या लहरीवर आम्हीपण कितीतरी वेळ तरंगलो ते ? ...

# गोकुळाष्टमी

संग्राहिका : सौ. कुमुदिनी रांगणेकर

गोकुळाष्टमी हा सण मुलांना भारी आवडतो. श्रीकृष्णाच्या बाललीलांची माहिती असल्यामुळे मुलांना तो आपला सवंगडीच वाटतो! त्याने गोकुळात केलेल्या गमती, गाईवासरांवरील त्याची माया, मित्रांबद्दलचा स्नेह, त्याच्या मुरलीचे सूर वगैरे सारेच मुलांना आवडते. पण ह्याच्याबरोबर कृष्णाची मल्लविद्येची आवडही त्यांना आवडावयाला हवी. लहान वयात कृष्णाने तालमीच्या व कुस्तीच्या आखाड्यात मेहनत केली. म्हणून कंसमामाने पाठविलेल्या चाणूर व मुष्टिक या मल्लांना तो लोळवू शकला. तेव्हा कृष्णाच्या अंगातील अद्भूत गुणांबद्दल कौतुक करावे नि त्याचे शक्य तेवढे अनुकरण करावे. कधी कधी कृष्ण गौळणींच्या खोड्या काढीत असे. म्हणून त्याचे अनुकरण करण्यासाठी शेजारणींच्या खोड्या करणे चुकीचे ठरेल. कारण कृष्णाने खोड्या काढल्या तरी तो लगेच त्यांची नुकसान भरपाई करी नि झालेल्या नुकसानीपेक्षा ही भरपाई किती तरी जास्त असे. कृष्णाप्रमाणे हा गुण आहे का आपल्या अंगात ? अर्थातच नाही. तेव्हा त्याच्याप्रमाणे खोड्या करण्याचा अर्थातच आपल्याला हक्क नाही. मात्र त्याच्या इतर गुणांचा कित्ता गिरविण्याचा प्रयत्न प्रत्येकाने अवश्य करावा.

श्रीकृष्णाला गरीब-श्रीमंत, सुन्दर-कुरूप असा भेदभाव वाटत नसे. गाई चारावयाला रानात नेल्यावेळी सर्वांची शिदोरी तो व त्याचे मित्र एकत्र करीत नि सर्वजण वाटोळे बसून मजेने जेवीत. कृष्णाचा आवडता मित्र पेंद्या हा गरीब होता नि कुरूप व लंगडाही होता. पण तो कृष्णाला फार प्रिय होता. कृष्णाच्या स्वभावातील हा चांगुलपणा अवश्य लक्षात ठेवावा नि तो आपल्या आचरणात आणावा.

त्याच प्रमाणे जातिभेद न धरता व गरीब-श्रीमंत असा भेद न करिता सर्व मित्रांनी मजेने अधून-मधून वनभोजनाला जावे अन् कृष्णजन्माच्या ह्या

अष्टमीच्या दिवशी कृष्णाला आवडणारे पदार्थ खावेत. दूध, दही व फळे यांचा सात्विक आहार घ्यावा. म्हणजे उपवास आयताच घडेल. आपल्याकडे उपवास करण्याची जुनी पद्धत आहे. ती फार उत्तम आहे उपवास केल्याने आरोग्य उत्तम रहाते आपल्या पोटोबाला थोडी विश्रांती मिळते नि शरीर हलके व चपळ बनते. तेव्हा ह्या दिवशी अवश्य उपवास करावा.

गोकुळात कृष्णावरोबर गोप व गोपी रास खेळत. मुलामुलींनी आताही टिपऱ्या खेळाव्यात. त्यामुळे व्यायाम व करमणूक एकदम मिळू शकतात.

बरं, श्रीकृष्ण गोकुळात काही नुसतीच गंमत करीत नव्हता. यमुना नदीतल्या कालिया नागाला त्याने आपल्या शक्तीने हरविले आणि त्याच्या विषाने यमुनेचे पाणी विषमय झाल्यामुळे ते पिऊन गुरे वासरे व माणसे मरण पावण्याचे संकट त्याने दूर केले !

एकदा इंद्राने चिडून अतिशय जोराचा पाऊस पाडला. घरे-दारे, गुरे-ढोरे, फार काय माणसेसुद्धा वाहून जाण्याचे भय वाटू लागले. तेव्हा श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या करंगळीने उचलून सर्वांचे रक्षण केले. त्यावेळी त्याने सर्वांना हा धडा मिळाला की, गोवर्धन उचलण्याची सर्व लोकांनी धडपड केली म्हणून कृष्णाने-देवाने-त्यांना मदत केली आणि त्यांची धडपड यशस्वी केली.

आपण मनापासून प्रयत्न करायला हवा म्हणजेच देव आपल्याला मदत करतो. तुम्हाला ठाऊक आहे ना, श्रीकृष्णाचा जन्म तुरुंगात झाला ते ? पण त्याचे कर्तृत्व, त्याच्या अंगातील शक्ती इतकी सामर्थ्यवान होती की, तुरुंगाचे गज त्याला कोंडून ठेवू शकले नाहीत ! प्रतिकूल परिस्थितीवर जे मात करू शकले तेच खरे सामर्थ्य.

गोकुळाष्टमीच्या सणाच्या दिवशी गोड पक्वान्न खाऊन खाऊन एक दिवस तोंड गोड होते. पण कृष्णाच्या चरित्रापासून आपण योग्य बोध घेऊन वागलो तर आपले सबंध आयुष्यच आपण आनंदमय बनवू शकू.

अनुक्रम :–

१. श्री. बा. ना. टेकाळे

२. सौ. शरदिनी मोहिते

३. श्री. बाजीराव पाटील

४. श्री. हणमंत पाटील

५. श्री. रमजान खान महंमद खान

६. श्री. दा. गो. बोरसे

७. श्री. टी. जी. देशमुख

८. सौ. उषा रेमजे

९. श्री. वा. गो. बुलबुले

संग्राहक : श्री. बा. ना. टेकाळे

जलमला कृष्ण देव-उजेड पडला न्हानी
नगरीचे लोक म्हनी झाला गोकूळाला धनी

जलमला कृष्णदेव गोकुळात दिवा लावा
सावळे त्याचे रूप मावशीला तोंड दावा

कृष्णदेव पवा वाजवितो जुना
भुलविल्या सासासुना

कृष्णदेव पवा वाजवितो नवा
भुलविल्या माया लेकी

येशोदाबाई तुझा कृष्ण गोड बोल्या
घागरी जड झाल्या मागल्या पुढे गेल्या

येशोदाबाई तुझा कृष्ण इपीतर
पाण्याच्या वाटेवर मारीलं कबूतर

यशोदाबाई तुझा कृष्ण विचीतर
राधीकेच्या म्हालामधी साबण्यातून उतरं

संग्राहिका : सौ. शरदिनी मोहिते

उपजला कृष्ण अडवा घेतला बापानी
कवाड कृष्ण उघडी लाथांनी
आगाशी पाखरू बोलीचा फेर जाना
उपजला कृष्ण उघडीला बंदीखाना
आगाशी पाखरू बोलीती गत मत
उपजला कृष्ण झाला आनंद गोकुळात
आगाशी पाखरू बोली बोलांत दुहीरी
उपजला कृष्ण झाला मामाला वयीरी
उपजला कृष्ण कुलुपं गळाली ठाईची
पुरवीली इच्छा माता देवकीबाईची
उपजला कृष्ण आनंद झाला फार
हत्तीवर जासूद मामा वाटीतो साखर
उपजला कृष्ण उपजला रांगतो
कंवस त्याचा मामा माराया सांगतो
साठ पुतरांनी गंधारी नाई हारकली
एकल्या कृष्णातानी देवकी संतुषली
कृष्णा तुझी बोली गुळाची गूळपोळी
आता भुलावीली राधा गवळ्याची लेकूरवाळी

मथुरी बाजारी गेल्या गवळनी झाडूनी
कळंबाच्या झाडावरी कृष्णा बसला दडूनी
नदी जमुनाला कृष्ण खेळतो सारंगपाट
आला गवळनीचा थाट कृष्णा द्यावीस देवा वाट...

३

संग्राहक : श्री. बाजीराव पाटील

(१)

यमुनेच्या तिरी किस्न खेये चेंडूफयी
कयंबाखाली गाई चेंडू गेला उभ्या नायी (नारी)
किस्न टाके उळी कयंबा झाळावरून
पाया पाता[1]यीचा नाग कसा आनला धरून
किस्नं टाके उळी कयंब डांग उराळली
देवका माता येळी कुरळे केस तोळी
येसोदाबाई काहून वाचली निश्चित
येमोनेच्या तिरी किस्नं बुळाला खचीत
येसोदाबाई किस्नाले सांग काई
गवयाच्या सुना पान्याले जाऊ देत नाई
येसोदाबाई किस्न मोठा बालंट

१. पाताळीचा

उलटले माठ यमोनेशी गेले लोट
येसोदाबाई किस्नं वाळयामंधी येते
चेंडवाच्या मि[1]सं झा[2]ळे गवयनीचे घेते
वैराई झाले देवकीचे मूल
कंबयजा लेते चुळा चायंबीचे फूल
मारला कंस राजा रक्ता भरली रजयी
गर्जना करतील त्याचे पालखीचे भोयी
मारला कंसराजा रक्त भरला दुपट्टा
बोलली कंबयजा पाहु दे दुपट्टा
पानी त पानी पानी नाई आभाळात
किस्नाचा जन्म झाला केळीच्या कमळात
चित्रलेखानं चित्र काढलं सवाई
मदनाचा लेक बाना सुराचा जवाई
चित्रलेखानं चित्रं लिहिले भितीवर
अनीरुद्धाचा पलंग आनला हातावर
सरल दयनं राह्यला एक दाना
गोकुळ नगरात सावळा किस्न ताना

(२)

तुयशीचा पाला वाऱ्यानं उळून गेला
सावळा किस्नदेव आवळीनं जमा केला
पह्यल्या दिवशी हंड्याखाली लावा जाय[3]
देवकाबाईच्या आला परसुतीचा समय

---

१. मिषाने २. झडती. ३. जाळ.

तिसऱ्या दिवशी श्री किस्नाचा गजर
केयीच्या पानावर जेवू घातले पिंजर
चौथ्या दिवशी दुधाची धार वाहे
देवकाबाई श्री किस्नाची माय न्हाये
पाचव्या दिवशी पाट्याचं पुंजन
देवकाबाईनं बाय घेतलं गूंडून

४

---

*संग्राहक : श्री. हणमंत पाटील*

द्रुपदीची लज्जा लज्जा घ्यायला आले ऋषी
त्यांच्या जेवणाशी तीन खंडीच्या पडल्या राशी
त्यांच्या तोंडा लावू येळा लवंगाची केली शाकू
त्यांच्या आंघोळीशी तळं खांडिलं सूर्यानी
त्यांच्या विभुताशी वणवा टाकिला जंगलाशी
त्यांचं अंथरूण गादी जमखाना पासोडी
द्रुपदाबाई बोले मी एकटी वाढू कशी
किसना बंधुजीशी पत्र धाडिले गोकुळाशी

५

संग्राहक : श्री. रमजान खान महंमद खान

द्रौपदी नेसली नवलाखाची शेलारी
दुष्ट कौरवांचे डोळ्याला आली अंधारी
द्रौपदीसी गांजीले सभेस नेवूनी
पंढरारीराया माझा वस्त्र पुरवी अनंत करानी
द्रौपदीनी केला धावा धावा केला जेवता
पंढरीरायीयाची कंठी तुटली धावता
द्रौपदीचं वस्त्र फेडिता फेडिता भागला
तिच्या वस्त्राचा ढीग कैलासी लागला
वस्त्रावरी वस्त्र नेसिली बाला
पांडुरंगानं माझ्या चतुःर्भूज केली तिला
द्रौपदीची निरी हासडीतो दुर्योधन
पंढरीराया माझा पाठीशी घनःशाम
द्रौपदी निरोप सांगे अर्जूनाचे कानी
यज्ञाला आणावी कृष्णा सहित रूक्मिणी
चंदनाची उटी हरी सख्याला कुठं झाली
द्रौपदीबाईनं बहिण बीज ती केली
द्रौपदीचं मन नव्हतं राजा कर्णावरी
जांभूळ तुटलं येऊन पडलं धरणीवरी
द्रौपदी म्हणे देवा तिरूपती झाले
देवा इठ्ठलाच्या जाऊनी चरणाला लागले
द्रौपदीबाईला नाही सखा बंधू

कामाला आला तोंडी मांडिला गोविंदू
द्रौपदी नेसे रंगारंगाची कासई
दुर्योधनाच्या मनात अशी असतूरी असावी
द्रौपदीच्या मिऱ्या आसाडिता हे भागले
यादव इचे बंधू दिंड कैलासी लागले
द्रौपदीच्या निऱ्या कोण आसाडितो वड्या
यादव इचे बंधु नेसिती नव्या वड्या
गांजली द्रौपदी नेली चावडी भाऊनी
यादव इचे बंधू आले बैरागी होऊनी
गांजली द्रौपदी नेली चावडीच्या कोना
यादव इचे बंधु खाली घालित्याती घोणा
पाची पांडवाची हाये द्रौपदी बायकू
दुर्योधनाचं नको भाषण आयकू
वाढविली येणी इची लचकली मान
द्रौपदीबाईचा असा वैरी होता कोण
द्रौपदी म्हणे धावा धावा यादवराया
पाची पांडव वरी आले लज्जा घेया
द्रौपदी म्हणे गाठण चोळीची फिटली
धावा धावा यादवराया सभा वैऱ्याची दाटली
दोन प्रहर रात्र झाली ऋषी आले भोजनाला
नव्हते पात्रा अन्न आळविले द्रौपदीने भावाला
देवाचा ग देव कृष्ण वश झाला द्रौपदीला
ऋषी बसे भोजनाला वाढू लागतो भगिनीला
दुष्ट ग दुर्योधनानी आणिली सभेत
स्वस्त का असे उभे नाही का बोलत

दुष्ट ग दुर्योधन म्हणे द्रौपदीशी बस माझ्या अंकावरी
सती शाप देऊनी म्हणे भीमगदा बसेल तुझ्या मांडीवरी
संकट समयी तुझ्या वाचूनी देवा आठवू मी कोणा
म्हणे द्रौपदी अंत नको पाहू आता येई मनमोहना
माझ्या अंगणात सडा पडतो फुलांचा
चिंधी मागता नारद द्रौपदी पितांबर फाडून देई मोलाचा
पुत्रास दिली लाथ द्रौपदी छळली वनात
जयद्रथा उद्या सूर्य असेपर्यन्त करील तुझा अंत
गांजिला द्रौपदी गांजिली साऱ्या रात
यादव इचे बंधू जागे झाले द्वारकेत
गांजिली द्रौपदी इला तव्याचा मार
इठलाचे खाली हात द्रौपदीचे पाऊल वर
देवाच्या यदन्याला ऋषी जेवे तीनसेसाठ
शिणली द्रौपदी देव थोपटीती पाठ
बसले जेवाया द्रुपदीची तारांबळ
कोणी म्हणे गूळपोळी कुणी म्हणे कढी डाळ
ऋषी बसले जेवाया काय द्रौपदीची मात
कोणी म्हणे गूळ पोळी कोणी म्हणे कढीभात
कापली करंगळी रक्ता लागीयली धार
द्रौपदीने फाडियेला सव्वा हात पितांबर
द्रौपदीबाईने भाव धर्मांचा जोडीला
कापली करंगळी पदर साडीचा फाडीला
द्रौपदी निरोप सांगे अर्जूनाच्या कानी
यज्ञाला आणावी कृष्णा सहित रुक्मिणी

भावाला भाऊबीज द्रौपदीने केली काल
द्वारकेचे हरी पांघरले हिरवी शाल
चंदनाचे पाट मांडले हारोहारी
भावाला भाऊबीज बहीण द्रौपदीच्या घरी

६

संग्राहक : प्रा. दा. गो. बोरसे

यशोदा जसोदा बयणी बयणी दोघी
एक पुत्रावरती राज्य करू आपून दोघी
यशोदा करे ताक काना घुसळू देना
कडेवर बाळ याला बाहेर कुणी नेईना
यशोदा करे ताक रवि वाजे सपासप
क्रिष्ण खाले भय डेऱ्यामधी हाये साप
जसोदा म्हणे सांग तुझ्या कारट्याला
खातो दही दूध लाज नाही चोरट्याला
जल्मिले क्रिश्णदेव अंधारी काळीकीट
मथुरेला जायला यमुनाने दिली वाट

७

संग्राहक : श्री. टी. जी. देशमुख

किसनदेव बोले यसोदा मातेला
देग महा चेंडू आमी जातो खेळायाला
यमुनातिरी डाव देवानं मांडला
गवयनीचा भार आला व्हता धुयाला
गवयनीनं चेंडू किसनाचा चोळीमंदे गुंफ केला
दे ग म्हने माझा चेंडू कडाकडा झोंबे अंगाला
तुझ्या चोळीत काय फुगलं दाव आम्हाला
ऋषिकेशी मसकरी नाही यायची कामाला
धरूनी मनगटी कळ लाविती जीवनाला
अरे आम्ही सासुरवासी नारी अब्रू जाईल लाखाची
गडबड गडबड लोळे यसोदा मन काही बरवं नाही
किसनाला देवी निघाली कोनगत करावी
आली देवीची साथ किसना तापला फनफन
अेकुलता अेक यसोदाचा नंदन
नवरतनाचा पाळना धरतीवर ठेवून दिला
फुलाचे अथंरूण करून किसनदेव आडपडवी झोपवला
बारा नवस करती देवीमातेला
सातव्या दिवसी लावलं उटनं
नवव्या दिवसी फुलांचं पानी घातलं
बारा दिवसी पूजन काढलं
गदगद किसन हासला

हे काय म्हणती बाअी नवलाअी
कळमच्या अडून झाडावरी वाजवे बासरी
भुलवू लागता गवळ्याच्या नारी
गडबड गडबड लोळे यसोदा
किसना देवी निघाली
कोन गत झाली बाअी
यसोदा म्हने देवाला खेळ वाड्यात
चेंडूचा डाव मांडला राजवाड्यात
झरोक्यात बसून यसोदा पाहते मात
तुमी गवळनी नका जाऊ रानात
त्याने जमविले सोंगाडे सांगे कानात
नंग्या मागे मोहरे हात
दुजा गवळनी अडविल्या किसनाने रानात
जमविले सोंगाडे सांगे कानात
राधिकेचा धरला हात भरजवानीत गोपीनाथ
दोघे गेले मंदिरात पानविडे तबकात
विडा घालूनी तोंडात रतन जाळी तुटून पडली
देवाच्या मुखावर शेला किसनदेव गअीप झाला

८

संग्राहिका : सौ. उषा रेमजे

रुसली सत्यभामा निजली भूमीवरी
कृष्ण तिला उचलुनी घेई मांडीवरी
कृष्णाचा मित्र सुदामा भेटीशी आला द्वारकेत
पोह्याची गाठोडी आणली होती काखेत
ओळखुनी मनी भाव कृष्णाने पुतळा पुढे केला
सज्जनांनी बहू छळीले ज्ञानेश्वरादिक भावाला
काशीला गंगेत करिती वेणी दान
गोकुळी यमुनेत जलक्रीडा करी भगवान
द्वारकेत कृष्णाच्या लग्नाचा गजर
टाळीचे वेळी तेहतीस कोटी देव हजर
द्वारकेत कृष्णाच्या लग्नाचा थाट
अंगाला चंदनाची उटी सुटला घमघमाट
द्वारकेत कृष्णाच्या लग्नाचा गाजा वाजा
विहिणीच्या पंक्तीला नाना तऱ्हेच्या भाज्या
द्वारकेत मंगल वाद्य वाजतं
रुक्मिणीशी कृष्णाचं लग्न लागतं
भाचा अभिमन्यू कृष्णाचा झाला जावई
टाळीच्या वेळी अभिमन्यू पाठी बळराम उभा राही
कृष्ण घेऊन वसुदेव जाई मथुरेतून
देवपुष्प टाकी विमानातून

यमुना पाण्यानं दुथडी भरली
कृष्णाचे पाय लागता दुभंगती झाली
हत्तीवरी अंबारी घोड्यावरी फौज
कृष्णाच्या बाळ क्रीडेची यशोदा पाही मौज
गोकुळ अष्टमीच्या दिवशी सारं नगर उपाशी
कृष्ण जन्मले पहाटेच्या समयासी
गोकुळ अष्टमीच्या दिवशी करिती मानभाव
जन्मले बाई यांच्या घरी कृष्ण देव
जन्मले कृष्णदेव आठवणीच्या पुरती
मायबाप बंदीमंदी यांचे बंधन गळती
जन्मले कृष्णदेव बघा बघा दिव्या ज्योती
पायात पदम हाती शंखाच्या मुरती
जन्मले कृष्णदेव गोकुळी दिवा लावा
कृष्णाचं चांगुलपण मामा मावशाला दावा
जन्मले कृष्णदेव झाला गोकुळी आनंद
हात्तीवर साखर वाटितो राजा नंद
जन्मले कृष्णदेव हरक्या झाल्या नगर नारी
उभारिल्या गुड्या बाई यांनी घरोघरी
यमुनेच्या तीरी खेळाया जमले गोप
कृष्ण गोकुळी चोरूनी खातो तूप
कृष्ण गोकुळी चोरी हंडी दही तूप लोण्याची
आनंद वाटे नाम्या घरी कोरडी भाकर खाण्याची
राधा म्हणे व्हा लहान तुम्ही हरी
हाका मारी माझा प्राणनाथ उभा दारी
राधेचा प्रतिभाव पाहून

कृष्ण क्षणात झाले लहान
सत्यभामा पुसे कृष्णाला तुम्ही होता कुठे
रूक्मिणीच्या महाली होतो येता पायी रूतले काटे
बाळया बुगड्या शोभती रूक्मिणीच्या कानात
कृष्ण अंगणात रंग खेळे गोपिकात
रूक्मीणी पुसे कृष्णाला कोठे लागला शेल्याला खोचा
गेलो होतो कुंजवनी जाईचा अडकला फासा
पहिली माझी ओवी देवाला मी गाईली
सावळी मुरत मी गोकुळात पाहिली
काय सांगू बाई त्या हरीच्या लीला
पाऊस येता त्याने आंगुलीवर गिरीच उचलीला
गवळ्याच्या वाड्या गवळणीची मारामारी
दह्या दुधाची येती कृष्णावर चोरी
गवळ्याच्या वाड्या हरी रोज रोज जातो
दही दूध खातो ताक लवंडूनी देतो
सोड सोड कृष्णा राधाच्या पदराला
राधीचे दीर बाई गवळी गेले बाजाराला
कृष्ण लपंडाव खेळाया यमुनातीरी गेला
साऱ्या सवंगड्यांना फसवून त्यांच्या हरयात लपला
सारे सवंगडी पाहू लागले हा सापडेना कोणाला
बोबड्या पेंद्याने हरयातूनी शोधून काढीला
कृष्ण साऱ्या सवंगड्यासह यमुनातीरी गेला
कालियाची खोड मोडण्याकरिता चेंडू डोहात फेकीला
कृष्ण सांगे मित्रमंडळी चेंडू मी घेऊनी येतो
चेंडूच्या निमित्ते तो कालियाची खोड मोडीतो

चोईने बोट चिरून कृष्ण म्हणे नारदाला
सुभद्रा भगिनीकडे जाऊनी चिंधी आणा बांधायला
कृष्णाचे बोल ऐकूनी नारद सुभद्रेकडे गेला
चिंधी नाही कोठे बाई दिंडे सोडून दावी त्याला
कृष्णाचे बोट चिरले नारद सांगे द्रौपदीला
नारदाचे वचन ऐकूनी तिचा जीव घाबरला
द्रौपदीचा धावा ऐकूनी कृष्ण आला लवलाही
सभेशी वस्त्र पुरविले त्याला अंत नाही

९

---

*संग्राहक : श्री. वा. गो. बुलबुले*

कृष्णाचा जन्म झाला मथूरेच्या ठायी
वासुदेव देवका सोडली बंदी शाई
कृष्णाचा जन्म झाला आकाशी वाजे भेर
गोकुळ नगरात आनंद झाला दाट
सावळे कृष्णदेव उडदाया दाणा
त्यांचा चांगुलपणा भावल्या गोपिकांगणा
सावळे कृष्णदेव पिवळे त्यांचे डोळे
राधिकेच्या दाराहुनी मुरली वाजवित गेले
सावळे कृष्णदेव पिवळी बनात

गवळ्याची सून राधा झुरते मनात
कृष्णानं मुरली वाजविली झाडीतून
गवळ्याची सून राधा पाही माडीतून
कृष्णानं मुरली वाजवली येता जाता
गवळ्याची सून राधा उठली न्हाता न्हाता
यशोदा बाई कृष्ण तुझा फंदी
गवळ्याच्या सुना याने कोंडील्या बागामंदी
यशोदाबाई कृष्णाला सांग सूद
राधा गवळणीचं उलंडीलं दूध
यशोदाबाई कृष्णाला सांग काही
राधा गवळणीचं यानं उलंडीलं दही
यशोदाबाई कृष्ण तुझा चोर
चोरला रवी दोर हिंडते मी सारे घर
मथुरी बाजारी गवळण चालली एकटी
कळंबाच्या झाडीतून कृष्ण मारी आरोळी
मथुरी बाजारी भाव नाही तुपाला
असे झाले मोल चंद्रावळीच्या रूपाला
सोळा सहस्र नारी भोगून बैसला बाहेरी
बोलली देवकी कृष्ण माझा ब्रह्मचारी
सोळा सहस्र गोपींगना घालती धिंगाणा
रूक्मिणी वाचून विडा हरीचा रंगेना
पारिजातकाचं झाड सत्यभामेच्या दारी
फुलं पडतील रुक्मिणीच्या दारी
कुंतीचे पाच जण गांधारीची फौज

दुर्योधनाच्या लढाईत कृष्ण पाहतो मौज
ऋषीच्या पंगतीत द्रौपदीची झाली धानं
बोलिले भगवान झाऱ्या भरल्या उदकानं
ऋषीच्या पंगतीत द्रौपदी वाढी मीठ
बोलिले भगवान पंगती बसा ऋषी नीट
ऋषीच्या पंगतीत द्रौपदी वाढी भात
श्लोक म्हणावयास विठ्ठला मारा हाक
ऋषीच्या पंगतीत द्रौपदी वाढी डाळ
तांब्याचे गंगाळ सोन्याचे वगराळं
ऋषीच्या पंगतीत द्रौपदी वाढी शिरा
झळकते तिच्या कांकणाचा हिरा

अनुक्रम :-

# मथुरेच्या बाजारात

संग्राहक : प्रा. सदाशिव माळी

दही रे दुधाची गवळण चालली एकली
कळंबाच्या झाडाखाली कृष्णाने आरोळी ठोकली
मथुरेच्या बाजारात जातसे श्रीकृष्ण कोल्हाटी
खेळ मांडिला तिथे राई चंद्रावळीसाठी
मथुरेच्या बाजारात झाला श्रीकृष्ण चांभार
बेगडी वहाणा राई चंद्रावळ घेणार
मथुरेच्या बाजारात झाला श्रीकृष्ण कुंभार
नाजुक नवल्या राई चंद्रावळ घेणार
मथुरेच्या बाजारात झाला श्रीकृष्ण कासार
राजहंसी बांगड्या राई चंद्रावळ भरणार
मथुरेच्या बाजारात झाला गवळणीत गजर
सोडा सोडा कृष्णदेव राईबाईचा पदर
दही रे दुधाची राई परतली एकली
कळंबाच्या झाडाखाली कृष्णाने काचोळी गुंफली

सौ. शरदिनी मोहि

( १ )

गोकुळामध्ये कृष्ण नांदतो बहु आनंदानं
मातेच्या उसण्यासाठी देवानं घेतलं लहानपण
वैराळाचं रूप घेऊनी निघाले भगवान
कंस मामाच्या गावी मुक्काम केला देवानं
घ्या ग घ्या ग चुडा बायांनो जडीत्राचं लेणं
सर्व नगरीच्या बाया चुड्याचं करतात खंडान
खोल खोल पेटारा चुडा तुझं नाव सोनारी
एक एक चुड्याची किंमत तू बा सांग खरोखरी
सव्वा लाख सोनटक सोनं ऐक सुंदरी
झाक झाक पेटारा चुडा तुझा मोलाचा भारी
एवढ्या मोलाचा चुडा लेणारी भाग्याची कोण
भाग्याची नार कमळजा कंसाची जाण
खबरीमागं खबरी कळाल्या कमळजबाईला
कुण्या देशाचा वैराळ आपुल्या गावात आला
जाग, जाग, सयांनो आणा तुम्ही त्या वैराळाला
आणा वैराळाला चुडा मी भरते मनगटाला
पुढं साऱ्या न मागं वैराळ आल्यात वाड्याला
उठकर बसकर चंदनपाट दिला बसायाला
कोण गाव कोण ठिकाणा कुठला रहिवासी

तुझ्या सारखा कृष्ण भाचा नांदे गोकुळाशी
गाव नाही शीव नाही मूळचा परदेशी
चुडा विकण्यापायी आम्ही हिंडतो दाही दिशी
असे म्हणताना विश्वास आला कमळजबाईला
कमळजबाई नारी चुडा तिनं भरला मनगटाला
अरे अरे वैराळा एवढा चुडा ढिला कर
मनगटी लागली कळ न् माझा पति जागा होईल
जाग जाग सयांनो आणा तुम्ही विळा खिळा सुरी
चुडा खिसायचं खड्ग माझं विसरले मी घरी
उभी होती अंगणी झटकन गेली पतीच्या म्हालासी
उशाखालचं खड्ग आणूनी दिलं वैराळाशी
खड्ग आलं हाताला कृष्णदेव खुशालीत झाला
खुशालीत झाला न् देतो वळक मामीला
जा ग जा ग मामीबाई निरोप कळवा मामाला
गोकुळचा रहिवासी कृष्णदेव मी आलोय दाराला
भाच्याचं नाव ऐकता मामा दचकून जागा झाला
दस्तरूमालानं हात बांधुनी शरणच गेला
अरे भाच्या नको कापू रे तू माझी मान
सांगतो खरोखरी घरचा तुझा होतो मी बंदीवान
बंदिवान होतो मी न गोकूळी गाई राखीन
सात बंधु मारिलं तुम्ही नव्हतं असं बोलणं
एका शिरासाठी तुम्ही मामा लई कष्टी झाला
मावळ भाच्याची लढाई चालली त्याच येळेला
पहिला हाती मारीला न् मामानी झरे बांधिला

दुसरा हाती मारिला दंड पाडीला धरणीला
तिसरा हाती मारिला न् शीर घेऊनी गेला गोकुळाला
बाळ गेलं शिकारीला न् देवकी आली ओवाळायला
अरे अरे चांडाळा कसा तू वैर साधीला
वाणीतिणीचा बंधु माझा का तू मारिला
सात बंधू मारिले पाणी नाही डोळ्याला
एकाच शिरापाई माता लई कष्टी झाला
त्या दिवशी आनंद झाला उभ्या गोकूळाला
असा पापी मारिला न् त्याचा दोष नाही मजला

(२)

गौळण सांगे गौळणीला
पुत्र झाला येश्वदीला
येकी म्होरं येक धावे
येक वाटे सुंटावडी
अशी गलबल झाली
दासी जनी हेल घाली
वान घेऊनिया ताटी
नंदाघरी झाली दाटी

(३)

नंदाघरचा त्यो गुरंराख्या
येता जातो वो मजकडे
पाहता वाईट तुमची खोड
काना पदराला धरू नको सोड

करूनी येनीफनी
काजळ कूंकू लेली
काळ्या हरीला दावा गोरा रंग
पदराला धरू नको सोड
तू किष्णा काळा
मी राधा गोरी
तुजी माजी न्हाई शिनजोड
काना पदराला धरू नको सोड

(४)

हांडी भीवरी पारी काशीला
आग लाव त्या गाईला
जाती कुनब्याच्या रानाला
जोंधळा खाऊनी बुडविला
तवा तो कुनबी धावत आला
हाती भेंड त्याने घेतला
मग धीर माझा तुटला
पळतांनी काटा मोडला
कृष्ण बाळ बोले येश्वदीला
गाई फुकट दे कोनाला

ढवळी पवळी पांढरी पाय सोरटी
ती खाईना करड
काठीवाडी मालंदीची जुटी
काळी म्हताप गाय धाकटी
घरी हरणीच्या शेपटी

मग वळल्या यमुना तटी
घालू धुनं रं वाळंवटी
कृष्ण बोले येश्वदीला
गाई फुकट दे कोनाला

यमुना जमुना गाई सरस्पती
तान्ही वासरं पाजती
गंधारी गाई धुरपतीला हुमरती
कावीरी तिला चाटती
जग हवान चैताळती
गुल पतंग उधळती
लक्षी जावीला जुजती
कृष्ण बाळ बोले येश्वदीला
गाई फुकट दे कोनाला

आंबी भवानी बंदर भंडारीला
नाही सुमार लाथ मारली गुढग्यावर
राजी गीरजी टेकावर
गाई पिळाव्या कुठंवर
कृष्ण बाळ बोले येश्वदीला
गाई फुकट दे कोनाला

पानी पिईना साळीबाळी गाय चरंना
इसी भाऱ्याला आयकना
गजी वासरू घेईना
कमळी नाचती छनाछना

तिला घालावा लोढना
छंद चोरीचा लागला
कृष्ण बाळ बोले येश्वदीला
गाई फुकट दे कोनाला

(५)

फुलांची शेज सुंदरी
कधी येतील राजमंदिरी
भुलले ग बाई घननीळासी घेऊनी यायी
करू गत काई कृष्णाला कडेवर घेई
दारी उभी होते मी वनिता
कमरी घालुन सोन्याचा पट्टा
हातामधी सोन्याची अंगठी
शोभिती निराळ्या बोटी
भुलले ग बाई घननीळासी घेऊनी यायी
काय करू गत काई कृष्णाला कडेवर घेई
बुंदी भरून खिरीची वाटी
सोलंना मजेची आमटी
पापड लाविला ताटी
भुलले ग बाई घननीळासी घेऊन यायी
काय करू गत काई कृष्णाला कडेवर घेई

# कृष्णाचं आगळं मागणं

संग्राहिका : श्रीमती नलिनीबाई शिंदे

कृष्णानं घातली घुंबर (आकाड तांडव)
बाहेरनं आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला विंचू धरून त्याची आंगठी करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

कृष्णानं घातली घुंबर
बाहेरनं आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला साप धरून सापाचा चाबूक करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

कृष्णानं घातली घुंबर
बाहेरनं आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला चांदणी धरून चांदणीची गोटी करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

कृष्णानं घातली घुंबर
बाहेरून आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला चांद धरून चांदाचा चेंडू करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

कृष्णानं घातली घुंबर
बाहेरनं आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला सूर्य दहन सूर्याचा चक्र करून
दे मला आभाळ धरून आभाळाची गादी करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

कृष्णानं घातली घुंबर
बाहेरनं आली यशोदा सुंदर
का रे रडतो फुंदतो काय मागतोस रे बाळा
दे मला नदी धरून नदीची नाव करून
असा कसा रे दयाळा जगा परास आगळा

## श्रीकृष्णाचे मौंजीबंधन

संग्राहक : श्रीमंत आबासाहेब मुजुमदार

श्रीगणेशाय नमः
हरिहरि ऐसे जन हो म्हणा
सत्य पाप जाईल जाणा
कृष्ण द्वारकेचा राणा
त्यासी मौजी बंधन

नंद यशोदा दोघेजण
पाहती कृष्णाचे लक्षण
पिता देखुनी म्हणे जाण
मौंजीबंधन करी

साता वर्षांचा मुरारी
त्यासी करा ब्रह्मचारी
शीघ्र बोलवा आचारी
जोशी मुहूर्त सांगती
तंव ते पाचारिले जोशी
नंद पुसतो तयापासी
मुहूर्त सांगावा आम्हासी
चंद्रबळ गोमटे

पाटी घालूनी वर्तविले
उत्तम लग्न जे पाहिले
लग्न उत्तम जे रिघाले
चंद्रबळ गोमटे

नंद मनी संतोषले
थोर सोहळा पै आले
दारी मंडप घातीयेले
थोर कोड कौतुके

आमंत्रण नगरात
आले विद्यावंत भट्ट

विडे वाटिती चोखट
गंध अक्षता करिती

आले शेट सावकार
घेऊन उत्तम आहेर
गवळी मिळून थोर थोर
आहेर उत्तम करिती

नंदनवन सारिचीप्रिती
सरशा नारी गीत गाती
तंव तो मुंजीया श्रीपती
खेळविती गवळणी

नंदे बोलाविला साला
त्यासी बैसु घालला शेला
तंव त्या चतुर वृद्धबाळा
खेळविती गोपाळा ते

गोकुळग्रामी मांडीला सोहळा
वाजती मृदंग पै काळा
आणिक वाजंत्र्यांचा मेळा
झगडे मृदंगे ताळ

अष्टवर्गे जेवीती
षड्रस पक्कान्ने वाढिती
तंव तो मुंजीया श्रीपती
मातेपुढे जेवितो

दहीभात कालविती
कृष्णामुखी कवळ देती
जे कृष्णासंगे जेविती पाहो
त्याच्या पुण्या नाही नीती

आड धारिला कपडा
कृष्णराम उभा पुढा
हरी पाहे चहूकडा
मी तर अवघे देखतो

मीच उभा शयनी देखा
मजपुढे कायसाय मनीका
कृष्णरूप हे अनीका
सर्वांभूती मीच वसे

ब्राह्मण समिधा पाठविले
वेळ वगमे घेऊनी आले
घरात स्थंडील घातले
होम मांडीला नीका

चरूघृताच्या आहुती
बरव्या समीधा अर्पिती
ही तव झाली पूर्णाहुती
शांती करिती अभिषेक

कृष्णे पसरिला हात
आहुती तो खाया मागत

स्वच्छ वदन प्रकाशित
मुखी अग्नी दिसताहे

मी चराचरी देखा मनी
अग्नी प्रवेश मजपासूनी
पाहा दिव्य लोचनी
हरीरूप गोमटे

कान्हुगाईचा गोवळा
साप घालीतो वोगळा
हा तो उंडीचा भूकेला
उभ्या अन्न भक्षीतो

आमुचे कुळी धर्म थोर
संध्येनिष्ठेचा आचार
आव घाली तो आपार
अन्न खाया मागतो

घेई करगोटा कसोटीशी
ब्रह्मचारी तू बा होसी
तीर्थाटण करिसी
संध्या कारणा लागी

भट्ट तुम्ही हो आळशी
मौज वळली पाहो कैसी
कृष्णा न पुरे कासेसी
भट्टा दक्षणा थोडी म्हणूनी

भट्ट सर्व हो हासत
हरिकडे कसे पाहत
तंव तो कानी जी बोलत
आम्हा नीगुती हो सांगा

अंगीकारोनी श्रीहरी
संध्यामंत्र तो उच्चारी
पाटी बैसले आचारी
तयापुढे तो बोलतो

बोलवा हो ती यशोदा
काही सांगेल मुकुंदा
रूष का धरीशी गोविंदा
अघटित पवाडे होती तुझे

शाहण्या राहे बाऊगला
तू तर ब्रह्मचारी मला
लाडू साखरे घोळिला
खाये घाप भुकेला हवे

हाती घेऊनीया थाळा
मातेपुढे उभा बाळा
ब्रह्मचारीयांचा खेळा
भिक्षा मागतो कैसा

भिक्षा मागतो कानया
लाडू सूदले तान्ह्या

सुवर्ण पुष्प अंगोळीया
बरवी भीक्षा मागतो

म्हणा रे गोविंद गोविंद
मना लागो हाची छंद
माझे हृदयी प्रेमानंद
तीन्ही योग्यानं सोडी

कृष्णादेव हो मौजीबंधन
आनंदले त्रिभुवन
जन करिता चिंतन
पापा होय भजन हो

## श्रीकृष्णाची मुंज

*संग्राहिका* : **सौ. उषा माटे**

वसुदेव देवकी दोघेजण पाहती कान्हूची लक्षणे
पिता बोलावूनी म्हणे यासी मुंजी बंधन
कृष्णा मुंजीबंधन आनंदले त्रिभुवन
करिता हरिचे चिंतन पापा होये भंजन
देखा उद्यासला भुकेळू उभ्याच अन्न खातसे
आम्हा कुळी धर्म संध्या अनुष्ठान आचार

आता झालासे ओंगळू उभ्याचा अन्न खातसे
आठा वर्षाचा मुरारी आता करू ब्रह्मचारी
शिघ्र बोलावा आचारी जोशी कैसे बोलती
पाटीवरी वर्तविले उत्तम लगीन पाहिले
जोशी कैसे बोलती नवग्रह आयती करा
गवळी बोलावा जवळी तुम्ही करावी आंघोळी
वाजे तुरे बांधावणे टाळा मृदंग ढोल
नंदी न्हाणे ज्या घालिती सरशा नारी गीत गाती
विद्यार्थी मुंजीया श्रीपती खेळवीती गौळणी
ऐशा मिळाल्या चौघीजणी कृष्णा करती अक्षयवाण
वाजे तुरे बांधवणे टाळा मृदंग ढोल
नगरी केली आमंत्रणे सकळ जन बोलाविले
आले भले विद्यावंते सकळही वेद पढिते
आले चाट दे सोहनी उत्तम आहेर घेऊनी
थोर थोर गवळी हे मिळूनी अवचिते घेऊनी आले
सभा बैसली घनदाट हरि सुघट विघट
विड ओपिले चोखट मंत्राक्षता लाऊनी
हरि हरि ऐसे म्हणा
सकलही पापे जळती जाणा
कृष्ण द्वारकेचा राणा
त्यासी मुंजी बंधन साहा साचा
रूपयी केला आड धरिला कानीवडा

हरि म्हणे चहुकडा आम्ही उभे देखतो
एक आहे रे आम्हासी एक आहे रे तुम्हासी
एक जाऊनि सांगतो जसमती मातेसी
जवळ बोलवा यशोदा ती काही सांगेल मुकुंदा
यश धरूनी गोविंदा अनंत पोवाडे होती
थठे समिधा पाठविल्या दूध समिधा घेऊनी आले
भटे स्तंडिले हर्षे कोडे कौतुके
भट ढांईचे आळशी मुंज वळली पाहा कैशी
पहाता नपुरे गांठिशी भटा दक्षता थोडी
हाती मुंज घेऊनी मेखळा
कृष्णा उभा राहे कि जवळा
देसून प्रदोष निर्मळा पाहून घ्यावी डोळा
भटे पत्रिका वाचिली कृष्णे मुंज बांधू दिली
दंड काष्ठे आणिली तया सारिखी नोहे
एक झालेसे अपुरे म्हणुनी आणिले दुसरे
ती नव्हे तया सारिखी नवल परी मांडल्या
दंड काष्ठ ठेवा हो परते उशीर झालासे आम्हासी
भिक्षा मागे ऋषिकेशी प्रथमेची जननीये
भिक्षा मागतो कान्ह्या लाडू शुद्धले जननीया
सुवर्ण रत्ने सुवर्णामुले कृष्णा भिक्षा करिती
ऐसे म्हणतसे माता कृष्णा ऐके गा बुद्धिमंता
संध्या त्रिकाळ करी कृष्णे
नेत्रवणी प्रक्षाळिते अग्नी मुखी दावितो

मज जाणारे पासूनी अग्नी झाला मज पासूनी
उपज निपज रे जिवनी धृते आवातू असे हसून बोलली जननी
ऐशी नव्हे बा करणी अष्टवर्ग ब्रह्म भोजनी तया पंक्ती वादिले
ब्रह्मचारी हा तू भला क्षण राहे बा उगेला
लाडू साखरे घोळिला खायिगा पहिले भुकेशी
अंगी करुनी श्रीहरी संध्या मंत्र जे उच्चारी
लटके बसविले आचारी तया पुढे तो म्हणे
विस्मय वाटला भटांसी कुणी शिकविले यासी
धन्य देवकिचे कुशी
ब्रह्म उदरा आले सायी सुधीची देवेळे नंदे केली ब्रह्म भोजने
चरू धृताचे आवन कृष्ण आदरे करी माझे गोपाळ सवंगडे
मज बाहलीला पुढे दे गे माते घोंगडे आणिक पावा मुरली
चौदा विद्यांचे दैवत गोकुळी आहे बा खेळत
एक वाहती सुवर्ण कमळे एक वाहती तुलसी दळे
फळ घ्यावे नारायणासारिखे भोगिता बंधन
आनंदले त्रिभुवन
करीता हरिचे चिंतन
पापा होये भंजन
हरी हरी ऐसे म्हणा सकळही पापे जातील जाणा
कृष्ण द्वारकेचा राणा त्यासी मुंजी बंधन

# अंगी

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

कृष्णा लोळण जी घेतीली
आमा अंगी जी शिवावी
काढले गजनी दिंड
काढल्या सोन्यायाच्या सुया
काढले रेशमाचे दोरे
गेले शिंप्यायाच्या आळी
आरं तू शिंपी नामदेवा
अंगी शीव नानापरी
श्री नाम दे शिवऱ्यावरी
मुंगळे काढा भुजेवरी
चांद सूर्व्या छातीवरी
गरूड पक्षी पाटीवरी
अंगी घालून सावळा
दिसे मदन पुतळा
आला आपुल्या वाड्याला
गाई गोधन सोडीली
गेला जमुना नदीला
डाव चेंडूचा मांडीला
डाव आला कृष्णावरी
फर फर अंगी जी काढिली

नेऊन खडकाव ठेविली
अकस्मात वायदळ आली
अंगी वाऱ्यानं गेली
कृष्ण रडत फुंदत
आला आपुल्या वाड्याला
येश्वदा माता बोलती झाली
कृष्णा अंगी काय केली
आल्या काशीच्या कावड्या
अंगी दानाला दिली
लेक न्हवं तू वयीरी
मुंगळे काढले भुजवरी
चांदसूर्व्या छातीवरी
गरूड पक्षी पाठीवरी

### झिम्म्याचे गाणे

याहो या रूक्मिणी आमुच्या या आळी
हिरामोराची तुमची काचोळी
हिरा मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी वसली पंढरी
पंढरपूरचा दामाजी सोनार
त्यानं घडविलं जोडव्याचं ज्वाड
एका जोडव्याला साडेतीनशे मोती
न्हाई रूक्मिणीचा पांडुरंग पती

याहो या रूक्मिणी आमुच्या या आळी
हिरामोराची तुमची काचोळी

हिरामोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी वसली पंढरी
पंढरपूरचा दामाची सोनार
त्यानं घडविलं पैंजनाचं ज्वाड
एका पैजनाला साडेतीनशे मोती
न्हाई रूक्मिणीचा पांडुरंग पती

याहो या रूक्मिणी आमच्या या आळी
हिरामोराची तुमची काचोळी
हिरा मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी वसली पंढरी
पंढरपूरचा दामाजी सोनार
त्येनं घडविलं बांगडीचं ज्वाड
एका बांगडिला साडे तीनशे मोती
न्हाई रूक्मिणीचा पांडुरंग पती

(हे गीत याप्रमाणे सर्व दागिने संपेपर्यंत असेच लांबते.)

### फेराचे गाणे

न्हाईबाई जोडवी मोडुनी
दयाबाई चेंडूजी गुंफूनी
आगाशी मणी माळ ग
कृष्णात घेत्याती लोळूनी
न्हाईबाई पैंजन मोडूनी
दयाबाई चेंडूया गुंफूनी

आगाशी मणी माळ ग
   कृष्णात घेल्याती लोळूनी
म्हाईबाई बिलवर मोडूनी
   दयाबाई चेंडूया गुंफूनी
आगाशी मणी माळ ग
   कृष्णात घेल्याती लोळूनी
म्हाईबाई पाटल्या मोडूनी
   दयाबाई चेंडूया गुंफूनी
आगाशी मणी माळ ग
   कृष्णात घेल्याती लोळूनी
कृष्णात झिम्मा घालीतो
   गोण्या गुलाल उधळीतो
तुझा गुलालाचा भार
   माझी जोडवी झाली लाल
जाऊन येशवदेला सांग
   कृष्णात झिम्मा घालीतो
कृष्णात झिम्मा घालीतो
   गोण्या गुलाल उधळीतो
तुझ्या गुल्लालाचा भार
   माझं बिलवर झालं लाल
जाऊन यशवदेला सांग
   कृष्णात झिम्मा घालीतो

# चुटका

संग्राहक : बाजीराव पाटील

सुदं (चांगलं) सांगाना साजनी कुठी गेला चक्रपानी
त्याच्या मनगटी पवई लटका
मले लागून गेला चटका
त्याच्या खांद्यावर जरतारी पटका

दारी सारवत होती चूल
तिकून खेळत आले मूल
त्याच्या हाती दिले मी फूल
त्याचा जवाई मोती एक लटका
त्याच्या खांद्यावर जरतारी पटका

उभी होती मी कयंबावनी
तिकून आले ग सारंगपानी
पितांबराची कुचवे दोनी
मुरली वाजवी मंजूळ वानी
त्याच्या खांद्यावर जरतारी पटका

उभी होती मी कयंबा काठी
तिकून आले होते जगजेठी
त्याच्या मनगटी पवय लटका
त्याच्या खांद्यावर जरतारी पटका

# राधिका

संग्राहिका : सौ. विजयादेवी सा

चिकणी सुपारी कात हो केवड्याचा
हाती पक्की पाने चुना मोतीयाचा
रूमालात घेऊनी राधा निघाली
अशी कृष्णाजीच्या महालात गेली
कृष्णाजी कृष्णाजी शेज करा निराळी
का तोडली माझी मोत्याची जाळी
अग राधिके आज का रूसलीस
पलंगास्थळी जाऊनी बैसलीस
पलंगास्थळी शेज चाफेकळ्याची
उद्या आणीन आण तुझ्या गळ्याची
असे वाटते राधेला कन्या व्हावी
सरी साखळी घालुनी खेळवावी
असे वाटते राधेला पुत्र व्हावा
कडी करदोटा घालुनी खेळवावा
असे चांदणे पडले पोर्णिमेचे
राधा लुगडे नेसली भरजरीचे
चोळी घातली हिरव्या तापत्याची
वेणी गुंफली शेवंती मोगऱ्याची
ओटी भरली खारिक खोबऱ्याची
अशी राधिका कृष्णाजी नेटक्याची

# सुदाम्याचे पोहे

संग्राहिका : सौ. सुलोचना फडके

सुदामा ब्राम्हण होता तो दुर्बळ । घरी चित्ती गोपाळ । दीड घरी तयाचे ।
रित्र ऐका सावधान ।। तेणे जन्ममरण दूर होती । सत्वाचा सागर । धैर्याचा
दार। भक्तिवानी धरी तयापाशी । ऐसा तो ब्राम्हण दारिद्रे पीडीला ।। परी
नरे देवाला। अखंडीत नाही धड धर । केवळ जर्जर चंद्र प्रभाकर। उगवती
ष्णे पोळे। वारा येतसे भरारा । मेघाचीये धारा धरा ।। माझी एके दिनी
ार्या भावे हात जोडी । भ्रताराच्या पुढी नम्र तेणे । तुमचा सोयरा आहे
ारायण । अखंडीत ध्यान करिता त्याचे । बालमित्र भेटी लवकरी जावे । तो
ाहे कैवारी दीनालागी ।। ऐकता वचन मानीले तयासी । पुढे कल्पनेसी
र्व नाही । तेथे नामा जावे कैसे हे न कळे । नीवतील डोळे दर्शनाने । परी
या भेटी न्यावे काहीबाही । परंतु ते नाही देशावरी ।। सुदामा ब्राम्हण
ायकोस म्हणे । रिकाम्या हाताने लाज वाटे । पाहे चहुकडे धुंडोनी । सुंदरी
ळी मुट्टी चारी तांदुळीका । तेची भक्तिभावे पतीपुढे ठेवी ।। पाहुनी गौरवी
ाम्हण । तू तया नावे योग्य पदार्थे प्रेमे करी । अति कृष्णदेव पोव्हे बांधावया ।
स्त्र ते फाडीलेल्या माजी बांधीले कसे तरी ।। सुदामा ब्राम्हण आनंद पावला ।
हूर्ताने मला प्रयाणाचा द्विज । म्हणे जाता मनी कैसा भेटे चक्रपाणी । काय
ाईल नकळे म्हणूनी । हृदई कळवळे ।। केवढा त्याचा राज्यभार । मी तो
वळ फकीर। येईल का आठवण बालपणाची ।। माझे नाव तैत होता
वळ्याघरी । आता त्रैलोक व्यापी काले । तयाने देखीले द्वारकानगरी ।। दिसती
ीस ते लांबती मोतीयाचे । सभा ते साजरी रत्नसिंहासनी । देव चुडामणी
ोभतसे देवाचीये दारी । नाही आडकाठी हे तो आहे गोष्टी । सिद्धांताची ।।
टस्थ जाहला । चालला सत्वरी । तो मुखी नामे गात गोविंदाचे ।। देखीला
ुदामा आपुल्या नयनी । मग चक्रपाणी उठे त्वरे । सिंहासनाखाली टाकूनिया
डी । करद्वय जोडी नयनालागी ।। भेटुनिया तेव्हा धरीला मस्तकी । बैसवी
ंचकी सोनीयाच्या ।। म्हणे रूक्मीणीसी आणू उदकाला । पूजू ब्राम्हणाला

सन्मनाने ।। पट्टराण्या तेव्हा उटणे लावीती । आऊक्षवान आरती करीतात
करवीले स्नान दिले पीतांबर । तैसे अलंकार नानापरी ।। काय वहिनं
दिधले आम्हासी । हे तो गोष्टी म्हणे कृष्ण । सोडियले तेव्हा मुठी तां
रूक्मिणी नायका पुढे ठेवी ।। घेऊनीया पोहे मुखामाजी टाके । ते भीमकी
धरी । भक्षुनिया पोव्हे संतुष्ट जाहला । मग आनंदला नारायण ।। तेव्हा अ
केली । क्षणात रचली सुदामपुरी । सर्व सुवर्णाची द्वारकेप्रमाणे । ब्राम्हण
दाने गुप्त दिली ।। सुदामा म्हणे आनंता । आम्हा आज्ञा द्यावी आता । उ
घरासी सत्वर । येऊनी दिवस झाले चार ।। सर्व ठेवूनी जावे बरे वा
मारीती मस्करे ऐसी ऐकुनी वचने । सर्व काढीली भूषणे । आज्ञा घे
चालला । देव बोळवीत आला ।। नाही आमुचे दैवी । त्याने कैसे द्यावे । क
का रूसावे देवावरी ।। धरीता न खेद पुढे वाट चाले गवळी । भेटले तयाल
पुसतसे ।। त्यांनी कोणाचे नगर ते म्हणती घर सुदाम्याचे । सुदामाही ते
मंदीरासी गेला । मग ओवाळीला सुंदरीने ।। समाधानी झाला सुदामा । ब्रा
करा रे कीर्तन सुदाम्याचे ।।

# चिंधी

संग्राहिका : सौ. ताराबाई

द्रौपदी भगिनीवरती प्रीति । अधिक कारे कृष्णा अधिक कारे ।।
तुझी ही भगिनी सुभद्रा असे । प्रेम अधिक मग तिजवर कैसे ।
कधी कारण मज गुह्य जरी । असे नंदबाळा ।।
ऐकुनि वच हे निज भगिनीचे । बोट कापिले म्हणे आमुचे ।
जाऊनि भगिनी चिंधी । मागे नारदा रे ।।
जाऊनी सत्वरी सुभद्रा गृही । बोट कापले सांगे तिजही ।

देई देई चिंधी थोडी । विलंब ना गे लावो विलंब ना गे ।।
चिंधी पाहुण्या वेळ नसे मज । शालू पैठणी आणली आज ।
कैशी फाडून चिंधी । चिंधी देऊ नारदा रे ।।
येउनि सत्वरी द्रौपदी गृही । बोट कापले सांगे तिजही ।
देई देई चिंधी थोडी । विलंब ना गे लावी विलंब ना गे ।।
ऐकता क्षणी पदर जरीचा । फाडुनि बोले लावू आता ।
वेगे येऊनी बांधी बोटी । ती स्वकरे भगिनी ती स्वकरे ।।
पाहुनी प्रीति द्रौपदीची । कृष्णा म्हणियले धन्य भगिनीची ।
ऐसी भक्ति तैशी प्रीति । तुझी प्रभु रे आहे तुझी प्रभु ।।

## द्रौपदीचा धावा

दुष्ट दुर्योधन कुळकुळीत कसा ग जन्मला । द्यूत खेळूणी आरी आणीले पांडवाला । दुष्ट हा शकुनी दुष्टबुद्धी शिकवी कपटाला । सापळा ग एक गाईला । पाजी वासराला ।। सोडिला वाण शद्राशी । चढे गुणाला पाही अंतरी । कळ काढी माया प्राणाला । लागली ग चिंता शरण जाऊ कोणाचे पायी । धाव रे कृष्णा श्रीरंग माझी आई । संकटी पडले मी एकदा भेट मज द्यावी ।।

धरोनी मृदुवेणी दुःशासन हासडून पाडी । फरफरा ओढीत ग नेत असे सभेत तातडी । डाव्या अंकावरी बैस म्हणी तो जोडी । नको ग धरू ममता भलत्याची आशा सोडी । धावोनी ये दयाळू वत्सला संकटी । येई नको सख्या गुंतू कोठे अयोध्या राहिली थोडी । वस्त्रहरणाचा कैफ मांडिली सारी घाई । संकटी मी पडले एकदा भेट मज द्यावी ।।

क्षीरसागरीचा विलासी मोठा ध्यानी मनी । अजून कसा ग येईना सावळा चक्रपाणी । रंगमहाली नेला असेल सत्यभामानी । वाट बघून शिणती नेत्र माझे दोन्ही । होईल रे हानी । सख्या सोडीव येऊनी । संकटी मी पडले एकदा भेट मज द्यावी ।।

न सोडी सत्व तो धर्मराज गंभीर। भीम अर्जुन भाकले गुंतले शूर । नकुल सहदेव रणी भैरव वीर आनीवार । न बोलता म्हणती रागावला ईश्वर । न अधी भीष्म द्रोण आला विदुर। सभा लोक पाहे टकमका । थोर थोर एकली मी आहे ह्याला गत करावी काई। संकटी मी पडले भेट मज द्यावी ॥

ऐकोनी इतके गहिवरले जगजीवन। कोण्या वेडयाने गांजिली माझी हरण। ऐकोनी धावा मनी योग टाकोनी । नाभी नाभी शिष्याचा ऐकोनी । खवळले प्रेम अंगाचे झाले स्फुरण । सावरल्या जाई जुई । संकटी मी पडले एकदा भेट मज द्यावी ॥

दुर्योधनाने हासडिता निरी। फेडिली पहिली सोनेरी । चटक अंजेरी फेडली दुसरी शेलारी वैंजापूरी। फेडली तिसरी पुन्नड नाग भरजारी। हिरवा दोरवा कंचुकी। गौरूपटयावा नेसली चुमा खंबाईत हिरवी जाई। संकटी मी पडले एकदा भेट मज द्यावी ॥

सोडिला दिंड काढिली बोभाटाची खजोरी डाळिंबी। काळी चंद्रकळा झळझळी। गुलाबी हिरवी वाणपुरीची खंजूरी । डाळिंबी सेवराला म्हणोनी आपला पितांबर झाकी। भेटला मजला देव श्रीहरी । द्रौपदीला हर्ष झाला धाव रे धाव श्रीरंगे माझे आई। संकटी मी पडले एकदा भेट मज द्यावी ॥

## टिपऱ्याचे गाणे

नर्तनाची प्रार्थना   नमन करू गजानना
पार्वती सूतनंदना   देव टिपरी खेळू कुंजवनी
प्रथम राजा   येऊनी टिपरी माझी घेऊनी
कृष्ण सन्मुख लाजूनी   देव टिपरी ...
सीता करीती रोदना   काय करू मी या वना
वेध लागला मना   देव टिपरी ...
श्रवण कुंडल पैठणी   वाणी गल्ली ठिकाणी
समू लगेची कल्पनी   देव टिपरी ...

गोकुळात जाऊनी  गौळणीशी बोलावुनी
दही दूध खाऊनी  देव टिपरी...
गौकुळात जाऊनी  गोपाळ गोप्या मिळवुनी
गाया चारतात वनी  मधुर पावा वाजवुनी
देव टिपऱ्या खेळू कुंजवनी ...

## दुर्वासाचे भोजन

एके दिवशी हस्तिनापुरास आले दुर्वास
आदर त्यासी त्यासी बहु केले ग दुर्योधना
वसविले सिंहासनी नेऊन
अशी सेवा सेवा मनोभावा
भाव काय केला कावा करी मनामध्ये
योजना केली भक्ती सहा महिने संपूर्ण
स्नान करूनी, झारी भरूनी, खाली बघुनी,
धार धरूनी केले केले चरणप्रक्षालन
झाले ऋषिराज प्रसन्न मग म्हणे
मग बोले दुर्योधन द्या मजला एक वचन
दिले ऋषींनी ततक्षण काय मागितले दुष्टाने
येथे आहे एक काडी कवन
तेथे पंडूचे नंदन धर्म द्रौपदी भीमसेन
नकुल सहदेव अर्जून रात्र होऊ द्या प्रहर दोन
तुम्ही जाऊन इतकेजण मागा तयासी भोजन
जरी अन्नमाग केला तयाने तत्घडी शाप देऊन भस्म करी
जय जय जगदीश्वरा, पूर्ण भास्करा, दयासागरा
की विश्वंभरा, नंदकुमारा, शामसुंदरा, सख्या गिरीधरा,
की धाव मनोहरा, चाला दुड दुड ये लौकरी
मजवरी कृपा करी श्रीहरी
दुर्वास म्हणे दुर्योधना

तुझ्या रे मनीची मनकामना
पूर्ण करीन मी ऐक सुयोधना
तयारी केली की काङ्ग्लिक वना
निघाले तेथुनी अति सत्वर
सवे अठ्ठाविस हजार दळभार
निजले होते पंडुकुमार
रात्र होऊ दिली भली दोन प्रहर
मिळूनि सकळीक एकंदर
वेढिली गुंफा हो चौफेर
अवघ्यांनी केला गजर हर हर
जागा झाला धर्मराज
करतो खूण बसा महाराज
कोणते कार्य काय लागली गरज
का दया केली मजवर गरिबावर
दुर्वास म्हणे धर्मासी
काही एक जात होतो कार्यासी
मार्ग चालता झाली निशी आहोत उपवासी
आम्हाला भूक लागली फार
वाढा जेवाया सत्वर भाकर
गेला धर्माचा आवंका
द्रौपदी म्हणे भिऊ नका
स्नान करा म्हणा सकळिका मी लागते सैपाका
बोलली पतिव्रता उत्तर
आता काय करू विचार
मग जाऊन वृंदावनी
बैसली आसन घालुनी
गेली निद्रा वरी लागुनी
काय आठवी अंतरातुनी

ये कृष्णा ये साजणी
कुठे गुंतलास मायबहिणी
तू माझी कुलस्वामिनी
मी पडले महा अडचणी
जशी फाशामध्ये हरणी
पडले अवचित येऊनी
जरि न येशिल धावा ऐकुनी
सत्वाची होईल हानी
तो द्वारकेचा धनी नुक्ता पिताबर नेसुनी
बसला होता ग साजणी
आला ग धावत चक्रपाणी
हाका मारी जय जय
मजवरी कृपा करी श्रीहरी
श्रीकृष्ण म्हणे द्रौपदी
कराया कारण माझी स्तुती
काय संकट पडले तुजप्रति
नाही रे धडगति काय सांगू रे बाबा तुला
नको गुंतू रे बोलायला आजला
ऋषी गेले आहेत आंघोळीसी
आता ते येतील भोजनासी
काय वाढावे मी इतक्यांसी
म्हणुनि हृषीकेशी सावळ्या तुझा मी धावा केला
एवढी माझी लज्जा नाही तुला
श्रीकृष्ण म्हणे तुझा मी भाऊ
आधी तू मला घाल ग जेऊ
ऋषींचे कार्य पुढे मग पाहू
आधी तू संतोष कर ग मला
मग सगळे लाव कामाला

राबला मग फारच चिंताग्रस्त
मोठ्याने आक्रंदत फुटले माझे संचित
नका भिऊ माझी मात
हात घालुनिया थालीने
काढीलं भाजी पान
वाढाया आपुली कीर्ती होईल याने पूर्ती
ते टाकले मुखात
दिली ढेकर झाला तृप्त
मग अन्नाचे पर्वत पाडले असंख्यात
अजुनि का ऋषी येईनात नदीवरूनी
श्रीहरी मजवरी कृपा करी
तिथेच ब्राम्हण तिथेच द्रौपदी
तिथेच सैपाक तिथेच यदुपती
न कळे कोणास याच्या गती
पाडिले ग अन्नाचे ढिगारे
नाना परीचे प्रकार सुंदर
दहीभात, वडे, खीर, पोळ्या,
घारगे, पुऱ्या, काय भाज्या चिरल्या
मोकळ्या तूपसाखर दह्याच्या डिखळ्या
अशी नावे घेऊ मी कुठंवर बैसले ऋषेश्वर हरहर
परब्रह्म अन्न चोखट
इच्छिती श्रेष्ठांची ती श्रेष्ठ
खाता खाता दमले चट
तरी त्या अन्नाची अशा न सुटे
भोक जरी असते रे माथ्यावर
आणि एक पक्का अच्छेर जेवीत रे
चट भोजन उरकले हात धुतले विडे घेतले
जाऊनि पसरले गडगड लोळती वाळूवर

फिट फिटुन गेली धोतरं नाही खबर
असा श्रीरंग कवटाळी
त्याने तिकडल्या तिकडेच केली
हाक भीमाला मारली भीमाने आरोळी दिली
उठा उठा पात्रे टाकली द्रौपदी खोळंबली
ऋषी अवघे चपापले
अजुनि तोंड नाही वाळले
तोचि बोलावणे आले गोष्ट दुर्वासा कळाली
त्याने अंतर्यामी शोधली बुद्धि नष्टाची ऐकली
काही बरी नाही झाली
जरी द्रौपदी क्षोभली
इथे नाही रे आमुचा वाली
अशा देशामध्ये पडली
त्याने मागेच्या मागे केली झुभापुरी
मजवयी कृपाकयी श्रीहरी
परतुनी आले वृकोदर
त्यासी पुसू लागले जगजीवन
आजुनि ऋषी आले का नाही रे
स्नाने तरी झाली की नाही रे
भीम चकित होऊनी उभा राहिला
मी गेलो होतो त्यासी बोलावयाला
ते म्हणाले आता घातले जेवू
आणिक का आलास पुन: बोलावू
कर कर लागले दातभी खाऊ
आम्हाला मारूनि तरी टाकारे
ते गेले पळून चट सारे माघारे
भीमाच्या मनी उमजले
आम्हाला जरा नाही कळू दिले

तिकडल्याच तिकडे समजावले हे अन्न रे वाया गेले
तुम्ही आम्हा काय जेवूया रे
सवे घेऊनि पाच मूर्ती
बहिण द्रोपदी सातवी कुंती
आठवा आपण स्वंये श्रीपती
जेविली ग बहु प्रीत केली
जशी बालांकसि माउली रक्षिली
द्रौंपदी पांडव अंगना लागले हरीच्या चरणा
काय करिते विज्ञापना
आली आमुची करूणा
श्रीधरा मधुसूदना अच्युत जनार्दना
पूसनसुता नंदना भूल पडली अठरा जणा
तुम्ही श्रीहरी का आठवाना
पापाचा होतो चुना
कर जोडुनि करी प्रार्थना मुरारी
जय जय मजवरी कृपा करा श्रीहरी

## कृष्णाचा विनोद

तेव्हा तो कोण्या एके दिवशी। रुक्मिणी बोले हरिसी। कृपा करूनि आधी मज सांग। विडा देईन मग। शेजी तुम्ही धीराचे आहा। परंतु तुम्ही का हो काळे मी गोरी। तुम्ही थोराचे आहा परंतु। नंदराणीने बाळपणाशी काळे लाविले गालासी। नाही पुसिले तसेच राहिले। गुंतलो भक्ता काजांसी ॥

कृष्ण म्हणे मी सूत गवळ्याचा। मजवर धुरळा त्रिभुवनाचा। शिशुपाल वर योजिला। मी काय गडचा तुझ्या कामाचा। तुम्ही थोराचे बल्लव। म्हणे अंगे सुंदर। तुळशीमाळा जड झाल्या। पूर्वी हा वर योजिला। भ्रतार येईना तुझ्या मना। तुम्ही थोराचे आहा परंतु ॥

इतके भाषण ऐकून। रुक्मिणी लोळे धरणीला उठून। धरी हृदयी सहज बोललो मी तुला। तुम्ही थोराचे आहा परंतु। तुम्ही काहो काळे मी गोरी। तुम्ही थोराचे आहा परंतु ॥

## विंचू

सहज उभी मी अंगणी। हर्षवंत मनी सर्व शृंगार करूनी। पितांबरा नेसुनी। रंगीत कंचोळी शिकोळा उभी ग चित्रशाळा। खांब कवळीला तिथंच विंचू होता। त्यानी मज डंखीले। विंचू करितसे मज कष्टी। कळ घ्यावी मनगटी। बावन चंदन शिरसोनं। जडित्राचं लेणं। माळ चिमण्याची असावी। याला गत करू कैसी। भेटी मदनाचा पुतुळा। ऐशी शिवतकळा। विंचू उतरा गे साजणी। आणावे चक्रपाणी। विंचू उतरा गे ।।

विंचू नव्हे ग तो काळजीव। माझा व्याकुळ सुटली गळगाठ। मोकळे मुरशान मंडयळी। विंचू उतरा गे ।।

सूर्य उगवला आकाशी। तो आणा मजपाशी। त्याने होतैसे उबारा। विंजन वारा घाला। विंचू उतरा गे तयासी ।।

विंचू-विंचू बाना विंचाने डंखिले। राजहंस संख्यानो घरी शाम आले। झडकरी जागा आणाजी कृष्णाजीला। ऐसी राधिका हासत बोले मंद चाले। विडा बनविती सत्यभामा। देवा मेघःश्यामा तुमचा तांबूल। राधाला प्रसाद गोविंदाचा ।। विंचू उतरला। तयाचे चित्त नेले चोरूनी। विंचू उतरला ।।

## कृष्णाचे गाणे

पदरी तूं उदय चंद्राचा वनी। हृदयी उभा गवळणीचा। सुगंध सुटत सुमनांचा। ये पवन मलयागिरीवराचा। हा थाट उभा रासांचा। धरूनी हस्त राधेचा। श्रीरंग कुठे आजी जावा हृदयीचा। तो प्राण विसावा। मुरलीधर आजी कुणी दावा हृदयीचा। तो प्राण विसावा कुंजात असेल प्रभु बसला यदुपती। आम्हावरी रुसला मग विचारती। तुळशीला माला किती। अम्र बकुळीला तुम्ही कुठे कृष्ण पाहीला। ठकवोनी गोपींना गेला। तो मदनतात हरी यावा। हृदयीचा तो प्राण विसावा। मुरलीधर आज कुणी दावा।

## श्रीकृष्णाची गाणी

संग्राहिका : सौ. अन्नपूर्णाबाई जो

( १ )

येश्वदेबाई तुझ्या दुर्गुणी मुलाला करू काय
घरात शिरूनी चोरूनि खातो दुधावरील साय
पराई पोरे जमवूनी सारे शंभरदा करी येरझारे
प्रसंग पाहुनी करितो चोरी अवगुण याचे न जाय
धेनुवत्से सोडुनी देतो गेली म्हणूनी आम्हा पळवितो
शिंक्यावरची दहीदुधाची मडकी फोडूनी जाय
या कृष्णाला बांधुनी टाका किंवा यमुनाजळात लोटा
राधा म्हणे हा कृष्ण नाटकी पूर्ण ब्रह्म यदुराय

( २ )

सुप्रभाती थोडे तरी रे दूध घेई प्रभुवरा
दूध घेई प्रभुवरा रे नयनशामा सुंदरा रे
दूध घेई प्रभुवरा
षड्रिपुशी जाळियेले भक्तीने दूध तापविले
प्रेमभरे आटीविले घातियली शरकरा
दूध घेई प्रभुवरा
सत्पात्रा धरूनिया करी उभी येश्वदा सुंदरी
आता घेई बा श्रीहरी विनविते किंकरा
दूध घेई प्रभुवरा

शांत व्हावयासी मजला मान देई या विनंतीला
आजी भाग्योदयची झाला
दूध घेई प्रभुवरा

( ३ )

घ्या गे घ्या गे घ्या गे कुणी घ्या गे
ह्याच्या हाताचा वेणु कुणी घ्या गे
गृही आपुल्या करीत होते धंदा नंदाचिये नंदा
तल्लीन झाले मी मुरलीच्या नादा
गृही सासुरवास मला भारी
जावा नंदा गांजिती परोपरी
ह्या मुरलीने ठकविले पोरी
वेणु नव्हे हे विष मला वाटे
वेणु ऐकता भ्रांती मनी दाटे
महादेवाची मूर्ती कधी भेटे
सासू की सासरा म्हातारा
त्याने केला जिवाचा कैवारा
तान्हे बाळा टाकूनि आले गृहा हारी

( ४ )

नंद बाल गोपाल हरी । जाऊ दे आम्हाला
गौळणी आम्ही सासुरवाशी । जातो मथुरे बाजाराशी
नित्य आमुच्या खोड्या करिसी । सांगू आम्ही नंदाला॥
बाजाराचा घ्यावा कर । मग आपुला रस्ता सुधार
त्यात एक गोपी सुंदर । त्यात एक राधा सुंदर

पाहुनिया कर धरिला ॥
तुझे रूप मोहक फार । कासे शोभे पितांबर
भक्तासी एक वार । दासासी एक वार
दर्शन दे जगताला ॥

### गौळण

हरी माझा काळा निळा संगे गोपाळांचा मेळा
त्येच्या हातीचा वेनू
कुनी घ्या ग घ्या ग
हरी माझा किती छान जसं केवड्याचं पान
हरी माज्याच्या अंगी गोडी चालताना डोळे मोडी
करी गोकुळात खोडी
हरी माजा किती धट धरी मथूरेची वाट
कुनीकुनी आक्रूज आला
माज्या हरीला घेऊन गेला
आक्रूजानं उद्धव पाठविला
येश्वदीचा समाचार कळला
मन न्हाई त्या संसारी सर्व चित्त हरीवरी
खेळ बघुनी झुरतो जिवू कुठे ग हरीला पाहू

# राजसूय यज्ञ

संग्राहिका : कु. विद्या देसाई

पंडूचा निरोप नारदांनी सांगीतला
राजसूय-यज्ञाचा धर्मराजाने बेत केला
धर्म म्हणे अर्जुनाला तुम्ही जावे द्वारकेला
राजसूय-यज्ञासाठी आणावे माधवाला
सोन्याच्या नांगराने पृथ्वी नांगरीली
राजसूय-यज्ञासाठी धर्मराजाने जागा केली
द्रौपदीचा निरोप लागे अर्जुनाच्या कानी
सोळा हजार अष्ट नायीका कृष्णासहित रुक्मिणी
अर्जून गेले द्वारकेला थोर आनंद झाला मनी
आत रामकृष्ण पाहिले सिंहासनी
अर्जुन गेले सभेला समोर जगजेठी
नरनारायणाच्या गाठी फार दिवसांनी झाल्या भेटी
अर्जुन बोलावितो छपन्न कोटी यादवाला
प्रद्युन्म अरिरथ्य तुम्ही सारेजण चला
देव म्हणे बळीरामदादा बरोबरी चला
राजसूय-यज्ञाचा धर्मराजांनी बेत केला
रुक्मिणीकडे पाहुनी हासले चक्रपाणी
राजसूय-यज्ञासाठी चला तुम्ही साऱ्याजणी
कुटुंबासहित रामकृष्ण कोठे जातो
धर्मराजाच्या घरी राजसूय-यज्ञ होतो
सोन्याच्या रथात रामकृष्ण बैसती
हस्तीनापुरी जाता रथ पालख्या होत्या कीती
मोतीयाचा तुरा पडला वाटेवरी

राजसूय-यज्ञासाठी तातडीने आले श्रीहरी
अंबारीचा हत्ती उभा केला महाद्वारी
राजसूय-यज्ञासाठी तातडीने आले श्रीहरी
धर्म येवूनी सामोरी रामकृष्णाचा मान केला
धरून देवाचा हात यज्ञ मंडपात चला
द्रौपदी सुभद्रा येवूनी रुक्मिणी सामोरी
देऊनी हळदी कुंकू साऱ्यांचा मान करी
देव आले मंडपात द्रौपदी पाय धरी
पद्‌माचा उजेड पडला चुडयावरी
द्रौपदी सुभद्रा कर देवाला नमस्कार
दिला चुडयाला आशीर्वाद मनी हासले यदुवीर
राजसूय-यज्ञामध्ये सारे ऋषी बोलवीले
वसिष्ठ वामदेव कपील महामुनी आले
राजसूय-यज्ञासाठी कामे दिलीत नेमुनी
देव नारायण उभे कंबर बांधुनी
राजसूय-यज्ञामध्ये दुर्योधन कोठीवरी
नाथमच्छींद्र त्याच्या उजव्या हातावरी
आकाशी मंडप सुरूचे दिले खांब
राजसूय-यज्ञाचा केला धर्मराजाने आरंभ
अग्रपूजेला आले हरी उद्धव अक्रूर हात धरी
राजसूय-यज्ञाची सभा उठुनी उभी सारी
नकुल म्हणे द्रौपदीबाईला
राजसूय-यज्ञासाठी धर्मराज खोळंबला
धर्मराज धुतो पाय द्रौपदी घाली पाणी
अर्जुन म्हणे नकुलाला अग्रपूजेचे ताट आणी
हिऱ्यामोत्यांचे अलंकार वर तुळशीचे हार
द्रौपदी दृष्ट काढी देवाची वारंवार
सुगंध चंदन भीमसेनाचे हाती

पाची पांडवात द्रौपदी उभी होती
द्रौपदीबाई माझी धर्मराजाचे शेजारी
गंध अक्षदा लावोनी पूजा केली ती साजरी
राजसूय-यज्ञ धर्मराजाचे घरी झाला
अग्रपूजेचा मान देवा गोविंदाला
राजसूय-यज्ञ धर्मराजाचे घरी
देव नारायण अग्रपूजेला अधिकारी
रुक्मिणी येवूनी द्रौपदीला न्हाऊ घाली
हिऱ्यामोत्यांची काचोळी पैठणी हाती दिली
हिऱ्यामोत्यांची काचोळी द्रौपदीबाई ल्याली
राजसूय-यज्ञामध्ये करी आहेर वनमाळी
सुभद्रा नेसती पिवळा पितांबर
राजसूय-यज्ञामध्ये केले कृष्णांनी आहेर
राजसूय-येज्ञामध्ये सभेला झाली दाटी
धर्मराजाला आहेर करितो जगजेठी
राजसूय-यज्ञामध्ये सभेला रीघ नाही
धर्मराजाला आहेर करितो शेषशायी
राजसूय-यज्ञामध्ये सभा दिसती तांबडी
द्रौपदीबाई माझी पांघरली शालजोडी
होमशाळेला मोती पोवळ्यांचे घोस
द्रौपदीबाई माझे अग त्रिवेणी खाली बैस
राजसूय-यज्ञामध्ये वाजंत्र्याचा गजर
धर्मराज द्रौपदीला राजे करीती आहेर
शंकर म्हणे पार्वतीला यज्ञाला दोघे जाऊ
धर्मराज द्रौपदीला आहेर होतो तो पाहू
राजसूय-यज्ञामध्ये धर्मराज हार्षीक
प्रसादाला आले मिथुलापुरीचे जनक
राजसूय-यज्ञामध्ये द्रौपदीबाई वाढी

करूनी ब्राह्मणाची पूजा धर्मराज हात जोडी
ऋषींच्या पंगतीला जेवीती कोण कोण
वशिष्ठाची आरूंधती लोपामुद्राला बोलावणं
ऋषीच्या पंगतीला वाढीती दोघी सया
द्रौपदी रखमाबाई नणंद भावजया
ऋषींच्या पंगतीला द्रौपदी वाढीती
देव विमानी पाहती जशी वीज चमकती
राजसूय-यज्ञामध्ये स्वर्गी घंटानाद झाला
राघूच्या रूपाने शुक प्रसादाला आला
स्वर्गीची घंटा वाजते खणखणा
धर्मराजाचे घर शुक बैसले भोजना
राजसूय-यज्ञामध्ये स्वर्गी घंटानाद होतो
कृष्ण म्हणे धर्मराजा शुक प्रसाद वेचीतो
राजसूय-यज्ञामध्ये नित्य ब्राम्हणाच्या ओळी
देव नारायण अंगे काढीतो पत्रावळी
राजसूय-यज्ञामध्ये उचिष्टांची लगवग
देव नारायण मोहनमाळ टाकी मागं
राजसूय-यज्ञामध्ये धर्मराज पुण्यशील
पांडवाचे भाग्य थोर काढी उचिष्ट घननीळ
रूक्मिणी येऊनी म्हणे द्रौपदीबाईला
पाची पांडवांची नावं घ्यावीत सभेला
पाची पांडवात धर्मराज पुण्यवान
द्वारकेचे घरी पाठीशी नारायण
साती समुद्राचा पृथ्वीला पडला वेढा
अर्जुन भीमासारखा नाही जोडा
वहिनी तुम्हाला सांगते पाची पांडवात नकुल रूपवान
जसे पौर्णिमेचे चांदणं
सात्वीक सहदेव कीर्ती त्याची दूरवरी

राजसूय-यज्ञामध्ये दक्षणा दिली सारी
सुभद्रा नाव घेती नका करू गलवला
कृष्णानी मला दिली संन्याशाला
अर्जुन म्हणतो मला संन्याशी कोणी केलं
सुभद्रेनं नाव घेतलं देवा तुम्ही ऐकीलं
द्रौपदीबाई म्हणे सुभद्रा आहे पोर
आता नावासाठी काय सुचवावं त्यावर
द्रौपदीबाई म्हणे वहिनी तुम्ही नाव घ्यावं
भीमकांनी मला दिली अनंत त्यांची नावं
द्रौपदीबाई म्हणे वहिनी तुम्ही नाव घ्यावं
त्रैलोक्यामध्ये प्रसिद्ध केशव त्याचं नाव
हिऱ्यामोत्यांची सभा मायासुरानं केली
देव बैसले सभेला कशी शोभा आली
राजसूय-यज्ञामध्ये सुवासनींची झाली दाटी
द्रौपदीबाई माझी हळदी कुंकू वाटी
राजसूय-यज्ञ झाला राजे निरोप मागती
देवूनी आहेर-विडा धर्म सन्मान करिती
निरोप दिला छप्पनकोटी यादवांला
रूक्मीणीसहीत माधव निघाले द्वारकेला
देव बैसले रथात द्रौपदीला पुसे श्रीहरी
येईन लवकर माघारी पांडव बसवीन राज्यावरी

# मीठ

संग्राहिका : श्रीमती सुलोचना फ

प्रथम नमू गणपती । आणिक माते सरस्वती । पूर्ण व्हावी मज मती । गु
राया ।। उत्तम गोविंदाचे गुण । नीज भावे मी वर्णीन । चित्ता होईल स
धान । संतोषाचे ।। ऐका श्रोते देऊन चित्त । पूर्व पातक होतील भस्म । 
तारक हरीनाम । कलीयुगी ।। व्रतदान तपदान । यथा सांगेन मी पूर्ण । ग
अन्नमय प्राण । म्हणती ।। म्हणूनी एक नाम सारं । उच्चारावं वारंवा
उतरूनी जावं भवसागर । हरीच्या कृपे ।।

एके दिवशी साऱ्या जणी । मिळुनी कृष्ण कामिनी । आल्या रूखुमिण
सदनी । क्रीडावया ।। अष्टनायकाही देखणी । रखुमाई पट्टराणी । मधे श
सारंगपाणी । चंद्र जैसा ।। रत्नजडीत सिंहासन । त्यावरी बैसे नारायण
अर्धांगी रखुमाई जाण । आदि शक्ती ।।

प्रथम विनवी सत्यभामा । मी आवडती कैसे तुम्हा । सत्य सांगा पुरूषोत्तम
हसू आले गोविंदासी ॥ प्रती उत्तरले भामेशी । चित्तापासूनी आवडसी । प्रि
राणी जगी उत्तम गूळ गोड । तैसी आवड सर्वकाळ । मग ती संतोष
वेल्हाळ । नमन केले ।। नमन करूनी गोविंदाशी । जाऊनी बसली असनाशी
आनंद ना मावे चित्ताशी । साठवेना ।।

मग ती विनवी जांबुवंती । सत्य सांगा प्राणपती । माझी आवड को
रीती । सांगा स्वामी ।। हसूनी बोलले गोपाळ । तुझ्या प्रीतीचे कल्होळे क्ष
एक असावी वेळ । जगी उत्तम साखर गोड । तैसी आवड सर्वकाळ । मग 
संतोषली वेल्हाळ । नमन केले ।।

मग ती विनवी मित्रावंदा । सत्य बोलाजी गोविंदा । माझी आवड आनं
कंदा । कोणे गुणी ।। जगी उत्तम दूध गोड । तैसी आवड सर्वकाळ । म
ती संतोषली वेल्हाळ । नमन केले ।।

मग ती विनवी लक्ष्मणी । सत्य बोला नारायण । माझी आवड तुमच्या मने । कुण्या गुणे ।। जगी जैसे तूप । तैसे आवडते रूप । आनंद झाला मग आमूप । नमन केले ।।

मग ती विनवी मित्रावंती । सत्य सांगा प्राणपती । माझी आवड कोणे रीती । सांगा स्वामी ।। जगी उत्तम जैसे लोणी । तैसी आवड तुझी मनी । मग संतोषली कामिनी । नमन केले ।।

मग ती विनवी यज्ञजननी । सत्य सांगा प्राणपती । माझी आवड कोणे रीती । सांगा स्वामी ।। जगी उत्तम जैसा मध । तैसी आवड तुझी शुद्ध । झाला नारीशी आनंद । नमन केले ।।

मग ती विनवी कालिंदी । सत्य सांगा प्राणपती । माझी आवड कोणे रीती । सांगा स्वामी ।। जगी उत्तम साखरखडी । तैसी तुझी प्रिये गोडी । आनंद झाला मग तातडी । नमन केले ।।

सहस्त्र विनवीती । सत्य सांगा प्राणपती । आमची आवड कोणे रीती । सांगा स्वामी । जगी उत्तम जैसा पेढा । तैसा तुमचा माझा जोडा । आनंद झाला मग केवढा । नमन केले ।।

जगी उत्तम जैसी बर्फी । तुम्हावर प्रीती । आनंद झाला मग तो किती । नमन केले ।।

जगी उत्तम जैसा खवा । तैशा आवडती जीवा । आनंद झाला मग जेधवा । नमन केले ।।

मग ती विनवी रूखुमीणी । सत्य सांगा चक्रपाणी । माझी आवड कोणे रीती । सांगा स्वामी ।।

जगी उत्तम जैसे लवण । तैसे तुम्हावरी मन । भीमक् बाळी झाली खिन्न । आपुले चित्ती ।।

मनी दचकली सुंदरी । उतरला मुखचंद्र । कंठी दाटला गहीवर । रूख
मिणीच्या ।। सोळा सहस्त्र हासती । ठायी ठायी कुजबुजती । किती डोळचां
खुणवती ऐकमेकी ।। भामा म्हणे रूखमिणीशी आम्हाहुनी श्रेष्ठ होशी । भ्रतारा
का नावडशी । कोणे गुणी ।। उदास रूखमिणीचे मन । सर्वक्ष अंगी झाली खिन्न
आपुल्या प्रालब्धाचा गुण । सखेबाई ।। मूर्च्छा दाटली शरीरी । सर्वही आं
आली घेरी । उलंडली धरणीवरी । निधळवाणी ।। देव म्हणे रूखमिणीशी
काय राग धरलास मनी । सत्य सांग मज लागोनी ग सुंदरी ।। देव म्हणे
रूखुमिणी । दाही अवताराची राणी । आज काय पडली धरणी । निधळवानी
रूखुमिणी बोलली देवाशी । मला निजवूनी शेजेशी । आपण जावे हो सभेशी
वेळ झाली ।। परतूनी यावे मंदीराशी । मग मी बोलेन तुम्हाशी । सो
सहस्र मंदीराशी । पाठवाव्या ।। सभेशी वसले नारायण । आनंदाने सभाजन
बैसविले सर्व सन्मानाने । गोविंदाशी ।। सभेशी वसले भगवंत । मनी हो
चिंताक्रांत । कैसे याने होईल शान्त । भीमकबाळी ।। सभा सारोनी वेगेश
देव विचारे मानसी । सत्वर गेले मंदीराशी । देवकीच्या ।। देवकी म्हणे तान्
वाळा । मुखचंद्र झाला काळा । काय चिंता बा गोपाळा । उद्भवली ।। वाणि
तू माझे तान्हे । सत्य सांग मज लागोनी । प्रिय पुत्रा ।। वानीचा मी तु
साच । सोळा सहस्रांचा जाच । कोठवर सोसू जननीये ।। आज तुम्हा अव
सुना । एंका जागी मिळाल्या जाणा । पुसती आवडीची खुणा । आम्हालागी
मी सांगितले समस्तांशी । सांगितले रूखुमिणीशी । मिठासारखी आवड
म्हणूनीया ।। कोपून मजवरी भीमकबाळी । कासावीस भार झाली । उलंड
धरणीवरी । निधळवाणी ।। देवकी म्हणे तान्ह्या बाळा । आधी करवा भो
नाशी । मग मी जाऊन समजाविन । रूखुमिणीशी ।। उदक उपसोनी घंगाळ
स्नान घाली करकमळी । भोजनासी बैसविले । भोजन घालोनी देवाशी । 
निजवूनी गोविंदाशी । आपण गेली मंदीराशी । रूखुमिणीच्या ।। सुनमुख देखे
देवकी । उदरे गौरवी भीमकी । करी धरोनी । मंदीराशी नेली ।। रखु
वंदी चरण । माता बोले आशीरवचन पाच पुत्र होतील जाण । सुने तुज
वाणीचे हे माझे तान्हे । तुम्हास दिसते इलविलवाणे । कृष्णाचे हे वाल
देखीले नाही ।। कंवसाच्या बंदी शाळेत । बहुत शिणले बलविल बा

नाहीतरी माझी आठही बाळे । असती मज ।। सुन तू माझी देखणी । आव-डशी चित्तापासूनी । सोळा सहस्र सुंदरी । तुझ्या दासी ।। सोळा सहस्र वरिष्ठ । वडील सून तू माझी श्रेष्ठ । आता तोडीन तुझे मीठ ग रूखमिणी । सख्या म्हणी रूखमिणीशी । घरी आले ऋषीकेशी । उठजी बाई ।। घेऊनी पंचारती । भीमकी ओवाळी श्रीपती । करी धरूनी कौतुकी । मंदिरी न्हेले ।। सेजे बैसले नारायण । वदन पाहती न्हाहळून । रूखमणीचे ।। उदास रूखमिणीचे मन । सर्वही अंगी झाली खिन्न ।। पाहूनिया घननीळा कृपा झाली । सहज बोललो वचन । तुज काय वाटले कठीण । माता देवकीची आण ।। आव्रडशी मीठ तर सर्वांचे जीवन। तुझे माझे एक मन । पित्या वसुदेवाची आण आवडशी ।। समजावूनी रुखुमिणीशीं देव पहुडले शेजेशी । चार प्रहर निद्रा नाही देवकीशी ।। उठूनिया प्रहर प्रात:काळी । देवकी बसे सुखासनी। सत्वर गेली मंदिराशी । रुखुमिणीच्या ।। सुनमुख देखोनी देवकी । उदरे गौरवी भीमकी । करी धरूनी कौतुकी । मंदिरी न्हेली ।। रखुमाई वंदी चरण । माता बोले आशीर्वचन । पाच पुत्र होतील जाण । सुने तुज ।। देव म्हणे ग जननी । सोळा सहस्त्र कामिनी । आठौ सहित मेजवानी । द्यावी आम्हा ।। पाक सारोनी सत्वरी । सोळा सहस्त्र सुंदरी । आठासहीत आले भोजनासी । ऋषीकेशी ।। काढुनीया रंगमाळा । रत्नसहीत सोहोळा । करी देवकी सोहाळा । कृष्णाजीचा ।। मांडुनी सोनीयाचे पाट । रत्नजडीताची ताटं । आणिक माणिकांच्या वाटचा । झळकती ।। उदक भरोनिया झाऱ्या । रत्नजडीत अडण्या । वाढीतसे अंगी माता । समस्तांशी ।। आंबा, लिंब, करंदेसाल, फळ मुपसाचे करवंदे । भाज्या फळभाज्या साभारी फुलभाज्या । पापड, सांडगे, कुरडचा वाढीयल्या ।। तिळवडचा चिकवडचा । मिरे बोंडसवडे । भजी अख्वाळ वाढियली । पुऱ्या पुरण पोळीया ।। त्यावर वाढील्या सुराळचा । त्यावरी वाढिल्या करंज्या । सुकुमार ।। सुंदर मांडे याची घडी । त्यावरी वाढली खाजी । त्यावरी वाढीयली फणी अख्वार । लाडुबुंदीचे सढळ दळचा बेसन मोतीचुरे । चिरोटे जिलबी घिवर वाढीयल्या ।। भात वाढूनी राजवळ । वरण वाढिले निर्मळ । साजूक ताकाची कढी । त्यावरी आळवाची वडी । दहीभातावर मिरपुड वाढीयली ।। तूप वाढूनी

सुगंध। देवकी बोलली आनंदात। आता बसावे गोविंदा भोजनासी ।। समस्त बसले भोजनाशी। लवण नाही त्या पाकाशी। रुची नाही त्या मुखाशी। न गिळे अन्न ।। देवकी बोलली प्रगट। मीठ तर सर्वच खारट। तैसा आहे आम्हा वीट। रुखमिणीचा ।। सोळा सहस्त्र झाल्या खिन्न। खाली घालुनिया मान। संगे घेईन रुखमिणीशी। मी तर जाईन तीर्थाशी। तुम्ही घेऊनी गोविंदाशी। राज्य करा ।। देव म्हणे जननीशी। संगे घेऊनी रुखमिणीशी। मला ठेवूनी कुठे जाशी। जननी गे ।। झाली सर्वांची भोजने। सर्वत्र देऊन भूषणे। तिघे बैसली आनंदाने। विडा देत असे करोनी। रुखमिणी ।। एके दिवशी नारायण घरीच मांडीले गहन। मीठ पळविले नगरातून। एकाएकी ।। मीठासाठी लहान थोर। अबला नारी वृद्ध आले धुंडत रावळ। रूखमीणीचे ।। मिठासाठी लहान थोरी सोळा सहस्त्र सुंदरी। लवण द्यावे हो पाकाशी। रूखुमिणीबाई ।। रूखुमिणी बोले देवाशी। लवण द्यावे समस्तांशी। ऐकूनी ऋषीकेशी हासू आले ।। देव बोलले प्रगट। मीठ तर सर्वात खारट। तैसा आहे आम्हा वीट। रुखमिणीचा ।। एके दिवशी नारायणे। चरित्र मांडिले गहन। मीठाच्या पडल्या राशी। ऐसा गृहस्थ द्वारकावासी। नांदतसे ।।

# सत्यभामा गर्वहरण

*संग्राहिका : श्रीमती राधाबाई रानडे*

मुनी म्हणे ग नारद हिजला गर्व फार झाला। परब्रह्म श्रीकृष्ण सावळा न कळे मुरकेला। तिशी ठकवावे ऐसा विचार नारदानी केला ।। पुनर्जन्म येईल म्हणोनी संशय मनि धरिला। जे जेर द्यावे ते ते प्राप्ती हृदयी नेम ठरला। दे कृष्णाला दान आता गे उपाय हाचि उरला ।। भामा म्हणे नारदा देते हरिला।

पूजा करुनिया दिला हरिला । उदक सोडिताचि हरि उठे झडकरी ।। चंबू-गवाळे वीणा देऊनि श्रीकृष्णाचे पाशी । शिष्या करूनि मुनी निघाले त्यजुनी द्वारकेसी ।। रूपाभिमानी सत्यभामा बोले नारदासी । जन्मोजन्मी कृष्ण भ्रतार व्हावा सांग मजसी ।। १ ।।

घरोघरी यदुपति होता तो आला धावोनी । मुनीच्या मागे त्वरित चालला ब्रह्म-वीणा घेऊनी ।। अग पापिणी काय करणी तू का पट्टराणी । नरनारीचा आकांत झाला न दिसे चक्रपाणी ।। वसुदेव देवकी बळीराम आणि यादव। रोहिणी–सुभद्रा म्हणती थोर तुझे ग वैभव ।। पति दान देऊनी घालविला ग माधव। या पापाची फळे तुज ग गौरव ।। रुक्मिणीवरही सर्व बोलती सत्यभामेसी। नारद चरण वंदुनी आणि गे आमुचा ऋषीकेशी । रूपा-भिमानी ।।२।।

भामा वंदी नारदचरण स्वामी चुकी झाली । हरिच्या बदला मागे देते मी अन्यायी ठरली ।। मुनी म्हणे ग परत दानाची नाही कोठे चाली । ऐक शिष्या पुन्हा मिळेना ही लटकी बोली ।। परंतु देतो आणा सुवर्ण हरी घरात घाली । हरि सुषुप्त सुवर्ण आणाया भामा घरी गेली ।। हरी पारड्यात सोने एकीकडे। सर्वांनी घातले अलंकार आणि चुडे । सर्वांनी घातिले चुडे परि न हाले पारडे। हे आश्चर्य देखून भामेचे मुख वाकडे ।। मुनी म्हणे ग नारद हिजला आणा भीमकेशी । तिजवाचूनी हे कार्य साधेना कळली खूण मजशी । रूपाभिमानी ।।

पट्टराणी श्रीरूक्मिणीदेवीस सांगती जाऊन। आली हाती कृष्णतुळशीचे एक पत्र घेऊन ।। सुवर्ण तबकी ठेवून दिधले तेच तुळशी पान । तत्क्षणी जड पान पाहुनी हरी झाले लहान ।। ज्याचे त्याला हे अलंकार दिधले काढून। कृष्ण रूक्मिणी महाली जाती बहुत आनंदानं ।। भीमकेनी यदुपति नेला निज मंदिरी ।। रत्नमंचकी बसवुनी आरती करी। आले नारद भामा लज्जित अंतरी ।। कृष्ण रूक्मिणी भामा वंदिती नारद चरणांसी । परब्रह्म श्रीकृष्ण असे हा वश हो भक्तीशी ।। रूपाभिमानी ।।

# खांदामळणी

हातातलं काम एका अंगाला सारून आज तिकडं जाईन, उद्या जायचं बघीन, असं करीत करीत होतेली चालढकल चांगली तीन-चार महिने तरी रेंगाळलीच, रेंगाळली ... पण परवा आमच्या तात्यांचा सांगावा आल्यासरशी तडातापडीनं सगळी कामं गुंडाळून ठेवली न् कसंबी करून जायचंच असा केला विचार. घेतले चार पैसे कडोसरीला, दोन वाळले कपडे घातले पिशवीत न् जेवण झाल्या झाल्या दुपारची दोनची एस्.टी. गाठली देखील ...

"घरात नवा पाडा आणलाय तर बेंदराचं टिप्पण गाठून तू कंसबी करून यायलाचं पाहिजेस." असा तात्यांचा सांगावा आल्या कारणानं 'नाही', 'होय', करीत काथ्याकूट मांडायला सवडच नव्हती. म्हटलं, रोजच्या कामाचं होऊंदे काय पण न् गेले तशीच मागचा पुढचा लई घोळ घालीत न बसताना ! करणारच काय मग ? म्हशीच्या लोडण्यागत कामं हाईतच बगील तेव्हा तर ?

आमच्या तात्याला खिलारी बैलांची दांडगी हौस. जिवा पलीकडं तो बैलांना सांभाळणारा. रात्रंदिवस शेतीच्या उपसाभरीत स्वतःला गुंतवून घेणारा. कधी कुठं जाणं नाही का येणं नाही. लईच कुणाची आठवण आली तर सांगावा देऊन भेटून जा म्हणणार. पण स्वतः तळावर कायम ! त्यातून आमच्यावर त्याचा लई जीव. नव्या पाड्याला गाडीला जुंपून दणाण् गाडी पळवीत आमचं ध्यान फिरवून आणलं की, त्याला मोठी खुशी. म्हणून जायलाच पाहिजे या विचारानं आम्ही गेलेलो ...

तर आम्हाला आलेले बघून तात्याचा जीव एवढा झालेला ... ज्याला त्याला "पोरगी आली बरं का आमच्या सांगाव्यासरशी." म्हणून सांगताना त्याची कळी खुललेली ... त्या कारणानं गावाकडच्या घरात गेल्या गेल्या आमच्या हातांनी दिसेल ते काम झोकात उचलेले !

काकूनं सारं घर उभं कडवी सारवून घेतलंवतं, तशी भिंतीवरच्या क्याच्या चित्रांची न् सोप्यातल्या चिंचोक्याच्या झाडांची फाटक्या फड पहिली आम्ही पुसापुशी केली. खुंटीवरचं सामान जिथल्या तिथं फडत न् कोनाड्यात ठेवलं. अंथरूण पांघरूणासकट लख्ख धुवून वाळवून ठेव कपड्यांच्या घडवंचीवरच्या ढिगातलं एकेक उचलून नीट घड्या जागच्या जागी त्यांची मांडामांड केली.

तेवढ्यात घरोघरी मूळ आणून टाकतेल्या संबानं रंगीत माती दिली. म्हणताना आमच्या तात्यानं परड्यात चूल मांडून तापत ठेव हंड्यातल्या गरम पाण्यानं बैलांचे खूर धुतले. काकूनं त्यावर हळदकुंकू मनोभावे जोडीनं नमस्कार घातला. मग तात्यानं तेलानं न् हळदीनं खांदे मळले. लहानग्या मुलाला मालीश करावं त्या रीतीनं बैलांची चोळली. त्यासरशी बैलांनी खुशीनं माना डोलावीत डरकाळी फोडली. हरखून टूम्म झाला !

आमचं घर तसं तीन खण तिघई. पुढं पैस अंगण. खायल्या अंगाला तिथंच जनावरांच्या चाऱ्यासाठी भूस, वैरण न् पेंड असं काय काय ठे खाऊन पिऊन सुखी घर आमचं. लई बडेजाई कसलीच नाही. पण ता बैलांची लई आवड म्हणताना बेंदराच्या सणाचा उत्सव आमच्या घरी होणार.

म्हणताना उदकाडी लावून, पानफूल वाहून, बैलांची पूजा-बिजा झा करडईचं दूध काढून अनेक धान्यांचा शिजविलेला खिचडा नैवेद्याला दा बैलांना घमेल्यात वाढला गेला. त्याच वेळी कोंड्याचे तयार केलेले मुट त्यातच मांडले गेले. बैलांनी मोठ्या खुशीनं हा प्रसाद ग्रहण केला. पाजलेली आंबील चवीनं घुटकली. त्यावेळी त्यांची ही हौसमौज बघून सुखावला. आनंदानं त्याची नजर पाणावली. त्यानं लहान मुलांची आ घ्यावी तशी बैलांची घेतली. आणि राजीखुशीतल्या त्यांचे मटाटा मु त्यांना कुरवाळलं. त्यांचा मान राखला.

रात्रीच्या जेवणात मग आम्ही देखील खिचडा न् ते मुटके आमच्या पानात वाढून घेत चवीनं खाल्ले ! मोठी मजा आली !

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेला आंब्याच्या पानाची तोरणं दारावर आली. गोठ्यात बांधली गेली. धुऊन पुसून लख्ख केलेल्या शेतीच्या अवजारावर गुंफण्यात आली. त्या वेळी ही तोरणं घेऊन येतेल्या साधूला काकूनं सुपानं ज्वारी दिली.

तात्यानं मग बैलांना चोळून मोळून गरम पाण्याची आंघोळ घातली. धोतरानं बैलांचं अंग पुसलं. कावेनं त्यांच्या अंगावर हातवे उठवले. त्यांची शिंगं रंगवली. त्यावर रेशीम गोंडे बांधले. गळ्यात नव्यानं आणलेले खळ-खुळते चाळ बांधून पायात तंगभार चांदीचे तोडे अडकवले. अंगावर खुत-नीच्या झुली घातल्या ... नटवता येईल तेवढं बैलांना नटवीत बसला... आणि मग दर्भाच्या वाडच्यांच्या कुंच्याला दोनदा बैलांच्या वशींडावरून उत-रीत त्यांची दृष्ट काढली.

तेवढ्यात अंगणातल्या भिंतीवर चुन्याची झाडं चितारलेला कोळी आला. पाठोपाठ बारा बलुती गोळा होत गेली... काकूनं त्या प्रत्येकाला सूपभर जोंधळ्याची ओटी घातली.

घरात इकडं तोवर पुरणावरणाचा सैपाक रांधला गेला.... म्हणताना तेल, हळीव न् अंडी एकत्र करून तयार केलेले मिश्रण काकांच्या शिदूनं फुंकणीतून बैलांच्या तोंडात घालीत त्यांना पाजलं. जशी काय घुटीच पाजावी त्या झोकात ! बैलांनी पण त्याचा चट्टामट्टा करून टाकला.

नंतर मग प्रत्येक बैलापुढं पुरणाच्या पाच पोळ्या, मुदी मुदी वरणभात, तेलच्या, कडबू, भजी असलं काय काय वाढलेली पत्रावळीताटं मांडली गेली. उदकाड्या लावल्या. सगळ्या जनावरांनी या महानैवेद्याचा जसा बघता बघता फन्ना उडवून टाकला. हागणं मुतणं केलं.... धन्याचा जीव खुशालीत आला.

होता होता मग आमच्या घरी पावणा होऊन आलेल्या तात्यांच्या
दोस्तानं कुंभाराकडून आणलेल्या पडग्यात फुलवातीचा दिवा लावून ठेव
तात्याला वाटेकऱ्याचं पागोटं घालायला लावलं. पुढं दोन बैल घेऊन घर
गाई वासरांसह पूजा करायला सांगितली.... वाटेकऱ्याला खांद्यावर पेर
चाडं घ्यायला लावलं. त्याच्या काखेत करडी, ज्वारी, गहू, साळी, हर
अशा जिन्नसानी भारावलेली पिशवी अडकवून घे म्हटलं. मग तात्यानं प
घेऊन पुढं होताना कुणीतरी पितळी वाजवली. तशी पितळी घेणारा बोलला

पाऊस आला चांगभलं
चोर चोर ( पेरणी ) चांगभलं

आणिक सर्वांनी या बैलांना तीन प्रदक्षिणा घातल्या. तात्यानं मग बैल
तेवत्या दिव्याचा पडगा धरला. तशी बैलांनी आनंदानं त्या दिव्याकडं पा
त्यांची नजर चकाकली.... त्यासरशी तात्याचा आनंद गंगनाला गेला....

म्हणताना मग कुंभारानं घरात आणून दिलेल्या बैलांसकट सर्वांची
झाली. आरती घेऊन काकूनं सर्व जनावरांना ओवाळलं. हळदकुंकू न् पान
वाहून पाया पडली.

आम्ही मग सगळीजणं एकत्र बसून ढेकर येस्तोवर जेवलो. गप्पा ग
करीत लई खाणं झालं.

तिसऱ्या प्रहरी मग आमच्या खिलार बैलांचा जाई मोगरीच्या फुल
माळांनी, भिंगाच्या बाशिंगांनी न् ठेवणीतल्या झुलींनी शिणगार करून त
मिरवणूक काढली.

तात्यानं त्यासाठी ताशेवाजंत्री बोलीवलेवते. बँड आणलावता. मिरवणु
दारूकाम मांडलंवतं. कळवातणी नाचत होत्या. पोरंढोरं लेझीम खेळत ह
बघण्याजोगी ऐटी उभी केलीवती.

गावातल्या लोकांनी मारूतीच्या देवळाकडं निघालेल्या या तालेवारीचं कवतिक मांडलवतं.

मारूतीचं दर्शन घेऊन बैलांना माघारी यायला तब्बल दोनतीन तास लागले-वते. घरी आल्या आल्या काकूनं बैलांवरून गूळपाणी उतरून टाकलं. त्यांना पुन्हा आरती ओवाळली. पाया पडली न् मग बैल दावणीला बांधले गेले.

शेतीच्या देवांची ही महापूजा झोकात पार पाडली.

बेंदराच्या दुसऱ्या दिवशी मग घरात 'कर' तळण्यात आली.

काकूनं आमच्या सगळ्यांच्या मदतीनं कापण्या केल्या. करंज्या तळल्या. कडबोळी केली.

बैलांच्या गळ्यात न् शिंगावर हा तळणाचा शिणगार दोऱ्यात गुंफून बांधला गेला !...

घरात गोळा झालेल्या सगळ्या पै-पावण्यांनी न् गणगोतांनी ह्या फराळावर मग मनमोक्त ताव मारला. खूप खूप मजा आली.

सगळ्या घरादाराला शिणवटा येस्तोवर या सणाची उपसाभर मोठ्या डामडौलानं झाली न् मग आम्ही निवांत एकत्र येऊन एकमेकांच्या विचार-पुशीत असताना स्वत:लाही पार विसरून गेलो !

आषाढी पौर्णिमेच्या चंद्राला देखील मग त्यावेळी हेवा वाटला तर ? खरं ना !

अनुक्रम :--

# बेंदूर ( बैलांचा सण )

लेखक : श्री. म. भा. भोसले

ंदूर हा महाराष्ट्रातील शेतकऱ्यांचा फार मोठा सण. जसा बैलांच्या पूजेचा साच मोठ्या हौसेचा आणि मौजेचाही. काही ठिकाणी या सणास बैलपोळा सेही म्हणतात. शेतकऱ्याबरोबर शेतात राबणाऱ्या बैलांची पूजा करणे हे ा सणाचे मुख्य उद्दीष्ट आहे. जे जे आपल्या उपयोगी पडते किंवा ज्याचा याचा आपणावर उपकार होतो, त्याची मनोभावे पूजा करून त्याबद्दल तज्ञता व्यक्त करणे ही आपली पुरातन संस्कृती आहे. माणसांच्या उपयोगी डणाऱ्या अशा सजीव, निर्जीव अनेक गोष्टी आहेत. आणि त्या सर्वांची मानव नादी कालापासून पूजा करीत व त्याबद्दल कृतज्ञता दाखवीत आला आहे. ीवन देणाऱ्या नदीची पूजा, नदीपार व्हायला मदत करणाऱ्या नावेची पूजा, ुलं, फळं देणाऱ्या झाडाची पूजा, पाणी पाडणाऱ्या पावसाची पूजा, उष्णता णाऱ्या अग्नीची पूजा, अन्न पिकविणाऱ्या भूमीची पूजा, समुद्राची पूजा, ागाची पूजा, सूर्याची पूजा अशा अनेक पूजा मानव अनादी कालापासून करीत आला आहे.

बैलांची अशीच पूजा करण्यासाठी ठरविलेला सण म्हणजे बेंदूर. हा सण त्येक वर्षी आषाढ महिन्यातील पौर्णिमेच्या सुमारास ज्या दिवशी मूळ नक्षत्र असते त्या दिवशी सुरू होतो.

शेतीचे कामात बैलाला फार महत्त्वाचे स्थान आहे. हल्लीच्या या सुधार- लेल्या काळात नांगरणी, सरी सोडणे, ढेकळे फोडणे आदि कामासाठी ट्रॅक्टर हे मोठे स्वयंचलित यंत्र निघालेले आहे. पण प्राचीन काळी असे कुठलेच यंत्र नव्हते. त्यावेळेपासून शेतीची सर्व कामे केवळ बैलांच्या साह्यावरच होत आलेली आहेत. नांगरणी हे मोठे अवजड काम तर त्यासाठी दहा दहा बारा बारा बैल

जोडून ते करीत होते. त्याचप्रमाणे मोट ओढणे व रब्बी पेरणी करणे यासा
चार चार बैल जोडीत होते. आजच्या या सुधारणेच्या काळातही शेतीसा
अनेक प्रकारची यंत्रे निर्माण झाली असली तरी शेतीतील बऱ्याच लह
सहान कामासाठी व सर्व सामान्य शेतकऱ्यांच्या छोटचा शेतीसाठी शेतीकामा
प्रमुख साधन म्हणजे बैल हेच होय.

शेतीची नांगरट, कुळवण, पेरणी, कोळपणी, मळणी व वहातूक वगैरे स
कामे बैलांकडून होत असतात. माणसांच्या व सर्व प्राणी मात्रांच्या जीवना
आवश्यक असणारे अन्न व चारापाणी हे शेतीपासून मिळते. आणि अशा शेती
काम करणारा महत्त्वाचा घटक म्हणून बैल हा शेतकऱ्यास पूजनीय वा
साहजिकच आहे.

उन्हाळ्यात बैल शेतजमिनीची मशागत करतात. त्यात नांगरट, कुळव
खुरट, दिंड अशी खूप कष्टाची कामे येतात. ती झाल्यावर ज्येष्ठ, आषाढ
झडीचा पाऊस लागला की, मग अतिशय महत्त्वाचे असे पेरणीचे काम बैलां
करावे लागते. पेरणीचे काम जसे कष्टाचे तसेच पावसापाण्याने मोठ
गारठ्यातले म्हणून अगदी जिकरीचे असते. असे हे पेरणीचे मोठे क
झाल्यावर मग लगेच बैलांना मोठे असे काम नसते. पिके कोळपणीला ये
पर्यंत त्यांना विसावा असतो. अशा विसाव्याच्या मोक्यातच बेंदराचा स
मुद्दाम योजलेला दिसतो.

सबंध वर्षात दिवाळी हा सर्वांचाच मोठा सण. शेतकऱ्यांना तो तर मो
आहेच, पण हा बेंदूर त्यांना दिवाळीपेक्षाही मोठा वाटतो. तो साजरा क
ताना घरच्या सगळ्यांचाच अगदी आटापिटा पडतो. पण बैलांच्या प्रेमाने
सगळा सहन करून घरची पुरुष, बायका व मुले सगळीच हा सण जसा हौ
तसाच मोठ्या उत्साहाने साजरा करतात. या दिवसात पुरुषाची पेरणी
धांदल, गडबड असते. घात साधून पेरा तर करावाच लागतो. पण त्या
बेंदरांसाठी म्हणून सवड काढून बैलासाठी चाळ, कंडे, वेसणी, रंग, हुर
तेल आदींचा बाजारही करावा लागतो. बायकांची तर बेंदूर आला म्ह

की, अगोदर आठवडाभर घराचे उभेकडवी सारवण करणे, गोठे स्वच्छ करणे अशी कामे सुरू होतात. या सणाच्या निमित्ताने घराचा व गोठ्याचा कोपरा न् कोपरा स्वच्छ केला जातो. सगळीकडून घराचे संपूर्ण सारवण करीत असल्यामुळे यास उभे कडवी सारवण असे म्हणतात. असे सारवण झाल्यावर घराच्या भिंतीवर आतून व बाहेरून हाताच्या पाच बोटांनी चुन्याच्या टिकल्या मारण्याची एक रीत आहे. बाहेरच्या बाजूने कुणी चुन्याच्या बाहुल्याही काढ-तात. बेंदूर दोन दिवसावर आला की, मग बैलाच्या खिचड्यासाठी कांडण करणे व आंबील करण्यासाठी आणि कापण्या कडबोळी यांचेसाठी पीठ तयार करणे अशी कामे चालतात. मुलांची तर चिखलाचे वा शाडू मातीचे बैल तयार करण्याची झुम्मडच उडून जाते.

आणि मग बेंदूर या सणाचा पहिला दिवस उगवतो. साधारणपणे या सणाचे दोन विभाग पडतात. हे दोन विभाग दोन दिवस साजरे केले जातात. आषाढी एकादशी झाल्यावर बारशी दिवशी बहुतेक मूळ नक्षत्र हमखास येते. त्या दिवशी या सणाचा पहिला दिवस व्हनुंगा म्हणून साजरा करतात व लगेच दुसऱ्या दिवशी बेंदूर म्हणून सण उत्सव करतात. पहिला दिवस म्हणजे व्हनुंगा. हा बैलांच्या सेवेचा, म्हणजेच त्यांचा श्रमपरिहार करण्याचे दृष्टीने साजरा करण्याचा दिवस व दुसरा बेंदूर हा सणाचा दिवस. हा दिवस हौसेचा व मौजेचा म्हणून पार पाडतात.

चिखलात व गारठ्यात पेरणीचे काम करून आलेल्या बैलांचे पाय व्हनुंग्या दिवशी सायंकाळी गरम गरम पाण्याने धुतात. नख्या, खुरनख्या अगदी स्वच्छ करतात व त्यांच्या पायास शेक बसण्याचे दृष्टीने गरम पाणी त्यांचे पायावर ओततात. हे पाय धुणे झाल्यावर मग ज्या आपल्या खांद्यावर बैलाने वर्षभर जू घेऊन काम केलेले असते त्या खांद्यावर हळद व तेल लावून मालीश करतात. त्याचा वर्षाचा सगळा शीण जावा म्हणून मनोभावे मर्दन करतात. त्यांचे पुढचे गुडघेही तेल, हळद लावून चोळतात. गरम पाणी त्यांचे गुडघ्यावर व पायावर घालतात आणि हे खांदे मळणीचे व पाय धुण्याचे काम झाल्यावर मग दिवसभर बायकांनी घरी खपून तयार केलेले अन्न म्हणजे मक्याचा,

शाळूचा वा बाजरीचा खिचडा आणि कोंडयाचे मुटके त्यांना पोटभर खाऊ घालतात. या मुटक्यांचा व खिचडयाचा काही भाग नैवेद्य म्हणून गावचे मांगासाठी मुद्दाम राखतात. कारण मांग हा बैलांच्या पूजेला मुळाच्या काडया व आंब्याची तोरणे देतो. हे झाल्यावर कुंभाराने दिलेले चिखलाचे बैल देव्हाऱ्यावर मांडले जातात. त्यानाही हळद तेल लावले जाते. नैवेद्य दाखविला जातो. बैलाचे हे सर्व काही आवरल्यावर मगच घरचा मालक व घरचे सर्व लोक भोजन करतात.

व्हनुंग्याचा पहिला दिवस अशा तऱ्हेने साजरा होतो.

दुसरा दिवस मग बेंदराचा उजाडतो. तो उजाडल्यापासूनच घरच्या मालकाची व पोराठोरांची बैलासाठी काम करायची धांदल उसळते. आणि बायकांची नेहमीच्या सणाप्रमाणे पोळया करायची तर गडबड असतेच, शिवाय त्यांना कापण्या, कडबोळी, तळावी लागतात. शिवाय बैलासाठी आंबील घुगऱ्याही त्यांना प्रथम तयार कराव्या लागतात.

या मुख्य दिवशी सकाळी बैलांना स्वच्छ धुण्याचे पहिले काम केले जाते. जणू काय त्यांना आंघोळच प्रथम घालतात. नदीवर नेऊन त्यांना घासून घासून व चोळून स्वच्छ धुतात. पाण्यात पोहण्याने शिणवटा जातो ही भावना असल्यामुळे त्यांना चांगले पोहायलाही लावतात. यासाठी नदी जरी दोन तीन मैल लांब असली तरी लोक बैलांना घेऊन शक्यतो नदीवरच जातात. पण अगदीच नदी लांब असेल तर मग विहिरीवर, आडावर वा नळावर बादल्यांनी पाणी घालून बैलांना धुतात.

याच वेळी तांबडा हुरमूस गोडया तेलात घालून त्याने व चुन्याने घराची दारे, चौकटी व गाडी रंगवितात. हल्ली आता यासाठी बरेचजण पेन्टचा उपयोग करतात. औतांचे काम संपलेले असते म्हणून कुरी, कुळव, दिंड, कोळपी आदि सर्व शेणाने सारवतात व ओळीने पूजेसाठी मांडून ठेवतात. या सणासाठी शेतकऱ्यांना कोळी चुना देतो. चांभार चाळ, घुंगूर गाठवून देतो. वाद्या

पुरवितो. सुतार, लोहार यांनी पेरणी पूर्वीच औतांची दुरुस्ती केलेली असते. मांग तोरणे पुरवितो. म्हणून सर्वच बारा बलुती या दिवशी खांद्यावर पोती टाकून घरोघर बेरे मागण्यासाठी फिरत असतात. त्यासाठी घरोघर धान्याच्या पाट्या भरून ठेवतात व त्यातून शक्यतेप्रमाणे कमी जास्त पण सुपातून सर्वांना सकाळपासून हे धान्य वाढतात. मांगाने दिलेले आंब्याचे तोरण शुभ म्हणून घराच्या, गोठ्याच्या, दारावर, औतावर गाडीवर व हुडव्यावर देखील बांधतात. अशी कामे सकाळपासून सारखी चालू असतात.

बैलांचे धुण्याचे काम पूर्ण झाल्यावर लगेच त्यांना घुगऱ्या चारतात. त्यावर भरपूर आंबील पाजतात. नवीन पाणी व हिरवा चारा चालू झाल्याने बैलाचे पोटात काही रोगराई निर्माण होऊ नये म्हणून त्या आंबलीत भरपूर गोडे तेलही घालतात. बैलाबरोबर इतर वरकड जनावरे म्हणजे म्हशी रेड्या, गाई-वासरे आदींनाही धुतात व त्यांनाही घुगऱ्या चारतात. आंबील पाजतात. हे झाल्यावर मग बैलांना रंगवायचे काम सुरू होते. प्रथम त्यांची शिंगे निळ्या, तांबड्या वा गुलाबी पेंटने रंगवितात. त्यावर आडव्या बेगडीच्या पट्ट्या डकवितात. त्यांच्या अंगावर हिरव्या, निळ्या, तांबड्या रंगाचे अनेक शिक्के उठवितात. फुले काढतात. ही रंगाची सजावट इतर जनावरांनाही केली जाते. त्यात म्हैस, रेडी, गाय-वासरे, शेळी, करडे, कुत्रा ही सगळी रंगविली जातात.

रंगाचे काम झाले की लगेच बैलांना सजविण्याचे काम चालू होते. हे सजविण्याचे काम प्रत्येकजण आपापल्या साधन सामुग्रीप्रमाणे जास्तीतजास्त आकर्षक करण्याचा प्रयत्न करतो. शिंगाच्या टोकावर शेंब्या घालतात. या शिंब्या बहुतेक पितळेच्या असतात. पण कित्येकजणांनी हौसेने त्या मुद्दाम चांदीच्या करवून घेतलेल्या असतात. शिंगात रेशमी गोंडे बांधतात. कपाळावर बाशींग लावतात. या बाशींगाच्याही अनेक तऱ्हा असतात. पाठीवर झूल घालतात. गळ्यात सुती, रेशमी कंडे व त्याचबरोबर घुंगऱ्याचे चाळ बांधतात. काहीजण बैलांच्या पायात खूर नखीचेवर चांदीचे तोडे देखील घालतात.

सकाळपासून हा सगळा साज आवरेपर्यंत अकरा बारा वाजायची वेळ होते. तोपर्यंत घरात पुरण-पोळ्या कडबोळी तयार झालेली असतात. मग

प्रत्येक बैलासाठी पाच पाच पोळ्यांचा स्वतंत्र नैवेद्य तयार करतात. दे
व देव्हाऱ्यावरील चिखलाच्या बैलांचाही नैवेद्य भरतात. देवाला व चिखल
बैलांना प्रथम नैवेद्य दाखवितात. चिखलाच्या बैलांचे शिंगात कडब
घालतात आणि मग दारातल्या बैलापुढे नैवेद्याचे एकेक ताट आणून त्
एकाद्या मुलाला भरविल्याप्रमाणे तो नैवेद्य चारतात. शिंगात कडब
अडकवितात. पाणी पाजतात. हे झाल्यावर बैलांचा धनी मग बैलांचे कप
वरून व शिंगांवरून, गळ्याखालच्या पोळीवरून आणि पाठीवरून मायेनं
फिरवितो. अशा वेळी पोट भरल्यामुळे पूर्ण समाधानाने बैल हागला व मु
तर ते मोठे शुभ समजतात. बैलाला पूजा पावल्याचे ते लक्षण मानता
मग धनी खरा समाधान पावतो. आणि हा बैलांच्या पूजेचा कार्यक्रम सं
त्यानंतर सर्व ग्रामदैवतांना नैवेद्य दाखवून येतात. सारवून आणि ओ
मांडून ठेवलेल्या सर्व औताना नैवेद्य दाखवितात. उन्हाळ्यात तयार झाले
शेणींचा पावसाळ्यात उपयोग करण्यासाठी हुडवा रचलेला असतो. त्या
नैवेद्य दाखवितात. त्यामध्ये हेतू हा की विंचू, किरडू वगैरे पासून तो सुर
राहावा. प्रत्येक शेताचा स्वतंत्र, नैवेद्य भरून ठेवतात. आणि मग घर
सगळी माणसे आनंदाने पुरणपोळीचे जेवण करतात.

गणेशोत्सवात गणपती जसा बसवितात तसाच गावात सार्वजनिक ठि
गावच्या कुंभाराने केलेला मोठा चिखलाचा बैल बसवितात. त्याची अ
व सजावट सगळे मिळून करतात. जेवणानंतर दुपारच्या वेळात सर्व शे
नैवेद्य पोचवितात. सार्वजनिक बैल शृंगारतात. आपापल्या बैलग
सजवितात. मग चारचे सुमारास मिरवणुकीची तयारी होते.

या मिरवणुकीसाठी आपल्या ढोल टिपऱ्यांसह गावचे गजे आणि ल
हलगीसह गावचे खेळे मोठ्या हौसेने तयार असतातच. शिवाय बाहेर
सनईवाले, बँडवाले असे वाजंत्रीही बोलावले जातात. एका रंगीत गा
माच ठेवून त्यावर तो चिखलाचा सार्वजनिक बैल बसवितात, त्याच्या
बाजूस केळींचे खुंट बांधून मोठी आरास करतात. आणि त्या गाडीला गाव
पहिल्या नंबरची धष्ट पुष्ट बैलजोडी जोडतात. त्याच्यामागे गावचा

शेतकरी आपली सजविलेली बैलजोडी जोडून गाडी लावतो आणि मिरवणूक सुरू होते. वाजत, गाजत खेळत आणि भुईनळे, बाण, औट उडवत ही मिरवणूक सगळ्या गावातून फिरते ठिकठिकाणी चौकातून 'कर' तोडण्याचाही कार्यक्रम होतो. शेवटी ती नदीवर जाते. तेथे त्या चिखलाच्या बैलाचे विसर्जन करतात आणि बैलांच्या उत्सवाची समाप्ती होते.

त्या नंतर त्या रात्री या सणाची हौस मौज म्हणून काही ठिकाणी तमाशे वा जलसेही उभे केले जातात.

व्हनुंग्या दिवशी औत गाडी चालते. पण बेंदराच्या दिवशी औताला वा गाडीला बैल अजिबात जुंपीत नाहीत. काही महादेव भक्त शेतकरी तर आठवड्यातला प्रत्येक सोमवार बैलांना न जुंपण्याचा वार म्हणून व्रताप्रमाणे पाळतात. जणू काय आधुनिक काळाप्रमाणे साप्ताहिक सुट्टीच ते आपल्या बैलांना देतात.

एखाद्या शेतकऱ्याचे घरी चालू वर्षात लग्नसमारंभ झालेला असेल तर त्याच्या घरी सणाची सर्व तयारी होते. पण कुळाचार म्हणून घरचा मालक स्वतः बैलांची पूजा करीत नाही. ती पूजा त्याच्या भाऊबंदानी नेऊन करायची असा प्रघात आहे!

आतापर्यंत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे बेंदूर साजरा करण्याची रीत दक्षिण महाराष्ट्रात आणि विशेषतः सातारा, सांगली आणि कोल्हापूर या जिल्ह्यात फार पूर्वीपासून चालत आलेली असून आजही ती तशीच प्रचलीत आहे.

वर्षभर शेतीत राबून आपल्यासाठी अन्नधान्य पिकविणाऱ्या बैलांबद्दल कृतज्ञता दाखविण्याचा हा बेंदूर सण सर्व शेतकरी मोठ्या हौसेने, आनंदाने व उत्साहाने साजरा करतात.

# पोळा आणि झडत्या

डॉ. भाऊ मांडवकर

यवतमाळ, वर्धा, चंद्रपूर या भागात आजही पोळा हा सण मोठा धूमधडाक्याने व विशिष्ट पद्धतीने पार पाडला जातो. पोळयाच्या आधल्या दिवसापासून बैलांकडून कामे करवून न घेता त्यांना सुटी देण्यात येते. आधल्या दिवशीच्या सायंकाळी शेतकरी व गडीमाणसे बैलजोडया गव्हाणीवर बांधतात आणि त्यांना कुटार, कडवा, ढेप, दाणा[1] इ. चांगले चांगले पदार्थ खाऊ घालतात. हळद व तुपाच्या मिश्रणाने बैलांचे खांदे शेकून काढतात. खांदे शेकता शेकता पळसाच्या तीन डाळयांना तेलात बुडवून तो शेतकरी वा गडीमाणूस बैलास उद्देशून म्हणतो –

अज[2] अवतनं[3] घ्या
उद्या जेवाले या

त्या खांद्यावर केवढा भार ते बैल नेहमी सहन करतात. खांदे शेकून काढण्याच्या विधीला आणि त्या दिवसाला 'खांद शेकनी' असे म्हणतात. खांदाशेकनीच्या दिवशी शेतकरी व गडीमाणसे गोडधोड पदार्थ करून खातात आणि बैलांची पूजा करून त्यांनाही ज्वारीचे मूठमूठ दाणे प्रसाद म्हणून चारतात. शेतकरी व गडीमाणसे जोरजोराने 'झडती' नावाची गीते गातात. शेवटी सर्वजण मिळून 'हर हर महादेव' असा गजर करतात. अशा झडत्या गडीमाणसे व शेतकरी अहमहमिकेने म्हणतात आणि शेजारी पाजारी ऐकतील एवढया जोराने एका विशिष्ट तालावर गातात. साधारणतः एका बैलजोडीला एक नोकर असे गडयामाणसांचे प्रमाण असते. जेथे जास्त गडीमाणसे असतील तेथे अशा झडत्यांची जणू स्पर्धाच सुरू होते.

१. दाणा – बैलांना खाऊ घालण्यासाठी तयार केलेला विशिष्ट असा पौष्टिक पदार्थ.
२. अज – आज. ३. अवतन – आमंत्रण.

अशा कार्यक्रमातील एका झडतीचा[१] नमुना–

चक[२] चहाडा[३]
बैल बहाडा[४]
बैल गेला
पोहनगडा[५]

पोहनगडची आनली माती
थे[६] देल्ली[७] गड्याच्या हाती
गड्यानं देल्ली कुंभाराच्या हाती
कुंभारानं घडवलं पिपळपान[८]

थे देल्लं मालकाच्या हाती
मालकानं देल्लं गड्याच्या हाती
गड्यानं लावलं हो बैलाच्या मस्तकी
एक नमन गौरा-पारबती[९] हरबरा[१०]
हर हर महाऽऽदेव

---

१. ह्या व या पुढील झडत्यांची भाषा यवतमाळ, हिंगणघाट या भागातील आहे. गडचिरोली भागाच्या खास बोलीतही ह्या झडत्या आहेत. परंतु या लेखात त्यांचा वापर केला नाही. २, ३. हे दोन्ही शब्द पादपूरकांप्रमाणे गीतात आले असले तरी बहाड्या रंगाच्या आपल्या आवडत्या बैलाला 'चहाडखोर' असे विनोदाने शेतकरी वा त्याचा गडी (नोकर) म्हणतो, असे दिसते. 'चक', चा अर्थ 'चक्क', 'निरवालस' असा होतो. 'चक' 'स्वच्छ', 'साफ' असाही अर्थ वापरणीत असल्यामुळे तोही अर्थ लागू पडतो. ४. बहाड– चित्रविचित्र रंगाचा, अंगावर ठिपके असलेला. (बैल). ५. या ऐवजी 'पवनगड' असा काही जागी उच्चार होतो. तो उचित वाटतो. (गीताखालील खुलासा पाहावा.) ६. थे–ती. ७. देल्ली–दिली, देल्लं–दिलं, दिले. ८. पिपळपान–पिंपळाच्या पानाच्या आकाराचा एक अलंकार, पिंपळपान, ९. पारबती–पार्वती १०. हरबरा– (१) साजरा शंकर (२) हरबोलाचा अज्ञानाने झालेला अपभ्रंश.

या झडतीतून शेतकऱ्याचे व त्याच्या नोकरमाणसाचे आपल्या बैलांबद्दलचे अपार प्रेम दिसून येते. तो विनोदाने व आपुलकीने बैलांला चहाडखोर म्हणतो आणि त्यांच्या स्वच्छपणाची, उत्तम रंगाची व नीटसपणाची ग्वाही देतो. बैल ज्या गडावर गेला असेल त्याचे नाव 'पोहनगड' ठेवतात. एक तर, पोळ्याच्या दिवशी व दुसरे म्हणजे बैलाला नदीत आंघोळीला म्हणजे 'पोहनी' द्यायला नेतात, तेथील भागाचा नदीचा डोह ज्या उंचवटयाच्या शेजारी असेल त्याला महानत्व प्राप्त झालेले असते. आपला बैल वायूच्या उंच शिखरावर वायू जेवढा उंच असेल तेथवर वायूच्या वेगाने गेला, या म्हणण्यातील भरारी काही और आहे.

पवनगडावरील त्या अत्युच्च शिखरावरील दिव्य, धातुमय अशी 'माती' त्या बैलाने आपल्या शिगांनी उकरून आणली. त्या शिगांवरची माती मालकाने काढून गोळा केली. ती माती मालकाने गड्याला दिली. गड्याने ती कुंभाराकडे नेली. कुंभाराने त्या मातीचे 'पिंपळपान' तयार केले.

कुंभाराने घडविलेले दिव्य मृतिकेचे ते पिंपळपान शेतकऱ्याकडे आले. शेतकऱ्याने ते आपल्या नोकराला दिले. नोकराने ते पोळ्याच्या सणाच्या निमित्ताने बैलाच्या मस्तकावर शोभून दिसेल अशा पद्धतीने लावले. पोळ्याला बैल सजविताना त्यांच्या कपाळावर आरसे, बेलपत्री, मणके, चवरी, माथोटी, चमकणारे बेगड अशा सारख्या अलंकारवत वस्तू लावण्याची वा बांधण्याची प्रथा आहे. त्या सर्वांत चमकून, उमटून दिसेल असे हे 'पिंपळपान' म्हणजे 'झडती' काराच्या कल्पनेचा उच्च विलास म्हटला पाहिजे.

अशी ही सलग भावदर्शक 'झडती' संपली की, मग सर्वजण एकदम गजर करतात तो महादेवाचा बैल म्हणजे नंदी. शंकराचे, महादेवाचे वाहन, नंदीच्या मालकाचे स्मरण करण्यासाठी सर्वजण गजर करतात–

हर हर महादेव

पण त्या आधी गौरी–पार्वतीचे स्मरण केले जाते. विशेष हे की, पार्वती शंकराला एकाच वेळी (एकदम, एकसरी, 'एक') नमन करून ते शेतकरी

शेतमजूर अभावितपणे गौरी व शंकराच्या अभिन्नतेचे आगळे रूप ' झडती 'तून व्यक्त करून जातात.

' हर बरा ' हा शब्द अपभ्रंश खरा, पण 'हर (शंकर) बरा (चांगला) हे दोन शब्द तोडून उच्चारले तर हा आमचा बरवा, साजिरा, गोजिरा शंकर ' असाही भाव शेतकरी व शेतमजूर व्यक्त करतात. !

प्रत्यक्ष पोळ्याचा दिवस उजाडतो तेव्हा शेतकरी किंवा त्याची गडीमाणसे भल्या पहाटेलाच आपले बैल हिरव्या रानात चरावयास नेतात. सूर्योदयानंतर कासरा दोन कासरे दिवस वर आल्यानंतर बैलांना नदीवर नेऊन ' पोहणी ' देतात. बैल चांगले ' पोहणी ' लागतील अशी जादा पाण्याची जागा निवडतात. गावातील अनेकांचे बैल तेथे ' पोहणी ' द्यायला आणलेले असतात. गडीमाणसांना या कामात अती उत्साह, अती उल्हास असतो. एक प्रकारे तेथे तो खेळच चालतो. बैल न्हाऊन निघतात व त्या सोबत बैलकी[1] ही !

त्या पूर्वीच घरातील एखादी व्यक्ती, एखादा गडीमाणूस किंवा खुद्द शेतकरी रानात जाऊन पळसाच्या फांद्या तोडून आणतो व त्या आपल्या घराच्या दारावर दोन्ही बाजूंना उभ्या करतो. त्यांना ' मेढे ' असे म्हणतात. शेतात. मळणीच्या वेळी बैलांची पात (पंक्ती) ज्याच्या भोवती फिरते तो खुंट वा खांबसुद्धा पळसाचाच असतो. आणि त्यालाही ' मेढे ' असेच म्हणतात. व्याकरणदृष्टया खळ्याची मेढ स्त्रीलिंगी असते तर पोळ्याचा ' मेढा ' पुल्लिंगी आहे. घरातील सुवासिनी दारावरील मेढ्यांना हळदकुंकू लावून व त्यांच्या-वर तांब्याने पाणी टाकून पूजते. गावातील प्रत्येकाच्या (पुढच्या) दाराला तोरण बांधण्याचे काम गावचा कोतवाल (महार, पांडेवार) करतो. तो राना-तील पळसांची मुळे खोदून आधीच बारव तयार करतो व त्यांचा ' पोडा ' '[2]आटून ' दोरी बनवितो. त्या दोरीला धाडचाच्या शिलकांच्या मदतीने शिवून आंब्याच्या पानांचे तोरण तयार करतो. ते तोरण तो शेतकऱ्यांच्या दारावर लावतो. मोठ्या शेतकऱ्यांच्या दाराला लांब व जास्तीचे तोरण बांधून तो

---

१. बैलकी–बैलकरी, बैल चारणारा, राखणारा. २. आटणे–वळणे.

यांच्याकडून जास्त 'दानी[1]ची' मागणी करतो. शेतकरी लोक या कामाच्या मोबदल्यात कोतवालास आपल्या कुवतीनुसार शेरभर, अधोलीभर, पायलीभर अशी ज्वारी देतात.

सकाळच्या जेवणापूर्वी बैलांना देव समजून प्रथम 'उपार[2]' दाखवितात. त्या नैवेद्यरूप भोजनात पुरणाची पोळी प्रमुख असते व ती बैलांना आत्मीयतेने खायला घातली जाते. घरमालकीण हळद, कुंकू, अक्षता इत्यादींनी बैलांची पूजा करते. बैलांच्या पायांवर तांब्याने पाणी टाकते. बैलांचे पाय आपल्या पदराने पुसून ती 'वृषभदेवाच्या' पाया लागते. मग घरमालक, घरातील इतर व्यक्ती व नोकरमाणसे बैलांना तसाच वाकून नमस्कार करतात.

अशी ही पूजा चालू असताना गडीमाणसे व मालक झडत्या म्हणतात. काही झडत्यांमध्ये व्यक्तिपरत्वे थोडाबहुत फरक आढळतो. असा एक नमुना–

**चक चहाडा**
**बैल बहाडा**
**गोनीवर टाकला हो कडा**
**उचलून नेला आपल्या घरा**

या झडतीत काहीसा अपुरेपणा आहे, हे स्पष्टच आहे. आरंभी दिलेल्या झडतीमध्ये पवनगडला जाऊन तेथील माती शेतकरी आणीत असतो तसाच तो येथेही गोणी भरून काहीतरी धनद्रव्य आणीत असून ते द्रव्य दिसू नये म्हणून त्यावर कडा ताटी टाकली असली पाहिजे, हे उघड आहे. धनद्रव्याचा असा हा साठा बैलांच्या मदतीने शेतकरी घरी आणतो, असा भाव आहे. नाहीतरी, शेतात पिकवणारे धान्यरूपी मोती ही शेतकऱ्यांची दौलतच आहे व ती बैलांच्या मदतीने शेतकरी घरी आणतो. प्रत्यक्षात शेतकऱ्याची कशीही का परिस्थिती असेना, काव्यात आणि कल्पनेत तरी तो 'कुबेर' आहे हेही काही कमी नाही.

---

१. दानी–मोबदल्यादाखल द्यावयाचे धान्य. २. उपार–उपहार, नैवेद्य.

या दिवशी सकाळचे जेवण पुराणपोळी असते. सर्व गडीमाणसांना मालकाकडे हे खास जेवण असते. वऱ्हाडी पुरणपोळी म्हणजे कणकेच्या पातळ आवरणातून तो पापुद्रा न फाटता लालघमक पुरण दिसेल अशी, आणि वाटीभरून तूप, अशा थाटाची. तुपात बुडवून पोळीचा प्रत्येक घास खायचा. वाढणारी बाई तुपाची शीग कमी होऊ देणार नाही, उलट पात्रावरून तूप वाहून जावे इतकी तुपाची रेलचेल.

जेवणानंतर घरातील पुरुषमंडळी व गडीमाणसे बैलांना सजवितात. पोळ्यासाठी नाना प्रकारचे अलंकार मुद्दाम बैलांकरिता केलेले असतात. बैलांना खरारा करून त्यांच्या पाठीवर गेरूचे लाल थापे मारतात. शिंगांना रंगीबेरंगी, चमकिले बेगड लावतात. गळ्यात मणके, माळा, कसाटचा, घंटचा, घुंगरू, तर पायात तोडे, साखळचा, काळे दोरे, असे विविध अलंकार घालतात. मस्तकावर बेलपत्री व माथोटी बांधलेली असते. अंगावर शानदार झुली टाकतात. आपापल्या परीने शेतकरी लोक आपापल्या बैलजोडचा शृंगारतात.

गावाच्या एका कडेला सोयीच्या जागी वा मैदानी भागात चार पाच फाटे गाडून, सुमारे फर्लांगभर लांब असे तोरण बांधण्याचे काम गावचा कोतवाल करतो. सुमारे चारपाच वाजण्याच्या सुमारास त्या तोरणाखाली प्रत्येकजण आपापली बैलजोडी घेऊन येतो व उभी करतो. सर्व बैल रांगेत व एकाच दिशेने तोंड करून उभे असतात. नव्या कपडचाने सजलेला गडी, मालक अथवा मालकाचा मुलगा बैलजोडीचे कासरे धरून उभा असतो. सर्वप्रथम प्रत्येक बैलजोडी गावच्या मारूतीला प्रदक्षिणा घालून येते व मग तोरणाखाली उभी राहते. पाटलाचा मखराचा बैल तयार होत असतो. त्यास धरूनच सजवून आणले जाते. त्याच्या शिंगांवर मखर बांधतात. तो बैल मारूतीला प्रदक्षिणा घालून पोळचात येतो. तोरणाखाली आला की, त्या मानाच्या बैलाला पुजून त्याचा मखर पेटविण्यात येतो. तेव्हाच एक नवीन लुगडे व चोळीचा खण ( लाल दोऱ्यासह ) लावलेली पाच सहा फूट लांबीची काठी मारूतीचा 'भगत' बैलांच्या मानेवरून पूर्ण तोरणभर फिरवीत नेतो व परत ती मारूतीजवळ नेतो. त्याला चौरीफेरा असे म्हणतात. या चौरीचा आकार

गुढीसारखा असतो. मखर पेटला की, पोळा फुटतो. बैलकरी आपापले बैल घेऊन धूम घराकडे दौडत जातात. काहीजण तोरण तोडतात. तुटलेल्या तोरणाच्या वाखाचा दोर थोडा जरी हाती लागला तरी धन्य मानून त्याचे मुसके[1] करतात. काही आजारात ते मुसके उकळत्या पाण्यात टाकून त्या पाण्याने आंघोळ केल्यास आजार जातो असे शेतकरी सांगतात. तोरणाचे मुसके मानाचे म्हणून घरी बाळगणारे अनेक शेतकरी आढळतात.

पोळा भरायला लागल्यानंतर मखर पेटवीपर्यंतचा जो दीड दोन तासांचा वेळ असतो, तो मोठा उत्साहाचा व मौजेचा असतो. नवे फेटेवाले, कुडते[2]वाले शेतकरी, गडी, लोक पोळ्यात जमलेले असतात. पोळ्यात पोहचू शकणारी बरीचशी मुलेही फेटे बांधून व धोतर नेसून आलेली असतात. बायका व मुले दुरून पोळ्याची गंमत बघतात.

ह्या दीड दोन तासांच्या अवधीत झडत्यांची बरसात सुरू होते. बरसात (पाऊस) सुरू असली तरी लोकांचा उत्साह कमी होत नाही. जास्तच पाऊस असला तर लोक घोंगड्या पांघरून येतात. मग त्या वर्षीचा तो पावसाळी पोळा 'घोंगड्या पोळा' म्हणवितो. झडत्यांवर झडत्या झडू लागतात. निर्झराचे पाणी झुळूझुळू झरत वाहत असले तर झर झर असा काहीसा शांत आवाज होतो. ओढा असला तर खळखळात जास्त. झडत्या झरत नसतात, त्या खळाळतही नसतात, तर नौबतीसारख्या झडत असतात. घोंघावत असतात. खड्या स्वरात, खणखणाट वजा, उंच व दणकेबाज आवाजात म्हटली जाणारी ही गीते एकापाठीमागून एक अशी म्हटली जातात. काही झडत्या उत्तरास प्रत्युत्तर अशा पद्धतीने म्हणण्यात येतात. एकावर दुसरी कडी करतो. अगदी जोर चढल्यागत, धुंदावत, मस्त अवस्थेत झड[3] असली तरी झडती कमी होत नाही. झडतीवर झडती झडतच राहते. ग्रामीणांनी या गीतप्रकाराला 'झडती' हे नावही मोठे अन्वर्थकच दिले म्हणायचे.

---

१. बैलांच्या तोंडावर चढविण्याची जाळीदार वस्तू. २. सदरा, शर्ट ३. पावसाची सातत्याने सुरू असणारी रिप-रिप.

समूहात एकाने झडती म्हटली की, ती दुसऱ्याला एकप्रकारे आव्हानच असते. काही काही झडत्या तर दुसऱ्याला खास चिडविण्यासाठीच असतात. त्यांना खवळणीच्या (खवरनीच्या) झडत्या म्हणतात. त्यांचे स्वरूप आक्रमक असते. आव्हानात्मक, उत्तेजनात्मक अशा पद्धतीची त्यांची धाटणी असते.

कोणत्याही कार्याला गणपतीच्या स्मरणाने आरंभ होतो. पोळ्याला जमलेले हे झडतीबहाद्दरही आधी गणेशालाच नमन करतात–

गना गना[१]
नमू गना
त्याची कंठी[२]
सांगू कोणा
आठ बारा
चौऱ्यास[३] गना
लांब सोटावर
टुचकन मारती
गन करे
गनाची आरती
आफुन[४] करू हो महादेवाची आरती
एक नमन गौरा-पारबती हरभरा
हरहर महादेव

रूपकात्मक कूट रचनेत ग्रामीण लोक मागे नाहीत, हा या झडतीचा फलितार्थ! गणेशाचे विशालत्व वर्णन करता करता त्याच्या लांब सोंडेला "लंबा सोट" असे सरळसोटपणे म्हणून टाकले आणि "मग करे गनाची आरती" यात

१. गण, गणेश. २. कंथा, कथा, महिमा. ३. चौऱ्यांशी. ४. आपण.

अध्यात्माचे अद्वैताचे सुंदर तत्त्व गोवून टाकले आहे, हे जाणत्यांना सांगितलेच पाहिजे असे नाही. संतांच्या रचनेची आठवण या एका ओळीनेच होऊन जाते. गणेशाच्या पित्याचे मोठेपण अमान्य होऊ नये यासाठीच की काय सर्वांनी मिळून शेवटी महादेवाची आरती केलेली आहे !

समोरच्या झडतीबहाद्दराला आव्हान द्यायचे तर मग कोणत्याही झडतीच्या पूर्वार्धाला जोडून, पुढील ओळी जोडून, तो "चेव" आणला जातो –

असन गुरूचा पुरा
मार लंकीचा हुडा[1]
चक्रसभे[2]मंधी
भरल्या पोळ्यामंधी
द्या आमच्या बेलपत्री[3]चा झाडा[4]
मंग[5] जा हो आपल्या घरा
एक नमन गौरा - पारबती झरबरा
हर हर महादेव

–जो कोणी झडतीबहाद्दर असेल त्याने हे माझे आव्हान स्वीकारावे. तो आपल्या गुरूपासून खास विद्या शिकला असेल तर लंकेवर उड्डाण मारण्याचे सामर्थ्यही त्याला असेल. (मग झडतीचे उत्तर देणे त्याला कठीण नाही) या चार लोकांच्या जमावात, या भरलेल्या पोळ्याच्या उत्सवात मी माझ्या बैलांचे, त्यांच्या पवित्र बेलपत्री अलंकाराचे जे झडती-गीत गातो त्याचे उत्तर

---

१. हुडा–उड्डाण. २. चक्रसभेमंधी–चक्राकार भरलेल्या जनसभेत. ३. बेलपत्री–पोळ्याच्या दिवशी बैलास चढविण्यात येणारा बेलाच्या पानांचा एक खास अलंकार. या दिवशी महादेवास आवडणाऱ्या बेलपत्रीचा खास मान असतो. ४. झाडा–उत्तर, पडताळा, परीक्षा. ५. मंग–मग.

द्या. पडताळा द्या. परीक्षेत पार व्हा. (दुसरी झडती म्हणून आमच्यावर ताण करा, कडी करा.) नंतर आपल्या घरी जा.

अशाच एका झडतीत झडतीकार आपल्या गुरूच्या बळाची कल्पना देतो–

काटी रे काटी
सगुन काटी
नागेलीचे पानं देठोदेठी
सात खडे नऊ पेरं
काडी मोडे गुरूच्या बरं
असन गुरूचा पुरा
मार लंकेचा हुडा
चक्रसभेमंदी
भरल्या पोळ्यामंधी
द्या आमच्या बैलाच्या बेलपत्रीचा झाडा
एक नमन गौरा पारबती हरबरा
हर हर महादेव

नुसती सगुणकाटी! क्षुल्लक काटेरी झाड! पण त्यालाही (गुरू कृपेच्या बळावर) नागवेलीची पाने देठोदेठी आलेली मी दाखवून देऊ शकतो.

दणकट दांडीसारखी, कठीण उसासारखी नऊ पेरांची (लांबसडक) व सात अळे (खडे) असलेली मजबूत काडीही गुरू कृपेच्या बळावर मोडून दाखवीन.

तुमच्याही गुरूची कृपा तुमच्यावर असेल तर लंकेवर उड्डाण मारा. चार लोकांच्या सभेत या. भरल्या पोळ्यात आमच्या या झडतीचे उत्तर द्या.

वरील झडतीमधील आरंभीच्या ओळी कुणी कुणी अशाही म्हणतात ––

काटीत काटी सगुन काटी
नागेलीचे पान देठोदेठी
सात खडे नऊ पेरं
काठी मोडे गुरूच्या बरं

जेव्हा खवळणीच्या म्हणजे चिडवणीच्या झडत्या झडतात, तेव्हा श्लील–अश्लील आणि औचित्य–अनौचित्य यांचे कुणालाच भान राहत नाही. "घोंगडचा पोळचाच्या दिवशी (पाऊस सुरू असता भरलेल्या पोळचात) झडती पुढील आवेशाने म्हटली जाते ––

झिमी झिमी[1] पानी[2] पडे
बैलकी[3] दारा बैल सोडे
सहा बैल भठाटी[4]
फुलाचा झेला[5] .... गाभन ठेवला[6]
तव्हा[7] तोरनाखाली गेला
फिरून बोल रे
चिपडीच्या[8] पोरा
नाही त[9] मारीन एक जोडा
तव्हा जा आपल्या घरा
एक नमन गौरा – पार्वती हरबरा
हर हर महादेव

---

१. "झिमिड झिमिड" असाही प्रयोग आढळतो. २. पाऊस. ३. बैलांचा राखणदार. ४. पाभोटी, बैलांच्या मस्तकावर लावण्याचा पोळ्यातील एक प्रमुख अलंकार. ५. गुच्छ, पुष्पसमूह. ६. मागे लागून काम करून घेणे, लकडा लावणे. ७. तेव्हा. ८. डोळ्यात मचमच चिपड साचलेली, बटबटीत डोळ्यांचं. ९. तर.

—— या झडतीचे स्वरूप निश्चितच चिडविणीचे आक्रमक असे आहे.

आपल्या बैलाची वा साध्या बैलकऱ्याची तुलना श्रीमंत शेतकऱ्याशी करून त्या श्रीमंताला "क्षुद्र" लेखण्याचा ह्यात प्रयत्न आहे.

. . . झिम झिम पाऊस पडत आहे. आमचा बैलकरी बैल सोडतो. मात्र . . .

सहा बैल असलेला बैलांच्या मस्तकी माभोटचा व पुष्पगुच्छ लावून मिरविणारा मोठा मालक, मालधनी मात्र (पावसाच्या भीतीने) पोळ्यातच आला नाही. तेव्हा त्याला बोलून बोलून "गाभण ठेवला" त्याचा पिच्छाच पुरवला, म्हणून तो मग बैल घेऊन तोरणाखाली पोळ्यात आला. (त्याचे बैल . . . अगदीच रडे असतील, म्हणूनही तो आधी पोळ्यात आला नसेल, असेही सूचित होते.)

ह्या झडतीचा समारोप करताना "यावर कडी कर" म्हणून स्पर्धक झडतीकाराला पहिला झडतीकार म्हणतो., "आम्ही असे पराक्रमी आहोत. तुला चिपडीच्या पोराला माझ्या या झडतीवर उत्तर आहे काय ? बोल तर खरा पुन्हा ? बोलणार नाहीस तर एक जोडा मारीन. मग मुळू मुळूवाणी आपल्या घरी जा."

"फिरून बोलरे चिपडीच्या पोरा" व त्यानंतरच्या दोन ओळी (एकूण तीन ओळी) खवळणीच्या झडतीला मुद्दाम जोडूनच म्हणतात. "चिपडीच्या पोरा" या शिवीऐवजी कधी "बटकीच्या पोरा", "चिपडीनच्या पोरा" "बटकीनच्या पोरा" वगैरेसारखे शब्द वापरतात.

झडतीतला भयानक विनोदाचा भागही पाहण्याजोगा असतो ——

**खुरी[१] रे खुरी हरनखुरी[२]**
**मारला बाम्हन हागला तुरी**

---

१. खुर. २. हरणाची खुर. ह्या दोन्ही ओळी पादपूरके म्हणून चालीसाठी वापरल्या आहेत, तरीपण त्यांनाही अर्थ येऊन चिकटतो.

चोखट चोखट[४] वठ्यात[५] भरी
कास्टा[६] फिटला घराकडं परी[७]
असन गुरूचा पुरा
मार लंकेचा हुडा चक्रसभेमंधी
द्या आमच्या बैलाच्या सिंगुटीचा झाडा
एक नमन गौरा – पारबती – हरबरा
हरहर महादेव

खुरात खूर हरणाची खूर सुंदर असते, (कारण हरीण सुंदर नाजूक असते.) असे सांगून अनामिक झडती – रचयित्याने आपल्या निरीक्षणशक्तीचा, सौंदर्य-दृष्टीचा, रसिकतेचा व कोमल भावांचा दृढ परिचय दिला.

लहान गावात एखाददुसरेच ब्राह्मण कुटुंब राहत – असते. तो ब्राह्मण जर शेतकरी असला तर त्याला शेती प्राय: जमायची नाही. तो जर पोळ्यात आला तर त्याची उडवण्यासाठी ही झडती उपयोगात आणली जाणार.

जरी ब्राह्मण पोळ्यात आला नाही तरी त्याच्या 'गुणा' चा परिचय हा ग्रामीण झडतीकार आपल्या दृष्टीने तो जेवढे समजला तेवढेच शब्द वापरून देतो–

ब्राह्मण घाबरट, शेळपट. त्याला मारले, थोडा जरी मार दिला, तरी तो एकदम घाबरतो व त्याचे धोतर पिवळे होते !

या झडतीत 'असन गुरूचा पुरा' इत्यादी ज्या चिडवणीच्या खवळणीच्या ओळी आहेत त्यात "द्या आमच्या बैलाच्या सिंगुटीचा झाडा" असे म्हटले आहे. यापूर्वी या ओळीत "बेलपत्री" चा झाडा "असे होते. असे हे पर्यायी व औचित्यपूर्ण शब्द झडत्यांमध्ये आवृत होतात.

---

४. उत्तम उत्तम, चांगल्या चांगल्या. ५. वोट्यात, ओच्यात. ६. कासोटा.
७. पळी–पळे–पळून जातो, पळाला.

आमच्या बैलांच्या उत्तम, रंगरंगोटीच्या व चमकत्या बेगडांच्या सुंदर शिंगांपुढे तुमच्या बैलांची शिंगे अगदीच ही वाटतात. आमच्या या वैभवाचे उत्तर देण्यासाठी तुमचे बैल, तुम्ही व तुमच्या झडत्या उण्या पडतात, हा भाव.

आता ही शेवटची झडती पाहू या आणि तिच्यातील सौंदर्य रसिकतेने टिपून घेण्याचा प्रयत्न करू या–

बैल कोनाचे[१] ?
गावच्या पुताचे[२]
काच लावले हो सुताचे
कासऱ्याले देल्ला एक येढा[३]
बैल गेले पारबतीच्या दारा
पारबतीनं देल्ला हातचा इडा[४]
फिरून बोल रे बटकीनच्या पोरा
नाही त मारीन एक जोडा
तव्हा जा आपल्या घरा
एक नमन गौरा पारबती हरबरा
हर हर महादेवा

साधारणतः पोळा फुटताना, बैल घरी दौडवण्याच्या पूर्वी म्हणावयाची ही झडती आहे. स्वतःची व स्वतःच्या बैलांची फुशारकी मारणारी व्यक्ती ह्या झडतीत म्हणते –

हे बैल कोणाचे ? माहीत आहे का ?
हे गावाला भूषण ठरणाऱ्यांचे, माझे
या बंद्याचे बैल आहेत.

---

१. कोणाचे. २. पुत्र, सुपुत्र, श्रेष्ठ, गावचा पूत–गावाला भूषणावह ठरणारी व्यक्ती. ३. वेढा, वळसा, झटका. ४. विडा.

> यांच्या गळ्यात, मस्तकावर सुताने तयार केलेले जे जे अलंकार आहेत, त्यांवर आरसे लावलेले आहेत. बैलांचे पट्टे, झुली, इ. अलंकारांना आरसे लावण्याची पद्धत आहे.
> कासऱ्यांना (बैल आवरावयाच्या दोरांना) मी एक झटका दिला, तर माझे हे तडफदार बैल एकदम उसळले आणि पार्वतीच्या दारात गेले. पार्वतीने स्वतःच्या हातांनी तयार केलेला विडा मला दिला.

आपले बैल उत्तमोत्तम अलंकारांनी विभूषित असे, तडफदार, कासऱ्याच्या एका वळशासरशी चौखूर उधळणारे आहेत, हे तर या झडतीत दर्शविले आहेच, पण पोळा फुटल्यानंतरच्या एका प्रथेचाही तीत उल्लेख आहे. पोळा फुटताच लोक आपापल्या बैल जोड्या घेऊन भरधाव घरी येतात. घरातील सुवासिनी बैलांची पूजा करते. हळद, कुंकू, अक्षता बैलांना व बैलकऱ्यांना लावते. पायावर पाणी टाकते, पाया पडते. ज्वारीचे दाणे, पुरणाची पोळी बैलांना प्रसादाप्रमाणे खाऊ घालते व पंचारती घेऊन भावभक्तीने ओवाळते, बैलकऱ्याला, घरमालकाला घरधनीण स्वतःच्या हातांनी केलेला विडा देते आणि मग ती बैलजोडी घेऊन बैलकरी शेजारीपाजारी, गावात, प्रमुखांच्या घरी, ओळखीच्या लोकांच्या दारी फिरवितो. बरोबर बैलजोडीची यथोक्त पूजा होते व बैलकी-दादाला चारदोन आणे बिदागीही मिळते. ती बिदागी प्राय: विड्यांच्या पानावर ठेवूनच बैलकीदादास दिली जाते.

वरील झडतीत, मान्यवर बाईच्या घरून मान होतो, हे झडतीतला नामक दर्शवितो. फार काय, त्या मान्यवर महिलेच्या जागी तो नंदीबैलाशी निकटत्व असलेल्या पार्वतीमातेला कल्पून तिजशी भावभक्तीपूर्ण नाते जोडतो !

झडत्या द्व्यर्थी असतात हेही आपण पाहतोच. या झडतीत तसेच आहे. जर पार्वतीदेवीशी नाते जोडायचे नसेल तर तेथे रसिक दृष्टीने घरधनीण, प्रिय वा सुंदर युवती कल्पिता येणे काहीच कठीण नाही.

पोळ्याचा मुख्य दिवस म्हणजे पिठोरी अमावास्या. या दिवशी सायंकाळी बहीण आपल्या भावाच्या पाठीवर काकडी फोडते. ही काकडी लहानशी व कोवळी असते. बरेचदा ही काकडी उंबरठ्यावर आधी फोडून भावाच्या पाठीवर नंतर ती नाममात्र फोडल्यासारखे बहीण करते. हा विधी होईपावेतो घरात काकडी खात नाहीत. या विधीनंतर काकडी खायला हरकत मानली जात नाही.

# पोळा

*लेखिका :* ***कु. नीलिमा दाणी***

"पहा सजविले कसे देव हे परधान्या राजा
करावयाची आज तयाची प्रेमाने पूजा"

हे "परधान्या राजाचे" "देव" म्हणजे बैल. श्रावणात पेरणी संपल्यावर दया-मायेच्या ओलाव्यात कुठेतरी कृतज्ञता अंकुरते अन् ह्या मुक्या प्राण्यांना भक्तिभावाने पूजलं जातं. काळ्या वऱ्हाडी देहात पांढरं शुभ्र कनवाळू, श्रद्धाळू मन वसलं आहे. काळ्या मातीतून डोकावणाऱ्या शुभ्र कापसासारखं.

कामाच्या रगाड्यातून उसंत मिळताच बैलांच्या कष्टांची जाण येते. त्यांना मारल्या झोडल्याचा पश्चाताप डोकं वर काढतो. अन् क्षमायाचनेसाठी शेतकरी पोळ्याच्या आदल्या दिवशी आवतणं देताना म्हणतो–

"माझा मायबाप तुले
मारलं-झोडलं

आभाळाचं मन तुहं
इसर झालं गेलं
आज आवतनं देतो तुले
ये उद्या जेवाले

पोळ्याच्या आदल्या दिवशी शेतकरी बैलांजवळ जोड्याने येतो. बैलाच्या पाठीवरची थाप शब्दांशिवाय सारं सांगून जाते. दोघांचेही डोळे पाणवतात अन् ठिबकणाऱ्या आसवांसोबत हे शब्द ओघळतात. हे प्रेम नुसतं शाब्दिकच रहात नाही. त्यांनी कष्ट केले म्हणून त्यांचे ( बैलांचे ) नांगर ओढून शिणलेले खांदे तेल-हळदीनं शेकले जातात. पण त्यातील जिव्हाळ्याची ऊबच बैलांना जाणवत असावी. प्राणी-मनुष्य ह्यातला भेद इथे विरघळतो. कृतज्ञता, प्रेम, जिव्हाळा ह्या भावनांचं संमिश्रण इथे दिसतं. बैल अन् शेतकरी दोघांच्याही डोळ्यातून ओघळणारी आसवं एकाचं हृद्गत दुसऱ्याला कळल्याची साक्ष देतात.

ही दुसऱ्या दिवशीची सुरवात दुसऱ्या दिवशी पहाटेपासनंच त्यांची सरबराई सुरू होते. दिवाळसणाला आलेल्या लेक-जावयांसारखी ऊन पाण्याच्या आंघोळी, मग रंगीत झूला, रुईफुलांच्या माळा, झेंडूच्या माळा, शिंगांना बेगड लावलेला, त्यावर मखर, गळ्यात पायात घुंगरू, अंगावर रंगांचे ठिपके, अगदी शक्य तेव्हढं त्यांना सजवतात. मग खास पुरणपोळीची मेजवानी. नंतर संध्याकाळी वाजत-गाजत "पोळा फोडायला" नेलं जातं. गावाबाहेरच्या मारोतीजवळ मोठ्ठं तोरण बांधून त्याखाली बैलांचा मेळावा भरतो. पाटलाचा बैल मध्यभागी. पाटलाने ते तोरण तोडायचं म्हणजे पोळा फुटला. असं समजतात. काही गावात त्याच ठिकाणी मग शंकरपट होतो (बैलांच्या धावण्याच्या स्पर्धा) मग घरी आल्यावर ( गुणाची बाळं परतल्यासारखं ) त्यांना तुकडा-पाणी ओवाळलं जातं. ते "प्राणी" आहे हे पूर्णपणे विसरून सर्व व्यवहार सुरू असतात. त्या दिवसापुरते बैल शेतकऱ्यांसाठी नसून शेतकरी बैलांसाठी असतात. रात्र होते तेव्हा "कौतुक" संपल्याची जाणीव देत,

हे कौतुक मनात साठवून पुन्हा बिचारा बैल दुसऱ्या दिवशी सजतो. नाकात वेसण घालून शेतावर जाण्यासाठी एक दिवस का होईना प्राणीमात्रांचेसुद्धा उपकार स्मरणारा हा सण माणसातील माणुसकीचे मनोज्ञ दर्शन घडवितो.

# "कर" तोडण्याचा भव्य कार्यक्रम

( सीमा भागातील मौजे रामपूरचा वैशिष्टयपूर्ण बेंदूर सण )

लेखक : **श्री. दत्ता उमराणीकर**

बैलपोळा म्हणा अगर बेंदूर म्हणा, सणाचे वेळी बैलांची पूजा करून वर्षभरातील कष्टांचा सन्मान करण्याची पद्धत सर्वत्र रूढ आहे. परंतु मौजे राम-पूर या सीमाभागातील (कर्नाटक-महाराष्ट्र) गावी बेंदूर हा सण वेगळयाच पद्धतीने साजरा होतो.

आषाढ महिन्यात मूळ नक्षत्रावर निपाणीपासून तीन मैलांवर असलेल्या मौजे रामपूर येथे बेंदूर सण मोठ्या थाटाने आणि वेगळ्या पद्धतीने साजरा होतो. या सणाचे वैशिष्टय म्हणजे सायंकाळी दिवे लागणीचे सुमारास होणारा बैलानी "कर" तोडण्याचा भव्य कार्यक्रम. आजुबाजूच्या चिखलवाळ, पांगिरे, अकोळ, निपाणी, लखनापूर, नांगनूर, जत्राट, खडकलाट, शिरपेवाडी इत्यादी अनेक गावचे हजारो लोक हा कार्यक्रम पाहाण्यासाठी जमतात.

"कर" तोडणारे दोन बैल गावच्या गावकामगार पाटलांचे असतात. या सणाचे आधी एक महिनाभर या बैलांना शेतीच्या कोणत्याही कामासाठी उपयोगात आणले जात नाही, तर उलट सकस आहार भरपूर दिला जातो. त्यामुळे ती जनावरे तयार होतात. या सणाचे वेळी गावातील सर्व घरे रंगवून

व पिंपळाच्या पानांची तोरणे लावून सुशोभित करतात. प्रत्येकाचे घरी खूप पाहुणे मंडळी जमतात. घरच्या बैलांची पूजा करून पुरणपोळयांचा नैवेद्य दाखवितात.

"कर" तोडण्यासाठी गावच्या वेशीनजीक सुमारे पंधरा फूट उंचीचा व दहा फूट लांबीचा शमीच्या झाडाच्या फांद्यांचा (शिरी) ढीग रचतात. ही शिरी तोडून आणण्याचा मान हा गावच्या महार मंडळींच्याकडे आहे. तेवढ्याच उंचीवर पिंपळाच्या पानांचे तोरण आणि खोबऱ्याच्या वाटया बांधल्या जातात.

सायंकाळी गावच्या मगदुमांचे घरून बैलाच्या दोऱ्या वाजत गाजत आणून गावच्या बाहेर असणाऱ्या पाटलांच्या मळयात असणाऱ्या "कर" तोडणाऱ्या बैलांना बांधतात. नंतर बैलजोडी वाजत गाजत गावकामगार पाटलांच्या दारात आल्यानंतर त्या बैलांची सुवासिनींकडून पूजा करून आरती केली जाते व नंतर ते बैल कार्यक्रमाच्या ठिकाणी नेले जातात.

गावातील श्री मारूतीचे देवालयासमोरील पटांगण या वेळेपर्यंत लहान थोर मंडळींनी फुलून गेलेले असते. काही उत्साही प्रेक्षक मंडळी झाडावर सुद्धा बसलेली असतात. वेशीच्या पलीकडे असणाऱ्या श्री मरगुवाईचे देवालयास ही बैलजोडी पाच प्रदक्षिणा घालून पळत पळत "शिरी" रचलेल्या ठिकाणी येते व ती ओलांडण्याचा प्रयत्न करते. बैलाना ओलांडण्यास सोपे जावे म्हणून दोऱ्या धरलेले लोक ती पायाने, काठयानी तुडवितात. यावेळी शिरीचे काटे टोचल्याने त्यांचे हात–पाय रक्तबंबाळ होतात. पण त्याचे त्यांना भानही नसते. "शिरी" ओलांडताच सदरचे बैल मालकाचे घरी परतत असताना चावडी पुढील जोंधळयाने भरलेली अडिसरी लवंडून पुढे जातात. हा सोहळा पाहण्यासाठी आलेला प्रत्येकजण घरी परतताना बैलांनी ओलांडलेल्या शिरीच्या फांद्यापैकी एक फांदी घरी घेवून जातो. सदरची फांदी घराच्या छपरावर टाकावी असे शास्त्र आहे.

जर सदरची कर न तोडता बैल धरणारांचे हातातून सुटून गावच्या शिवेच्या बाहेर गेले व दुसऱ्या गावचे लोकांनी बैलाच्या शेपटीचा गोंडा कापून घेतला तर गावची "कर" गेली असे समजतात. "कर" जाणे म्हणजे गावच्या दृष्टीने नामुष्कीची गोष्ट समजली जाते. "कर" तुटल्यानंतर दोऱ्या धरलेल्या गावकऱ्यांना व गडीमंडळींना गावकामगार पाटलांचेकडून खुशाली म्हणून रोख रक्कम बक्षीस दिली जाते.

# पोळा

*श्री. गं. जा. अवारी*

पोळ्याचा सण आदिवासी लोकही श्रावण वद्य ३० आमावस्येच्या दिवशी पाळतात. ही तिथी श्रावण वद्य ३० खरी पण हे लोक पोळ्याच्या पहिल्या दिवसाला आमावस्या मानतात आणि त्या दिवशी कषिसा ह्या वृक्षाच्या फांदीच्या सालीची चौरी बनविण्यासाठी वेळ घालवितात. जवळपास झाडे नसली तर विकत घेतात व प्रसंगी पळस, कुंभई इ.च्या सालींच्या वाखाची ही चौरी बनवितात. कागदाची का होईना पण चौरी या दिवशी मिळविलीच पाहिजे. त्या रात्री रंगवून जागरण करतात. गाईला ते बांधावयाचे नसते पण वासराच्या गळ्यात गोंडली (लहान गोंडा) बांधतात. रेडे व म्हशी यांनाही ती बांधीत नसतात. रात्रभर नाचून जागरण करतात, पहाट झाली की बैलांना ती बांधतात. त्यासाठी शिंगे शेरतात. (छडी तापवून शिंगांना भोक पाडणें) व त्यात चौऱ्यांची दोरी ओवून पक्की आवळतात. बैलांच्या पाठीवर रंगाच्या व रेडयांच्या अंगावर गेरूच्या (हाताने) थापा मारतात. रेडयांना रंग लावीत नाहीत. पण गेरू व वारनिस ह्यांनी शिंगे रंगवितात. गाई

वासरांच्या अंगावर रंगाने थापा मारतात व सकाळी गावातील सर्व जनावरे एकाद्या मोकळ्या जागी जमवितात. त्या वेळी कोणी कासाची थाळी वाजवितात व मुले लाकडी भिरक्या वाजवून जनावरे भडकवितात. ह्या भिरक्यांचे वेड मुलांना नागपंचमी पासून असते. पण इतर दिवशी गुरे नसताना गावात करमणूक म्हणून ती वाजवित असतात. आज मात्र गुरे भडकवून पळविण्यास चटया फिरक्यांचा उपयोग होतो. जनावरे भडकून पळाली नाहीत तर कोणी मांत्रिकाने ती मंत्राने बांधल्याची लोक समजूत करून घेतात.

ही भडकावलेली गुरे एखाद्या खोल व मोठ्या आणि दगड धोंड्याची अडचण नसलेल्या अशा मोकळ्या डोहात नेऊन पोहोचवितात. कोणी कोणी तर बैल व एखादे हाडकुळे दुखावलेले जनावर ह्या वेळी खोल पाण्यात उलथे पालथे करून त्याला तसेच घरी नेऊन काही औषधी उपाशी पोटी पाजतात. बाकीचा सर्व जथा दिवसभर रानात चरावयास जातो. ह्या भडकावण्या आधी कोणी कोणी गोठ्यातच गाई बैलांची पूजा करतात. तर कोणी संध्याकाळी गाई घरी आल्यावर पूजा करतात. अर्थात सकाळी पूजा करणारांची संख्या कमी व तुरळक असते. आणि ह्यालाच "रितनामोळा आणि दिवसा पोळा" असे म्हणतात. म्हणजे खऱ्या अर्थाने संध्याकाळी पूजा मानली आहे. चौऱ्या बरोबरच रेडे व बैलांना वेगडी मोठ्या ताटच्या बांधण्यातही धन्यता मानली जाते. मात्र देशी भागाप्रमाणे पाटलाच्या बैलाला पूजेचा मान देणाऱ्या भानगडी नसतात. उपाशी पोटी ठेऊन औषधे पाजण्यात गहू, आंबा, हळद, रगत, रोहडा, खेकड्याचा रसा इ. प्रमुख वस्तू असून माहितीनुसार इतरही औषधांचा समावेश असतो.

पोळ्याच्या दिवशी सकाळी गोठ्यातून गुरे निघाली, त्यावेळी त्यांचे खूर भिजविण्यास पाऊस पडलाच पाहिजे अशी पूर्वीच्या नियमित व अतिवर्षाव काळी समजूत होती. तसे घडतही होते व त्यानंतर भाद्रपद महिन्यात पाऊस कमी पडत होता. श्रावणाच्या अतिवृष्टीच्या सरी ह्या पोळ्यापर्यंत अव्याहत असावयाच्या व नंतर उघाड जाणवत असल्याने पोळा आणि पाणी

पाऊस झाला गोळा (कमी झाला) अशी म्हण आहे. संध्याकाळी रानातून गुरे घरी येण्याच्या वेळी कोणी कोणी आधीच घरी आणलेले बैल त्यांच्यात नेऊन मिसळतात. याला नंदी नदीला म्हणजेच बैल गाईंना परणावयास गेल्याचे मानतात. यावेळी नंदीचे म्हणजेच बैलाचे गाईबरोबर लग्न लागले असे समजतात. याप्रमाणे ही सर्व गुरे घरी आल्यावर त्यांची पूजा करावयाची असते. त्यावेळी बैलाचे शिंग थोडेसे कापतात. (नाममात्र) पायावर पाणी घालतात. शिंगाला पैसा लावून विनवणी करतात की, तुला हाताने मारले तो राग रोष भंडारी घाल. म्हणजे विसरून जा आणि वाडवडिलांना जसा पावलास (प्रसन्न झालास) तसा आम्हा पोरासोरांनाही पाव. (प्रसन्न हो) असे म्हणून त्याच्या कपाळाला भंडारा लावून घरात जे अन्न पक्वान्न केले असेल. (विशेषतः भात, डाळ, भाकरी, खीर इ.) ते त्याला थोडे थोडे खाऊ घालतात. घरात जेवढे नांगर कामाचे बैल असतात, त्यांना हे अन्न घालतात व सर्व गाई बैलांना ओवाळतात. नंतर सर्वांचे जेवण होते. काही लोक या दिवशी घराच्या (गोठ्याच्या) छपरावर देठासह आळूचे पान ठेवतात. ह्यातील उद्देश हा की जसा अळूचा विस्तार झपाट्याने होतो, ते त्वरीत वृद्धिंगत होते, तसा गाई गुरांचा विस्तार व्हावा. पोळ्यापर्यंतच्या काळात आवणीची कामे काही ठिकाणी संपलेली असतात व असलीच तरी ती अर्धी अधिक उरकलेली असतात. बैलांचे कष्ट पुरे पहावयास मिळाले असतात. पावसाळी शेती ही बैलाविना होणे शक्य नाही. त्यामुळे पोळ्याचा सण हा फारच कृतज्ञतेने सहाजिकच पाळला जातो. बैलाला बळी राजा असे शेतकरी मानतो.

पर्जन्य व भाष्य वर्तविणाऱ्या पक्षांपैकी भोजा नावाचा पक्षी याच काळी मौन पाळतो. त्याने पोळ्याच्या आधी साधारणपणे आठ–दहा दिवस मौन पाळले तर पिकांना अखेरच्या पावसाचे दर्शन घडणे मुष्कील होईल असे समजून लोकांपुढे तो चिंतेचा विषय होऊन बसतो. पण पोळ्याच्या सणानंतर आठ–दहा दिवसांनी भोजा पक्षांचे हे मौन घडले तर पिकांना पुरेपूर पाऊस मिळणार या आनंदात शेतकरी असतो. भोजापक्षी पृथ्वीतलावर मौन सुरू

करून तो देव दरवारी जातो व देवसभेत सांगतो की, यंदा मानवी (मानव-प्राणी) खूप नांदला आहे. तो सोन्याचे चौरू बैलाला बांधतो व मोठ्या मजेत रहातो.

# बेंदूर

संग्राहिका : श्रीमती मालती दांडेकर

सणामंदी सण बेंदूर गजगजी
सांगते तुला शेजी बंधु बैलाला तेल पाजी

बेंदरापासून पंचीम वीस रोज
बंधु ताईताची वाट पहात नितरोज

बेंदराच्या सनाला बैलाला घाली साज
पाटील माझा भाईराज

पोळीयाच्या दिशी बैलाला तेलमीठ
भाई राजसानं दिली दावण सूर्यानीट

पोळीयाच्या दिशी गाई झाल्याती वरमाया
भाईरायाचे माझ्या नंदी गेले मिरवाया

पोळीयाच्या दिशी येशीला तोरन
भाईचे माझ्या नंदी चालती भारानं

बेंदराचे दिशी घाट्या घुंगुर वाजत्यात
बंधुजीचं बेंदराचं बैल सजत्यात

बेंदराचे दिशी नंदी झाल्याती नवरं
हौशा त्येंला बांधावी चवरं

बेंदराच्या दिशी बाळ ईळाचा उपाशी
लागला बैलाच्या सायासी

संग्राहिका : सौ. रोहिणी जोशी

शिलोशंख देवा पार्वता
माशी मोडल्या खाता
आमचा शिलबोका
चानिक चानिक पीठक वड्या
पिठा रांधले वडे
घरच्या दारच्याले पुरवले
आमचा शिलबा रंड
शिलोकेलारे मोत्याचा
सरी साखरेचा भरा हगळा
एक नयन गौरा
पार्वती हर बोला

३

संग्राहिका : प्रा. डॉ. सुमन पाटील

करो गो लेकीनो पुरनाच्या गोळ्या
करा गो सुनानो पुरनाच्या पोळ्या
पोळ्याचा सन तुमा माहत न का
हिकडं तिकडं भटकत्यात का

पिरतीच्या पोळ्याचा सन आज आला
धवळ्या पवळ्याला नाऊ माकू घाला

आज नगा तेना कामाला जुपू
त्येंच्यापुढं नका शिळं सुकं टाकू

रांगोळ्या काढा गो गोप्याच्या दारी
तोरू बांधा गो बाजूनी चारी

शिंगांना लावा रे बेगड गोंडे
पायामंदी घाला चांदवाचे तुडे

कपाळाला कुंकू पाठीवरी झूल
उधळा अंगणात झेंडवाची फूलं

पनत्या लावा रे आरती आना
पूजा आता व्हइल जंगर हाना

आडाच्या पान्याने पाय चारी धूवा
साद घाला पोरांना तीरत घेवा

घाई लई यांना हालाविती माना
झाल्या का ग पोळ्या बिगी बिगी आना

तूपदूध आना ओता पोळ्यावरी
माझे राजे राबले लई सेतावरी

खा रे माझ्या सोन्यानो खा रे माझ्या हिऱ्यानो
प्वाट भरूदे तुमचं पुरनपोळ्यानं

तुमचे पायी दारी मोती मानीक येती
कवा तुमचे उपकार आमी फेडल्याती

अंबे सुने ये गो दिष्ट यांची काढ
जिजा लेकी गोठ्याचे लाव किवाड

# फुलवरा

रानामागली तुळस पानाफुलांनी फुलली
पुतळ्यांच्या भारूंभार गवर कशी ग लवली....

दारात पाऊस सुप्पानं ओतत होता तरी त्या दिवशी झुंजूरकाचाच धुरपायचा गळा सजला म्हणताना आम्ही खडबडून जागे होत उठून बसलो. तशी घरात येत ती आणखी गुणगुणली--

कराड कोलापूरच्या गौराय
निगाल्यां म्हायारी
त्येंच्या ग पैंजनाचा नाद
येतूया दुयेरी....

म्हणताना अंथरूणातून उठून सोप्यात येत आम्ही तिला हाळी घातली, "कधी ग आलीस तू धुरपाय?" तशी ती खुदकिनी हसली. "आलो रातीच" म्हणाली. मग तिनं विचारलं, "फुलवरा सजविला काय?" त्यासरशी आम्ही नकारघंटा वाजवीत तिला म्हटलं, "अजून लई अवकाश. गौरी उद्या येणार आहेत."

"गौराय याच्या तवा येऊंद्यात्या. तुमी तयारी नगो करायला?"
"काय काय करायचं ग?"
"नव्या चिरड्या काडल्या टरंकातनं वर?"
"न्हाई बाई! का ग?"
"गौरायचं डाग केलं काय?"
"गेल्या सालचं असतील!"

“ थोरली डोरली हाईती ?”
“ आईला विचार.”

आम्हाला काही ठाऊकच नव्हतं तर यापलीकडं आम्ही काय सांगणार ? दर-वर्षी गौराय यायच्या पण न्हवणं नेण्याआणण्यापलिकडं आम्ही कशाचे मालक होतो ? आणिक हे ठाऊक असूनही धुरपायनं का विचारावं आम्हाला ?

आम्ही जरा हाडबडून गेलो म्हणताना डोईवरचा पदर काढून पिळीत तो झटकावून पुन्हा डोईवर घेत संगं आणलेली हाराळी आम्हाला नीट निवडून घ्या म्हणीत धुरपाय माळीत गेली. भिजून चिंब झालीवती तर लुगडं बदलावं म्हणाली. म्हणून आम्ही तिच्या पाठोपाठ आत जात काही विचारणार तर तिचाच आवाज आला––

नदीच्या पल्याड म्हादेव ग बाई
पाणी झुळुझुळू जाई
वाण्याच्या पोरी तुमी ठिणग्या ग
जशी फुलली जाई
नेसली पैठण साडी ग
पदर वाऱ्यानं जाई
हातात रूमाल नक्षीचा
राम उडवीत येई

त्या कारणानं आम्ही थबकलो. आणिक मग काय झालं अवचितच हरी जाणे. गौरी गणपतीचे दिवस तर रोज संध्याकाळी हातपाय दुखस्तोवर खेळतेल्या आमचापण गळा सजला––

घागर घुमूंदे घुमूंदे
रामा पावा वाजूंदे

आला शंकूरबा शंकूरबा
गवर माजी लेवूंदे
मोरपंखी चोळी
गवर माजी लेवूंदे...
हिरव्या रानात रानात
गवर माजी नाचूंदे....

"अग सोद्यांनू, शाण्या की ग ह्राईसा ?" धुरपायनं झटक्यासरशी मागं फिरून मटाटा आमचे मुके घेतले न् आम्हाला कुशीत ओढीत म्हणाली कशी, "आता एकेकीचा फुलवरा बगा कशी झोकात सजीवते." तेवढ्यात आडाचं पाणी आणायला गेलेली आमची आई घरात आल्याकारणानं ह्या दोघीजणी एकमेकींना कुशीत घेऊन भेटत चुलीपुढं गेल्या. एकमेकीत कुचुकुचू बोलत सुटल्या...म्हणताना आम्ही पण राखुंडी हातात घेऊन तोंड धुवायला जोत्यापाशी गेलो...

तसं पाहिलं तर ही धुरपाय आमची चुलत चुलत आत्या. नाचार कोचार संसारातली. पण तिला कशा एकाची भारी हौस. शून्यातून जग उभं करायची जिद्द. त्यामुळं सतरा ठिकाणी गाठी मारून अंग झाकतेलं अंगावरचं भिजकं लुगडं बदलून ती माळीतून बाहेर आली तर एकदम टवटवीत दिसली. आमच्या आईचं जुनंपानंच नेसलीवती. पण तिच्या अंगावर ते नेसुचं लई खुलून दिसलंवतं. अगोदरच गोऱ्यापान असलेल्या धुरपायला या देखणेपणात बघून एकदम बरं वाटलं. तशी मी तिला विचारलं, "चांगलं लुगडं रोज नेसत जा ! छान दिसतेस. आरशात बघितलंयस तू स्वत:ला ?" म्हणताना दाताखाली पदर धरीत ती गुणगुणली––

पाऊस पडला चिखुल झाला
व्हात आली गंगा

## गौराय पावनीला जेवायला
## भाजी भाकरी सांगा...

आणिक तिनं आम्हाला बजावलं, "असं बोलूनी. दोन राती पुरती गौराय पावनी येनार. तिच्या म्होरं घरातलं असलं बोलूनी. पाची परकारची भाजी तिला जेवाय करूया न् शेवाया बोटव्याची खीर शंकर जावयाला शिजवूया म्हनं. चला आणाजावा तेरडा भारूंभार. फुलवरा नटविते झोकात. सगळं रंग गोळा करा हं?" त्यासरशी आम्ही अंगणात पळालो. परसदारीची फुलं गोळा केली. रंगीबेरंगी तेरडा मुठी मुठी आणला. झालंच तर आघाडा दुर्वापण दुही दुही हातांनी इकडं आणला. चाफ्याची फुलंपानं जमवली. कण्हेरीच्या फुलांचे झुवके मिळवले.

हे सगळं बघून धुरपायचा चेहरा खुलला. तांब्या पितळेचे तांबे लखलखीत घासून घेत ती सुईदोरा घेऊन फुलवरा सजवायला बसली. एकाद्या सराईत कारागिरागत तिचा हात चालला. भरारा तिनं ह्या पानाफुलांचा फुलवरा बांधला. फुलांचे झुबके जागोजाग गुंफले... पानाफुलांचा शिणगार लेतेला तांब्या हारखून गेला. तशी धुरपाय राजीखुशीनं गुणगुणली ––

गुंज गुंज डोळे
सबंमंदी खेळे
सबंच्या नारीनं
शिवाशीव केली
नगरी भाईर गेली
नगरच्या नारीनं
पंचारती केली ....
आरती घालू आरती
पिरती घालू पिरती
किती घालू सोनं

## आमच्या गौराईला
## जोडव्याचं लेणं ....

आणिक तांब्याच्या वाटीला काजळानं नाकडोळे काढीत गौराईचं बाळ तयार करून न कुंभाराकडून आणलेल्या मुखवटयावर काचेच्या मण्यांचे तिनं गुंफलेले चकाकते डाग घालून तिनं समाधानाचा सुस्कारा सोडला . . . पण ऐनवेळी तिला काय काय पाहिजे होतं ते गवसेना तशी ती आम्हाला विचारीत फणकारली . . .

फुलाची गवर माडीला
चांगुणा गेली पाण्याला
गिरजा बसली न्हायाला
मी गेलते इच्यारायला
पायातलं पैंजण काय ग केलं
बाई मी दिलं जोग्याला . . .

म्हणताना आम्ही हसलो. तिच्या हाताखाली हे दे ते दे करीत वावरताना म्हटलं कसं, "गवर येऊंदे तरी धुरपाय ? . . . का उगं आपलं बोलावंच ?" त्यामुळं ती चूपचाप बसली. वाचक्यातील फुलं खालीवर करीत मग तिनं त्यांचे सुंदर घोस बांधले. फुलवराच्या तांब्याच्या गळयाला अडकवले. त्यासरशी दांडगी शोभा आली. त्यामुळं आमच्या आईनं खालीवर न्हाहाळीत फुलवराला कुरवाळून सांगितलं ––

झाड झुपका
फूल टपका
शोभेला ग दोघी
त्यात ठेवली दवत लेखणी
त्या परास मी देखणी ....

धुरपायचा चेहरा टवटवला. हारखून टुम्म होत तिनं म्हटलं, "वैनी वैनी, आपुन गवर जागवायची. गौरीचे कान फुंकायचे. तर सारी रात खेळू या. बोलीव कुना कुनाला. म्हणावं ––

नंदी नंदी ठोकीन तुजी पाठ
धरीन तुजी शिंगं
फुकीन तुजं कान
विठूरूक्मिनीची धुरपाय
आलीया म्हणून सांग ....

आम्ही, "हो हो. पोरी बोलावतो. बायकांला सांगावा देतो" असं चट्किनी उत्तर केल्यावर ती हसली. आईनं पण 'वराय ! वराय ! ' म्हटल्यावर तिचा चेहरा उमलला. खुशीनं तिची मान हलली डोलली. फुलवरा आणखीन् नटू लागला .. हळदकुंकू ल्याला .. गंधाक्षतांनी माखला गेला ... चंदनाची उटीपण ल्याला ... सारं घर त्यासरशी घमघमून गेलं ...

फुलवरा न्हवणं घेऊन आम्ही नदीवर गवर आणायला गेलो त्यावेळी नव्या चिरडचा नेसलोवतो. धुरपायनं काढलेली पिवळीधम्मक फुलं नाकातल्या मोरणीचा, कानातल्या फुलांचा, गळ्यातल्या बोरमाळेचा न् हातातल्या काकणांचा साज लेवून आलीवती त्या झोकात आमचं ध्यान नटलंवतं. चंदनाची उटी शिपीनं फिरवीत आमच्या हातावर सजलीवती. आम्ही कुणी थोरा मोठ्यांच्या लेकी दिसत होतो.

त्यामुळं आमच्या मुखी रंगतेलं ––

ये ऽ ग ऽऽ गवरीबाई
एवढं जिवून जाई
आता काय करू बाई
माता ग ऽऽऽ
दारी शंकर उभा ग

शंकर साळा राजा भोळी
नगरी सोडून जाय ग ऽऽ

हे गीत ऐकणाराला खुलवीत होतं. आमच्या संगं आलेल्या धुरपायला सुखवीत होतं. "गवर कशी गजबारानं येऊंदे" म्हणत ती आम्हाला गीतं देत होती. आम्ही ती सांगेल त्या झोकात गीतं गात होतो. त्याकारणानं ––

घेतली ग सुपली
आणली ग कुरकुली
राई गेली खेळायला केळीच्या बनी
तितं गोईंदा खेळतेला
इटी दांडू उडीवतेला
राईनं धरला म्हवनी पावा
गेली गवळवाड्याला....

ह्यातली गंमत खुलत होती. नवी गीतं कळत होती. फुलवरा ऐटीत चालला-वता... आमच्या हातात झोळणे होते. पायातले पैंजण वाजंत होते. नदीतले पाच खडे घेऊन आम्ही आणतेली गवर डामडौलानं मिरवीत घरी येत होती. झिरमिरत्या पावसात आमचं ध्यान खुदखुदत होतं.. आंब्याच्या बनात वाडूळ रमलेली गौराय दीडदोन दिवसांच्या बोलीनं माहेरी निघालीवती. तिच्यासंगं आम्ही पण खुशीत घरी निघालोवतो.

"गवराय आली गवराय आली"
"कोणत्या पायानं?"
"हळद्कुंकवाच्या"
"गवराय आली गवराय आली"
"कोणत्या पायानं?"
"हिऱ्या माणकांच्या..."

त्याकारणानं अंगणात आल्या आल्या हळदकुंकवाचे हाताचे ठसे काढून घात-लेल्या पायघडचावरून घरात जाताना गरम पाण्यातं आमचे पाय धुवून, आम्हाला हळदकुंकू लावून, पंचारती ओवाळीत आमची आई बोलत होती न् धुरपाय सांगेल ती उत्तरं आम्ही करीत होतो... गौरायची पावलं मग सुख–समृद्धीच्या, आरोग्य अवादीच्या, उदंड धनदौलतीच्या झोकानं आमच्या घरात पडत होती...

रात्र रात्र जागून आई न् धुरपायनं तयार केलेल्या लाडू, करंजी, चकल्या, शंकरपाळी, शेव, अनारसी, वडचा न् असलंच काय काय केलेल्या ताटांच्या आराशीमागं नवी जरतारी लुगडी नेसलेल्या दोघीजणी गौराय बसल्यावत्या. जिगाच्या न् मण्यांच्या दागिन्यांनी, फूलमाळांनी, कापसाच्या पोवत्यांनी नटल्या-वत्या. समोर त्याचं बाळ बसलंवतं. त्याच्या पुढं रांगोळी. मग निवदाचं भाजी भाकरीचं ताट न् आवतीभोवती आम्ही असा सोपा भरलावता. दोन्ही बाजूंना समई पाजळलेल्या. मधे उदकाडी दरवळतेली. सारं कसं देखणं दिसतेलं. तर ते बघून धुरपायनं गौराय पावण्यांची दृष्ट काढली. आमच्यावरून मीठ मोहऱ्या उतरल्या न् मग खेळगाण्याचा भडीमार असा उडून गेला की, सारी गल्ली गोळा झाली! ... त्या धांदलीत रात्र कधी सरून गेली कळलंच नाही तर!...

दुसऱ्या दिवशी पुरणपोळीचं जेवण करून गौराय विसावल्या तेव्हा कुठं आईच्या न् धुरपायच्या हाताला दम पडला ..

गौराय पावण्यांच्या कारणानं आमच्या चंद्रमोळी घरात लंकेचं वैभव उभं करतेल्या धुरपायच्या हौसेमौजेनं सगळ्यांचीच तहान भूक हरपून गेली...

असला डामडौल आम्ही कुठं पाहिलाबी नव्हता का घरी येतेल्या पावण्यांची एवढी ऊठबैस पण आमच्या कानावर आली नव्हती! अंहं! सगळाच साज शिणगार असा झोकात होता, असा झोकात होता की, पहाणारांची नजर ठरूच नये!...

अनुक्रम :—

# आली आली गौराय, येतच हुती

डॉ. सरोजिनी बाबर

गरजतेलं आभाळ दणाणून सोडीत आणि दारं खिडक्या झोडपून काढीत वळचणीखाली भल्यादांडग्या मुसंडीनं येतेल्या पावसानं त्या दिवशी आमची अशी दाणादाण करून सोडली की, सारं घर जसं पारच हादरून निघालं. आता पाणवठ्यावर जाऊन गवर आणायची कशी या काळजीनं वडीलधारी गांगरून गेली. असला दणक्या पाऊस लवकर उघडला नाहीतर तंगभार साखळ्यांची, कुलपाच्या दाबाची, नक्षीदार चिताकाची, पाच फेरांच्या डोरल्याची, वीस पंचवीस पुतळ्यांची, गजबार कापाची, ठेवणीतल्या चंद्रहाराची, डौलदार नथणीची, जडावाच्या राकडी केवड्याची, हिऱ्यामाणकांच्या कंगण्यांची, काजळलेल्या नेत्रांची, तांबूळ रंगल्या ओठांची, ठसठशीत हळदकुंकवाची, पायघोळ जरी साडीची, झिनकारत्या पायांची आणि नाजूक बांध्याची अशी गवर आणायला कुणी आणि कसं जावावं या कोड्यात सारं घरदार अडकून पडलं. म्हणून वेळेवर जर कुणी तिला आणायला गेलं नाही तर मग--

दक्षाची कन्या पारबती
आमी ग सातजनी भैनी
मजला टाकिलं येगळुनी
जशी काय वनात सुटली गाय
संचिती की माजी माय
जीव धंडा मी लेले काय ...

या गैरसमजानं ही वालूबाई कोमेजून जाईल हे नक्की होतं. त्यामुळं उगीच तिचा हिरमोड होईल या भीतीनं गजबजलेलं मन संगं घेतच आला पाऊस तर येऊंदे या निर्धारानं आम्ही घर सोडलं आणि--

पायी जोडव्याचा थाट
चढती नदीचा ग घाट
शोभा गौराईला
गौराईचा ग रंग पाहुनी
शंकूरबा दंग झाला साजणी
आली ग आली
गौराय पावणी ....

हे गीत गात सारं गाव दणाणून सोडायचा बेत केला. अंगावर नवी परवंटी साडी नेसलो, भिंगाची चोळी घातली, शेलके अलंकार ल्यालो आणि पानाफुलांची न्हवणं हातात घेत उभ्या पावसात झोकात निघालो... त्यासरशी ईर्षा ल्यालेली--

ताड गौरी ताडाला लागली
ताडावरची माय गवराय येंगूजी लागली
तिकून आला शंकर त्येनं पदर धरीला
सोडा सोडा पदर मला जाऊंद्या म्हायारी
म्हायारी जाऊन काय काय खाशील
तुजं तर म्हायार दुबळं
असूंदे माजं म्हायार दुबळं
तूप शेवाया दूध शेवाया मी खाईन
दीड दोन दिवस राहूनी येईन
सोडा सोडा पदर मला जाऊंद्या म्हायारी
न्हाई न्हाई सोडीत पदर काय ग करशील
वैताग घेऊन जाईजी होईन
जाई होऊन मळ्याला जाईन

मग मी माळी होऊनी येईन
पाणी घालुन तुजशी भेटीन
झाड होऊन कळयाजी आणीन
फुलं मी तोडुन हार जी गुंफीन
देवाला वाहून तुजला भेटीन
सोड सोड शंकर आमुचा पालव
आमाला जाऊ दे म्हायारी
काय काय लेणं लेवूनी येशील
आणीन साकळ्याचं ज्वाड
माज म्हायार दुबळं....

असली गीतं आम्ही एकापेक्षा एक चढ म्हणीत गेलो. तशी गीत संपल्यावर वैलीकडील किशी म्हणाली कशी, " ह्यो शंकर जवा तवा लईच आडवं लावतो ग ? असा कसा म्हणावा तरी ? ह्याला दुसरा उद्योग न्हाई काय ? " त्या उप्पर राधीनं खुलासा केला, " अग, ही पार्वती पण काही कमी नाही... शब्दाला शब्द देईल तरच नावाची म्हणावी ?... " चालता चालताच या बोलण्याची लांबड लागली. पावसानं भिजती तोंडं भिजलेल्याच साडीच्या पदरानं टिपली गेली आणि मग आम्हाला ती सांगेल त्याप्रमाणं गीतं म्हणा-यचा इषारा देत राधीनं आपला गळा काढला——

भली भली ग पारवती
शब्दाला उतार देती
ऐकावं महादेवा शब्दाला उतार द्यावा
कुणाला ग सोडीत होती
कुणाला ग बांधीत होती
कुणाला हाती धरुनी रंगमहाली जात होती

गाईला मी बांधीत होते
वासराला मी सोडित होते
दुधाची चरवी घेऊनी रंगम्हाली जात होते...
कुणाला ग हडपीत होती
कुणाला ग दडपीत होती
कुणाच्या मुखाकडे बघूनी वारा घालीत होती
दाराला मी हाडपीत होते
इस्त्याला मी दडपीत होते
रिकाम्या मुखाकडं बघूनी वारा घालीत होते ...
कुणाला ग वारित होती
कुणाला ग बुडवित होती
कुणाच्या गळ्यावरी हात ठेवून चालत होती
पाण्याला मी वारित होते
घागरीला मी बुडवित होते
घागरीच्या गळ्यावरी हात ठेवून चालत होते
कुणाला ग दिला पाय
कुणाला ग दिला हात
कुणाच्या गादीवरी राज तू करीत होती
कासाराला दिलावता हात
सोनाराला दिलावता पाय
देवाच्या गादीवरी राज मी करीत होते...

"बाई ग बाई ! किती ग द्वाड आहे हा माणूस ? असल्या शंकेत गेलाच कसा हा मी म्हणते ?... देव आहे ना ग हा शंकर ?"... किशीनं हे गीत संपताक्षणीच शंकरावरचा राग काढला. त्यामुळं दुरून ओळखता येतेल्या न् पिवळ्या ठशांच्या हिरव्या रानातून दिसतेल्या माहेराकडं पाहात "तू गेलीस की

मी कोमेजून जाईन. मला करमायचंच नाही!" असली भाषा करणाऱ्या शंकराला सगळ्यांनीच दोष लावला. पावसाला उघडीप दे म्हणून हात जोडले. तशी बिगीनं पुढं होत सखूनं दणका उडवून दिला....

साती शंकर वनामंदी
एकला गनव्या वनामंदी
गणूच्या आईला सांगून द्या
गणूनं तोडं गमीवलं
गमीवलं तर गमवूंद्या
गणूला घरला घेऊन या

शंकराच्या नादात गणेशाला एकट्यालाच रानावनात भटकाय लागल्याकारणानं पोरी चिडल्या. पार्वतीवर कडाडल्या, "हिला कळू नये का पण?" म्हणताना फिदीफिदी हसतेली किशी बोलली—

अल्याड शंकर धोतर धुतोय
पल्याड गौराय नाय गो
न्हाऊन धुवून उभीच केली
एवडा शिनगार काय गो
माय बोले लाडक लेकी
बुगड्या लेवुन जाय गो
आता गे माय काय लेवू
शंकर वाट पाय गो

आणि आम्हीही मग तीन मजली हसत सुटलो. त्या नादात पार्वतीची बाजू घेऊन शंकराबरोबर भांडण करायचा बेत ठरला!...त्या सरशी कैलाशीच्या या मालकाची गंमत वेणूनं आमच्या कानावर घातली हं!...म्हणाली कशी—

तात्या कुसब्याचं श्यात पिकलं अमरावती
महादेव गेले चोरीला पाच कनसं मोडीली
कुनब्यादादानं देखीली न् तो धावत पळत
धरला जटेशी गोसावी न् हसडून धरणी पाडीला
गोसावी धरून वडीला न् माळ्याला बांधीला
तात्या कुनब्याची राणी आली कुरुंद तिला दाटला
भरली पाटी आली शेती देती शिव्या भ्रताराला
गोसाव्या का चोरी केली माळ्याला सोडीयीला
गोसावी धावत पळत आला आपुल्या मठाशी
बोलता झाला पारबतीशी गेलोवतो मी चोरीला
पाच भेंडांनी मारीला धरून माळ्याला बांधीला
पारबती ग ऐकती झाली भोळ्या माझ्या म्हादेवा
तात्या कुनब्याच्या शेतामंदी मार काय म्हनं खावा

त्यामुळं मी बोलून गेले, "हे काय मेलं ह्याचं अवलक्षण ग ? आणि मी म्हण
पार्वतीनं का चालू द्यावं ह्याचं एवढं ?... अगबाई ! हे ध्यान पदरात पडा
म्हणून का हिनं बारा वर्षाचं तप मांडलंवतं ? शाबास !... मी असते न
त्यावेळी तिच्याजवळ तर नक्कीच नकार दिला असता !" पोरी मला हसल्य
"तुला काय कळत ?" बोलल्या. अंगुपाती कारभार करणाऱ्या पार्वतीला बोला
कुणी म्हणाल्या न् मग कुणीतरी त्यातली पण मजा ऐकवली....

सोन्याची ग किरीमिरी शंभू देवाच्या शिकरावरी
चौरंगी शालजोडी शंभूदेवानं पांघरली
हाती घेऊनी काठी डोई घालूनी टोपी
काखी लावूनी झोळी गेला गिरजाच्या माडीखाली....

परंतु हे गाणं सगळ्यांना ठाऊक होतं. म्हणून पोरींनी 'माहीत आहे !...माहीत आहे !...' असा गलका केला. तशी पावसानं आणखीनच ज़ोर धरला आणि आम्ही वाटेवरच्या झाडाखाली पळालो...

होता होता मग नदी आली. आम्ही न्हवणं खाली ठेवली. पूजा झाली. ओलेत्यानं नमस्कार घातला. तिथले पाच खडे उचलले. न्हवणाच्या तांब्यात ठेवले. गजबारानं न्हवणं पुन्हा उचलली न् मग...

गवर आली गजबारानं
पाय भरले जोडव्यानं
तुझ्या गुलालाचा भार
आमची जोडवी झाली लाल...

हे गीत गात माघारी वळलो. झपाझप पावलं उचलली. गौराईचं स्वागत झालं जणु !...त्या कारणानं चंद्रीनं आम्हाला विचारलं, 'ही आली खरी. पण काय ग, हिचे लाड कधीच नाही झाले सासरघरी ?' तिच्या या प्रश्नानं आम्ही खदखदून हसलो. आम्हाला काय ठाऊक होतं तेव्हा आम्ही सांगणार हिला ? पण साळूला त्या संदर्भातलं एक खानदेशातलं गीत ठाऊक होतं. म्हणून ती म्हणाली, 'मी सांगते ग यातलं ! ऐका...' आणि लागली की ठेक्यात गीत सांगायला...

सोन्यानी सुतई न् पानी काडे कोत्ता
शंकर हरी व माय
केसर दंदनी
पानी काडे शंकर हरी न् तठे मनी गौराय
न्हायनी व माय
केसर दंदनी
तठेमनी गौराय न्हायनी न् पिवया पितांबर

नेसनी व माय
केसर दंदनी
पिवया पितांबर नेसनी न् कंपाळी कुंकवाची
चिरी व माय
केसर दंदनी
कंपाळी कुंकवाची चिरी न् गुलालाचा
भांग भरी व माय
केसर दंदनी
गुलालाचा भांग भरी न् डोळी काजळ झिरीमिरी
घातलं व माय
केसर दंदनी
डोळी काजळ झिरीमिरी न् हाती चंदनाची छडी
घेतली व माय
केसर दंदनी
हाती चंदनाची छडी न् गौराईचं माहेर
फुलझडी व माय
केसर दंदनी
गौराईचं माहेर फुलझडी न् तठला सुतार
नांदे भारी व माय
केसर दंदनी
तठला सुतार नांदे भारी न् त्याना घर रंगीत
पायना व माय
केसर दंदनी
त्यांना घर रंगीत पायना न् रेशीमन्या दोऱ्या

त्याले व माय
केसर दंदनी
त्याले रेशीमन्या दोऱ्या न् त्यामां मसूरनी
गादी व माय
केसर दंदनी
त्यामां मसूरनी गादी न् त्यानामां निजना
शंकर हरी व माय
केसर दंदनी
त्यानामां निजना शंकर हरी न् झोका देये
गौराई नारी व माय
केसर दंदनी

'अग्गोबाई ह्रो का ?...' या गदारोळानं फुललेलं हे गीत संपलं न् आम्ही एवढ्या हसलो एवढ्या हसलो की, पायाखालची वाट जशी डोक्यावर यावी !...

तेवढ्यात काय गंमत झाली की, आमच्यागतच गवर आणायला गेलेल्या दुसऱ्या गल्लीतल्या पोरींचा आवाज पुढच्या अंगानं कानावर आला--

गवर आली भांग भरून गेली
भांग न्हवं बाई भंडारा
खिडकीत पडला अंगारा
खिडकीच्या बाई कपाटा
नव्हता माजा परवंटा
परवंटा माजा हाटावू
शेला माजा पाटावू
बाई माजी हासरी
शेतं तिची ग डोंगरी

डोंगर जळतो धडाधडा
हरीण रडतं खळाखळा
हरणीबाईचं दूध ग
बाळपणीची सूद ग
घोड्याच्या मांडीवर फिरे मोगरा
एक कळी तोडता वास गेला नगरा
नगराच्या राजाची नगराई
म्हादेवाला दिली पारूबाई
पारूबाई देऊनी यशवंत झाला
दिवट्या लावूनी घरासी आला

तशा आम्ही सावरलो. आमच्यापेक्षाही कुणी उश्शेजादा होतं तर! पोरींचा आवाज खणखणीत होता. चालणं ठसक्यात होतं. गौळणींच्या थाटानं त्या झपापा चालल्यावत्या. तिन्ही सांजेलसा आत गौरी घरी घेऊन निघाल्यावत्या. आमच्या ते ध्यानात आल्यासरशी आम्हीपण मग झपाटच्यानं पावलं उचलली न् त्या पोरींच्या वरचढ आवाज काढला...

आली आली गवराय येतच हुती
आंब्याच्या बनी गुतली हुती
आंब्याच्या आंबं तोडीत हुती
सईच्या वट्या भरीत हुती
सईला वाटेला लावीत हुती
आंब्याच्या बनी वरूटा पाटा
आली आली गवराय हळदकुंकू वाटा...

त्यामुळं काय झालं की, आमच्या गल्लीतली घरं तोंडं बाहेर काढीत डोकावली. रात्री गौर जागवायची आहे या कल्पनेनं आमचा उत्साह दुणावला.

सूप नाचवायचं, कळशी फुंकायची, झिम्मा घालायचा, फुगडचा खेळायच्या, फेर धरायचे यातल्या आनंदानं जीव वाराहुरा झाला.... शाडू मातीनं माखलेले पाय आणि भिजून चिंब झालेलं शरीर जड झालंवतं तरी ओझं ढकलावं त्या गतीनं आम्ही आपापल्या वाडचात आम्हाला झोकलं..... मेंदीनं रंगवलेल्या नक्षीगत आमच्या पायांची चित्रं दारात उमटली ! ..... तशी दाराशी उभ्या असलेल्या आजीनं माझे पाय गरम पाण्यानं धुतले. शिळचा भाकरीचा तुकडा पाण्यात भिजवून माझ्यावरून ओवाळून टाकला. माझे पाय पदरानं पुसले. वरती हळदकुंकवाने माखले. आरती ओवाळली. आपल्या हातांचे हळदकुंक-वाचे ठसे उमटवीत त्या पायघडीवरून तिनं मला घरात ये म्हटलं !... तशी मी तिच्या पाठोपाठ निघाले तर मला तिनं एकच प्रश्न वारंवार विचारला, "गवराय आली, गवराय आली, कोणत्या पायानं?" आणि तिनं शिकवून ठेवलंवतं त्याप्रमाणं मीही तिला दरवेळी उत्तरं केली, "हळदकुंकवाच्या, हिऱ्या-माणकांच्या, आरोग्य आबादीच्या, मोत्या पोवळचांच्या. सुखा समाधानाच्या. समृद्धीच्या. माहेरपणाच्या."

तेरडचाच्या पानाफुलांनी सजवलेलं आणि चाफ्याच्या पानात बांधलेलं आमचं न्हवण मग मी घरात बसवलेल्या महालक्ष्मीच्या पुढचात आणून ठेवलं. तिथं सवाष्णीच्या ओटीचे गहू, तांदूळ, नारळ, पानसुपारी, लेकुरवाळं हळ-कुंड अशा सामानानं भरलेलं तबक होतं. त्याला पाय लागू नये म्हणून अंग चोरीत मागं सरले. भर्जरीवस्त्रं आणि ठळक अलंकार ल्यालेल्या महा-लक्ष्मीच्या पाया पडले. तिला हळदकुंकू वाहिलं, मी ल्याले. मग स्वतः गरम पाण्यानं स्नान केलं. नवीन लुगडं चोळी नेसले आणि देवीची पूजा केली...

आज देवीला भाजी भाकरीचा नैवेद्य होता. फराळच्या जिन्नसांची ताटं तिला वाढली होती. उद्या पुरणापोळीचा बेत होता आणि परवाला दहीभात. तर त्या चवीचा अंदाज घेत मीच करून ठेवलेले फुलांचे दागिने अंगावर चढ-वले. त्यात नाकात घालायचा मोगरा, पायातल्या मासोळचा, कानातले डूल आणि गळचातली माळ होती ... माझे दागिने मी जिथल्या तिथं घालून बघत होते. तेवढचात आमच्या मामीचा आवाज आला...

अंगणी तापतं दूध दूध पिवळी शाई
ये ग गवरीबाई एवढं जिवूनी जाई
आता काय करू बाई माता ग
दारी शंकर उभा ग
शंकर साळा राजा भोळा नगरी मोडून जाय ग
नगराला लागलं निशाण ग कापूराची वात ग
दिवा जळो दिवटी कापूरजळी आरती
गौराय सारखी पावणी खेळू साऱ्या राती

त्यासरशी शंकर पावणे खरंच आले की काय या धास्तीनं धाबं दणाणलं !... म्हणून धावत पळत दारी येऊन बघतेय तर पाऊस उघडलेल्या अंगणात पोरी खेळायला येतेल्या !... एक दोघींनी तर झिम्मा खेळायला हातही धरलेले व मामी त्यांना गीत शिकवतेली... म्हणून मी पण पुढं झाले आणि आम्ही मग सगळ्याच पोटभर खेळलो. पार दमघीर होस्तोवर.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी गणगोतातल्या बायका हळदकुंकवाला येऊन गेल्या. जेवणंखाणं आटोपली. आणि मग पुन्हा खेळगाण्यांना जोर आला. गवर जागवायच्या गोष्टीनं मान वर केली. तशी एकदम बरं वाटलं.

आमच्या थोरल्या काकूनं वाडवडिलांच्या शिरस्त्याप्रमाणं एक परात आणली. तिला पालथी घातली. वर वस्त्रगाळ केलेली राख पसरली. एका हातात डाव न् एकात रवी घेऊन दोन्हीची टोकं त्या राखेवरून एकामागून एक अशी ओढली ! त्यासरशी ब्रह्मानंद उभं करणारं संगीत बाहेर आलं न् आम्हीपण आमचा आवाज त्यात मैफलीत मिसळला. ...

गवरी ग बाई जागरान तुझं
जागता जागता पडल्या झापाडी
एवढ्या निजेची पिरत केवढी

सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
नारळीच्या गोण्या झोकील्या अंगणी
सुपारीच्या गोण्या झोकील्या अंगणी...

त्या उमेदीत मग आम्ही सगळचाच अशा खेळलो अशा खेळलो की, पहाटेच्यावेळी कोंबडचानं केव्हा वांग दिली ते पण कळलं नाही का वासुदेवासह शंकरपावणे दारी येऊन केव्हा ठाकले तेही लक्षात आलं नाही!... सारं वातावरणच असं धुंद होऊन गेलवतं की, त्यापुढं कशाचंच काही कुणाला सुचू नये का कुणी काही विचारलं तरी ते लक्षातही येऊ नये!...

## एक धुंद सण

श्री. अरविंद राऊत

गौरीचा सण हा या आदिवासी भागातील एक धुंद सण. या सणाला सासुरवासिणी माहेरी येतील. गौरीच्या सणाला जेहठा देव (ज्येष्ठा देवी) किंवा जहटुली असेही म्हणतात. गौरी पहिल्या दिवशी येते. दुसऱ्या दिवशी तिची पूजा होते. तिला जेवण दिले जाते. तिसऱ्या दिवशी तिचे विसर्जन होते.

तांब्या भांडचात ताजे तेरडे ठेवायचे. तेरडचाभोवती नवा शालू गुंडाळावयाचा. तिला खरे दागिने चढवायचे व भाणोसावर (चुलीमागील ओटा) मांडावयाचे. तिच्या पुढे दिवा, फळे ठेवायची. रात्री गाणी गाऊन जागवयाची. गौरी येताना चालत आल्या असे दाखविण्यासाठी परातीत पीठ कालवून त्यात भिजलेले हाताचे पंजे दरवाजापासून भाणोसापर्यंत जमिनीवर लावायचे. गौरीच्या मागच्या भिंतीवरही पिठाचे टिळे लावावयाचे. पूर्वी जेव्हा

कुडाच्या भिंती होत्या तेव्हा या पिठाच्या ठिपक्यांच्या अनेक आकृती (झाडे, पाने, पक्षी इ.) त्या कुडावर या दिवशी काढत. बरेच दिवस त्या राहात.

गौरीच्या जेवणासाठी मटण आणावयाचे. दारू पिणारे दारूही आणतात. श्रावणातील पारणे गौरीला सोडायचे. यावेळी लाडू करतात. कोलंबी व आळूच्या देठीचे कालवण प्रथम पाहिजे. त्याशिवाय गौर जेवायचीच नाही. गौरीला आलेल्या सासुरवाशिणी साखर चवथीपर्यंत म्हणजे भाद्रपद वद्य चतुर्थीपर्यंत राहातात. ही त्यांच्या हक्काचीच रजा असते. बहुजन समाज हा सण उत्साहाने पाळतो. विशेषतः मुगाचे लाडू करतात. चंद्रदर्शन झाल्यानंतर जेवतात.

## ये ग गवरीबाई

*संग्राहिका : श्रीमती अनुराधा खांडेकर*

महाराष्ट्रात गौरीची गीते विशेष प्रसिद्ध आहेत. आणि ती मराठा समाजात प्रकर्षाने म्हटली जातात. त्यांचा उगम शेतकरी, कामकरी स्त्रियांच्या लोक-गीतातून झाला असावा. ऐन पावसाळ्यात या शेतकरी स्त्रिया दिवसभर चिखलपाण्यात थंडी वाऱ्यात काम करून दमलेल्या असतात. रात्री जेवणे आटोपून झिम्मा, फुगडी, पिंगा वगैरे खेळ खेळण्याची त्यांना प्रेरणा होते. या वेळच्या आल्हाददायक, नयनरम्य वातावरणामुळेच त्यांना ही प्रेरणा होत असावी. आषाढाचा जोरदार पाऊस सरून श्रावणाच्या रिमझिम पावसास सुरुवात झालेली असते. सृष्टी यावेळी आपले मोहक रूप घेऊन आनंदाने मजेत हलत डुलत असते. तिच्या अंगावर नवा साज, नवा पेहराव खुलून दिसतो. हाच साज, हाच पेहराव, या स्त्रियांच्या गीतातून साकार झालेला असतो.

श्रावणमासास प्रारंभ होतो, पावसाची रिमझिम चालू होते. मधूनच कोमल पिवळ्या किरणांची ढगातून बरसात होते. वाऱ्याची सुगंधी चाहूल लागते, इंद्रधनुष्याच्या सात रंगांची उधळण होते आणि श्रावणाची गीते ओठावर उमलू लागतात.

श्रावण म्हणजे आनंदाचे संपन्न भांडार होय. नवविवाहित युवतींचा हा लाडका महिना. सणाउत्सवांना, व्रतवैकल्यांना, या महिन्यात चांगलाच बहर येतो. नागपंचमीच्या सणाच्या निमित्ताने मुली माहेरी आलेल्या असतात. थट्टा मस्करीला अगदी ऊत येतो. नागोबाच्या पूजेला जाताना त्या फेर धरून गाऊ लागतात ––

**चल ग सये वारूळाला--वारूळाला ग**
**नागोबाला पूजायाला--पूजायाला**

आणि यानंतरच गौरी गीतांना प्रारंभ होतो. झाडांच्या फांद्यांना झोपाळे बांधलेले असतात. त्यावर उंच उंच झोके घेणे चालू असते. गाण्यांची गर्दी उसळलेली असते आणि कौतुकाचा भाव त्यातून असा ओसंडत असतो ––

**मावळच्या बहिणी आल्या भेटायासी**
**मुंगसाची वाट आम्हा दाखवीशी**

या गीतातल्या सुवासिनींचा माहेरच्या प्रेमाने व अभिमानाने ऊर दाटून आलेला असतो. तर काहीजणी सासरीच असतात. माहेरच्या प्रेमाला आचव-लेल्या या सासुरवाशिणी म्हणू लागतात ––

**झुरझुरा पाखरा जा माझ्या माहेरा**
**कमानी दरवाजा त्यावरी बैस जा**
**बयाला सांग जा तुमच्या लेकींनी जोडवी मोडली**
**मोडली मोडली तर हिण्णाची करून देईन सोन्याची**

असा माहेराहून सोन्याची जोडवी करून आणण्याचा अभिमानही त्या प्रगट करतात.

नगरच्या नारी उभ्या हुत्या दारी
कवा आला राधाबाई अपुल्या घरी
काय सांगू बाई माहेरीचं सुख
आता विसरले प्रपंचाचं दुःख

संसारातील दुःखे विसरायला लावणारी आणि झिम्मा–फुगडीच्या खेळात तल्लीन करायला लावणारी ही गीते नागपंचमीच्या सुमारास सुरू होऊन भाद्रपदातील गौरी विसर्जनानंतर संपतात. या गीतांचा गोडवा एवढा विलक्षण की, दिवसभराचा कामाचा शीण कुठल्या कुठे निघून जातो. मध्यरात्रीपर्यंत या स्त्रिया फेर धरून ही गाणी म्हणत असतात. वेगवेगळ्या प्रकाराने ही गाणी म्हणण्याची प्रथा आहे. कोणी घागर फुंकीत हातातील जोडव्यांचा त्यावर आवाज करून ताल धरतात. तर कोणी सूप वाजवून गाण्याचा ताल धरतात. येथे वयाचा प्रश्नच नाही. छोटया परकऱ्या मुलीपासून ते वृद्ध स्त्रियांपर्यंत अनेकजणी या गाण्याच्या खेळात सामील झालेल्या असतात. त्यांची तल्लीनता आणि बेभानपणा खरोखरच वाखाणण्यासारखा असतो. या गीतातून घडणारे तिच्या भावनांचे दर्शन मनोहारी वाटते.

श्रावण संपतो आणि भाद्रपदास सुरुवात होते. गणेशचतुर्थी हा सण घरोघरी मोठ्या उत्साहाने साजरा केला जातो. गणेशावरील गीते यावेळी म्हटली जातात. गौरी आणि तिचा पती शंकर यांच्यावरील ही अनेक गीते सादर केली जातात. प्रथमतः गौरीचा मुलगा गणोबा येतो —

गणोबा आला गौराई का ग नाही
साखळ्या लेती मागाहून येती

गौरीचे प्रतीक म्हणून गौरीची रोपटी घरात आणून मग त्यांची पूजा केली जाते. अशावेळी तिला एकटीलाच पाहून थट्टेने विचारले जाते —

**का ग गौराई एकली ?**

गौराई तत्परतेने उत्तर देते–

**का मी होईन एकली ?**
**पुढे गणेशबाळ मागं शंकर भ्रतार**

दुसरे दिवशी शंकर घरी येतो त्यांचीही रोपटी पुजून गौरीजवळ ठेवली जातात. जेव्हा प्रथमतः गौर येते तेव्हा ती जणू काही शंकराची परवानगी घेऊन जाण्यास निघते !

**गौर पुशी शंकरासी स्वामी विनंती तुम्हासी**
**मला पाठवा माहेरासी भेटून येईन आईबापांशी**

पण शंकराचे मन तिच्या भोवतीच घोटाळत असते. तो म्हणतो —

**प्राणवल्लभे तुजविण न करमे**
**तू अस्तरी रंभा शोभे आम्हाला**

असे म्हणणारा शंकर तिला पाठवण्यास तयार नसतो. मग काय ? या गौराबाई रूसून बसतात. मग यांचा रूसवा तरी कोण काढणार ?

**राधा रूसली सुंदरा जाऊन बसली मंदिरा**
**आणल्यात सोनकेळं फोडल्यात नारळ**
**राधे करावा फराळ**

अशी मनधरणी होते. पण गणपती आल्यानंतरच ही गौर घरी येते अर्थात माहेरी आल्यावर हिच्या कौतुकाला सीमाच नसते. स्त्रिया गौरीला उद्देशून म्हणू लागतात —

ये ग गवरीबाई एवढं जेवून जाई

परंतु गौरीचे सगळे लक्ष शंकराकडेच असते ना ? ती म्हणते —

आता काय करूबाई शंकर आला
जोडवी ल्यायला उशीर झाला

परत या स्त्रिया म्हणू लागतात —

ये ग गवरीबाई एवढं जेवून जाई

पण तिचं आपलं ठरलेलं पालूपद —

आता काय करूबाई शंकर आला
बिलवर ल्यायला उशीर झाला

या प्रमाणे अनेक कडव्यातून आलेला हा दागिन्यांचा उल्लेख उठून दिसतो, तसेच इतर काही गीतांतही दागिने आलेले दिसतात.

ठळक ठळक दिसाची चांदणी
कृष्ण निजला अंगणी
आमुच्या गौराईला बिलवर घडवा
बारीक बारीक गुंजवाणी
हिरवा माणिक जडवा

या पद्धतीनेच अलंकारांचीही नावे गीतात गोवतात आणि नंतरच हे गाणे पूर्ण होते.

जोडवी, बिलवर, साखळ्या हे सुवासिनींचे अलंकार. या गीतातून अनेक वेळा त्यांचे उल्लेख आलेले दिसून येतात.

अग रूक्मिणी रूक्मिणी पांडुरंग पती
तुझी जोडवी जोडवी साडेतीनशे मोती

गहू जुंधळा जुंधळा पंढरीचं रानं
आहेव रानीला रानीला रूक्मिण देती मान
तुझ्या साखळ्या साखळ्या साडेतीनशे मोती

या गीतातही अनेक दागिन्यांची नावे गुंफलेली आहेत. दागिन्यांसाठी रूसलेल्या गौराईला तिच्या सासूबाई म्हणतात —

काट्याकुट्याचा डोंगर त्यात गौराई शंकर
चौघी माझ्या सुना गिरीजा माझी एकली
एकली एकली तिथं का बसली
बसली बसली जोडव्या रूसली

ज्या प्रमाणे ती जोडव्यासाठी रूसते त्याप्रमाणेच बिलवर व इतर अलंकारांसाठी रूसते. शेवटच्या ओळीत फक्त नव्या अलंकाराचे नाव घातले जाते. बाकी गाण्याचा थाट तोच असतो.

अशा या लाडक्या माहेरवाशिणीची हौस पुरवताना माहेरच्या माणसांचे मन भरून येते व ती कौतुकाने गाऊ लागतात.

रानामागली तुळस पानाफुलांनं भरली
जोडव्याच्या नादी गौर माझी लवली
गौर मानाची मानाची किणव्या थोरांची
सांगून धाडीते पंढरपुरासी
तिथला सोनार काय घडवितो
जोडवी घडवितो जोडवी घडवितो
पैसा चढवितो

या माहेरवाशिणीच्या कौतुकाला सीमाच नाही. भावजय सुद्धा प्रेमाने म्हणते —

नणंद निघाली सासऱ्याला तिचा आनंद काय ग
जोडव्याचा जोड माझ्या नणंदजोगा ह्राय ग

भावाबद्दलचा प्रेमाचा ओढाही या माहेरवाशिणीच्या अंत:करणातून भर-भरून वहात आहे. त्याच्याबद्दल वाटणारा अभिमान जसा या गीतातून आला आहे, तशीच त्याच्या मोठेपणाची थोरवीही येथे गायिली आहे. भावाच्या प्रभावाबद्दल ती म्हणते ––

एवढीशी मासोळी पाण्यात झुळझुळी
चला ग सयांनो धराण धराया
धराण धरितो ग जीव माझा लचितो
खारकेच्या बागेत बंधू आला अवाचित
बंधूला देखता खारका पिकतो

याप्रमाणे बंधूला पाहताच बागेतली झाडे फुलतात, बहरतात आणि परि-पक्व होतात. नारळ, सुपारी, वेलदोडे, बदाम इत्यादींनीही बंधूच्या दर्शनाने बहर येतो आणि तेही फळरूप धारण करतात. पुढील गीतात भावाचे केलेले कौतुक उल्लेखनीय आहे ––

चांदीचं ताट रूप्याचा तांब्या
तिथं आमचे बंधू कुंडलीक नांदं
खाजीव अनरसं तळीव मोठं
या परकारानं भरीलं ताट
खाऊन जेवून बाहीर आलं

गणोबा हा गौरीचा मुलगा. तेव्हा त्याचे कौतुक करावे तेवढे थोडेच. तो आजोळी जाणार मग काय त्याचा जोर ––

गणूबा गणपती आज जातील आजोळी
चंदनाचा पाट तुम्हा बसायला देतील
जरीकाठी शेला तुम्हाला कांबराया देतील

ह्या गणोबा आपल्या अंगावरील दागिने हरवतो तेव्हा त्याच्याबद्दल घरच्या माणसांना चिंता निर्माण होते, ती अशी —

साती शंकर वनामंदी
एकला गणू माझा वनामंदी
गणूच्या आईला सांगून धाडा
गणूनं चिपळ्या गमीवल्या
गमीवल्या तर गमवू दे
गणूला घरला घेऊन या

स्त्रियांना प्रिय असणारे हे दागिने बनविण्यासाठी देवही जणु सोनाराचे रूप धारण करतो !

पंढरपूरचा विठोबा गेला मंगळवेढ्याला
गेला वेशीबाहेरी ग पडला वेशी बाहेरी
झोपडी बांधली झोपडी बांधली
देव झाला सोनार सोनार
बिलवर विकू लागला ग बिलवर विकू लागला

गौरीची ही गीते अनेक वैशिष्टयांनी नटलेली आहेत. माहेरी येणाऱ्या या गौरीचे आपल्या मुलीच्या मायेनेच घरोघरी कौतुक केले जाते. ती येते तीच वाजतगाजत. सुवासिनी समुदायाने गाणी गात नदीकाठी अगर ओढ्याकाठी तिला न्हाऊ घालतात, हळदीकुंकू वाहतात, कापुरारतीने ओवाळतात व मिरवणुकीने शुभमुहूर्तावर विधीपूर्वक घरी आणतात. तिला साध्या

भाजी भाकरीचा नैवेद्य दाखवितात. गौर घरी आणतांना रानगौरी–साध्या-भोळ्या सुवासिनी – गाऊ लागतात ––

ताड गौरी ताडाला येंगवली
शंकराची वाट गिरिजा पाऊली लागली
सोड शंकर सोड शंकर आमुचा पालवा
गौरी जातील माहेरी काय काय बंगाल आणशील
आनीन बांगडीचा जोड माझं माह्यार दुबळं

दुसऱ्या दिवशी गौरीची यथासांग पूजा मांडली जाते. या गौरीच्या पूजेचे अनेक प्रकार आहेत. गौरीच्या रोपट्यांना कपड्यात गुंडाळून व्यवस्थित पातळ नेसवतात. काही ठिकाणी मुखवटे बसवितात, आणि मग गौरदेवताच साक्षात प्रगट होते. सर्व स्त्रिया गाणी म्हणत रात्रभर तिच्याबरोबर फेर धरून नाचतात. आनंद महोत्सव साजरा करतात. एखाद्या स्त्रीच्या अंगात ऐन मध्यरात्रीच्या सुमारास गौर संचार करते. गाऱ्हाणी घातली जातात. नवस-सायास केली जातात. गौर सर्वांना दिलासा देते. प्रेमाचा आशीर्वाद देते व मग निरोप घेते. हळदीकुंकू देऊन उत्तररात्री सर्वजणी एकमेकींचा निरोप घेतात आणि मग तिसऱ्या दिवशी दहीभाताची शिदोरी देऊन गौरीविसर्जन होते. गौरी सासरी गेली तर तिची अनेक गीते लोकमानसात गंधासारखी दरवळत रहातात ––

घागर घुमू दे घुमू दे गोकुळाच्या नारी
गौर माझी घुमू दे जोडव्याच्या नादी
गौर माझी घुमू दे साखळ्याच्या नादी
गौर माझी घुमू दे बिलवराच्या नादी

# महालक्ष्मी

संग्राहिका : सौ. सुशिला बारलिंगे

आमच्या वऱ्हाडात भाद्रपद महिन्यात शुक्ल अष्टमीस अनुराधा नक्षत्रावर महालक्ष्म्या वसतात. त्यांना वाजतगाजत आणून त्यांचे स्वागत केले जाते. महालक्ष्म्या आणणाऱ्या सवाष्णीचे पायघड्या घालून स्वागत केले जाते. घरची मुख्य स्त्री सवाष्णीस "कोण पाहुणे आले?" असे विचारते. त्यावर ती सवाष्णबाई उत्तर देते, "मी महालक्ष्मी आले".

महालक्ष्म्या ज्या दिवशी वसतात त्या दिवशी संध्याकाळी त्यांच्या डोक्यावर पोवतं ठेवून हळदी-कुंकू लावून त्यांना दुसऱ्या दिवशीच्या जेवणाचे निमंत्रण केले जाते. त्या दिवशी त्यांना दागदागिने व नवीन रेशमी वस्त्रे घातली जातात. मोठ्या महालक्ष्म्यांसाठी दोऱ्याचे १६ पदरांचे आणि त्यांच्या मुलांचे ८ पदरांचे पोवते केले जाते. ती पोवती हळदीमध्ये भिजवून ठेवतात.

दुसऱ्या दिवशीं महालक्ष्म्यांना सुतवतात. दोन महालक्ष्म्यांना एकत्र प्रत्येकी ८।८ (एकूण १६) पदरांनी आणि त्यांच्या मुलांना प्रत्येकी ४।४ (एकूण ८) पदरांनी सुतवतात. (सुतवतात म्हणजे दोऱ्याने एकत्र बांधतात.) त्यांच्यापुढे फुलोरा मांडतात. फुलोऱ्यामध्ये करंज्या, साटोऱ्या, सांजोऱ्या, अनारसे, लाडू, चकल्या इत्यादि पक्वाने ठेवलेली असतात.

ज्येष्ठा नक्षत्रावर संध्याकाळी त्याची महापूजा केली जाते. या पूजेसाठी पूजेच्या नेहमीच्या साहित्याबरोबरच आघाडा, केना, वस्त्र, कमळाचे फूल, केवडा या वस्तूंचा प्रामुख्याने उपयोग केला जातो.

महालक्ष्म्यांच्या समोर पहिल्याच दिवशी गहू, तांदूळ, डाळी इत्यादी धान्य ठेवले जाते. त्यावर नारळ, काकडी व पडवळ ठेवतात.

महापूजेमध्ये पुरणाची आरती केली जाते. या आरतीत १६ दिवे आणि १६ काडवाती असतात. त्यानंतर नैवेद्य दाखवून सायंकाळी जेवण होते. जेवणामध्ये १६ भाज्या, १६ चटण्या-कोशिंविरी केल्या जातात. शिवाय वडा, घोसाळ्याची भजी, अळूच्या वड्या, सुकवडी म्हणजे कणकीची बोंडे, मुगाच्या डाळीचे वडे, कचोरी असे १६ पदार्थ केले जातात. तसेच घाऱ्या, घारगे, वरणभात, कथली म्हणजे पडवळ टाकून केलेली कढी, आंबील आणि पुरणपोळी हे मुख्य पदार्थ असतात.

तिसऱ्या दिवशी मूळ नक्षत्रावर महालक्ष्म्यांना मुरडपोळी, दही भात यांचा नैवेद्य दाखविला जातो. संध्याकाळी त्यांची पूजा करून त्यांच्यावर अक्षता टाकून त्यांना हलवितात. नंतर त्यांचे पोवते काढतात. मग महालक्ष्म्यांची गोष्ट (कहाणी) सांगितली जाते. ही गोष्ट सांगत असतांनाच मोठ्या महालक्ष्म्यांच्या पोवत्यांला १६ आणि त्यांच्या मुलांच्या पोवत्यांला ८।८ गाठी मारतात. नंतर ही पोवती घरातील माणसे आपल्या अंगावर धारण करतात. गोष्ट सांगतेवेळी येणाऱ्या स्त्रियांना हळदीकुंकू लाऊन भिजलेली हरबऱ्याची डाळ व काकडी या नैवेद्याचा प्रसाद वाटण्यात येतो. त्यानंतर महालक्ष्म्या उठतात. त्यांचे विसर्जन केले जात नाही.

## ईनाई

*निवेदक* : ***श्री. वसंत गिरटकर***

इनाई ही देवता पार्वती असून तिचा पती शंकर आहे. लोकगीतात हिला गौरा, गौराई असे संबोधिले आहे.

हिची स्थापना पढणाच्या म्हणजे दसऱ्याच्या आदल्या दिवशी होते. शेतातील चिक्कण माती आणून तिची मूर्ती तयार करतात. कोठे कोठे कुंभाराकडूनही अशी मूर्ती करवून घेतात. त्यावेळी कुंभार दादाला विनंती केली जाते –

कुंभार माह्या दादा माती चिकवजो राती
आंधी तू घडवजो माहा चौरंग पाटगा
त्याच्या पाठी घडवजो माहा जगमल्या हत्ती
त्याच्या पाठी घडवजो माहा शंकरजी पती
त्याच्या पाठी घडवजो माहा भांगुलबा देर
त्याच्या पाठी घडवजो माही गौराई नार
मंग तू का घडवजो तिचं चिलया बाळ

या गौरेचा पती शंकर म्हणजे महादेव, तिचे वाहन आहे हत्ती, बसायला चौरंग पाट, तिचे चिलयाबाळ आणि तिचा भांगुलबा देर आहे. हा कुणाच्या वाडीतले रोप मोडतो आणि मग फुलवंता माळीण त्याच्या कागाळचा कानावर घालण्यासाठी गौराकडे येते :

भांगुलबाजी देर चाले झपझप
मोडयलं रोप मिरच्याचं

फुलवंता माळीण आली घरावरी
किती अर्जी करी भांगुलबाची

गौरा भांगुलबाची परोपरीने विनवणी करते, पण भांगुलबाच्या खोडचा काही कमी होत नाहीत.

भांगुलबाजी देर चाले रप रप
मोडयलं रोप दवन्याचं
फुलवंता माळीण आली घरावरी
किती अर्जी करी भांगुलबाची

अशा प्रकारे तो एक एक रोप मोडत जातो. आणि गौराची मनधरणी करता करता नाकी नऊ येतात.

लोकांच्या लेकी बाळी माहेराला जातात. गौरालाही आया बाया पुसतात. 'गौरा, तूं कधी माहेराला जाशील?' ती उत्तर देते –

वाढले विरुक्ष या माय येला जाती
तव्हा का माहेरी जाईन मी

वृक्ष वाढतील, ते वेली पांघरतील तेव्हा मी माहेरी जाईन. मग तिच्या सया सकवा म्हणतात ––

दिडा का दिसाचं गौराचं माहेर
जलमाले लागला सासुरवास
कही येशीन नारी कही जाशिन नारी
नदी का नर्मदा भरयन
धुंद धुंदकार काह्यचा कह्ला होते
बाईच्या माहेरचं मूळ येते

बाईच्या माहेरी काय काय नवल प्यारी
नागव्या तलवारी चमकती

माहेराला जायला कोणाही स्त्रीचा जीव वाराहुरा होतो, आसुसतो. तिला माहेराचा बांध दिसला, झुडूप दिसले तरीही आनंद होतो. माहेरचे नाव जरी निघाले तरी तिच्या आनंदाला उधाण येते. जीव खालीवर होतो. कधी माहेराला जाईन नि कधी नाही असे होऊन जाते. गौरा त्यातलीच —

गुळाची पापडी तिळानं घोळली
लाडाची गवरा माहेराला आली

ती दसऱ्याला माहेरी येते. त्यावेळी हस्त नक्षत्र लागलेले असते. हस्ताचा पाऊस हत्तीच्या सोंडेने वर्षत असतो.

हत्तीयाचा पानी पडे चहुंधारा
कसी जाऊ देरा माहेराला
माहेर मंतानी हर्ख माह्या मनी
लागल्या दावनी हलियाच्या
हले करी दादा हले राखत राह्य
वाटंनं या गौरा देखली काय ?
देखली देखली गौरा रत्ता झांबळ झाली
तिच्या आंगी चोळी मदनाची
मदन म्हनावे पदरी धरावे
लेहून धाडावे दसरथाले
दसरथ दसरथ अयुध्येचे राजे
त्याहीचे दरगे गावो गावी
आनलं बेगडं घडवले तानवडं
घे ये गौराबाई आपलं लेनं

बेगडाचे अलंकार गौराला घडवले. गौराला मूळ आले. गौराने सासूबाईंना विचारले ––

चांदीचा आरसा सोन्याचा अंबरसा
कुंकू लेते सारजा सासू माही
तुम्हा मंतो सासुबाई आम्हा मूळ आलं
धाडता का मले सासूबाईजी

गौराने परवानगी मागितली. परंतु सासूने सासऱ्याकडे बोट दाखवले.

गुनाचे गुनवंती बरी का दिसती
मला का पुसती पूस आपल्या सासऱ्याला
चांदीचा पलंग सोन्याची नेवार
सासरे माहे निजले सकवार.

सोन्याच्या निवारीने गुंफलेल्या चांदीच्या पलंगावर सासरे झोपले होते. त्यांना ती पुसू लागली ––

तुम्हा म्हंतो मामाजी आम्हा मूळ आलं
धाडता का नाही जी

आणि सासऱ्यानेही पदर झटकला ––

गुनाचे गुनवंती बरी का दिसती
मला का पुसती पूस आपल्या भासऱ्याला

असा प्रत्येक जण तिला हुलकावण्या देतो. आपली जबाबदारी दुसऱ्यावर ढकलतो. असे करत करत ती आपल्या "स्वामी"ला विचारते. तो मात्र झटपट तयार होतो आणि तयारीही करतो ––

आनलीच साडी जुतलीच गाडी
चाल जाऊ रानी तुह्या माहेराला

माहेराला जाताना शुद्ध हरपते. मन पिसासारखे हलके फुलके होते. कधी कधी जाईन नि कधी नाही असे तिला होऊन जाते. पाखराला पंख मागायलाही ती कमी करीत नाही ! घाईगर्दीत ती —

माहेराले येता लगबग झाली
इरद्याचा जोड इसरली
माहेराले येता लगबग झाली
नथीचा मुखरा इसरली...

असा एक एक अलंकार ती विसरते !

चांदणे पडलेले असायचे, जेवणे खाणे झाली की, मायलेकी जुईच्या मांडवाखाली बसायच्या. माय मकाचा जीवच तो. ती आपल्या लाडक्या लेकीला खोदू खोदून विचारायची, "गौराई, कसं आहे? बेस आहेना? काही सासुरवास, तर नाही ना? वनवास?"

सांग सांग गौराई लेकी सासुरवासाच्या कथा वो
सांग सांग गौराई लेकी सासुरवासाच्या कथा वो

आणि असे विचारले की, गौरेच्या मनाचा बांध फुटायचा नि धो धो वाहू लागायचा —

काय सांगू जनाई माता सासू बोले जा मशी जी
पाह्यटीस घुसरन माहाजी आंगनी शेनाच्या राशी जी
खंडी खंडी पानी माहा डोई पडलं टालं जी
कुडव कुडव दळण माहा हाता आलेस फोड जी

असा तिचा सासुरवास ऐकून मायच्या डोळयांचे रांजण पाझरले. आणि ती मुक्या मुक्या ऐकू लागली ––

टोपलं टोपलं धुनं माहा हात बाई आले लाल जी
कन्याची खरवड वर तेलाची धार जेव जेव वो गौराई लवकर
जाय जाय वो बिन बंधनाची मोळी आन वो
जेवली खावली इचारी पडली
सांगाना सासुबाई पुढचा धंदा जी
जाय जाय वो बिन पान्याचं धुन धुऊन आन वो
नदीवर गेली गौरा रडत बसली वो

तिला वाटले केवढे अवघड काम सोपवले सासूने ! ही काय सासू आहे ? साताजन्माची वैरीण ही, बिनबंधनाची मोळी कशी आणावी ? बिनापाण्याने धुणे कसे धुवून न्यावे ?

इतक्यात तिथे बागळे जमा झाले. ते तिच्या धुण्यावर लोळले. तिचे धुणे पांढरे शुभ्र झाले ! धुणे नेऊन ठेवले. ती अरण्यात गेली. मोळी केली आणि रडत बसली. पाच भुजंग आले. तिच्या मोळीला गुंडाळले. घरी आली. म्हणाली ––

"घ्या आना घ्या आना सासुबाई बिनबंधनाची मोळी" सासू आक्रीत करू लागली.

"भले वो, कोतवालाचे पोरी तुले भरून इद्या सारी."

ही इनाई कोतवाल पटणाचे दिवशी मांडतात. तेच तिची पूजाअर्चा करतात. ती त्यांच्या इथे माहेराला येते. म्हणून तिला "कोतवालाचे पोरी" म्हटले आहे. ज्या दिवशी ही मांडल्या जाते, बसते, तेव्हा ही माहेरी येते असे समजतात. तिचे माहेर दीड दिवसाचे असते आणि उठते तेव्हा ती सासरी जाते असे समजतात.

तिची पूजाअर्चा दीड दिवस करतात. पहिल्या दिवशी कोंबड्याचा भाव देतात. फुलोरा असतोच. दसऱ्याचे दिवशी नैवेद्य दाखवतात. पूर्वी रेड्याचा बळी हिला पडत असे. गावचे देशमुख, देशपांडे, पाटील किंवा अन्य दुसरे जे ज्या गावचे वतनदार असतील ते त्या गावाला हेल्याची गर्दन मारीत. त्या हेल्याचा हिस्सा, एक वाटा मानवाईक वतनदाराकडे पोचता करीत. ही चाल चाळीस पन्नास वर्षांपूर्वी लुप्त झाली. परंतु नाकावर तलवार चालवून त्याच्या रक्ताचा टिळा लावण्याची प्रथा आता आतापर्यंत प्रचलीत होती, तीही बंद पडली.

पारधी या वन्य जमातीतील पोवार अजूनही हेल्याचा अविर्भाग होमात टाकतात व त्याचे मांस नि काळीज सेवन करतात. ही पण प्रथा लुप्त होण्याच्या मार्गावर आहे. ते कालीमाता व मरीमाय यांनाही रेडा बळी देत असत.

इनाई ह्या देवतेचे वाहन हत्ती व घोडा आहे. जेव्हा दसरा हस्त नक्षत्रात येतो तेव्हा हिचे वाहन हत्ती असते व उत्तरात आल्यास घोडा असते. दसऱ्याच्या दिवशी सायंकाळी तिला सासरी धाडतात. ती सासरी जात असताना आयाबाया तिला सार करतात.

**सासऱ्याले जाता गौरा माही लडे**
**बाप मन मोडे येसासाठी**
**सासुऱ्याले जाता काय काय गौरा लेली**
**बापानं घेतली सोनसाडी**
**बाबाजीनं केली बाईची बोळवण**
**केल्या भावजयींनं पायधुण्या**
**सासुऱ्याले जाता बाई गौरा लडे**
**कशी पाया पडे लडू लडू**

ती साऱ्यांचा निरोप घेते. पाया पडते. रडून रडून तिचे डोळे सुजतात. तिला सार करायला आयाबाया जमतात.

तिची मूर्ती चौरंगावर मांडतात. तो चौरंग कोतवाल डोक्यावर घेतो. तिच्या पुढे लिंबं असतात. चौरंगावर पाच धोंडे उभे करून "खोपडी" केलेली असते. तिच्यापुढे दिवा तेवत असतो. पुढे टेंभा पाजळत असतो आणि बायका मागून गाणी गात गात जात असतात.

माहेराले आली काय काय गौरा लेली
बापानं घेतला वो सोनसडा
दुरुन दिसते महालाच्या खिडक्या
मैदानी पालख्या बाईजीच्या
पायी पैंयजन वाजे झुन झुन
मोठ्या घरची सून बाई वो माही
माडीवरतं माडी माडीवरतं चांद
फेकून मारे गेंद बावाजीले
दुरुन दिसते कोनाचे बुरुज
मैदानी फऊज राजियाची

दोघी पुढे म्हणतात. बाकीच्या मागाहून एक झाली की दुसरी, तिसरी . . .

आंगनी दुदुल तपते माह्या लाडाचे गवरा
दूध घेऊनी जाय
कसी पेऊ माय शंकर सवं हाये
शंकर नव्हे माहा सांगती मजला टाकून जाती
आडवा पाय मी देईन शंकर शिपून घेईन
माहे लाडाचे गवरा संगं शिदुरी नेजो

असे तिची आई म्हणते नि गवरा काही ना काही कारणे पुढे करते.

असे करत करत तिला गोठाणावर आणतात. इकडून गावकरी मंडळी रावण मारून शिलंगणाचे सोने लुटून आलेली असतात. त्यांना पाहून परधान व बाया त्यांच्या स्तुतीवर गाणी गातात. त्यात मानवायकांची नावे गुंफतात.

दसरा खेलू गेले यसवंत झाले
सवाशा मोत्याचे तुरे लेले
सोनियाचा टाळ रूपयाची पाळ
तिथी बसे काळ बावाजीचा
बावाजी राजाले पुसतीन बारनी
गाव झाला तोरणी राजियाला
करवती धोतर नारेळी पागूटं
कचेरी बसनं बावाजीचं
याहीन गावचे पाटील साहेब नटं
कमानीले कंठ सोनियाचे
याहीन गावचे पाटील साहेब जुने
हवेलीले चुने टाळियेले
याहीन गावचे पाटील हावशी
बुरजावर तुळशी लावली जी
कमरी करदुडे तुमच्या जडिताचे
कानीचे चौकुडे सोनियाचे
मारला रावण टाकला कावडी
या नेला चावडी राजियाच्या
बावाजीचा घोडा नाचे ठायी ठायी
नाचत आला बाई वाड्यामंदी

बावाजी पाटलाचा घोडा मोठा नाल
चावडी कोतवाल गस्त देती
गस्त देता देता थकले कोतवाल
रयतीले सुख देशमुख

सोने घेण्याचा पहिला मान इनाईचा. सारी मंडळी पहिले तिला सो देतात. इनाईपुढले मानाचे लिंबू दिले जाते. त्याबद्दल लोकही कोतवाला पैसे देतात. कुणी पाच रुपये, कुणी एक रुपाया, आठ आणे, चार आणे. लिंबू कामी पडते अशी समज आहे.

इनाईला सोने देऊन मंडळी मग इतर दैवतांना सोने देतात नंतर सर्वां सोने देण्यासाठी घरोघरी फिरतात. गावकऱ्यांच्या सोन्याचा स्वीकार केल्य वर इनाई–माता कोतवालाच्या डोक्यावरून आरवत मिरवत जाते. यावेळ खरोखरच आयाबायांच्या डोळ्यातून आसवांच्या धारा वाहात असतात आणि त्या गात असतात —

पायीच्या वाह्यना डोईच्या दोह्यना
गवराई चालली शेतमेरा
शेवई मेरानं गौराताई उभी
ललकारु लागली शंकराले
शंकरजी शंकरजी शिराटीचे राजे
त्याह्यचे पर्ण राजे गावो गावी ....

गाण्याच्या गजरात गौरा सासरी जाते. तिला जोंधळ्याच्या शेतात नेऊ खड्डा करून त्यात ठेवतात. तिची पूजापाती करून तिला नैवेद्य दाखवता आणि जड अंत:करणाने सारे घराकडे परततात.

# गौराय निघाली माहेरा

डॉ. सौ. चारूशीला गुप्ते

श्रावण महिन्यातील सारी व्रतवैकल्ये नि फुगडचा, झिम्म्याचा मंगळागौरीचा काळ संपला की, सौम्य, गंधीत, रंगीत पण गंभीर सौंदर्याचा संभार घेऊन मनाला भुरळ घालणाऱ्या भाद्रपद महिन्याचे आगमन होते. श्रावणातले निसर्गाचे सौंदर्य काहीसे बालीश असते. पण भाद्रपदामध्ये ते कसे भारदस्त दिसायला लागते. जिकडे तिकडे हिरवी मुलायम दुनिया उमललेली दिसते. पिवळचा रंगाची किंचित झाक असलेल्या या हिरव्या रंगाची भाषा सुद्धा हिरवीच असते. निसर्गाने अंगावर पांघरलेल्या, हिरव्या शेल्यावर रेखाटलेल्या, रंगीत फुलांच्या सुंदर वेलबट्टीची नजाफत अन् शेताशेतांतून भातांच्या ओंब्यांचे परस्परांशी चाललेले हितगुज जाणून घ्यायला माणसांचे मनही कसे रसिक पाहिजे.

गौराईला माहेरी जायची याच महिन्यात ओढ लागते. कारण तिचे रसिक मन, भाद्रपदात, फुलोरा फुलविणाऱ्या, झेंडू, तीळ, सोनचाफा, शेवंती इत्यादी नानारंगी आणि नानाढंगी फुलांकडे वेधलेले असते. केव्हा एकदा माहेरी जाते नि साऱ्या सुगंधी फुलांच्या सहवासात रमते, असे तिला होऊन जाते. बालपणी माहेरी जिवलग मैत्रिणी बरोबर गायलेली गाणी नि खेळलेल्या झिम्म्याच्या नि फुगडचांच्या आठवणीचे गोड धागे तिच्या मनात उलगडू लागतात.

परंतु महादेवाला मात्र गौरीचे माहेरी जाणे पसंत नसते. "तू गेलीस की मला करमायचे नाही." असे सांगून शंकर तिच्या आनंदावर विरजण घालतात. मग ती शंकराला म्हणते, " मला माहेराला जाऊ द्या ! तिथं मला उटणं लावून स्नान घालतील. नवा शालू देतील. अलंकार घालतील. तूप शेवया लाडू करंज्याचे जेवण घालतील."

परंतु पुरुषांना आपल्या पत्नीने कधीच माहेरी जाऊ नये असे वाटते. गौरीला मात्र माहेराची ओढ लागली होती. त्यामुळे ती पतीच्या नकाराला

न जुमानताच माहेरी यायला निघाली. पण शंकराला तिचा विरह सहन होत नाही. म्हणून पार्वतीचा रथ पुढे चालला तरी —

> "मागं मागं शंकर पुढं पुढं पार्वती
> जन लोक हासती तुम्हा कैलासाच्या पती"

एवढे सांगूनही शंकर तिचा पिच्छा सोडीत नाही ! शेवटी एकदाची पार्वती माहेराला पोचते. ती पलिकडे गेली तरी तिची परत येण्याची वाट पाहत शंकर अलिकडे उभाच राहतो.

पल्याड पार्वती अल्याड शंकर हे सगळे आक्रीत पाहून पार्वतीच्या साऱ्या मैत्रिणी खुदू खुदू हसू लागतात ! ... पार्वती लाजून लाल होते !

असे हे पार्वतीचे म्हणजे गौरीचे माहेरी येणे. एक पाय तळ्यात नि एक पाय मळ्यात असावा तशी तिच्या मनाची प्रथम अवस्था असते. परंतु माहेराची हवा लागली की, परत सासरी जाईपर्यंत गौरही सारे काही विसरून जाते. तिचे बालपण पुन्हा साकार होते. माहेरच्या रंगीबेरंगी फुलांच्या फुलोऱ्यात, आनंद महोत्सवात अन् मैत्रिणींच्या मेळाव्यात ती गृहिणी पदाची आठवण जणु विसरून जाते.

आपल्या इकडे भाद्रपदातील शुक्ल पक्षात गौराई सोन्याच्या पावलांनी माहेरी येते. त्यावेळी आपापल्या ज्ञातीच्या अन् घराण्याच्या रिवाजाप्रमाणे तिचे स्वागत, पूजा, विसर्जन केले जाते. या गौरीला ज्येष्ठा गौरी म्हणतात. अनुराधा नक्षत्रावर गौर घरात येते. मग दुसरे दिवशी तिचे पूजन आणि तिसरे दिवशी तिचे विसर्जन.

घराघरातील सुवासिनी एकत्र जमतात. आणि घराण्यातील रिवाजाप्रमाणे गौरीला आणायला जातात. या गौराईची रूपे पण या चालीरितीप्रमाणे भिन्न असतात. लक्ष्मीची धातूची मूर्ती, मातीचे मुखवटे, कागदावर काढलेले गौरीचे चित्र, नदीकाठचे पाच खडे इत्यादी स्वरूपात गौरीला घरी आणतात.

महाराष्ट्रामध्ये मातीच्या पाच मडक्यांची उतरंड किंवा भात मोजण्यासाठी वापरण्यात येणारे अधोळी नावाचे लाकडाचे उंच माप घेतात. त्यात हळदीने पिवळा केलेला दोरा, हळद, कुंकू, पैसे, सुपाऱ्या, हळकुंडे आणि खारीक खोबरे घालतात. या उतरंडीवर गौरीचे गणपती प्रमाणे जे मातीचे सुंदर मुखवटे मिळतात. ते बसवतात. काहींच्या घराण्यात पितळेचे मुखवटे परंपरेने तयारच करून ठेवलेले असतात.

नंतर या उतरंडीला साडी चोळी नेसवतात. अलंकार घालतात. अशी दागिन्यांनी नटलेली गौर पाहणारांचे मन वेधून घेते. काही घराण्यात दोन मुखवटे असतात. दोन मुखवटे म्हणजे पार्वती आणि तिची सखी. काही घराण्यात एकच मुखवटा असतो.

कोणत्याही स्वरूपात आणि घराण्याच्या चालीरितीप्रमाणे गौरीला सायंकाळी दिवेलागणीला दारात आणतात. त्यावेळी दाराला फुलांच्या माळा बांधतात व दारापुढे रांगोळीची वेलबुट्टी काढतात. नंतर घरातली यजमाणीन सुवासिनी स्त्री, हातात गौर घेऊन दारातून घरात प्रवेश करते. दुसरी एखादी कुवार मुलगी किंवा सुवासिनी भिजवलेल्या कुंकवाची वाटी घेऊन बरोबर असते. या गौरीला घरात सर्वत्र फिरवितात. गौराईला जमलेल्या सुवासिनी स्त्रिया प्रश्न करतात, "गौराई गौराई, कुठं ग आलीस?" "बैठकीच्या खोलीत," "गौराई गौराई कुठं ग आलीस?" "तिजोरीच्या खोलीत," इत्यादी प्रश्न विचारून त्याची उत्तरे त्या भगिनी याप्रमाणे स्वतःच देतात. गौरीला घरात नेताना प्रत्येक दालनात जाताजाता कुंकाची पाच बोटे जमिनीवर उठवितात. नंतर गौरीची स्थापना करून तिच्यावर साजश्रृंगार चढवितात.

काही घराण्यात तेरडयाची रोपे उपटून आणतात व नंतर त्याला नवा शालू किंवा जरीचे लुगडे चोळी नेसवून आणि गळयात हातात व नाका-कानात अलंकार घालून सजवितात. काहींच्या घरी पाणवठयावर जाऊन पाच खडे आणून त्यांची गौर म्हणून पूजा करतात. मग गौरीची आरासही शानदार करतात. हळदकुंकवाला सुवासिनींना बोलवितात.

रात्री गौर जागवतात. मुलीबाळींनीच नव्हे तर प्रौढ स्त्रियांनी घरोघरचा परिसर भरून जातो. त्यावेळी फुगड्या, झिम्मा किंवा इतर खेळ आणि गाणी व उखाणे यांचा एकच थाट उडतो. खेडवळ बायका गातात ––

आली ग वर्साची गवर
नागदिस आवऱ्यानी
आमी ग खेलाया जमल्या
आमी ग खेलाया जमल्या

लहान थोर स्त्रिया वेगवेगळे खेळ खेळून आणि गाणी म्हणून गौर जागवतात. प्रौढ स्त्रिया, नवविवाहिता पती संबंधी उखाणे घेतात.

दुसरे दिवशी गौरीच्या स्नानाचा आणि जेवणाचा समारंभ केला जातो माहेरवाशिणीचे कौतुक केलेच पाहिजे. तिला चार गोडधोडाचे पदार्थ पोटभर खाऊ घातले पाहिजेत या आविर्भावाने घरात ऐपती प्रमाणे पक्वान्ने करतात.

याच दिवशी या माहेरवाशिणीचे समारंभपूर्व स्नान किंवा नहाण होते. त्यावेळी त्यासंबंधी खेडेगावात गाणी म्हणतात––

गौरी बसल्या नाह्याला
गणपती गेले पहायला
गणपती आमचे राणे
सात दिवसांचे पाहुणे

असे हे गणेश भक्तांचे राजे गणेशांच्या विसर्जनाबरोबर गौराईचेही विसर्जन करतात. विसर्जनाआधी खेड्यातील स्त्रिया गाणी म्हणतात.

माय बोले लाडिक लेकी
बुगड्या लेवून जाय गो

आता ग माय कवा लेवू
शंकर वाट पाय गो

विवाह झाल्यावर माहेराची ओढ असली तरी माहेर दोन दिवसांचे ! पतीच्या घरी परतायची ही गौरीची आतुरता यथायोग्यच समजली पाहिजे.

तरी आईची माया राहत नाही. गौराईचे विसर्जन होण्याच्या आधी आई तिला म्हणते —

माझ्या लाडक्या बये निदान ....
अंगणी तापतंय दूध
दुधा पिवळी साय
ये ग गवरी बाई
एवढं पिऊनी जाय

पण गौराईला कुठला धीर होता तेवढा ? ती लगेच जायला निघाली पण !

रस्त्यावरही झिम्मा फुगडी खेळत, गाणी गात गात स्त्रिया गौरीचे विसर्जन करतात.

जेष्ठा गौरीचा हा सण देशावर, कोकणात तसाच दक्षिण भारतातही साजरा करतात. हे सौभाग्यदायक व्रत आहे, त्यामुळे भगिनीमध्ये ते फार प्रिय आहे. गौरी पूजनाविषयी जुन्या काळातील खालील मनोरंजक कहाणी लक्षात घेण्यासारखी आहे –

एक ब्राह्मण होता. तो फार गरीब होता. त्यामुळे त्याला भाद्रपदातील गौरी पूजता येईनात, म्हणून त्याला फार वाईट वाटले व तो एका तळचा-जवळ जीव देण्यासाठी गेला. तिथे त्याला एक म्हातारी भेटली. तिने त्याला जीव देण्याच्या बेतापासून परावृत्त केले व त्याच्याबरोबर ती त्याच्या घरी आली. तिच्यासाठी स्वयंपाक करावा म्हणून ब्राह्मणाची पत्नी घरात काही

धान्य आहे का ते पाहू लागली. तर तिला भांड्यात विपुल धान्य भरलेले दिसले ! हा सगळा म्हातारीने केलेला चमत्कार होता !

दुसऱ्या दिवशी म्हातारीने ब्राह्मणाकडे दूध मागितले. पण घरात दूध नव्हते. तेव्हा तिने ब्राह्मणाला गोठ्यात खुंटे पुरून त्यांना दावी अडकवून ठेवायला सांगितले. संध्याकाळी जितके खुंट पुरले होते, तितक्या गाई म्हशींची नावे घेऊन त्यांना हाक मारायला सांगितले, त्याप्रमाणे हाक मारताच गाई म्हशी आल्या व मग ब्राह्मणाने त्यांचे दूध काढले.

मग म्हातारी जायला निघाली, तेव्हा ब्राह्मण तिला पोचवायला तळ्या-पर्यंत गेला. म्हातारीने त्याला तिथली थोडी वाळू दिली व ती घरातील मालमत्तेवर टाकायला सांगितली. त्यायोगे तुझे ऐश्वर्य कायम राहील, असेही ती म्हणाली. जाताना दरसाल गौरीची पूजा करण्याबद्दल तिने ब्राह्मणाला आदेश दिला. त्याप्रमाणे ब्राह्मणाला पुष्कळ संपत्ती मिळून त्याची ददात मिटली.

ज्येष्ठागौरी हा सण महाराष्ट्रीय संस्कृतीच्या कुळधर्माची परंपरा आहे. तो आपल्याला खऱ्या मानवधर्माची दीक्षा देतो व जीवनाचा खरा अर्थ व आनंद आपल्या लक्षात येण्यास सहाय्य करतो. आणि म्हणूनच आटपाट नगरातले हे सणसोहळे, माणसाचे जीवन सुफल संपूर्ण करतात असे म्हणावे लागते.

# गौराई सणाची कोकणी महिलांची लोकगीते

*निवेदक : रा. ल. महाडिक*

कोकणी महिला शेती कामातून मोकळी होते. श्रावण मास सणा-सुदीचे दिवस घेऊन उत्साहाने पुढे येतो. नाच-गाणी सुरू होतात. अशा वेळी कोकणी हरिजन महिला म्हणते,

घागर घुमू दे देवा पवा वाजू दे
पव्याच्या नादानं गौराय कधी येशील ग

अशी हाक घातल्यावर गौराय म्हणते,

पाऊस पडंल नदी भरंल तवा येईन ग
तेरड्याच्या फुलावरी वस्ती करीन ग

असेच मग भेंडीचे फूल, कवाळीचे फूल इत्यादी विविध फुलांची नावे घेऊन हे गीत गातात. या फुलांवर वस्ती करून गौराय रहाते अशी भावना धरून सायंकाळचे सुमारास नदीपासचे शेतात ठेवलेला फुलोरा वाजत-गाजत गाणी म्हणत आणतात.

ढवळ्या नंदी वरना गौर एकली आली
बापानं देखिली (गौर) लेक एकली आली
नाय बये एकली संगं शंकर मुलारी
ते गेलं राऊळी मी आले माहेरी
आईनं देखिली लेक भुकेली आली
नाय बये भुकेली घरी जेवून आली

अशा उत्साहाने गौरायला आणताना वाटेवरील वरोबरीच्या महिला आर
ओवाळतात.

सरला श्रावण निघाला भादवा
भाव जातो बहिणी मुलारी

यावेळी शंकर-पार्वतीमध्ये संवाद होतो तोही फार हृदगत व्यक्त करणा
आहे.

सोलावंदी सूप घेनं भारजा तुला
नको जाऊ दुबळ्या माहेरा ग
मायेचा लेकरू दुबला बंधु
घेल मला कळकीचा सूप ग
त्याला मी करीन मान
जाईन मी दुबळ्या माहेरा

त्यावर शंकर म्हणतो,

सोन्याचा नारळ घेनं भारजा तुला
रेशमी चोळी ....
रेशमी बांगड्या....

गौराय प्रत्येक वेळी म्हणत असते,

नारळीचा नारळ आणील बंधु मला
हिरवी चोळी ...
हिरव्या बांगड्या ....
फुलेला राजगिरा मोठा आनंद झाला
भाऊ वंजारी गेलं देश पाहयाला
बहिणीच्या ववशासाठी बंधु सुपा साठवितो
बहीण ववसेत बंधु सुपा साठवितो

नारळ, सुपाऱ्या, पानं, केळी, खारका-बदाम भाऊ साठवितो आणि वहिणीचा वसा निर्विघ्नपणे पार पडावा म्हणून धनुष्य-बाण घेऊन संरक्षण देतो.

माहेरा जाशी गौरी कुठं बसशी
कुडामंडपी मी सुपा बशीन
माहेरा जाशी गौरी काय खाना खाशी
कोंड्याची भाकर माठाची भाजी
दुबळ्या माहेरा गौरी काय लेना लेशी
बयेच्या साडी-चोळया घेन मज पाशी
कोकणी माहेर घाटावर सासर
घाटावर सासर तिथं पुतळयाचा लेना
कोकणी माहेर सरी-साखळी लेना
घाटावर सासर तिथं गव्हाचा खाना
कोकणी माहेर तिथं तांदळाचा खाना
हिरवी बांगडी रूप्याचं ठसं
गौराय म्हणं माझं माहेर दिसं
मोती नाय म्हणून रूसं ग
गौराय बाजेवर बसं

गौरी विसर्जनाचे वेळीही गाणी म्हणत नदीवर जाताना,

पाटा बाय पाटा ग कातीव पाटा
आमची गौराय जाते सासऱ्या
तिला पोळयांच्या भेटा

असेच नारळ, मोदकाच्या भेटा गाण्यात गातात,

वरी बाय वरी ग डोंगरची वरी
आमची गौराय जाते सासरी
तिला सोन्याची सरी
नाचणी बाय नाचणी ग डोंगरची नाचणी
आमची गौराय जाते सासरी
तिला सासरची काचणी
कां ग बाय कां ग डोंगरचं कां ग
आमची गौराय जाते सासरी
तिला सोन्याचा भांग

अशा रीतीने कोकणी पिकांची नावे घेऊन गौरव गीते गात गात गात जात असता–

लवतील आंबं लवतील जांबं
लवतील मोगरा-जाय हो
माय म्हणे तान्हया लेकी
पुतळ्या लेऊनी जाय हो

त्यावर गौराय म्हणते,

आता कधी लेऊ ग बये
शंकर पुढे जाय ग
शंकर सारा भोला राजा
नगरामधी नाय ग

अशा रीतीने झाडे-वेली कष्टी होऊन निरोप देताना नम्र होतात. हरिजन महिलांच्या या अशा दडलेल्या भावना 'गौराय' सणात गाण्याच्या रूपाने प्रगट होत असतात. गौराय आपल्या बापाचा असाच निरोप घेत असताना म्हणते,

कारलीचा वेल काय मंडपी गेला
कारली खाली बस माझ्या पित्या रं
तुझी लेक जाते सासरी
जा जा म्हणशी पाणी डोळं भरशी
पेटीतला शेला लेकीला देशी वज जा म्हणशी
वज जा म्हणशी रं पाणी डोळी आणशी
केतकीच्या बनातना पहावया येशी

गौराय आपल्या आई-बापासंबंधीच्या भावना व्यक्त करताना–कुटुंबाचा विस्तार कारलीच्या वेलासारखा वाढलेला असतो असे सांगते. तेव्हा त्याच्या छायेखाली राहून आई-बापांनी दिवस काढावेत असे म्हणते. जड अंतःकरणाने निरोप देत असताना केतकीचे बनातूनही तू मुलीला पाहातोस ही भावना, हा कल्पना विलास, मोठ्या चातुर्याने केला आहे.

अशी गौरीच्या सणात गीत गात असतांना श्रीकृष्ण लीलेसंबंधी गीतेही हरिजन महिला गातात. 'चंद्रावळी' नावाची हरिजन गौळण श्रीकृष्णाच्या मर्जीतील होती–त्यावरील–

निघाल्या ग तीनशेसाठ गवळणी
निघून चालल्या मथुरेच्या बाजारी
आडवा आला श्रीकृष्णाचा मेळा
दे ग गवळणी माझासा हा दानू
होऊ दे माझ्या दुधाचा इकरा
मग देईन तुला खोरी भरून दूध

त्यावर श्रीकृष्ण म्हणतो,

नको ग मला खोरी भरून दूध
आहे माझी शेलकी गवळण

अशाच रीतीने दही, लोणी इ. बोलून श्रीकृष्ण हट्ट सोडीनासा झाला; तेव्हा गौळणी म्हणतात–

घ्या घ्या मेल्याच्या घोलाची घोलकाठी
उपटा मेल्याच्या माथ्यावरची शेंडी
तिथून गोविंदा निघून गेला साळिया आळी
तुला म्हणं मी साळिया मैतरा
मला पाहिजे काळी चंद्रकला
तुला गोविंदा काय करायची चंद्रकला
मला जायचं हाय चंद्रावलीचे महाली

शिंपी आळी गेला. मदनाची चोळी घेतली. तिथून सोनार आळी गेला. नथ, पुतळ्या घेतल्या. कासार आळीतून बांगड्या घेतल्या. असा सर्व साज-शृंगार चढवून चंद्रावलीच्या बहिणीच्या रूपाने श्रीकृष्ण चंद्रावलीच्या महाली आला. तिला पाहून चंद्रावली म्हणते,

आली ग माझी देवकाई बहिणुली
ये ग बहिणी तुझी पाऊला धुऊ दे
पाय धुताना पाय धुतले पुरुषाचे
तिथं चंद्रावली मनी काय इरांगली
ये ग बहिणी आपण दोघी पाणी घेऊ
माझ्या नवऱ्याने मला खुणानी नेसविली

जेवताना पुरुषाचा घास दिसला. पान खाताना चुना आंगठ्याने लावला गेला. तिथं चंद्रावली वरमली.

बोलता चालता रात निघून गेली
मधान अमलामधी भोग देऊनी गेला

सकाळी चंद्रावली पानीयाशी गेली
'चंद्रावली बाय तुझा नूर का ग कोमेला'
आला होता गोकुळचा गोविंदा
देऊनीया भोग निघूनीया गेला

अशीच कृष्णालीला पुढील गीतातही दिसून येते.

चांद सूर्याचा ववसा गौरीचा
राख 'झांजू' माझीया गाई ग
गायी राखीन 'येसू' नवल काय ग
तुझा मला भोगल काय ग
ववशाची पाच सुपा देन चांद-सूर्या
सहावा सुप झांजू तुला रं
सहावा सुप येसू काय ग कराया
आम्हा घरी व्हावी भारजा ग
गायीच्या वासरा हरणाच्या पाडसा
'भारजा' म्हणतो कवनाला रं
भात खाया देन 'जिरसाल' ग
दूध खाया देन बहुला गाय ग
आंब्याच्या बनी हुकलील्या गाया
चल झांजू नाच पहायाला रं
तुझा येसू नाच परोपरी
भुलविशी गवळ्याच्या बाळा
गवळ्याचं बाळ माझं पाठीचं बंधु
भुलवीन मी झांजू होईन
होईन येसू सुंदरा !

येसू तुम्ही न्हावा वा जावा
मी जातो माळवा देशाला
"केळ जशी वाढू, जाय जशी फुलू
लिंबू आला रंगारोपा
झांजू का जाता माळवा देशाला"
साता अस्तुरीशी लंपट होशी
माझी येसूची याद इसरशी
आंब्याच्या बनी आठूरपना
तशी पुरुषाची कठूर मना
केळीच्या बनी नागवेली पाना
तशी नारीची हळुवारु मना
झांजू का जाता माळवा देशाला

अशी ही प्रेमाची द्वंद्वगीते चतुराईने भावना प्रगट करणारी दिसून येतात. हरिजन महिलाही सणा-सुदीला कल्पना विलास गीतारूपाने प्रगट करताना दिसतात.

अनुक्रम :—

१. सौ. शोभा देवर्षी

२. डॉ. सरोजिनी बाबर

३. सौ. कुमुदिनी पवार

४. सौ. सुलोचना देशमुख

५. श्रीमती जानकीबाई पाटील

६. सौ. वत्सला मोरे

७. प्रा. सुमन पाटील

८. श्री. डी. ए. खरात

९. श्रीमती सिंधुताई अंबिके

१०. श्रीमती नलिनीबाई शिंदे

११. श्री. तुकाराम पाटील

१२. सौ. विमल बाबर

१३. श्री. सा. मा. पाटील

१४. सौ. सिंधू जगन्नाथ नेवाडकर

१५. कु. विद्या देसाई

१६. सौ. शांताबाई उमराणी

# गौराइची गाणी

---

संग्राहिका : सौ. शोभा देवर्षी

(१)

गुंज गुंज डोळे
अंगणामधी खेळे
अंगणीच्या ग नारीनं
शिवाशीव केली
शिवाशीव केली ग
नगरीभाईर गेली
नगरीच्या नारीनं ग
पंचारती केली
आरती घालू सये
पिरती ग घालू
किती घालू सोनं
आमच्या ग गौराईला
जोडण्याचं लेणं....

(हे गाणे याच रीतीने साखळ्या, पैंजण, पुतळ्या, मोहनमाळ, टिक्का पाटल्या, मासूळ्या, झुबे, कंगण्या इ. दागिने गुंफून होईपर्यंत लांबते.)

(२)

फुलाची गवर माडीवर ग माडीवर
चांगुणा गेली पाण्याला ग पाण्याला

गिरजा बसली न्हायाला ग न्हायाला
पायातलं पैंजण काय ग केलं
बाई मी दिलं ग जोगव्याला ग जोगव्याला

(हे गीत याच रीतीने सर्व दागिने असे गुंफून होईपर्यंत लांबत जाते.)

(३)

सोनियाच्या पावलानं
गवर आली माहेरा
रानंमाळं हिंडली ग
भाजीभाकर जेवली

( हे गीत या रीतीने दहीभात, वडीभाकरी, पुरणपोळी, श्रीखंड पुरी इ. पदार्थ गुंफून होईपर्यंत म्हटले जाते.)

(४)

गणोबा आला आला
गवर का ग नाही
साखळ्या लेती लेती
पाठीमागनं येती
साखळ्या घडविणारा
सोनार ग कोणचा
माझ्या ग म्हायाराचा
वाटं गुजरीच्या
पाटील ग युवाई
सोनार जावाई

(हे गीत याच रीतीने सर्व दागिने गंफून होईतो असेच लांबत जाते.)

(५)

झाड झुपूका
फुलं मी टपूका
शोभेला ग दोघी
धू धू ग पायरी
त्यात मी वयरी
शोभेला ग दोघी
दऊत लेखणी
सर्वांपरास मी देखणी
शोभेला ग दोघी
धू धू ग कळशी
त्यात मी आळशी
शोभेला ग दोघी
धू धू ग घंगाळ
त्यात मी वंगाळ
शोभेला ग दोघी
फुलं मी टपू का ग
झाड झुपूका
शोभेला ग दोघी

(६)

पंढरपुरामंदी काचेचा बंगला
रूक्मिणी सजली ग विठू कुठं गेला

इथं होता इथं होता गेला मंदिरात
माझ्या जोडव्याला शोभा सये राघुरंगात

(या गीतात सगळे रंग याच रीतीने गुंफीत हे गाणे लांबत जाते.)

(७)

अळू म्हणं अळू
पन्हाळी अळू
पन्हाळी गावच्या टिपऱ्या खेळू
खेळता खेळता खाऊचं पाणी
खाऊच्या पानाला ग काजळकुंकू
काजळकुंकू बाई लेवू का नको
सोन्यारवाड्या सये जाऊ का नको
सोनारदादा सोनारीनबाई
बाळाच्या बिंदल्या झाल्या का हो नाही

(हे गीत लहान मुलाची सर्व बाळलेणी गूंफून होईपर्यंत याच रीतीने म्हणतात.)

*संग्राहिका :* **डॉ. सरोजिनी बाबर**

(१)

(न्हवणाला जाताना म्हणावयाचे गीत)

रानामागली तुळस
पानाफुलांनी फुलली
साखळ्याच्या भारूंभार
गौराय कशी ग लवली
कराड कोलापूरच्या गौराय
निघाल्या म्हायारी
पैंजणाचा त्येंच्या नाद
सये येतूया दुहेरी

(हे गीत याच रीतीने सर्व दागिने गुंफून होईतो लांबत जाते.)

(२)

(गौरी येत असता म्हणावयाचे गीत)

घेतली ग सुपारी
घेतली ग करकुली
राई गेली खेळायाला केळीच्या बनी
तितनं गोइंदा निघाला
घेतला त्येनं ईटीदांडू

गेला बापा जवळी
बाप माजा तूं हूशील
बाप माजा तूं हूशील
राईनं धरला म्हवनीपवा
तितनं बापजी निघाला
गेला गवळ वाड्याला
गवळ्याचे राई गवळ्याचे राई
दे ग किष्णाचा म्हवनी पवा
मामुजी मामुजी तुमी का आला
ज्येचा त्येला धाडून द्यावा
तुमचा पवा घेऊन जावा
गौराय पावनी येतीया गावा

(हे गीत याच रीतीने सर्व नातलग गुंफून होईतो तसेच लांबत रहाते.)

(३)

सरीला सरावन भादवा आनंदाचा
अशा पाठमोरी मुराळी सुकाचा
पाऊस पडला चिखुल झाला
वहात आली गंगा
पेरीला मका धान्य लाल तूरी
गौराय पावनीला वाडा भाजी भाकरी

(४)

गौराय पावनी
ये ग दोन रातरा

पाची परकाराची भाजी
करते जेवायाला
दूध पोळी खा ग शेवाया बोटवं
वाढा जेवायला
शंकर जावायाला

(५)

( झिम्याचे गीत )

नदीच्या पल्याड हाई बंगला ग
पाणी झुळझुळ जाई
वाण्याच्या पोरी तुमी ठिणग्या ग
जशी फुलली जाई
नेसली पैठणी साडी ग
पदर वाऱ्यानं जाई
हातात रूमाल खिडकीचा ग
राम उडवीत जाई

( हे गीत सर्व जातीच्या मुली एकत्र येईतो असेच लांबते. )

(६)

झिम्मा घालू झिम्मा
झिम्म्यायाच्या राती
सासू बाळाई कुठं गेली
तिच्यासाठी तर भिंगरी केली
त्या बाई भिंगरीचा तुटला तातू
मेल्या गोप्यानं केला काय घातू

मेल्या गोप्याचं मी काय केलं
माझं हिंगाचं पोतं त्येनं न्हेलं

(या गीतात सर्व धान्याची पोती अशीच गुंफतात व नंतर अखेरी साधली जाते ती अशी–)

माझं हिंगाचं पोतं सये धरू धरू
भिंगरीचा तातू वाजं कुरू कुरू
रत्नागिरीचा आला सोनार
त्येनं घडवीला काटं काटं मणी
झिम्मा खेळताना घुळूघुळू वाजं
फुगडी खेळताना घुळूघुळू वाजं
माझ्या अंगणी रंगाचं रंगपाणी
गौरीबाळ खेळं पाण्याच्या चरणी
हे ग वाळं सये कुणाच्या बाळाचं
शिवराय सोन्याचं बत्तीस तोळ्याचं

(हे गीत याच रीतीने सर्व बाळलेणी गुंफीत असेच पुढे लांबत रहाते.)

(७)

सूर्व्या आगाशी गेला गंगनी
जींव माजा चक्रपाणी
म्या ग पापिणीनं आळस केला
हरी माजा कुठं गेला
जेवू वाढीलं मी न्हाई त्येला
सांगा ग सांगा नंदाला

बाळा न्ह्यारीची येळ न्हाई झाली
तुला खेळायाची घाई कशी झाली
दळव्याचे लाडू आळवी नानापरी
नंद हिंडीतो ग वाटा सये चारी
चारी वाटा की चारी पेटा
वाढीते दहीभात जेव तू निचिंता
चंद्र डुलतो खोलीला
मी ग पाहते चंद्राला
दादा आल्याती निय्याला
रजा द्यावी जायाला
न्हाई मी रजा दियाची
केळी बनं लावायची
केळी बनं मी तोडीन
भैना काढुनी नेईन
भैना घेऊनी जाईन
चल चल भैना झडझडी
शाळू दिवस कानेली
कशी मी चालू दादाजी
पायात पैंजण जाडजी
काढून ठेवजा हिन्नाचं
घालीन घडवीन चांदीचं

(८)

पिंगा

पोरी पिंगा ग पोरी पिंगा
तुज्या पिंग्यानं मला भुलीवलं
दिस घालीवलं पोरी पिंगा
पोरी पिंगा ग पोरी पिंगा
तुज्या पिंग्यानं केली मात ग
जागीवली सये सारी रात ग
पोरी पिंगा ग पोरी पिंगा

(९)

गवरी ग बाई जागरान तुजं
जागता जागता पडल्या झापाडी
एवढ्या निजंची पिरत केवढी
सोन्याच्या चौकटी गवरी बाळातनी
नारळीच्या गोण्या झोकील्या अंगणी
सुपारीच्या गोण्या झोकील्या अंगणी
तांद्ळाच्या गोण्या झोकील्या अंगणी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
हळदीच्या गोण्या झोकील्या अंगणी
खारकीच्या गोण्या झोकील्या अंगणी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी

(१०)

भाद्रपद सुद्देवो चातुरतीला
गण आनीला गो पुंजनाला
गनोबाबा आले गो आनंदले
भाद्रपद सुद्देवो चातुरतीला

(११)

आठशे खिडक्या नऊशे दार
कोण्या दरिवाजानं गेली गो नार
मंगळसुत घालुन झाली तयार गो
कोण्या दरिवाजानं गेली गो नार
येला घालुन झाली तयार गो
कोण्या दरिवाजानं गेली गो नार

(सर्व दागिने या परीने गोवून होईपर्यंत हे गाणे चालते.)

(१२)

ताड गौरी ताडाला लागली
शंकूरबाची वाट गिरजा पाहूं बा लागली
सोड सोड शंकर आमुचा पालव
आमाला जाऊं द्या माहेरी
गौरी जाऊं द्या माहेरी
जातील तशा बा जाऊं द्या
काय काय लेनं लेवूनी येतील्या
येतील तशा बा येऊं द्या

आणीन साखळ्याचं जोड
माझं माहेर दुबळं
आणीन पुतळ्याची माळ
माझं माहेर दुबळं

(१३)

वेळुबाई वेळु बाई पन्हाळी वेळू
पन्हाळी वेळूच्या टिपऱ्या किती खेळू
पन्हाळी वेळु नव्हे काचे पान
काचे पान बरवे रान
बरवे रान कशाचे
बरवे रान तुळशीचे
तुळस गुंफा जाळी लंका
आला आला रावण जाळी लंका
जाळी जळो काजळ पडो
ते बाई काजळ आम्ही दोघी लावू
गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली
मंडप घातला इस्लामपुरी
भोजन केलं सोलापुरी
उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली
पानसुपारी उद्या दुपारी

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

(१)

सोनू गवरी दोगी जावा कि बाईजी
गेल्या दोगी पाण्यायाला कि बाईजी
बाई त्या पाण्यायाच्या वाटं कि बाईजी
एक वन वलांडिलं कि बाईजी
दोन वनं वलांडिली कि बाईजी
तिसऱ्या वनायाच्या वाटं कि बाईजी
तितं नमानाचा तांडा कि बाईजी
अग गौराय बोलती झाली कि बाईजी
अग सोनू माजे जाऊ कि बाईजी
नगं जाऊ तांड्यामंदी कि बाईजी
तिनं पोषाक काडिला कि बाईजी
तितं सोटका खेळू लागली कि बाईजी
गौराय तितनं उठली तरी कि बाईजी
गेली यमुना नदीयिला कि बाईजी
तितं घागर भरीयिली कि बाईजी
घेतली गुडग्यामांड्यावरी कि बाईजी
घेतली डोई शिरावरी कि बाईजी
आली घरी निगूयिनी कि बाईजी

सासरा बोलता झाला तरी कि बाईजी
सोनुबाई कुठं हाई कि बाईजी
तूं आलीस निगूयिनी कि बाईजी
सून तुमची सोनू गेली नमानाच्या तांड्या कि बाईजी
सासरा तितनं उठयिला कि बाईजी
गेला नमानाच्या तांड्या कि बाईजी
त्येनं पोषाक उतरून ठेवला कि बाईजी
तितं सोटका खेळू लागला कि बाईजी
सोनूला घरला लावून दिली कि बाईजी
सोनू घरला आली कि बाईजी

(२)

तुजं ग पैंजान मला ग साजं
साजता सोबता पाहू
राधेच्या वाड्याला जाऊ
तुज्या ग साकळ्या मला ग साजं
साजता सोबता पाहू
राधेच्या वाड्याला जाऊ
तुजी ग जोडवी मला ग साजं
साजता सोबता पाहू
राधेच्या वाड्यात जाऊ
तुजा ग दाब मला ग साजं
साजता सोबता पाहू
तुज्या ग पुतळ्या मला ग साजं

साजता सोंबता पाहू
राधेच्या वाड्याला जाऊ

(या रीतीने या गाण्यात अनेक दागिने असेच गुंफतात.)

राधेच्या वाड्या जाईन ग
एकच पायरी चढीन ग
तितंच घुंबरनी पवा ग

(अशा रीतीने चार पायऱ्या चढून मग पुढीलप्रमाणे हे गीत म्हणतात.)

गेला राधेच्या घरी ग
तितंच घुंबरनी पवा ग
गोइंदा तितंच गुतला ग
राधा बोलती ग झाली
भैन असलीस तर मला हरवायची न्हाईस
मला भेटायची न्हाईस
भैनीसंगं भेटला ग
अग न्हाई माजे भैनी
गोइंदा असचील तर
मंदी कट्यार खूजी
गोइंदा गेला पलंगावरी
मंदी कट्यार खीळा
तितंच घुंबरनी पवा ग
गोइंदा तितंच गुतला

(३)

चुटूक तोंडे चुटूक तोंडे
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला
चुटूकं वाळं चुटूकं वाळं
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला
चुटूकं कडी चुटूकं कडी
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला
चुटक्या साकळ्या चुटक्या साकळ्या
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला
चुटूकी पेटी चुटूकी पेटी
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला
चुटूकं डूल चुटूकं डूल
माज्या ग बाजीरावाला
हंजीराचं फूल माज्या दालगिरीला

(४)

बोलीव बोलीव ग पाटल्याच्या पोरी
तुज्या पदरानं घाण केली सगळी
घागर घे चुंबळ घे
चालली सांगड सुईवार ग

बोलीव बोलीव ग वाण्याच्या पोरी
तुज्या सौद्याने घाण केली सगळी
घागर घे चुंबळ घे
चालली सांगड सुईवार ग
बोलीव बोलीव ग कुंभाराच्या पोरी
तुज्या गाडग्यानं घाण केली सगळी
घागर घे चुंबळ घे
चालली सांगड सुईवार ग
बोलीव बोलीव ग बामण्याच्या पोरी
तुज्या सवळ्यानं घाण केली सगळी
घागर घे चुंबळ घे
चालली सांगड सुईवार ग
बोलीव बोलीव ग मांगाच्या पोरी
तुज्या कासऱ्यानं घाण केली सगळी
चालली सांगड सुईवर ग

(५)

हितं बसा तितं बसा गणू माज्या बाळा
मी तर जाते मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा सोनारनीबाई
माज्या गणूनं गणूनं घेतीलाया छंद
मागीतो मागीतो तोड्यायाचा जोड
हितं बसा तितं बसा गणू माझ्या बाळा

मी तर जाते मी तर जाते सुताराच्या वाड्या
सुतारदादा सुतारदादा सुतारनीबाई
माज्या गणूनं गणूनं घेतलाय छंद
मागीतो मागीतो चवरंग जोड
ह्तिं बसा तितं बसा गणू माझ्या बाळा
मी तर जाते मी तर जाते शिंपीयाच्या वाड्या
शिंपीदादा शिंपीदादा शिंपीयीनी बाई
माज्या गणूनं गणूनं घेतलाय छंद
मागीतो मागीतो किनकाफ बंद

(६)

सिताच्या हाती फुलाचा गजरा
रामाच्या हाती बाण
धाडू नको वनी राम कैकयी
राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न
पुढं चालले हनुमान
धाडू नको वनी राम कैकयी
सिता निघाली वनवासाला
म्होरं लागलं अशुकवन
धाडू नको वनी राम कैकेयी
तुकारामानी गौळण गायिली
अग तुळशीचं पान
धाडू नको वनी राम कैकेयी

(७)

किष्णाचं धोतर बाई पारव्या रंगाचं
धुयाला टाकीलं ग परटाच्या दारी
वाळूजी घातीलं जय मोरावरी
घडी ही द्या तिली गजा पाटावरी
किष्णाचा सदरा बाई बगळ्या रंगाचा
धुयाला टाकला ग परटाच्या घरी
वाळणी घातली जय मोरावरी
घडी ही घातली गजा पाटावरी
किष्णाचं उपरणं बाई पिवळ्या रंगाचं
धुयाला टाकीलं ग परटाच्या घरी
वाळूजी जातीलं जय मोरावरी
घडी ही घातीली गजा पाटावरी
किष्णाची टोपी बाई गुलाबी रंगाची
धुयाला टाकीली ग परटाच्या घरी
वाळूजी घातीली जय मोरावरी
घडी ही घातीली गजा पाटावरी

(वेगवेगळे कपडे याच रीतीने रंग बदलीत गुंफून हे गीत म्हणतात.)

४

*संग्राहिका :* सौ. सुलोचना देशमुख

न्हाली धुली गौराय न्हाली धुली गौराय
जाऊन चौरंगी बैसली ग जू जू
गौराईचं चांगुलपन ग जू जू
बाळ्या बुगड्यांनी लवलं कान ग जू जू
कापाला सोडवानं ग जू जू
कापं घेतील इकात ग जू जू
नाकी सरज्याची नथ ग जू जू
त्याही नथीला आरली ग जू जू
चितंगाखाली सरी ग जू जू
सरीला पडला पिळा ग जू जू
दंडी कुसरीच्या येळा ग जू जू
हातात सईच्या ग्वाट ग जू जू
आंगड्यानं भरली बोटं ग जू जू
पायी तोडं साजती ग जू जू
वर पैंजन वाजती ग जू जू

५

*संग्राहिका : श्रीमती जानकीबाई पाटील*

ौराईचे कान उघडताना भानुर वाजवून म्हणावयाची गीते –

(१)

गवरीबाई गवरीबाई
आता कधी येशील ग
पाऊस पडूंदे गंगा भरूंदे
भाद्व्यात येईन ग
भोपळीच्या फुलावैनं
तालुक्यात जाईन ग

(२)

भोवर कडीपाट
त्येला कानोकानी गुंजा
राई उघड दरवाजा
पति आला तुजा
गवळी आला तुजा
इतकींदी इतकींदी कुठंजी क्रमिलं
क्रमीलं क्रमीलं जाईच्या देशाला
पिवळी कापडं कशानं झाली
तुम्हावरी गौराई सवत आणीली

आणुनी आणुनी कुठं जी ठेविली
ठेविली ठेविली खारकी बनात
बोलवा बोलवा गावाचं सुतार
पाडावं पाडावं सवतीवरी ऊन

(३)

गवर मनाची ग मनाची
कन्या थोराची ग थोराची
सांगून धाडीते ग धाडीते
पंढरपुराशी ग पुराशी
तिथला सोनार ग सोनार
काय काय घडवीतो घडवीतो
पैंजण घडवीतो ग घडवीतो
पायी चढवीतो ग चढवीतो

(४)

आला भादवा महिना
गवर लेकीला आणा
आली गवराई घरात
सडा रांगोळी दारात
झाला आनंद गगनात
वाजवा भानूर जोसात
आली गौराई आंगणी
दोन दिसांची पावणी
इंद्र राजाची म्हेवनी

शंकूबाची कांता
गजाननाची माता
हिमगिरी तिचा पिता
वट्या भरा जाता-जाता
दहिभात देती हाता

(५)

सोड माळ्या बैल
पाटाच्या पाण्याला
पाटाच्या पाण्याला
हे पाणी कशाला
खारकी बनाला
ह्या खारकी कशाला
यील गौराय पावणी
लागतील तिच्या ववशाला

(हे गीत नारळ, केळी, नागवेली इ. ववशाचं सगळं सामान गुंफीत असेच्च म्हणतात.)

(६)

बंधु गेल्याती कराड बंगली
येतील का नाय वं ?
येतील का नाय वं ?
साकळ्यांचा जोड मला
आणतील का नाय वं ?

साकळ्याचा जोड लेतीया कोण ?
सुराचं मोती घेतीया कोण
सुराचं मोती लालू-लाल
जुंद्ळा पेरूला मालू-माल
जुंद्ळा उगवंल का नाय वं ?
बंदु गेल्यात कराड बंगली
गौराय यील का नाय वं ?

(७)

तळ्याच्याया काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिशी वारूळाला जातो
वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा तू माझा पदर
सांग सांग तुझ्या जोडव्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेनं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

तळ्याच्या काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिवशी वारूळाला जातो
वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा तू माझा पदर
सांग सांग तुझ्या मासूळ्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेनं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

तळीयाच्या काठी मोर पाणी पितो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिवशी वारूळाला जातो
वारूळाचा नाग धरी माझा पदर
सोड सोड नागा माझा पदर
सांग सांग तुझ्या करंगळ्याचं मोलं
काय सांगू दादा चुटक्याचं लेनं
त्याचं मोल केलं देवा विठ्ठलानं

( या प्रकारे सर्व दागिने सांगून होईपर्यंत हे गाणे चालते. )

---

संग्राहिका : सौ. वत्सला मोरे

(१)

ऊठ ऊठ माळी दादा बैलं जूप-हाटाला
बैलं जूप-हाटाला रे पाणी जाऊ दे पाटाला
पाणी जाऊदे पाटाला रे खारकीच्या देठाला
ह्या खारका कशाला
गौराईच्या ववशाला
गौराईचा वसा ग फुलांनी डळमळी
फुलानं डळमळी ग उदानं परमळी

(२)

आगाडा हाराटी ग पाण्यानं तुंबली
आमची गौराई ग हितं का बसली
हितं का बसली साखळ्या लिवू बसली
साखळ्या लिवू ( घालून ) बाई सासऱ्याला ( सासरी ) जाई
सासऱ्याच्या वाटं सोनार कळीचा
माझ्या म्हायारीच्या वाक्या गुजरीचा

(३)

ये ग गौराई येत्याली हुती
आंब्याच्या बनी गुतली हुती
आंब्याचं आंबं तोडीत हुती
गणेश बाळाला खेळवित हुती
गणेश बाळाचं काय लेणं
अंगी टोपडं पिवळं वाण

(४)

गवर आली शेतापाशी गवर आली शेतापाशी
शेतवाल्या विचारतो का ग गौराई एकली का ग गौराई एकली
मी का हुईन एकली मी का हुईन एकली
पुढं गणेश बाळ हाय मागं शंकर भ्रतार
गवर आली वेशीपाशी गवर आली वेशीपाशी
वेशवाल्या विचारतो का ग गौराई एकली का ग गौराई एकली
मी का हुईन एकली एकली

पुढं गणेश बाळ हाय मागं शंकर भ्रतार
गवर आली घरापाशी गवर आली घरापाशी
घरवाल्या विचारतो का ग गौराई एकली का ग गौराई एकली
मी का हुईन एकली मी वंश हुईन
पुढं गणेश बाळ हाय मागं शंकर भ्रतार

(५)

ताड गवरी ताडाशी बाई ताडाशी
सोड शंकर सोड शंकर आमचा पदर बाई आमचा पदर
आमाला जाऊ दे म्हायेरी बाई जाऊ दे म्हायेरी
माहेरीच्या परी काय काय आणशी
गवरी काय काय आणशी
आणीन म्हणते आणीन म्हणते जोडव्याचा जोड
तिथं गणेश बाळ त्येला वागऱ्याचा चाळ
माझं माहेर दुबळं बाई माहेर दुबळं

(६)

तांबडं जुंधळं ग खैर मुसळ
दारात वतीलं ग गणू आला आवचीत
गणोबा आला गवराई का ग न्हाई
साखळ्या लीती (लेवून घालून) मागाहून येती
साखळ्या घडविणारा सोनार कोणचा
माझ्या माहेरीच्या ग वाक्या गुजरीचा ग

(७)

गवरीच्या सणाला बंधू आल्यात बोलवायला
धाकल्या दाजीनो जाऊ काय जी म्हायेराला
न्हाई मी लावून देणार केळीची बाग लावणार
एक रात-न्हाईन केळीची बाग लावीन
केळीची बाग भयानाला काढून न्हेयीन
चल ग बाहिना झुळझुळी शाळू रान कानडी

(८)

हालता आंबा झुलती चिंच
फुलला मोगरा जाय ग
माय म्हणती लाडक लेकी
एवढं लिवून जाय ग
आता कवा लेवू बाई
शंकर नगरी सोडून जाय ग
शंकर साळा राजा भोळा
नगरामंदी न्हाय ग
नगरा भवती निशाण ग
दिवा जळी पाय ( पहा ) ग
दिवा न्हवं दिवटी ग
कापूस घाला वाती
गवराय आली पावणी
खेळू साऱ्या राती

## महालक्ष्मी

*संग्राहिका : प्रा. सुमन पाटील*

(१)

शंकर इचारितो गिरजा कुटं गेली
बापाची लाडकी ग माह्याराला गेली
धाडावी पालकी ग आणावी लाडकी
धाडली पालकी ग आणिली लाडकी
आणिली लाडकी ग उतरिली अंगणी
उतरिली अंगणी ग देखिली चांदणी

( आई, भाऊ, वहिनी अशी माहेरच्या नात्यातली नावे घालून हे गाणे याच रीतीने पुढे म्हणतात. )

(२)

सोड सोड शंकर आमुचा पालव
आमाला जाऊंदे माह्यारी
माह्यारीच्या काय काय परी आणशी गवरी
आणीन आणिन जोडव्याचा जोड माजं माह्यार दुबळं

( पैंजण, साखळ्या, बुगड्या, मासोळ्या अशी दागिन्यांची नावे घालून हे गाणे म्हणतात. )

(३)

अंगणी तापतं दूध
दूधा पिवळी शाई
लेकी गवरी बाई
एवढं जिऊनी जाई
नको नको आई उशीर झाला
दारी शंकर येऊनी गेला
जोडव्या लायला उशीर झाला

(४)

ढवळं पवळं नंदी
दोन मोटंचं पाणी
लिंबू पिकलं दोनी
पिकलं पिकलं तोडितो
हिरवं हिरवं राखितो
बाई मी माळीण शेराची
वाट चुकली नगराची

(५)

तुजी छकडी माझी छकडी
माज्या संगं छकडी घाल ग तू
माझ्या वाड्याला चल ग तू
गवराई खेळून जा ग तू

(६)

सालम सलकी तुझी माझी पालकी
पालखीत बसू पाताळ नेसू
चल ग रंगू बनात ग
चाफ्याचं फूल माज्या कानात ग

(७)

काळी कुळकुळी मांजरी
दारी क्रिस्नाताचा खेळ
आणि बाई खेळत खेळत
झाली मध्यान रातरा
राही कवाड उघड
न्हाई मी कवाड उघडायची
तुमच्या अंगावरचा शेला
कुण्या वालंबीला दिला
न्हाई मी वालंबिला दिला
बाळपणीचा मैतर
त्येच्या लगनाला दिला

(८)

अग अग फुलाई माळणी
माझ्या मळ्याला येशील
शेलक्या भेंड्या तोडशील
राखून राखून ठेवशील
बाळतपणाला खाशील

माळी ग तुजा भोळा
सबंमंदी गेला
नगराच्या नारीनं
संसार कस्सा केला

(९)

ऊठ ऊठ माळी दादा
बैलं झुप म्हाटाला
बैलं झुप म्हाटाला
पानी जाऊंदे पाटाला
पानी जाऊंदे पाटाला
नारळीच्या देटाला
नारळीची पाच पानं
गवराईच्या ववशाला
गवराईचा ववसा ग
फुलानी डळमळी
फुलानी डळमळी ग
उदानं परमळी

(सुपारी, खारीक अशी फळांची नावे गूंफून हे गीत असेच पुढे म्हणतात.)

(१०)

आमचा गणेस नखेरदार
त्येच्या रथाला चक्रं चार
एका चाकाला ऐंशी मोती
त्यावर नक्शा काढू किती

राज ग तळ्यावरी
गवराई धुणं धुती
माज्या ग पाटल्यावरी
सूर्व्या चमकिती
चमक चमक साडीवरी
हिरवा रंग माडीवरी

(११)

आली आली गवराई पावणी
आली तर येऊंदे
भाजी भाकरी खाऊंदे
रातंच्या रात न्हाऊंदे
ठेवा ऊन पाणी
गवर माझी न्हाऊंदे
मखमली चोळी घालूं दे
पिवळा पितांबर
गवर माझी नेसूंदे
आंब्यायाच्या बागंत
गवर माझी खेळूंदे
फुलायाच्या बागंत
गवर माझी झोपूंदे

(१२)

ऊठ ऊठ वैनी गुंफली माळ
मी तर जाते सोनार वाड्या

पायाच्या जोडव्या मोलवितो
मोलवितो मोलवितो गौरीला साज देतो
साज माजा सोन्याचा
गणा माझा मोत्याचा
तळ्याच्या काठाला ग मोर पाणी पितो
गौराई नेसली पिवळा पितांबर
नेसूनी नेसूनी ग जाई वारूळाला
तितल्या नागानं ग धरलं पदराला
मोत्याचा कंठा गणेश बाळाला

(१३)

गणोबा गणपती उद्या जाशील आजोळी
आजा तुला मांडीवर घेईल
चंदनाचा पाट तुला बसायला देईल
हातातली अंगठी तुला घालाया देईल
गणोबा गणपती ...

(दागिन्यांची नावे गूंफून हे गाणे याच रीतीने पुढे म्हणतात.)

८

संग्राहक : श्री. डी. ए. खरात

गवराय गवराय येतच होती
नारळाच्या बागेत जातच होती
नारळाचे नारळ तोडत होती
सयांच्या ओट्या भरत होती
सयीला वाटे लावत होती

सुपारीच्या बागेत जातच होती
सुपारिच्या सुपाऱ्या तोडत होती
सईच्या ओट्या भरत होती
सईला वाटे लावत होती

खारकांच्या बागेत जातच होती
खारकिच्या खारका तोडत होती
सयांच्या ओट्या भरत होती
सयांना वाटे लावत होती

मोसंबीच्या बागेत जातच होती
मोसंबीच्या मोसंब्या तोडत होती
सयांच्या ओट्या भरत होती
सयांना वाटे लावत होती

डाळिंबीच्या बागेत जातच होती
डाळिंबीची डाळिंबे तोडत होती

सयांच्या ओट्या भरत होती
सयांना वाटे लावत होती

अशा प्रकारे इतर अनेक फळांच्या झाडांची नावे घेवून हे गीत आणखीन वाढविता येते.

९

*संग्राहिका : श्रीमती सिंधुताई अंबिके*

(१)

(गौरीपूजनासाठी पुरुष मंडळी पुढील गीत म्हणतात व गोलावर नाचतात.)

कंबर खोडकी हातात विला रं
कंबर खोडकी हातात विला रं
विला कशाला रं बांबू तोडायला
बांबू कशाला रं बांबू कशाला
बांबू कशाला सुपल्या विनाया रं
सुपल्या कशाला रं सुपल्या कशाला
कुकू घोलाया रं कुकू घोलाया रं
कुकू कशाला रं कुकू कशाला
कुकू कशाला गौराय पुंजाया रं
कुकू कशाला गौराय पुंजाया रं

(२)

साते खनातळी बादली उपर माडी ग
ततं गवराय भारावरी उभी ग
ततं गवराय भारावरी उभी ग
गवराय कोनाची वाट पहाते ग
गवराय कोनाची वाट पहाते ग
तुजा भाव त बाजाराला होता ग
फुळा विचून साडीला साटव ग
येच वाट येईल तुजा भाऊ ग
येच वाट येईल तुजा भाऊ ग

## गौराईच मागणं

संग्राहिका : श्रीमती नलिनीबाई शिंदे

काय काय पाहिजे गौराबाई
जेवढं देईल तेवढं थोडं
जिन्या सहित पाच घोडी
काय काय पाहिजे गौराबाई
जेवढं देईल तेवढं थोडं
दाव्या सकट पाच म्हशी
शान काढायाला दासी
काय काय पाहिजे गौराबाई
जेवढं देईल तेवढं थोडं

दाव्या सकट पाच गाई
धार काढाया चरवी न्हाई
काय काय पाहिजे गौराबाई
जेवढं देईल तेवढं थोडं
अंबारी सकट पाच हत्ती
हत्ती महालाची दारं मोठी
ऊस मळा पानमळा गावा भाईर आंबराई
आणी काय पाहिजे गौराई
चोळी पातळाची घडी वर धोतराची जोडी
काय पाहिजे गौराबाई
माझं माहेर बळकट
पुढं गणेश बाळ मागं शंकर भरतार

११

संग्राहक : श्री. तुकाराम पाटील

गौराई माझी बहिणी कधी येशील ग
पाऊस आला चिखल झाला
यीन भादव्यात इन भादव्यात
खाऊ जेवू राहीन मी वस्तीला
भोपळीच्या पानातून जाईन तालुक्यात
सये जाईन तालुक्यात
पाऊस आला चिखल झाला वाहात होत्या गंगा

बाई वाहात होत्या गंगा
पेरिले ग आठरा दाणे मक्याला आला तुरा
बाई मक्याला आला तुरा
भाजी नी भाकरी गौराई बहिणीला
बाई गौराई बहिणीला
शेवयाचे ताट केले शंकर मेहुण्याला
बाई शंकर मेहुण्याला

## १२

*संग्राहिका :* सौ. विमल बाबर

(१)

ये ग गवरीबाई येवढं जेवूनी जाई
आता करू काय बाई शंकराला
साकळ्या त्याला उशीर झाला
साकळ्यासाठी वंजेला गेला
वंजेची कारली झेलत आला

(२)

देवळामागली तुळस
पाना फुलांनी फुलली
आमच्या गावच्या मारूतीला नवसानं वाहिली
(याप्रमाणे प्रत्येक देवाचे नाव घ्यावे व गाणे लांववावे)

(३)

बेटाच्या झाडावर चढलो ग सई चढलो
तिथनं खाली पडलो ग सई पडलो
माझ्या पट्ट्या मोडल्या ग सई मोडल्या
खालच्या आळीचा सोनार बोलवा ग सई बोलवा
माझ्या पट्ट्या घडवा ग सई घडवा
माझ्या पायात चढवा ग सई चढवा

(४)

चुट्टक चांदणे चुट्टक चांदणे
कुठ गं तू राहायची
पंजान मी लियाची
ढगात मी राह्याची

(याप्रमाणे सर्व दागिन्यांची नावे घ्यावीत व गाणे लांबवावे)

(५)

पावना आला दारी
कुण्या या देशाचा
बाई कुण्या या मुलकाचा
हाती रूमाल खिडक्याचा
बारीक बारीक भिंगाचा
बाई पिवळ्या रंगाचा

(६)

एवढी काय ?
भिंत
भिंतीवर काय ?
ताट
ताटात काय ?
करंड
करंड्यात काय ?
कुंकू
कुंकूवात काय ?
म्यान
मेणात काय ?
दांडा
दांडा मी हालवितो
शंकर मी डुलवितो

(७)

आमच्या अंगणी केळीचं रंगपाणी
कृष्ण खेळीतो पाण्यात चेरवणी
या बिंदल्या कुणाच्या बाळाच्या
सरी सोन्याच्या बत्तीस तोळ्याच्या

(८)

सूर्य उगवला ग
चंद्रभागेच्या कोंब्याला

मी पहाते चंद्राला
पदर माझ्या कमरेला
आई आली न्हिय्याला
रजा द्या मला जायाला
नाय मला रजा दियाची
लेकीला काढून न्हाय न्हियाची
पंचमीच्या सणाला बंधू आल्याती नियाला
रजा द्या मला जायला
नाय मला रजा दियाची
बहिणीला काढून न्हाय न्हियाची

(९)

आली गौराई धावोनी
एक रात्री राहूद्या
भाजी भाकरी खाऊं द्या
जोडव्याच्या नादी
गौराय माझी डुलूं द्या

(याप्रमाणे प्रत्येक दागिन्याची नावे घ्यावीत व गीत लांबवावे.)

(१०)

बाळ गेलं ऽ ऽ
करंड मोळीला ग मोळीला
सुताराच्या आळीला ग आळीला
सुताराच्या मुली तुम्ही चतुरानी
दहा वेण्या बांधल्या ग बांधल्या

(याप्रमाणे गल्ल्यांची नावे घालावीत व गीत लांबवावे.)

(११)

ऊठ ऊठ माळ्या बैल जूप
न्हाटाला रे न्हाटाला
पाणी जाऊं दे पाटाला रे पाटाला
एवढं पाणी कशाला रे कशाला
खारकीच्या रोपाला रे रोपाला
गौराईच्या वौशाला रे वौशाला

(याप्रमाणे निरनिराळ्या रोपांची नावे घ्यावीत व गीत लांबवावे.)

(१२)

मळ्याच्या वाटंवर कुंपान काठी
दोडकं लागल्यात देटा न् देटी
त्यावर झाकलाय शंकर शालू
अशी बाई माळीन नखऱ्याची ग नखऱ्याची
वाट चुकली इकल्याची ग इकल्याची

(याप्रमाणे सर्व भाज्यांची नावे घ्यावीत व गीत लांबवावे.)

(१३)

एवढा मोठा शेवगा
तुझ्या म्हशीनं खाल्ला शेवगा
तुझ्या सुनेनं फोडली घागर
ये ग सुने भांडायला
राळं देतो कांडायला

राळ्यात राळं मिसाळलं
म्हातारं घोडं पिसाळलं
म्हाताऱ्या घोड्याला जपू किती
पडक्या घरात लपू किती
पडकं घर जळून गेलं
म्हातारं घोडं पळून गेलं

(१४)

उपार माडीवरी ग उजेड आयीन्याचा
शंकर किती ग महिन्याचा
गौराय निघाली माहेरा
जुपली ग बैलं गाडीला
निघाला सासरवाडीला
वाटं ग मैनाचा वाडा
वाडा कुणाचा सांगा
देवक माझ्या हणमंताचा
वाडा सजनाचा वाडा सजनाचा
(याप्रमाणे सर्व देवांची नावे घ्यावीत व गीत लांबवावे.)

(१५)

काळ्या रानामधी कारल्याचा वेल
ततं उतरीला सयाप्पा सोनार
त्यानं घडवीलं पैंजनाचं ज्वाड
एका पैंजानाला साडेतीनशे मोती
राई रुक्मीणीचा पांडुरंग पती
(याप्रमाणे सर्व दागिन्यांची नावे घ्यावीत व गीत लांबवावे.)

(१६)

पोरी पिंगा ग पोरी पिंगा
तुझ्या पिंग्यानं मला बोलीवली
रात जागीवली पोरी पिंगा ग पिंगा
सायकलीवर बसल्याला भाऊ माझा ग
जावाय तुझा ग पोरी पिंगा
नथ घातलेली बहिण माझी ग
सून तुझी ग पोरी पिंगा
विमानात बसलेला भाऊ तुझा ग
जावाय माझा ग पोरी पिंगा
पट्ट्या घातलेली बहिण माझी ग
सून तुझी ग पोरी पिंगा

(१७)

घागर घुमूं दे घुमूं दे
रामा पवा वाजू दे
आला शक्रोबा शक्रोबा
गवर माझी लाजूं दे
मोरपंखी चोळी
गवर माझी घालूं दे
हिरवा बनात बनात
गवर माझी नाचूं दे
गवर माझी गवरी ग
झिम्मा फुगडी खेळू ग

(१८)

वेळू बाई वेळू पन्हाळी वेळू
पन्हाळीच्या टिपऱ्या खेळू
टिपऱ्या नव्हे काचे पान
काचे पान नव्हे बरवं रान
बरवं रान कशाचं
बरवं रान तुळशीचं
तुळस जाई लंकापुरी
मंडप घातला इस्लामपुरी
लगीन झालं सोलापुरी

१३

संग्राहक : श्री. सा. मा. पाटील

(१)

आथा आंबा तथा आंबा कैरी झोका खाय व
कैरी तुटनी खडक फुटना झुयझुय पानी व्हाय व
झुयझुय पानी व्हाय तठे रतन धोबी धोय व
रतन धोबी धोय तठे कसाना बजार व ?
माय माले तोडा ली ठेवजो ली ठेवजो
बंधूना हाते दी धाडजो दी धाडजो
बंधू मोठा सोनाना चौरंग गुफा मोतीना

(२)

आगासवर तीन चांदन्या सरती चांदनी निर्णय
आला वरना भाला तो भाला कोनी मारा व
भाला कोनी मारा ते साती दरजा खोला व
साती दरजा खोला ते बीचमे पलंग डाला व
बीचमे पलंग डाला ते शंकर राजा सोया व
शंकर राजा सोया ते गौरायी घाले वारा व

## १४

*संग्राहिका :* सौ. सिंधू जगन्नाथ नेवाडकर

(१)

चैत्र वैशाखाचं ऊन बाई वैशाखाचं ऊन
खडक तापुनी झाली लाल बाई तापुनी झाली लाल
गौराई आईच्या पायी आले फोड बाई पायी आले फोड
तिथं कशाचं झाड बाई कशाचं झाड
तिथं नारळाचं झाड बाई नारळाचं झाड
सावली पडली घम्माघोर बाई पडली घम्माघोर
तिथं काय गौराई रमली घटकाभर बाई रमली घटकाभर
चैत्र वैशाखाचं ऊन बाई वैशाखाचं ऊन
खडक तापुनी झाले लाल बाई तापुनी झाले लाल

गौराई आईच्या पायी आले फोड बाई पायी आले फोड
तिथं कशाचं झाड बाई कशाचं झाड
तिथं कणेराचं झाड बाई कणेराचं झाड
सावली पडली घम्माघोर बाई पडली घम्माघोर
तिथं काय गौराई रमली घटकाभर बाई रमली घटकाभर
चैत्र वैशाखाचं ऊन बाई वैशाखाचं ऊन
खडक तापुनी झाले लाल बाई तापुनी झाले लाल
गौराई आईच्या पायी आले फोड बाई पायी आले फोड
तिथं कशाचं झाड बाई कशाचं झाड
तिथं निंबाचं झाड बाई निंबाचं झाड
सावली पडली घम्माघोर बाई पडली घम्माघोर
चैत्र वैशाखाचं ऊन बाई वैशाखाचं ऊन
खडक तापुनी झाले लाल बाई तापुनी झाले लाल
गौराई आईच्या पायी आले फोड बाई पायी आले फोड
तिथं कशाचं झाड बाई कशाचं झाड
तिथं आंब्याचं झाड बाई आंब्याचं झाड
सावली पडली घम्माघोर बाई पडली घम्माघोर
तिथं काय गौराई रमली घटकाभर बाई रमली घटकाभर
चैत्र वैशाखाचं ऊन बाई वैशाखाचं ऊन

(२)

सासू सुनेचं भांडण व सैनाजी
सासू उठली तमक्यानं व सैनाजी
डोकी भाकरी बांधाया व सैनाजी
धरली रानाची वाट व सैनाजी

रानामधी साप मारीला व सैनाजी
सुनेला सांगती व सैनाजी
मी त माशी आणाले व सैनाजी
सासूनी भाजी केली व सैनाजी
सून जेवाला बसली व सैनाजी
सासूबाई पहिला घास कडू व सैनाजी
सासूबाई दुसरा घास कडू व सैनाजी
तुझा माहेरचा कोळी कडू मासे देऊन गेला सैनाजी
सासूबाई घेरीच आली ना व सैनाजी
तुझा माहेरचा तेली कडू तेल देऊनी गेलान व सैनाजी
गौराई मरूनी गेली व सैनाजी
सासू जाती कुंभाराच्या घरी व सैनाजी
रे कुंभारभाऊ गाडगं देना व सैनाजी
कुंभार म्हणे मावशी गाडगं कशाला व सैनाजी
माझी गौराई बाळंतीन व सैनाजी
सासू जाती कुंकारीच्या घरी व सैनाजी
रे कुंकारीभाऊ कुंकू दे व सैनाजी
कुंकारी म्हणे मावशी कुंकू कशाला व सैनाजी
माझी गौराई बाळंतीन व सैनाजी
सासू जाती वाणीच्या दुकानी व सैनाजी
रे वाणीभाऊ हळद देना व सैनाजी
वाणी म्हणे मावशी हळद कशाला व सैनाजी
माझी गौराई बाळंतीन व सैनाजी
सासू जाती कासारच्या दुकानी व सैनाजी
रे कासारभाऊ बांगड्या देना व सैनाजी

कासार म्हणे मावशी बांगड्या कशाला व सैनाजी
माझी गौराई बाळंतीन व सैनाजी
सासू जाती पेटंत व सैनाजी
लुगडे घेऊन आली व सैनाजी
गौराईला पुरूनी दिली व सैनाजी
रानातुनी लेक आला व सैनाजी
सर्व्या मूर्ती दिसतात व सैनाजी
एकच मूर्ती दिसत नाही व सैनाजी
सासू म्हणे गेली असेन माहेरी व सैनाजी
लेक रागात उठला व सैनाजी
धरीली गौराईच्या माहेरची वाट व सैनाजी
लेकाले सपन पडलं व सैनाजी
सपना मधी गौराई आली व सैनाजी
माले आपल्या घरात पुरेल व सैनाजी

(३)

ढवळा नी पिवळा नंदी खुळखूळ वाजे
गौराई चालली सासरी काय काय मागे
गौराई चालली सासरी सासरी तोडे मागे
तोडे किती भार किती भार गौराई नार
तोडे पाच भार पाच भार गौराई नार
ढवळा नी पिवळा नंदी खुळखूळ वाजे
गौराई चालली सासरी काय काय मागे
गौराई चालली सासरी पाटल्या मागे
पाटल्या किती भार किती भार गौराई मागे

पाटल्या पाच भार पाच भार गौराई नार
ढवळा नी पिवळा नंदी खुळखूळ वाजे
गौराई चालली सासरी काय काय मागे
गौराई चालली सासरी बांगड्या मागे
बांगड्या किती भार किती भार गौराई नार
बांगड्या पाच भार पाच भार गौराई नार

(४)

दोनी ननंद भावजाया न् बायजा
गेल्या गवऱ्या येचायले न् बायजा
गवऱ्या वेचूनी भरल्या पाट्या न् बायजा
तिथं काय लमान्याचा घोडा न् बायजा
त्याचा काय मखमली धोतरजोडा न् बायजा
त्याच्या अंगात रेशीम सदरा न् बायजा
त्याच्या खिशात बटवा न् बायजा
त्याच्या तोंडामध्ये पानाचा विडा न् बायजा
तो बोले तर गुजराथी बोले न् बायजा
चाले तर मुखानी चाले न् बायजा
गौराई म्हणे मी याच्यासंगं जाते न् बायजा
गौराई निघून गेली न् बायजा
भाऊ विचारतो भावजाईला न् बायजा
म्हणे माझे गौराई कुठे न् बायजा
भावजाई म्हणे गेली असेन लमान्याच्या संगे न बायजा
भावला क्रोद चढिला न् बायजा
गेला डोंगरा चढूनी न् बायजा

आला पर्वत उतरून न् बायजा
गौराई दारात उभी न् बायजा
भाऊ म्हणे बहिण मला पाणी तरी पाज न् बायजा
भाऊ सुराचं काढिला न् बायजा
गौराईच्या पोटात घातीला न् बायजा
गौराई मरून गेली न् बायजा

(५)

साती कुंड्यावरी कुंड्यावरी नागीण पसरली
तिथं माझी गौराई काय काय विसरली
तिथं माझी गौराई तोडे विसरली
तोड्याचा जोड तुझ्यापाशी माझी गौराई सासरवाशी
साती कुंड्यावरी कुंड्यावरी नागीण पसरली
तिथं माझी गौराई काय काय विसरली
तिथं माझी गौराई पाटल्या विसरली
पाटल्याचा जोड तुझ्यापाशी माझी गौराई सासरवाशी
साती कुंड्यावरी कुंड्यावरी नागीण पसरली
तिथं माझी गौराई काय काय विसरली
तिथं माझी गौराई बांगड्या विसरली
बांगड्याचा जोड तुझ्यापाशी माझी गौराई सासरवाशी
साती कुंड्यावरी कुंड्यावरी नागीण पसरली
तिथं माझी गौराई काय काय विसरली
तिथं माझी गौराई कुड्या विसरली
कुडीचं जोड तुझ्यापाशी माझी गौराई सासरवाशी
साती कुंड्यावरी कुंड्यावरी नागीण पसरली ....

(६)

वाटंवर निळ्या नी पिव्या झाडे व माय
निळ्या नी पिव्या झाडे
गौराई निघनी खेवाले
गौराई निघनी खेवाले व माय निघनी खेवाले
खत खेवत झाली आर्धी रात्र व माय झाली आर्धी रात्र
दिरजी आले बोलाव्याला व माय दिरजी आले बोलाव्याला
सासुजी बोले धर तू माहेरनी वाट व माय
माहेरनी वाटंवर निळ्या नी पिव्या झाडे व माय
निळ्या नी पिव्या झाडे
माय माय दारज उघाड व माय दारज उघाड
येवढ्या रात्री कोण व आलं व आलं
माझी गौराई लाडी व माय माझी गौराई लाडी
वाटंवर निळ्या नी पिव्या झाड व माय
निळ्या नी पिव्या झाड ....

## महालक्ष्मी--गौरी

संग्राहिका : कु. विद्या देसाई

भादवा निघाला म्हणजे गौरी गणपती घरी येतात. त्यावेळी घरातील कोनाड्याला मखर बांधून गणपतीची स्थापना होते. आणखी गणपतीच्या

तिसऱ्या चौथ्या दिवशी गौरी आल्यानंतर तिला चांगल्या आसनावर बसवितात.

ही गौरी म्हणजे गणपतीची आई–महालक्ष्मी. घरच्या लेकीच्या रूपाने ती घरी–माहेरी येते.

नदीवर जाऊन पांच खडे आणून कोणी ही गौरी बसवितात, तर कोणी वाटीवर काजळी आणून किंवा मातीच्या बाडग्यावर हळदीकुंकवाने नाक डोळे काढून ही गौरी बसवतात. तिला लुगडं चोळी नेसवतात. सर्व अलंकार घाल-तात. तिच्यापुढे आरास करतात. पांची पक्वानांची ताटे भरून ठेवतात. तीन दिवस ही माहेरी रहाते.

देशावर न्हवणे भरून, फुलापानांनी सजविलेला तांब्या घेऊन व लाह्यांचे भरलेले झोळणे घेऊन मुलीबाळी नदीवरून किंवा विहिरीवरून गौरीला आण-तात. घरी त्यांना ओवाळण्यात येते. त्यांच्या पायांवर गरम पाणी ओतून त्यांना हळदकुंकू लावले जाते. दारापासून गौरीच्या आसनापर्यंत हळदकुंकवाची पावले काढतात.

कोकणात गौरीला मोती (नथ) लागतोच लागतो. घाटल्याचे जेवणही लागते व तिसऱ्या दिवशी थाटामाटांत तिला निरोपही दिला जातो.

देशावर पुरणपोळीचे जेवण महालक्ष्मीला करतात व हळदकुंकूही थाटाने होते.

रात्रीच्या वेळी ही गौरी जागविण्याची देशावर खेडोपाडी चाल आहे. त्यासाठी नागपंचमीप्रमाणे आळीतील मुलीबाळी व बायका एकत्र येऊन खूप खेळ खेळतात व गाणीही म्हणतात.

घरातील परात किंवा काथवट घेऊन ती पालथी घालावयाची व नंतर त्यावर वस्त्रगाळ राख पसरून हाती लाटणे व रवी घ्यावयाची. नंतर ही दोन्ही धारण केलेले हात आगे मागे असे त्यावरून ओढावयाचे. म्हणजे फारच सुंदर पार्श्वसंगीत तयार होते. त्या नादावर व सुरावटीवर रात्रभर ही गौर जागते व पहाटेस––

'हम रस्ता पाय पुस्ता
देवाला निघाले पांच वाजता'

या बोलण्याने आपले खेळ बायका संपवितात. हे खेळ खेळतांना कोणाला वयाचे भान राहत नाही व काळाचेहि बंधन उरत नाही. म्हणून खेड्या-पाड्यांतून हा सण व ही पूजा फार मोलाची व मानाची मानली जाते.

(१)

अंगणीं तापतं दूध
दूधा पिवळी शाई
ये ग गवरी बाई
एवढं जिवूनी जाई
आता काय करू बाई माता ग
दारी शंकर उभा ग
शंकर साळा राजा भोळा
नगरीं मोडुन जाय ग
नगराला लागलं निशाण ग
कापूराची वात ग
दिवा जळी दिवाटी
कापूर जळी आरती
गौरायसारखी पावणी
खेळू साऱ्या राती

(२)

गवरी ग बाई जागरान तुजं
जागता जागता पडल्या झापाडी

एवढ्या निजंची पिरत केवढी
सोन्याच्या चौकटी गवरी बाळातनी
नारळीच्या गोण्या झोकील्या अंगनी
सुपारीच्या गोण्या झोकील्या अंगनी
तांदळाच्या गोण्या झोकील्या अंगनी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
हळदीच्या गोण्या झोकील्या अंगनी
खारकीच्या गोण्या झोकील्या अंगनी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी

(३)

भाद्रपद सुद्देवो चातुरतीला
गण आनीला गो पुंजनाला
गनोबा आले गो आनंदले
भाद्रपद सुद्देवो चतुरतीला

(४)

आठशे खिडक्या नऊशे दार
कोण्या दरिवाजानं गेली गो नार
मंगळसुत घालुन झाली तयार गो
कोण्या दरिवाजानं गेली गो नार
येला घालुन झाली तयार गो
कोण्या दरिवाजानं गेली गो नार

(सर्व दागिने या परीने गोवून होईपर्यंत हे गाणे चालते.)

(५)

ताड गौरी ताडाला लागली
शंकूरबाची वाट गिरजा पाहूं बा लागली
सोड सोड शंकर आमुचा पालव
आमाला जाऊं द्या माहेरी
गौरी जाऊं द्या माहेरी
जातील तशा बा जाऊं द्या
काय काय लेनं लेवूनी येतील्या
येतील तशा बा येऊं द्या
आणीन साखळ्याचं जोड
माझं माहेर दुबळं
आणीन पुतळ्याची माळ
माझं माहेर दुबळं

(६)

ये ग गवरी बाई
ये ग गवरीबाई
आली आली गवराय येतच होती
आंब्याच्या बनी गुंतली होती
आंब्याच्या बनी वरुटा पाटा
आली बाई गवराय हळदकुंकू वाटा

(७)

वेळु बाई वेळु पन्हाळी वेळु
पन्हाळी वेळूच्या टिपऱ्या किती खेळू

पन्हाळी वेळु नव्हे काचे पान
काचे पान बरवे रान
बरवे रान कशाचे
बरवे रान तुळशीचे
तुळस गुंफा जाळी लंका
आला आला रावण जाळी लंका
जाळी जळो काजळ पडो
ते बाई काजळ आम्ही दोघी लावू
गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली
मंडप घातला इस्लामपुरी
भोजन केलं सोलापुरी
उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली
पानसुपारी उद्या दुपारी

(८)

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू
चार लिंबू झेलू बाई पांच लिंबू झेलू
पांची लिंबाचा पानोळा
माळ घाली हनुमंता
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागं लपली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हं यमुना जमुना

यमुनाजमुनाची बारीक वाळू
तिथं खेळे चिलार बाळू
चिलार बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीनं दूध पाजलं
पाटावरच्या घडीवर निजवलं
नीज रे नीज रे चिलार बाळा
मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा
गौरीचे मोती झाले का नाही
गौरीच्या घरी तांब्याच्या चुली
भोजन झालं आवळीखाली
उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली
शेणगोळा आंब्याखाली
पानसुपारी उद्या दुपारी

या गाण्याचा उत्तरार्ध याशिवाय कुणीकुणी असाही म्हणतात :—

गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली
मांडव घातला मखमखपुरी
लगीन लागलं सूर्यातळी
उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली
टाळ्या पोळ्या पुरणाच्या पोळ्या
गौराई जाते सासरी
जाईल तशी जाऊं द्या
खीर पोळी खाऊं द्या
आमची गौराई येऊं द्या

(९)

सोन्यानी सुतई न् पानी काढे कोन्ता
शंकर हरी व माय
केसर दंदनी
पानी काढे शंकर हरी न्
तठे मनी गौराई न्हायनी न्
केसर दंदनी
तठे मनी गौराई न्हायनी न्
पिवया पितांबर नेसनी व माय
केसर दंदनी
पिवया पितांबर नेसनी न्
अंगी काचोई घातली व माय
केसर दंदनी
अंगी काचोई घातली न्
कपाळी कुंकवाची चिरी व माय
केसर दंदनी
कंपाळी कुंकवाची चिरी न्
भांग गुलालाचा भरी व माय
केसर दंदनी
भांग गुलालाचा भरी न्
डोळी काजळ झीरीमिरी व माय
केसर दंदनी
डोळी काजळ झीरीमिरी न्
हाती चंदनाची छडी व माय
केसर दंदनी

हातीं चंदनाची छडी न्
गौराईचं माहेर फुलझडी व माय
केसर दंदनी
गौराईचं माहेर फुलझडी न्
तठला सुतार नांदे भारी व माय
केसर दंदनी
तठला सुतार नांदे भारी न्
त्याना घर रंगीत पायना व माय
केसर दंदनी
त्याले रेशीमन्या दोऱ्या न्
त्याना मा मसूरनी गादी व माय
केसर दंदनी
त्याना मा मसुरनी गादी न्
त्याना मा निजना शंकर हरी व माय
केसर दंदनी
त्याना मा निजना शंकर हरी न्
झोके दियी गौराई नारी व माय
केसर दंदनी

(१०)

पार्वती म्हणे गंगे तू पाटकरणी
तू अखंड होतिस विष्णूच्या चरणी
भुलविले शिवाला कशी केलीस करणी
राहिलीस मस्तकी मजला चोरोनी

तू अमंगळ ग सवती
तुज नाही मूळ कुळ जाती
नरनारि तुझ्यामधे न्हाती
मी आद्य शक्ति आदिमाया अर्धांगा
घर निंघे जारिणी किती दंगा
दोघी सवति भांडती पति भागटभुंगा
आपसात वर्म बोलती गौरी आणि गंगा

गंगा म्हणे पार्वती तू दूर हो परती
ऐकिल्या मुळापासून तुझ्या कीर्ति
का असि अगोचर तू रुसलीस शिवावरती
भिल्लिणीचा वेष तू धरिला अपकीर्ती
टाकिली उडी होमात
केला दक्षपित्याचा घात
काय झालीस उत्तम जात
मी असे मस्तकि तू अससी अर्धांगा
घर निंघे०
दोघि सवती०

पार्वती म्हणे गंगे तू ऐक आता
शंतनूसारिखा भ्रतार तुझा होता
तो सोडून आलीस शिवा पाहतां
मारिले सप्तपुत्रांस पोटि होता
मानिले न दुःख तुज होता
दगा दिलास भगीरथा
तुझा जगांत उघडा माथा

मी आद्य शक्ति आ०
घर निघे जा०
दोघींचा बोल समतोल ऐकुनी कानी
ऐकता स्मशानी शिव बसले ध्यानी
थोरांची गति ही काय असे करणी
या लागी न करिती दोन स्त्रिया ज्ञानी
अडल्यावर करणे लागे
असे चालत आले मागे
त्या प्रवृतीने जन वागे
आणि बोले हर हर शिवगंगा
आपसात वर्म०
दोघी सवति०

(११)

न्हाली धुली गौराय न्हाली धुली गौराय
जाऊन चौरंगी बैसली ग जु जू
गौराईचं चांगुलपण ग जु जू
बाळ्या बुगड्यांनी लवलं कान ग जु जू
कापला सोडवान ग जु जू
काप घेतील इकात ग जु जू
नाकी सरज्याची नथ ग जु जू
त्याही नथीला आरली जु जू
चितंगाखाली सरी ग जु जू
सरीला पडला पिळा ग जु जू
दंडी कुसरीच्या येळा ग जु जू

हातात सईच्या ग्वाट ग जु जू
आंगठ्यानं भरली बोटं ग जु जू
पायी तोडं साजती ग जु जू
वर पैंजन वाजती ग जु जू

(१२)

शंकर आवड तुला बेलाची बेलाची
अर्ध्या अंगी पार्वती जटेतून गंगा वहाती
मांडीवर शोभे गणपती आवड तुला बेलाची
हातामध्ये तिरसूळ डमरु वाजविता नाना छंद
आला काशीचा रहिवासी आवड तुला बेलाची
ढवळ्यानंदीवरी स्वार पुढे चाले गजभार
उटी लावून भस्माची आवड तुला बेलाची
बेलाची बेलाची माझ्या तूं भोळ्या शंकरा
आवड तुला बेलाची बेलाची

## फेराची गाणी

संग्राहिका : सौ. शांताबाई उमराणी

(१)

अग गवळ्याच्या नारींनो नको जाऊसा धुयाला
ठेवा पैंजन काढून या ग झाजात चढून

झाज फिरतं ग गरारा कृष्णा हासतो खदादा
अग गवळ्याच्या नारींनो नको जाऊसा धुयाया
ठेवा साकळ्या काढून या ग जहाजात चढून
जहाज फिरत गरारा नारी कापती थरारा
कृष्ण हासतो खदादा

अग गवळ्याच्या नारींनो नको जाऊसा धुयाला
ठेवा पाटल्या काढून या ग जहाजात चढून
जहाज फिरतं गरारा नारी कापती थरारा
कृष्ण हासतो खदादा

(सर्व दागिने असेच गुंफीत हे गाणे लांबते.)

(२)

काय गवरीच्या गवरीच्या महिन्यात
लागली गवर गवर फुलाईला
गेला बहिनाला बहिनाला आणाईला
आडवा आलाय आलाय नदीला पूर
पाच फुलांची फुलांची केली नाव
त्यात बसून बसून गेला बहिनाला आणाईला
आला बहिनाला घेऊनी
आडवा आला महापूर
पाच फुलांची केली नावू
त्यात बैसली बहिण भाऊ
आवलं हाकीतो कृष्ण देव
बंधु गुजर बोलाईतो

घाल ग बहिनाला बहिनाला दूधभात
भावज गुजर बोलाईत
त्या दुधाचं दुधाचं केलं दही
बंधुजी बोलतो घाल गे बहिनाला दही भात
भावज गुजर बोलाईती
त्या मी दह्याचं केलं ताक
घाल ग बहिनाला बहिनाला ताक भात
त्या ताकाची केली कडी
बंधु गुजर बोलईतो
घाल ग बहिनाला बहिनाला कडीभात
भावज गुजर बोलईती
त्या मी कडीचा केला नास
बहिना निघाली सासऱ्याला
बंधु गुजर विचारितो
आता बहिना कवा येणं
आता येईन येईन एकदीशी
तुझ्या आटूंदे आटूंदे गाय म्हशी

(३)

अंदान दे की रे भाऊराया
काय देऊ ग बहिना बाई
तुझ्या दारातला चाफा
हाट पुरीव माझ्या बापा
अंदान दे की रे भाऊराया
काय देऊ ग बहिना बाई

तुझ्या दारातील जाई
हाट पुरीव की माझ्या आई
अंदान दे की रे भाऊराया
काय देऊ ग बहिना बाई .
तुझ्या दारातील झेंडू
हाट पुरीव की माझ्या बंधु
अंदान दे की रे भाऊराया
काय देऊ ग बहिनाबाई
तुझ्या दारातील आईना
हाट पुरव माझ्या बहिना
सारं देऊनी झालं थोडं
गाडीसंगट पाच म्हैसी येवढं
देऊन झालं थोडं लेक देऊन पाया पडं

(४)

गाय भरुन गायचे डोळे
जसे लोण्याचे गोळे
  कृष्णा गाय उभी गाय उभी की महादारी
  पंढरपुरी की गाय भरारी
गाय भरून गायची शिंगं
जशी महादेवाची लिंगं
  कृष्णा गाय उभी गाय ऊभी की महादारी
  पंढरपुरी की गाय भरारी
गाय भरुन गायचे कान
जसं केतकीचं पान

कृष्णा गाय हुबी गाय हुबी की महादारी
पंढरपुरी की गाय भरारी

गाय भरून गायची पाठ
जशी कापसाची मोट

कृष्णा गाय उभी की महादारी
पंढरपुरी की गाय भरारी

गाय भरूनी गायची कास
धार काडीतो रामदास

कृष्णा गाय उभी की महादारी
पंढरपुरी की गाय भरारी

अनुक्रम :–

१. सौ. कुमुदिनी पवार

२. सौ. पार्वतीबाई किर्लोस्कर

३. सौ. शरदिनी मोहिते

४. सौ. निर्मला धारप

१

*संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार*

१. आज मला ऐतवार उद्या मला सोमवार
जोडवी झनकार विरूद्या कणखार
दारी होती मेख मी कदमांची लेक.

२. चिकी बाई चिकी परातभर चिकी
सारवल्या भिंती आम्ही देसायांच्या लेकी.

३. चुनाबाई चुना परातभर चुना
सारवल्या भिंती आम्ही पवारांच्या सुना.

४. पत्रीबाई पत्री रानोमाळ पत्री
जेजुरीच्या खंडोबाला सोन्याची छत्री.

५. लाही बाई लाही मक्याची लाही
मुक्यांनी फुगडी शोभत नाही.

६. तवा बाई तवा लोखंडी तवा
भारीच्या लग्नात बेंडबाजा लावा.

७. तुझ्या माझ्या घरात उदबत्त्यांचा वास
आपण दोघी मैत्रिणी फायनल पास.

८. सहाण बाई सहाण कुरंजी सहाण
मी पडले लहान पण तुला टाकीन गहाण.

९. गोण बाई गोण भाताचं गोण
तू मला गहाण टाकणारी आहेसच कोण ?

१०. लोणी बाई लोणी ताकावरलं लोणी
तुला गहाण टाकीन असं अग म्हटलंच कोणी ?

११. पावसाचं पाणी कौलात ग कौलात ग
देसायांच्या मुली तुम्ही डौलात ग.

२

*संग्राहिका : सौ. पार्वतीबाई किर्लोस्कर*

१. फुगडी फुलती दोघे बोलती
चौरीखालनं साप गेला चौरी हलती.

२. आलंगडीवर पलंगडी पलंगडीवर हार
आज माझी मंगळागौर बोलू नका फार.

३. काळा कासोटा भुई लोळतो
जेजुरीचा खंडोबा चक्र खेळतो.

४. समुद्रातली वाळू चाळणीने चाळू
आपण दोघी मैत्रिणी गंजीफानी खेळू.

५. हार बाई हार गुलाबाचा हार
अण्णांनी बायको केली नाजूक नार.

६. खारिक बाई खारीक साखरी खारीक
दादांनी बायको केली आपल्यापेक्षा बारीक.

७. चुना बाई चुना परातभर चुना
पोत पेट्या घालू आम्ही किर्लोस्करांच्या सुना.

८. चिपाड बाई चिपाड जोंधळ्याचे चिपाड
अण्णांनी बायको केली आपल्यापेक्षा धिप्पाड.

९. वरी बाई वरी डोंगरी वरी
आमच्या गौरीला सोन्याची सरी.

१०. आपट्याचं पान माझ्या झपाट्या खाली
काळ्यांच्या मुली माझ्या डाव्या हाताखाली.

११. तुझी माझी फुगडी बनात ग
हजाराची कुडी माझ्या कानात ग.

१२. फुगडी खेळू एकी नदीच्या टोकी
आला कोल्हा घेऊन गेला आठल्यांच्या लेकी.

१३. कौल बाई कौल ग काचेचा कौल
आमच्या विहीणबाईंना श्रीमंतीचा डौल.

३

---

*संग्राहिका : सौ. शरदिनी मोहिते*

**कोंबडा घालताना म्हणावयाचा उखाणा**

घोडा घोडा एकीचा एकीचा
पेठकरणी लेकीचा लेकीचा
अशी लेक गोरी गोरी
हळद लावा थोडी थोडी

हळदीचा उंडा उंडा
रेशमाचा गोंडा गोंडा
गोंड्यात होती काडी काडी
काडीत होता रुपाया रुपाया
भाऊ माझा शिपाया शिपाया
शिळ्या चुलीत चाफा चाफा
नाव ठेवा गोपा गोपा
गोपा गेला ताकाला
विंचू लावला नाकाला
विंचवाची झाली गुळवणी गुळवणी
त्यात माझी मिळवणी मिळवणी
मिळवणीचा रहाट ग रहाट ग
कोल्हापुरची पेठ ग पेठ ग
पेठेला लागल्या शेंगा शेंगा
अशी शेंग गोड ग गोड ग
जिभेला उठला फोड ग फोड ग
फोड काही फुटेना फुटेना
घरचा मामा उठेना उठेना
घरचा मामा खैस ग खैस ग
त्याने घेतली म्हैस ग म्हैस ग
म्हैस गेली चरायला चरायला
मामा गेला फिरायला फिरायला

### फुगडीचे उखाणे

१. अरंड्यावर करंडा करंड्यावर मोर
माझ्या संगं फुगडी खेळते चंद्राची कोर.

२. ओवा बाई ओवा रानोमाळ ओवा
माझ्यसंगं फुगडी खेळतो गणपतिबुवा.
३. आम्ही दोघी मैत्रिणी अट्टीच्या अट्टीच्या
साड्या नेसू पट्टीच्या पट्टीच्या.
४. खोल खोल विहिरीला उंच उंच चिरे
तुझी माझी फुगडी गर गर फिरे.
५. आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या जोडीच्या
हातात पाटल्या तोडीच्या तोडीच्या.
६. चहा बाई चहा गवती चहा
माया लेकींच्या फुगड्या पहा.
७. पहा तर पहा उठून जा
आमच्या फुगडीला जागा द्या.
८. अक्कण माती चिक्कण माती पाय घसरला
प्रेमाचा नवरा शेला आणायला विसरला.
९. तुझ्या घरी माझ्या घरी आहे बिंदली सरी
फुगडी खेळताना बाई नको तालीवारी.
१०. एवढासा पाटा बाई जिरामिरी वाटा
छोट्या सुधेचा ठमकारा मोठा.
११. आमच्या चुलीवर सांडगा सांडगा
लिलूचा नवरा लांडगा लांडगा.
१२. आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या जोडीच्या
वेण्या माळू फुलांच्या फुलांच्या.

४

संग्राहिका : सौ. निर्मला धारप

१. फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी
माझ्याशी फुगडी खेळते लेकुर वाळी.

२. लाही बाई लाही साळीची लाही
मुक्यानं फुगडी खेळणं शोभत नाही.

३. गणपतीच्या मागे उंदराची पिल्लं
सगुणा म्हणते तीच माझी मुलं.

४. पैंजण बाई पैंजण छुमछुम पैंजण
माझ्याशी फुगडी खेळते बूटबैंगण.

५. खार बाई खार लोणच्याचा खार
माझ्याशी फुगडी खेळते नाजुक नार.

६. आपण दोघी मैत्रिणी गळा घालू वेढा
गोड गोड बोलू आपण साखर पेढा.

७. बारा वाजले एक वाजले समोर पडली आहेत उष्टी
नवरा आणि बायको बसून करताहेत गोष्टी.

८. तुझी माझी फुगडी किलवर ग
संभाळ अपुले बिलवर ग.

९. आपण दोघी मैत्रिणी गळा घालू मिठी
गोड गोड बोलू आपण साखरपिठी.

१०. नमस्कार करते आशिर्वाद द्या
लहान आहे सासूबाई सांभाळून घ्या.

११. फुगडी फुलेदार भाऊ शिलेदार
नणंदा मोकाणी जावा कोल्हटिणी
हरबऱ्याचं घाटं माझ्या फुगडीला दाटं
फुगडी पापा तेलणी चाफा
सईची साडी राहिली घरी
बाप सोनारा नथ घडू दे
नथीचा जोड सवती बोल
सवत का बोलं ना
यील मेल्या सांगीन त्येला तुला ग मार दियाला
बकरं कापीन गावाला हरीख माज्या जीवाला.

अनुक्रम :–

१. कु. नीलिमा दाणी

२. श्री. पां. र. शिंदे

३. श्रीधर रा. भुऱ्के

# महालक्ष्मी

*लेखिका : कु. नीलिमा दाणी*

## कहाणी पहिली

आटपाट नगर होतं. तिथे एक राजा राज्य करीत होता. त्याला दोन राण्या होत्या. एक दिवस आवडती राजाला म्हणाली, "एक तर नावडती इथं राहील किंवा मी राहील." राजानं तिचं ऐकून नावडतीला राज्याच्या बाहेर घर बांधून दिलं. नावडती आपल्या लेकासह तिथे राहू लागली. राजा तिला रोज फक्त पायलीभर जोंधळे अन् तांब्याभर ताक पाठवीत असे. त्या गावात एक तळं होतं. सगळा गाव तिथंच पाणी भरे. राजाच्या काहारणीसुद्धा तिथूनच पाणी नेत. एकदा काय झालं की, भाद्रपदाचा महिना आला. तळ्या-वर एक दिवस दोन म्हाताऱ्या येऊन बसल्या. बायकांना विचारू लागल्या, "राजाच्या काहारणी कशा ओळखाव्या ?" बायका म्हणाल्या, "मोत्यांच्या चुंबळी व चांदीच्या घागरीवरून ओळखाव्या." थोड्या वेळाने काहारणी आल्या. म्हाताऱ्यांनी विचारलं, "तुम्ही कोणाच्या काहारणी?" "आम्ही आवडतीच्या!" तशा म्हाताऱ्या म्हाणाल्या, "तुमच्या राणीला जाऊन सांगा तिच्या मावश्या आल्या आहेत व तळ्याकाठी बसल्या आहेत." काहारणी वाड्यात गेल्या. राणीला सांगितल, तशी राणी म्हणाली, "माझ्या कोणी मावश्या नाहीत." काहारणी म्हणाल्या, "आपण एकदा त्यांना बघावं म्हणजे आपल्या लक्षात येईल." राणीनं त्यांना घेऊन येण्याचा हुकूम केला. म्हाताऱ्या आल्यावर राणीनं त्यांना एक सतरंजी घालून दिली. बसायला सांगितलं व आपण नुसतीच इकडून तिकडे मिरवत होती. आहारा वाट पाह्यली, पहारा वाट पाह्यली, म्हाताऱ्यांशी कोणीच बोलेना. एका म्हातारीला खोकला आला. तशी राणी वसकून धावली, "म्हातारे! बाहेर जाऊन थुंक. इथं घाण करू नको," म्हातारी बरं म्हणून बाहेर गेली. थोड्या वेळानं म्हाताऱ्या राणीला म्हणाल्या, "आम्ही जातो." राणीनं "बरं जा" म्हटलं. म्हाताऱ्या तिथून

उठल्या. पुन्हा तळ्यावर जाऊन बसल्या. दुसऱ्या दिवशी तिथे नावडतीची काहारीण आली. म्हातारीनं विचारलं, "कोणाची काहारीण ? नावडतीची?" "तुम्ही कोण?" "आम्ही तुझ्या राणीच्या मावश्या. राणीला जाऊन सांग" "काहारणी म्हणाली," बापा! इथं काऊन बसल्या ? चाला घरी. "राणी रागावेल तर ?" "तुमी भाचीला ओळखत नाही. कारण राणी कधीच रागवत नाही." काहारणी म्हाताऱ्यांना घेऊन नावडतीच्या घरी आली. मावश्या आल्या म्हणून आवाज दिला. राणी उठून बाहेर आली. म्हाताऱ्यांना मिठी मारली. प्रेमाचं माणूस मिळालं, खूप आनंद झाला. म्हाताऱ्यांना हातपाय धुवायला पाणी दिलं. गुळाचा खडा हातावर ठेवला. मग तेल लावून आंघोळी घातल्या. दमून आल्या म्हणून ताक घेता का विचारलं. ताक-कण्या रांधून जेऊ घातलं. म्हातारीनं विचारलं, "तू रोज हेच जेवतेस ?" राणीनं डोळ्यात पाणी आणून सर्व हकीकत सांगितली. म्हाताऱ्या म्हणाल्या, "उद्या सप्तमी आहे. उद्या महालक्ष्मीची पूजा कर, म्हणजे तुला पूर्व-वैभव प्राप्त होईल. राजा तुझ्या घरी येईल. तुला घेऊन जाईल." राणी म्हणाली, "माझ्या घरी काहीच नाही. मी काय स्वयंपाक करू ?" तसं म्हाताऱ्यांनी सांगितलं, "पडवळाची काथली कर. (ताक घालून कोशिंबीर) अन् ज़ोंधळ्याच्या कण्याची आंबिल कर. बाकी स्वयंपाकाच आम्ही बघू." राणीनं बरं म्हटलं. दुसऱ्या दिवशी म्हाताऱ्या सूचना देत होत्या तसं केलं. जेष्ठा-कनिष्ठा महालक्ष्म्या मांडल्या. त्यांची दोन मुलं मांडली. "गव्हाचं खीर कर" म्हाताऱ्या म्हणाल्या. तसा तिनं डबा उघडून पाह्यला. गहू पाहून चकीत झाली. गव्हाची खीर केली. दुसऱ्या दिवशी राजाला बोलावू धाडलं. राजा मागल्या पावली आला. पूजेची तयारी केलेलीच होती. सायसंगीत पूजा झाली. आंबिल व काथली आणायला घरात गेली. पहाते तो पंचपक्वाने तयार आहेत. सोळा भाज्या, सोळा चटण्या, फुलोऱ्यासाठी पात्या, करंज्या, अनारसे सगळं बघून चकीत झाली. शिरा, लाडू, अमृतफळाची आरतीही तयार होती. पण मावश्या कुठेच दिसेनात! तेव्हा मनोमन समजली. भक्तिभावानं हात जोडले. अमृतफळाची आरती स्वतः धरली. निरांजन राजाला दिलं. नैवेद्य झाला. बाहेर सनई ताशेरे झडू लागले. तो आवाज आवडतीला गेला. तसं तिनं दासोंना विचारलं, "आज नावडतीकडे

काय आहे?" दासींनी सगळी हकीकत सांगितली. नावडतीकडे महालक्ष्मीचा सण झाला. लोकांनी जाऊन प्रसाद घेतला. आवडती संतापली. हाळा पेटवून निखारे तयार केले. राजाराणीच्या अंगावर टाकायला निघाली. नावडतीच्या दारी आली, अन् हात धुण्याच्या पाण्यावरून घसरून पडली. निखारे विझले अन् हिचं तोंड डुकरणीचं झालं. कु... कु... करू लागली. लोकांनी हाकून लावलं. सर्वांची जेवणं उरकल्यावर नावडती जेवायला बसली. तशी आवडतीची आठवण झाली. बोलावू धाडलं तेव्हा सर्व हकीगत कळली. तिला वाईट वाटलं. महालक्ष्मीची करुणा भाकली. महालक्ष्म्यांनी स्वप्नात येऊन सांगितलं की, "उद्या आमच्या घरचे पोवते उतरव. समोर ठेव. काकडी-डाळीचा नैवेद्य दाखव व तो प्रसाद तिच्या अंगावर फेक. त्यानं चुकल्या-माकल्याला क्षमा मिळते." राणीनं तसं केलं. काकडी डाळीचा प्रसाद व पोवते आवडतीच्या अंगावर फेकताच ती पुन्हा पूर्वीसारखी झाली. नावडतीला कडकडून भेटली. पुढच्या वर्षी महालक्ष्म्या मांडायचं कबूल केलं. जशी महालक्ष्मी नावडतीला प्रसन्न झाली तशी ती तुम्हाला आम्हाला होवो. ही साठा उतराची कहाणी पाचा उतरी सुफल संपूर्ण.

## कहाणी दुसरी

राण्यांपैकी नावडती गावाबाहेर रहात असताना महालक्ष्मीचा सण येतो. आवडतीकडे जोरदार थाट होता. सोळा भाज्या, सोळा चटण्या, सोळा पक्वान्नांची ताटे भरली होती. सनई ताशेरे झडत होते. राणी ( नावडती ) मनात खिन्न झाली. तिनं विचार केला. आपली ही दशा देवाला ठाऊक आहे, ह्यातच होईल ते करावं म्हणून उठली. मडक्यांची उतरंड तयार केली त्याला आपली पातळं नेसवली. एक लहान मडकं घेऊन त्यावर गंधाने मुखवटा रेखला. ते मडकं सर्वांत वर मांडलं. कण्यांची आंबिल करून नैवेद्य दाखवला. मनोभावे नमस्कार केला. तेवढ्यात, "बाई बाई, दार उघडं" असा आवाज आला. दार उघडून बघते तो प्रत्यक्ष महालक्ष्म्या. त्यांना घरात आणलं. पटावर बसवलं. तो एक म्हातारी भिकारीण व तिची नात दृष्टीस पडली. नातीनं विचारलं, "आज तुझ्या घरी काय आहे ? तू आम्हाला घरात कसं घेतलंस ?

आम्ही भिकारणी आहोत." राणीनं पुन्हा निरखून पाह्यलं. पुन्हा महालक्ष्म्याच दिसल्या. असं तीन चार वेळा झालं. शेवटी मनाशी खूणगाठ बांधली. आंबिलीचा नैवद्य ह्या दोघींची पूजा करून ह्यांच्यासमोर ठेवला. हात जोडून बसली, डोळे उघडून बघते तो अंगावरचा फाटके जाऊन शालू दृष्टीस पडला. नवल करू लागली. घरात जाऊन पाह्यलं पूर्व वैभव प्राप्त झालेल दिसलं. तेवढ्यात "राजा येत आहे." वर्दी आली. खूप आनंदली. महालक्ष्मीचा प्रभाव मनोमन समजली.

इकडे काय झाल होतं? आदल्या दिवशी राणीला स्वप्न पडलं. महालक्ष्म्यांनी स्वप्नात सांगितलं की, उद्या तू नावडतीला बोलाव तरच आम्ही येऊ. ज्या घरात गृहलक्ष्मीला मान नाही तिथं आम्ही येणार नाही. राणीनं स्वप्न मनातच ठेवलं. दुसऱ्या दिवशी पूजेला बसली पण महालक्ष्मीच्या चेहऱ्यावरचे तेजच नाहीसे झाले होते. राजानं कारण विचारलं. राणीनं स्वप्नाची हकीकत सांगितली. राजा तडक नावडतीकडे आला. त्या महालक्ष्म्यांचं तेज पाहून चकीत झाला. पूजेची इच्छा व्यक्त केली. राणीसह पूजेला बसला. ही हकीकत आवडतीला कळली. नावडतीला नष्ट करण्याच्या हेतूने निखारे घेऊन राणीच्या मोकळ्या केसांवर टाकले. पण त्यांची फुलं झाली. आवडती विलक्षण ओशाळली. राजानं तिला गावाबाहेर हाकून देण्याचा हुकूम केला. पण नावडतीनं रदबदली केली. तेव्हा राजाचा राग मावळला. दोघींना घेऊन राजवाड्यात आला. दुसऱ्या वर्षी दोन्ही एकत्र मांडून पूजा करू लागला. ही साठा उत्तराची कहाणी पाचा ऊत्तरी सुफळ संपूर्ण.

( ज्यांच्या घरी नऊ महालक्ष्म्या असतात त्यांची ही कहाणी. दोन साध्या, दोन त्यांची मुलं. दोन मडक्याच्या, दोन त्यांची मुलं. अन् आठ मांडू नयेत म्हणून मध्ये एक गोपाळकृष्ण मांडतात. कहाणी पहिली खास देशस्तांची कहाणी. शिवाय कोकणस्थांची ( खड्याच्या महालक्ष्मीची अन् अष्टमीची.)

# महालक्ष्मीची करणी

निवेदक : श्री. पां. र. शिंदे

एक होता राजा. त्याला होत्या दोन राण्या. एक आवडती व दुसरी नाव-डती. आवडतीची खूप मजा होती. तिला रहायला सुंदर महाल, चाकरीला दासी-वटकी आणि खायला पाची पक्वान्नं. नावडती रहात होती एक खोपटात. ती फाटकं तुटकं नेसे, साधेसुधे खाई आणि दिवस कसेवसे ढकली. एकदा काय झालं, दरसालप्रमाणे महालक्ष्मींचा (गौरीचा) सण आला. घरोघरी महालक्ष्मी बसविल्या गेल्या. रोज गोडधोड होऊ लागले. आवडतीच्या महा-लात तर गौरी खूप थाटाने वसविल्या गेल्या. नावडतीला मात्र गौरी बसविता आल्या नाहीत. ती कशी काय बसविणार ? धड ना जागा, ना जवळ मूर्ति आणि पूजेचे साहित्य पण नाही. एक दिवस काय झालं, "आपली कोण कशी पूजा करतो, हे पहाण्यासाठी साक्षात महालक्ष्मीच म्हातारीचं रूप घेऊन आली. आली अशी आवडतीच्या महालापुढं उभी राहिली. म्हणाली, "बया ग, मला आसरा दे". राणीने ती म्हातारी पाहिली. वाकलेली, डोक्यात उवा पडलेली आणि हातापायाला जखमा होऊन सगळी रक्ताने भरलेली !

"दासींनो या थेरडीला हाकलून द्या" आवडतीने हुकूम दिला आणि स्वत: फणकाऱ्याने महालात निघून गेली. महालक्ष्मीला मोठा राग आला. तिनं आवडतीला शाप दिला, "गर्विष्ठे, तू डुकरीण होशील आणि नावडतीच्या उकिरडा..टारात लोळशील !"

मग महालक्ष्मी नावडतीच्या खोपटापुढं येऊन उभी राहिली. नावडतीनं आतून पाहिलं मात्र न् ती लगा लगा धावत आली. गहिवरून म्हणाली, "अग आई ग, अशी कशी दशा झाली ग तुझी ?" "मला कोण नाही ग ?" महालक्ष्मी म्हणाली. "आई मलाच तू आपली लेक मान." नावडती म्हणाली,

आणि त्या म्हातारीला तिनं खोपटात नेलं. न्हाऊ धुऊ घातलं. तिच्या जख
मांना तेल-मलम चोळला. नेटकं नेसायला दिलं. टोपल्यातील भाकरी खायल
दिली. म्हातारीला खूप बरं वाटलं. म्हातारीनं तिला आशीर्वाद दिल
म्हणाली, "सुखाने संसार करशील". म्हातारीनं दिलेला आशीर्वाद हिनं ऐकल
मात्र आणि तिच्या डोळ्यात टचकन पाणी आले. पण ती बोलली मा
काहीच नाही. तशी म्हातारीच म्हणाली, "अग माझे बाय, तू महालक्ष्म
बसविल्या नाहीत त्या ?"

"कशाच्या बसवू आई ?"

"अग तयारीला लाग."

"आई, माझ्याजवळ मूर्ती सुद्धा नाहीत."

"नसू देत ग ! गाडग्याची उतरंड उभी कर." म्हातारी नावडतील
म्हणाली.

फारच आग्रह केला म्हणून नावडतीनं दोन उतरंडी मांडल्या. त्यांना दो
पातळं नेसविली आणि मनोभावे पूजा केली. आणखी पहाते तो काय
गाडग्याच्या उतरंडीच्याच सुंदर मूर्ती झाल्या ! फाटक्या पातळांची जरीच
पातळं झाली ! आजुबाजूला पाहिलं तर खोपट कुठं राहिलं ? तिथं छान
महालच उभा राहिला होता ! दिव्यांचा तर सगळीकडे लखलखाट झालेल
नावडतीला काहीच समजेना. तिनं म्हातारीला विचारलं, "आई ग, हे क
झालं ग ?"

पण कोपऱ्यात पडलेल्या आईनं काहीच उत्तर दिलं नाही. नावडती
पाहिलं तर म्हातारी तिथं होतीच कुठं ? तिथं होती सोन्याची लाट ! "आई
आई !" नावडती हाका घालून म्हातारीचा इकडे तिकडे शोध करू लागल
सगळा महाल धुंडाळला पण आईचा कुठंच शोध लागेना. नावडतीला चुटपु
लागली. याला त्याला ती विचारू लागली "माझी आई भेटली का ? माझ
आई कुठं पाहिली का ?" पण तिला कोणीच काही सांगेना. मग ती घराबाहे
पडली. तशी शोध करीत हिंडत असताना तिला एक सुतार भेटला. ति

त्याला विचारलं तर तो म्हणाला, "माझ्या बाई, तुझी आई मला भेटली नाही, पण तुला भेटली तर माझं एक गाऱ्हाणं तिला सांग."

"कोणतं ?" नावडतीनं विचारलं.

"तिला म्हणावं, सुताराची माडी कळसाला जात नाही. त्यानं काय करावं?" "बरं" म्हणून नावडती पुढं गेली. पुढं भेटला एक तेली. त्याला नावडतीनं विचारलं, "तेली दादा ! माझी आई पाहिली का ?" "नाही ग बाय. पण तुला भेटली तर माझ कोडं तिच्या कानावर घाल." "कोणतं दादा ?" "माझं तेल विकत नाही." तेली म्हणाला. "बरं" म्हणून नावडती पुढं गेली. पुढं भेटली एक बाई. बाईला विचारलं तर बाईनंच म्हातारीला साकडं घालायचं सांगितलं. ती म्हणाली, "तुझ्या आईला म्हणावं बाईच्या गोवऱ्या विकत नाहीत. रचून ठेवाव्यात तर तिरडं उभं रहात नाही. काय करावं ?" "बरं" म्हणून नावडती पुढं गेली. खूप हिंडली. अखेर म्हातारीचा शोध लावला तेव्हाच ती थांबली. म्हातारी भेटताच नावडतीला कोण आनंद झाला. ती म्हणाली, "आई, माझ्यावर रुसून आलीस ?"

"नाही ग बाय."

"मग चल घरी."

"आता तुझ्या घरी कशाला ?" म्हातारी म्हणाली, "तुला जितकं द्यायचं तितकं दिलं. मी का एकाच घरी बसून राहू ?"

"असं नको करूस ग ?" नावडती रडू लागली.

"रडू नये लक्ष्मीनं," म्हातारीनं समजूत घालीत म्हटलं, "जा बाळ, घरी तुझा नवरा तुझी वाट पहात बसलाय !"

नावडतीचा नाईलाज झाला. तिनं म्हातारीचा निरोप घेतला. जाता जाता तिनं सुतार, तेली व गोवऱ्यातल्या बाईची हकिगत सांगितली. म्हातारीनं प्रत्येकाला एकेक निरोप दिला. नावडती निघाली. होता होता ती गोवऱ्या

विकणाऱ्या बाईच्या गावी आली. बाई म्हणाली, "भेटली का म्हातारी ?"

"भेटली."

"माझ्या बद्दल काय म्हणाली ?" बाईनं उत्सुकतेने विचारले.

"म्हणाली दुसऱ्याची गोवरी व दुसऱ्याचा विस्तू वापरण्याची सवय सो
दे म्हणजे तुझ्या गोवऱ्या विकतील, तिरडं उभं राहील." पुढं तेली भे
तेव्हा त्याला हिनं सांगितलं, "आई म्हणाली तू एकच माप खोबऱ्या
तेलात, करडीच्या तेलात आणि घासलेटात बुडवतोस ना? तसं करू नक
तुझं तेल विकेल." पुढं भेटला सुतार. तो वाट पहातच होता. नावडत
पहाताच तो धाईनं तिच्याजवळ आला तेव्हा नावडतीने आईचा त्याच्यास
दिलेला निरोप सांगितला. म्हणाली, "आईनं सांगितलं बहिणीला साडी चो
कर. तुझी माडी कळसाला जाईल," "पण बाय ! मला बहीण कुठाय !
होतेस?" "होईन बापडी." नावडती म्हणाली. सुताराने नावडतील
साडी चोळी केली आणि निरोप दिला.

नावडती पुन्हा नगरात आली. तिनं आवडतीच्या महालाकडं पाहिलं
तिथं सगळा अंधारच अंधार. ती घोटाळ्यात पडली. ती आपल्या महाला
निघाली तर महालाजवळच्या गटारात एक डुकरीण लोळत होती. आत जा
पहाते तर राजा तिची वाट पहातोय ! तिला खूप आनंद झाला. तिनं म
राजांना ओवाळलं आणि त्यांच्या पाया पडली. राजानं तिची माफी मागित
म्हणाला, "तूंच माझी खरी लक्ष्मी" "पण धाकटीचा एवढा राग का आला
"तिनं साक्षात देवीचा अपमान केलाय त्याचे फळ ती भोगतेय, भोगू देत.

"म्हणजे ?" नावडतीला काहीच कळले नाही.

"अग ती काय डुकरीण होऊन पडलीय !"

"नावडतीला खूप वाईट वाटलं. तिनं आईचा धावा केला. आईनं दृष्ट
दिला. म्हणाली, "तुझ्या डाव्या पायाच्या करंगळीवरचं पाणी तिच्या अं
वर शिपड" आणि महालक्ष्मी अदृश्य झाली. तिनं सांगितल्याप्रमाणे

केलं तेव्हा डुकरीण गेली आणि आवडती दिसू लागली. नावडतीनं तिला आत आणलं आणि पाठच्या वहिणीप्रमाणं तिचं सर्व काही केलं. राजाला खूप आनंद झाला. पुढं त्या सर्वांनी सुखानं दिवस घालविले.

## महालक्ष्मी

संग्राहक : श्री. श्रीधर रा. भुरके

एक राजा होता. त्याला दोन बायका होत्या. एक आवडती. दुसरी नावडती. आवडतीचे नाव होते पाटमाधवराणी व नावडतीचे नाव होते चिमादेवराणी. त्या राज्याला एक शत्रू होता. त्याचे नाव नंदनबनेश्वर. तो क्षणात उडे क्षणात बुडे. आताळी जाई पाताळी जाई. असा राजाच्या पाठीस लागला होता. त्यामुळे राजा फार वाळत चालला. एके दिवशी राजाने सर्व लोक बोलाविले. नंदनबनेश्वराला मारण्याची आज्ञा केली. सर्व लोक त्याला शोधू लागले. त्याच नगरात एक म्हातारीचा मुलगा होता. तो आईला म्हणाला, "आई आई, मला भाकरी दे. मी राजाच्या शत्रूला मारायला जातो." म्हातारी म्हणाली, "बाबा तू गरीबाचा पोर चार पावलं पुढं जा. ही वाळलेली भाकरी झाडाआड बसून खा." म्हातारीनं भाकरी दिली. म्हातारीचा पोर भाकरी घेवून निघाला. सगळ्यांच्या पुढं गेला. इतक्यात संध्याकाळ झाली. सर्व लोक घरी आले. नंदनबनेश्वर सापडला नाही. फार रात्र झाली. म्हातारीचा पोर तिथंच राहिला. पुढं मध्य रात्री काय झालं? नागकन्या देवकन्या तिथं आल्या. महालक्ष्मीचा वसा वसू लागल्या. पोरानं विचारलं, "बाई बाई, ह्यानं काय होतं?" त्यांनी सांगितलं, "पडलं झडलं सापडतं. मनी चिंतीलेलं कार्य होतं." इतकं ऐकल्यावर तोही त्यांच्या बरोबर वसा वसू

लागला. पूजा केली. घागरी फुंकल्या. पहाटेस उत्तरपूजा केली. जशी पहाटेस महालक्ष्मीमाय कोल्हापुरा जाती जागती झाली. तसा नागकन्या देवकन्यांनी आशिर्वाद मागितला. तसा ह्यानेही मागितला. तसा देवीनं दिला. म्हणाली, "राजाचा शत्रू मरेल आणि तुला अर्धं राज्य मिळेल. राजाचा वैरी उद्या राजाच्या अंगणात मरून पडेल." असं म्हणून देवी गुप्त झाली. म्हातारीचा पोर घरी आला.

दुसऱ्या दिवशी राणी सकाळी उठली. पहाते तो अंगणात वैरी मरून पडलेला ! ही गोष्ट तिनं राजाला सांगितली. राजाला आनंद झाला. राजानं चौकशी केली तेव्हा म्हातारीच्या पोरानं शत्रूला मारलं असं समजलं. त्यानं त्या पोराला बोलाविलं व कसं घडलं ते विचारलं. पोरानं सर्व हकीगत राजाला सांगितली व देवीच्या वरानं शत्रू मेला असं म्हणाला. राजानं पोराला अर्धं राज्य दिलं व तो आनंदानं राहू लागला.

ही वातमी राणीला समजली, तिनं पोराला बोलावून महालक्ष्मीचा वसा कसा कसा करावा हे विचारलं. तेव्हा त्यानं सांगितलं, "आश्विन मास येईल पहिली अष्टमी येईल. त्या दिवशी सोळा सुताच्या वाती तेल हळद लावून कराव्या. सोळा दुर्वा, सोळा तांदूळ घेवून तुळशीची पंचामृती पूजा करावी. मग धूपदीप करावा. नैवेद्य दाखवून चिंतन करावे. म्हणजे इच्छित गोष्ट साध्य होते. म्हणून हे व्रत करतात."

# यावे नाचत गौरी बाळा

ृहाचा मृदंग घुमवीत आणि तळहातांचे टाळ वाजवीत नेत्रांचे दिवे पाजळून ारती करताना श्री गजाननाचा सहवास साऱ्या घरादाराला कसा सुखा-माधानाचा वाटू लागतो. ध्यानी मनी उल्हासाचे मळे फुलू लागतात आणि ा देखण्या गौरी नंदनाच्या दर्शनानं तहानभूक जशी हरपून जाते. आयुष्यात पेक्षिलेल्या गोष्टींच्या फलप्राप्तीसाठी चिंतामणीच्या होतेल्या या महापूजेनं हभान उजळून निघतं. शब्द ब्रह्माच्या प्रतीकात्मक असलेल्या ओंकाराच्या र्शनानं काळीज हेलावून जातं आणि उमेद न्हाऊन उठते.

ओंकार म्हणजे सृष्टीचा आदिकंद. ईश्वराचं नादमय स्वरूप. चैतन्यशक्तीचा ाभा. स्वयंभू वाटावं असं विश्वदर्शन. त्यामुळं पार्वती पुत्राच्या या सहवा-ानं माणूस भारावून जातो. नव्या ईर्षेनं माखला जातो. म्हणून "मंगलमूर्ती ोरया" च्या जयघोषानं सारं त्रिभुवन जणु दणाणून जातं. या जयघोषाची ांदी घरोघरी घुमते. व्यासपीठावरून धीर गंभीर आवाजात उच्चारिली जाते ाणि कलाविलासातून सहभागी होत नादवून मोकळी होते.

साहीशास्त्रं आणि अठरा पुराणं ज्याच्यापासून निर्माण झाली त्या लंबोद-ाचा उदोउदो होतो. पंच पक्वान्नांचा नैवेद्य सामोरा जातो आणि हरतऱ्हेची काकती रंगीत कलाकुसर सारा आसमंत सजवून रंगलाल होते.

त्यामुळं आपल्या कर्तवगारीची वाहवा व्हावी म्हणून कोकणातील मंडळी भालचंद्राला हातात फुलांच्या माळा घेऊन तू आम्हाला नाचत नाचत मोरा ये म्हणून आळवतात. त्याला गौरीबाळ म्हणून हाकारतात आणि ानं आपल्यावर मंगल आशीर्वादाची शिपण करावी म्हणूनही त्याला मनो-ावे पूजताना दिसून येतात.

अशावेळी या चौदा विद्यांच्या निर्मात्याला नवलाख तारांगणाच्या आणि दाही दिशांच्या साक्षीनं आमंत्रित केलं जातं तेच मुळी चारी वेद हातात घेऊन ये म्हणून! त्यामुळं टिप्पूर चांदण्याच्या अंगणात सारं गाव गोळा करीत या महाभागाची कौतुकानं आळवणी केली जाते. त्याचवेळी नेत्रदीपक चंद्रकिरणांच्या प्रेमामृताचा त्यांच्यासह सर्वांवर अभिषेक होतो आणि अस्मान ठेंगणं होत असतानाच अखिल तारांगणासह चंद्रसूर्यही खाली अवतरत या चंद्रमेळ्यात सामील होतात!

अनुक्रम :—

# गणेशोत्सव

*निवेदन : कुमुदिनी रांगणेकर*

आपल्या अनेक देवांमध्ये गणपती हा एकच असा देव आहे की, जो आपल्या घरी दरवर्षी पाहुणा होऊन येतो. इतर देव घरी देव्हाऱ्यात किंवा बाहेर देवळात असतात. पण गणपती दीड दिवस, पाच, सात किंवा दहा दिवस आपला पाहुणचार घेऊन जातो.

लोकमान्य टिळकांनी सार्वजनिक गणेशोत्सव करण्याची पद्धत पाडली. सर्व चाळीचा किंवा सबंध वाडीचा मिळून एक गणपती आणावयाचा नि सर्वांनी मिळून त्याची बडदास्त राखावयाची. अशा उत्सवात विद्वान माणसांना व्याख्याने द्यायला बोलावतात. त्यामुळे आपल्याला अनेक गोष्टींची माहिती मिळते. आपल्या देशाची परिस्थिती आपल्याला कळून येते. देशाच्या—आपल्या मायभूमीच्या—हितासाठी आपण काय केले पाहिजे ते समजते.

गणपतीच्या जन्मासंबंधी पुराणात निरनिराळ्या कथा आढळतात. एकदा श्रीशंकराची बायको पार्वती अंग धूत बसली होती. तिथे कोणी येऊ नये म्हणून तिने आपल्या अंगाच्या मळापासून एक मूर्ती तयार केली. आणि बाहेर पहाऱ्यासाठी तिला बसविले. एवढ्यात शंकर तिथे आले. पहारेकऱ्याने आपले कार्य चोख केले. तो त्यांना आत जाऊन देईना. पण शंकर त्याचे बोलणे ऐकतील तर ना ? त्यांच्या रागाचा पारा सूंऽदिशी चढला नि त्यांनी एका क्षणात त्या मूर्तीचे डोके कापून टाकले!

आंघोळ आटोपून पार्वती बाहेर आली. आणि हा प्रकार पाहून तिने त्या मूर्तीच्या जन्माची हकीकत शंकराला सांगितली. पार्वतीने निर्माण केलेली ती मूर्ती. तिने घडविलेला मुलगा म्हणजे तिचा तो मानसपुत्र होता. तो तिचा मानसपुत्र म्हणजे अर्थातच शंकराचाही.

शंकराचा राग एव्हाना ओसरला होता. त्यांना आता भारी वाईट वाटले. त्यावेळी त्यांचे गण ह्या नावाचे नोकर जवळच होते. त्यांना शंकरानी आज्ञा दिली की, प्रथम जो भेटेल त्याचे डोके कापून आणा. नोकरांना एक मेलेला हत्ती दिसला. त्याचे डोके त्यांनी कापून आणले. आणि भगवान शंकरानी ते डोके पार्वतीच्या मानसपुत्राच्या धडाला चिकटविले. ते हत्तीचे – गजाचे–आनन म्हणजे मस्तक होते. म्हणून पार्वतीच्या त्या मुलाला गजानन हे नाव पडले व शंकरानी त्याला आपल्या गणांचा ईश-मुख्य-केला. म्हणून त्याला गणेश म्हणू लागले.

ह्यासंबंधी दुसरी अशी कथा आहे की, तारकासूर नावाच्या राक्षसाच्या सैन्यातील एक राक्षस फार मस्त झाला होता. त्याने एकदा शंकराचा कमंडलू लाथाडून अपमान केला. शंकराला वाटले की, पार्वतीच्या मानस-पुत्रानेच हा अपराध केला. म्हणून आपल्या तापट स्वभावानुसार शंकरानी त्याचे मस्तक तोडले. पण थोडक्याच वेळाने त्याला खरा प्रकार कळला आणि त्यानी गजासुराला ठार मारून त्याचे डोके या मानसपुत्राच्या धडाला जोडले व त्याला सजीव करून 'गणांचा पती' म्हणजे गणपती बनविले.

गणपतीच्या आरतीत त्याला सुखकर्ता, दुःखहर्ता असे म्हणतात. त्याप्रमाणे त्याला विघ्नहर्तासुद्धा मानतात. सर्व विघ्ने – अडचणी – त्याच्या कृपेने दूर होतात. आणि म्हणून कोणत्याही कामाच्या आरंभी गणपतीचे स्मरण करतात. त्याची पूजा आधी करतात. गणपती ही विद्येची देवता आहे. त्यामुळें पूर्वी शिक्षणाला सुरूवात करताना पहिल्यांदा "श्रीगणेशाय नमः" हा मंत्र गिरवावा लागे. आजकाल शिक्षणाची नवी पद्धत निघाली आहे. तरीही "श्रीगणेशा" ह्या शब्दांचा अर्थच मुळी प्रारंभ असाच आजसुद्धा समजला जातो. शिवाजी-महाराजांनी स्वराज्याचा श्रीगणेशा केला असे म्हणतात ते ह्यामुळेच !

गणपतीला मोरया ह्या नावाने अनेकदा हाका मारल्या जातात. गणपतीचे विसर्जन करतेवेळी " गणपतीबाप्पा मोरया । पुढल्या वर्षी लवकर या ।" असे म्हणतात. ह्या मोरया शब्दाची देखील मोठी गंमतच आहे.

पुण्याजवळ चिंचवड म्हणून एक गाव आहे. तेथे मोरया गोसावी नावाचा एक साधू होऊन गेला. हा गणपतीचा मोठा भक्त होता. त्याची भक्ती पाहून गावच्या लोकांनी त्याला गणपतीचा अवतार बनविले नि त्याचे मोरया हे नाव गणपतीला चिकटविले !

गणपती हा अतिशय लोकप्रिय देव आहे. उत्तरेला नेपाळ प्रांतापासून दक्षिणेला रामेश्वरपर्यन्त गावोगावी गणेशाची पूजा केली जाते. ह्याचे कारण असे की, शैव व वैष्णव ह्या दोन्ही पंथाचे लोक त्याला मानतात व भजतात.

शैव म्हणजे शिवाचे - शंकराचे—भक्त आणि वैष्णव म्हणजे विष्णूचे भक्त. पूर्वीच्या काळी शैव व वैष्णव ह्यांच्यामध्ये एवढे शत्रुत्व असे की, ते परस्परांशी मुळीच लग्नसंबंध जोडीत नसत. फार काय शंकराच्या कपाळावरील गंध आडवे असते म्हणून शैवांच्या घरातील पुरुषांनी आडवे गंध व बायकांनी आडवे कुंकू लावलेच पाहिजे असा जणू कायदा होता त्यांचा. म्हणून बायकांनी जमीन सारविताना हात आडवा फिरविला पाहिजे अशी वडील माणसे ताकीद देत. ह्याच्या उलट, वैष्णवांचे गंध उभट व त्यांच्या बायकांचे कुंकूही उभट.

हा सारा कल्पनेचा, भावनेचा प्रकार आहे. शंकराची अनेक नावे आहेत. त्यात हर हे एक नाव आहे. आणि विष्णूचे नाव हरी आहे. त्यावर एका कवीने मजेने म्हटले की, शंकर व विष्णू ह्यात असा कितीसा फरक आहे? एक हर आणि दुसरा हरि ! म्हणजे फक्त एका वेलांटीचा फरक ! पण ह्या एका वेलांटीपायीसुद्धा त्या दोघांचे भक्त हटून बसतात नि आपापल्या देवाशिवाय दुसऱ्याचे नावही घेत नाहीत.

गणपतीच्या बाबतीत मात्र असे झाले की, तो पार्वतीचा मानसपुत्र म्हणून शंकराचासुद्धा मानसपुत्र ! अर्थातच शैव त्याला भजणारच.

पण गणपती हा विष्णूचा अवतार आहे असे वैष्णव मानतात, म्हणून तेही गणपतीला भजतात. त्यामुळे हिंदुस्थानातील प्रत्येक गावात गणपतीचे देऊळ हे असतेच.

तामीळ देशात गणपतीला "तूंविकाई अलवर" म्हणजे बुद्धिमान गजानन म्हणतात.

तंजावर येथील गणपतीचे देऊळ फार प्रसिद्ध आहे. तसेच त्रिचनापल्ली येथे उच्छि पिल्लेयर हे गणपतीचे देऊळ फार भव्य व सुंदर आहे.

पुण्याजवळ चिंचवड, कोकणातील पुळे व उत्तर कानडा जिल्ह्यात इडगुंजी ह्या गावी गणपतीची प्रसिद्ध देवळे आहेत.

गणपती विघ्नहर्ता आहे. त्याच्या कृपाप्रसादाने लहान किंवा मोठे कसलेही कार्य सिद्धीला जाते. तो चांगली बुद्धी देतो असे मानतात. पण ह्याचा अर्थ फक्त गणपतीची पूजा केली किंवा त्याला लाडू, मोदकांचा नैवेद्य दाखविला की, आपली सर्व कामे मनासारखी पार पडतील असा मात्र नव्हे. आपल्या प्रयत्नांच्या मदतीला गणपतीची कृपा मिळावी म्हणून खटपट करणे ठीक आहे. पण गणपतीला मोठासा नवस बोलला की, झाले व अभ्यास न करिता परीक्षा पास होता येईल अशी कल्पना मात्र चुकीची ठरेल.

**सार्वजनिक गणेशोत्सव**

या महिन्यातच गणेशोत्सवाचे दहा दिवस कार्यक्रम असल्यामुळे पावसाळा असला तरी हा महिना गजवजून जातो. घरोघरी लोक गणपतीची पूजा करतात, पण दहा दिवस (गणेश-चतुर्थी ते अनंत-चतुर्दशीपर्यंत) सार्वजनिक स्वरूपात हा गणेशोत्सव साजरा करण्याची प्रथा लोकमान्य टिळकांनी इ. स. १८९३ पासून सुरू केली. परवशतेने गाढ झोपी गेलेल्या जनतेत स्वराज्याची जागृती निर्माण करणे आवश्यक होते. त्यासाठी लोकमान्य टिळकांनी "स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य" असे चार कार्यक्रम देशापुढे ठेवले. यालाच लोकमान्यांची चतु:सूत्री असे म्हणतात. याच चतु:सूत्रीमुळे सामान्य जनतेत पारतंत्र्याबद्दल चीड व स्वराज्याच्या "जन्मसिद्ध हक्काची" जाणीव निर्माण झाली.

या चतु:सूत्रीपैकी राष्ट्रीय शिक्षणाचा एक भाग म्हणून त्यांनी शिवजयंती उत्सव व गणेशोत्सव सुरू केले. चतु:सूत्रीचा उपदेश खेड्यापाड्यातील जनतेपर्यंत पोहोचावा, सरकारी अन्याय्य फर्मानांना विरोध करण्याचे धैर्य जनतेत निर्माण व्हावे व स्वत्वाची जाणीव होऊन संघटना-कौशल्य प्राप्त करण्याचे सामर्थ्य लोकात यावे इत्यादी हेतू गणेशोत्सव सुरू करण्यात लोकमान्यांचे होते.

कर्तबगार लोक तर या उत्सवातील व्याख्यानांमुळे राष्ट्रीय चळवळीत ओढले गेलेच, परंतु इतरही लोकांची मने व्याख्यानांतील ज्ञानगंगेच्या अभिषेकाने पावन झाल्यावाचून राहिली नाहीत. एकंदरीत स्वराज्याबद्दल लोकजागृती करण्याचे साधन म्हणून गणेशोत्सवाचा फार उपयोग झाला.

पहिला गणेशोत्सव इ. स. १८९३ मध्ये साजरा झाला. त्यावेळी त्याचे स्वरूप धार्मिक होते. परंतु १९०८ ची लोकमान्यांना झालेली शिक्षा व १९१६ ची होमरूलची चळवळ यामुळे महाराष्ट्रात सर्वत्र हे उत्सव साजरे होऊ लागले. या उत्सवातील कार्यक्रमांनी राजकीय जागृतीचे पूर्ण स्वरूप धारण केले.

या उत्सवात पुराणे, कीर्तने, मेळे व व्याख्याने होत. मेळ्यांतील पदे पारतंत्र्यामुळे होणारी कुचंबणा व स्वातंत्र्याबद्दल वाटणारी तळमळ निर्माण करणारी होती.

राष्ट्रजागृतीच्या दृष्टीने गणेशोत्सवाचे टिळकांना फार महत्त्व वाटे. आपल्या मृत्युपत्रातही त्यांनी गणेशोत्सव अखंड चालू ठेवावा असे सांगितले आहे. कोठल्याही जातीची महाराष्ट्रीय माणसे परप्रांतात कोठेही असली तरी ती एकत्र येऊन हा गणेशोत्सव साजरा करतात. यामुळे हा उत्सव म्हणजे महाराष्ट्रीयांचे एक वैशिष्टय होऊन बसले आहे.

आजच्या स्वातंत्र्याच्या काळातही समाज-जागृतीचे साधन म्हणून गणेशोत्सवाची आवश्यकता आहे. रोगराई, अज्ञान इत्यादींशी तोंड देण्यास, तसेच आर्थिक प्रगती, लोकशाही जीवन इत्यादींचे ज्ञान सामान्य जनतेपर्यंत पोहोचविण्यास व कलांना उत्तेजन देण्यास उत्सवातील व्याख्याने व प्रदर्शने यांची

उपयुक्तता सध्याही आहे. त्यामुळे आजही हा उत्सव सार्वजनिक स्वरूपात लोक स्वयंसेवावृत्तीने साजरा करीत आहेत.

**अनंत-चतुर्दशी**

भाद्रपद शुद्ध चतुर्दशीला अनंत-चतुर्दशी म्हणतात. बरेचसे सार्वजनिक गणपती अनंत-चतुर्दशीला पोचवितात.

अनंत-चतुर्दशी हा सण नाही. ते व्रत आहे. आपल्या घराण्यात पूर्वापार पद्धत असल्यास हे व्रत करतात. किंवा मनात हेतू धरून कोणी आवडीने हे व्रत घेतात. तसे असल्यास हे व्रत चौदा वर्षेच करण्याची रीत आहे. ह्या व्रता-विषयीची कथा अशी आहे.

सुमंत नावाच्या एका ब्राह्मणाला सुशीला नावाची एक मुलगी होती. सावत्र आईने सुशीलेला फार छळले. पुढे कौंडिण्य ऋषीबरोबर तिचे लग्न झाले. आईच्या छळाला कंटाळून ती नवऱ्यासह अरण्यात निघून गेली. त्यावेळी त्यांची स्थिती फार गरिबीची होती.

एकदा रानात हिंडताना सुशीलेला काही सुवासिनी स्त्रिया पूजा करताना आढळल्या. तुम्ही कसली पूजा करता असे सुशीलेने त्यांना विचारले. तेव्हा त्यांनी अनंताच्या व्रताची माहिती तिला सांगितली. सुशीलेने त्यांच्याकडून अनंताचा दोरा मागून घेतला आणि मोठ्या भक्तीने त्याची पूजा केली.

ह्या पूजेचे फळ म्हणून सुशीलेला व तिच्या नवऱ्याला श्रीमंती प्राप्त झाली आणि एक दिवस चौदा गाठी मारलेला तो अनंताचा दोरा सुशीलेने नवऱ्याला दाखविला. त्यावेळी ती म्हणाली, "ह्या अनंताच्या कृपेने आपल्याला हे वैभव लाभले."

तिचे हे बोलणे कौंडिण्य ऋषीला आवडले नाही. आपल्या अंगातील गुणां-मुळे वैभव आपल्याला मिळाले असे तो ठासून म्हणाला आणि तो अनंताचा दोरा बिनकिंमतीचा ठरवून त्याने अग्नीत टाकून दिला! त्यानंतर त्याचे

वैभव नाहीसे झाले आणि तेव्हापासून कौंडिण्य ऋषीला अनंताचे जणू वेड लागले. ...

अनंताचा लाभ व्हावा म्हणूनच तो रानोमाळ भटकू लागला. रानात त्याला एक आंब्याचे झाड दिसले. त्याच्यावर पाडाला आलेले शेंदरी आंबे फांदी-फांदीला लटकत होते. पण त्यातले काही आंबे नासले असल्यामुळे तिथे एकही पक्षी फिरकत नव्हता.

पुढे त्याला एक बैल दिसला. त्याच्यासमोर चारा असूनही त्याला तो खाता येत नव्हता.

आणखी जरा पुढे गेल्यावर त्याला दोन सरोवरे दिसली. पण त्यांच्या पाण्याचा कोणीही उपयोग करताना आढळले नाही.

नंतर त्याला एक हत्ती व एक गाढव दिसून आले. त्याने आतापर्यंत प्रत्येकाला– आंबे, बैल व सरोवरे ह्यांना– अनंत कुठे सापडेल म्हणून विचारले होते. आता ह्या पशूंनासुद्धा त्याने हाच प्रश्न विचारला. परंतु कोणालाच ते सांगता येईना. तेव्हा निराश होऊन कौंडिण्य धाडकन जमिनीवर पडला.

त्या सरशी भक्तवत्सल विष्णू अनंताच्या रूपाने प्रकट झाला. आणि तुला गेलेले वैभव परत मिळेल असा आशिर्वाद देताना तो म्हणाला, "बाबा कौंडिण्य, वाटेत तुला हे कोण कोण भेटले होते ते कळले का? तो आंब्याचा वृक्ष म्हणजे आपली विद्या दुसऱ्यांना ज्याने दिली नव्हती असा विद्वान् ब्राह्मण. त्यामुळेच त्याला अशी निरूपयोगी स्थिती प्राप्त झाली. बैल हा गेल्या जन्मी गर्वाने दानधर्म केलेला श्रीमंत माणूस आहे. सणांच्या किंवा व्रतांच्या निमित्ताने माणसे दान करतात. अशी दाने नेहमी योग्य व गरजू स्त्रियांना नि पुरुषाना दिल्यानेच खरे पुण्य लाभते. तू वाटेत पाहिलेली ती दोन सरोवरे म्हणजे दोघी बहिणी होत्या. त्या फार स्वार्थी होत्या. त्यांनी जन्मभर एकमेकींनाच अशी दाने दिली. त्यामुळे ह्या जन्मी त्यांचे पाणी जागच्या जागीच कुजून जाते आहे. आणि ते शेवटचे दोन पशू, हत्ती व गाढव म्हणजे तुझा राग व गर्व! समजलास ?"

कौंडिण्य ऋषी चांगलेच समजला. आपल्या चुका त्याला कळून आल्य
सर्व माणसांत, सर्व पशुपक्ष्यांत, एवढेच नव्हे तर पृथ्वीवरील हरेक वस्तू
अनंत असतो. आंब्यातील गोडी अनंताच्या कृपेनेच लाभते नि विद्यासुद्ध
त्याच्या प्रसादानेच मिळते. तेव्हा अशा आपल्याला प्राप्त झालेल्या वेग
वेगळ्या गुणांबद्दल गर्व करणे चुकीचे आहे हे त्याच्या लक्षात आले.

# गणाधीश जो . . .

श्री. बापू वाटवे

श्रीगणेश गजमुख, एकदंत आहे. त्याचं वाहन आहे उंदीर. भक्तीभाव
त्याच्यापुढं नारळ फोडला जातो याच्या मागील पौराणिक दंतकथा काय आहे
आणि त्यापासून बोध काय घ्यायचा याचं व्यावहारिक दृष्टिकोनातून का
कामकोटी पीठम्चे जगद्गुरू जयेंद्र सरस्वती स्वामी गल यांनी तर्कशुद्ध तात्त्वि
विवेचन थोडक्यात आणि सुलभतेनं केलं आहे.

गजमुखामागील दंतकथा अशी: हत्तीचं तोंड असलेला गजमुखासूर अ
उन्मत्त झाला. त्याच्याचसारखं स्वरूप असलेलाच फक्त त्याचा वध क
शकेल असा त्यानं वर मिळविलेला होता. असा कोणी देव, दानव, मा
अस्तित्वात असूच शकणार नाही याची त्याला खात्री होती. त्याचा व
करण्यासाठी विनायकाला तसं रूप धारण करावं लागलं. त्याची स्मृती म्हण
विनायक आजही गजमुखात पूजिला जातो. गणेशोत्सवात तर श्रीगज
ननाच्या एकाहून एक सुबक, गोंडस आणि अर्थपूर्ण मूर्ती बघायला मिळता

गजमुखाचं आणखी एक वैशिष्टय सांगितलं आहे:– चंद्र, सागर आ
गजराज पहाण्याचा माणसाला कधी कंटाळा येत नाही. चंद्राकडं बघून

कसं प्रसन्न होतं. सागराच्या लाटांचा उसळता खेळ माणूस तासन् तास बघत बसतो. समुद्र किनाऱ्यावरून उठावंसं वाटत नाही. तसंच गजराज चालला असला की, त्याच्या डौलदार चालीकडं आबालवृद्ध एकटक लावून बघत असतात. अशा या अैटवान प्राण्याचं मुख परमेश्वरानं धारण केल्यानं त्याचं महत्त्वही वाढलं. श्रीगजानन गजमुखात शोभीवंत व चित्तवेधकही दिसतो. गजगतीतील रुबाबामुळं त्याच्या मुखालाही एक प्रकारची शान प्राप्त झाली. भारतभर श्रीगजानन मंदिरे आहेत गणेश मूर्तींचे कितीतरी आकार-प्रकार बघायला मिळतात. त्याच्या मागं निरनिराळ्या आख्यायिका आहेत. इतकी विविध रूपं कोणत्याही देवाची नाहीत. गजाननाइतका प्रचंड भक्तगण कोण-त्याही देवताचा नसेल. श्रीगणेश, 'प्रणवस्वरूप' म्हणजे परमात्मा मानला गेला आहे. ऋद्धीसिद्धीचा तो नायक आहे.

### 'एकदंता'चे रहस्य

श्रीगजानन एकदंत कसा ? त्याची कथा अशी सांगतात की, मुनीवर्य व्यास महाभारत सांगायला बसले. आणि श्रीगजानन लिहायला. लिहिण्यासाठी साधनं घ्यायचं राहिलं. बसल्या बैठकीवरून उठायचं नाही म्हणून विनायकानं आपला एक दात मोडून त्याची लेखणी केली ! कारण महाभारत म्हणजे पाचवा वेदच यातून अर्थ एवढाच घ्यायचा की, ज्ञानसंपदेसाठी शरीराच्या. एखाद्या सुंदर अवयवाचा त्याग करावा लागला तरी तो करावा. हस्तिदंत हा त्याच्या शरीराचा सुंदर भाग. हत्ती आपल्या दातांची फार काळजी घेतो. आपले दात झाडावर घासून तो पांढरे स्वच्छ व टोकदार ठेवतो. तरी गजाननानं आपला एक दात ज़ो सौंदर्याचं लक्षण, अभिमान वाटावा असा अवयव, महाभारतासारखं महाकाव्य लिहिण्याच्या उत्तम उदात्त कार्यासाठी अर्पण केला! धर्म, ज्ञान आणि शहाणपण यासाठी आपल्या जवळची कोणतीही प्रिय वस्तू समर्पण करण्याची तयारी पाहिजे.

### वाहन उंदीरच का ?

गजानन लंबोदर. त्यातून त्यांचा प्रचंड देह ! मग त्याचं वाहन एवढासा उंदीर कसा काय ? त्याची पौराणिक कथा अशी आहे की, एक दैत अतिशय

मातला होता. मायावी सामर्थ्यानं त्यानं मूषक रूप धारण केलं व गणपतीशी सामना देण्यासाठी व त्याला हैराण करण्यासाठी आपले चोरटे हल्ले सुरू केले. हे कपट रहस्य गजाननाच्या लक्षात आलं आणि त्या मूषकाला पकडून त्याच्यावर तो स्वार झाला. त्यामुळे राक्षस पूर्णतः त्याच्या नियंत्रणाखाली आला. युक्तीनं संकटावर अशी मात करावी लागते हे गणपतीनं दाखवून दिलं.

आपली मनोकामना पूर्ण होण्यासाठी आपण गणपतीची आळवणी करतो. साकडं घालतो, 'देवा, माझी ही इच्छा पुरी कर, मी तुझ्या पायाशी नारळ फोडीन.' त्याच्या मागील आख्यायिका अशी आहे. तांबे, लोह आणि सुवर्ण यांनी मढविलेल्या नगरात तीन दैत्य रहात होते. त्यांनी मानवांचा अनन्वित छळ आरंभला होता. त्याचं पारिपात्य करणं त्रिनेत्र शंकरालाही शक्य होईना. त्यांच्यापुढं या कामी नित्य नवीन नवीन संकटं उभी राहू लागली तेव्हा शंभू महादेवांनी विघ्नहर्त्या श्रीगजाननाला त्यावर उपाय विचारला. त्यानं सांगितलं. 'तात, या संकटावर मात करून विजयी होण्यासाठी तुमचं शीर अर्पण करायला हवं' मग शिवशंकराच्या शिराचं प्रतीक म्हणून तीन डोळे असलेला नारळ गणपतीपुढं फोडण्यात आला आणि शंकरांनी युद्ध सुरू केलं. त्या अन्यायी, अत्याचारी असुरांचा त्यांनी निःपात केला.

यावरून पुन्हा हेच लक्षात घ्यायचं की, आपल्याला फार मोठं काही मिळवायचं असेल तर आपल्या आराध्य दैवताला म्हणजेच आपल्या ध्येय-निष्ठेला आपल्याला प्राणाहून प्रिय असलेलं मग अगदी शीर सुद्धा असेल तर ते अर्पण करण्याची मानवी मनाची तयारी हवी. भारताच्या स्वातंत्र्य प्राप्ती-साठी कित्येक ज्ञात आणि अज्ञात वीरांनी हे केलेलं आहे. नारळ फोडून आपण मंगलमूर्तीला प्रार्थनाही करतो की, 'यातील' खोबऱ्यासारखं माझं मन शुद्ध रहावं.

विनायकाच्या देवळात नारळ फोडण्याची प्रथा तामिळनाडूत फार मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात आहे. त्याला तिकडं 'चिदर थेंगी' म्हणतात. म्हणजे खोबऱ्याचे तुकडे सर्व दिशांना विखरून टाकणे. नारळ फोडताना दोन छकलं

करीत नाहीत. तीन किंवा त्याहून अधिक नारळ फोडताना दोनच छकलं झाली तर त्याचे अधिक तुकडे करून इतस्ततःत फेकून द्यायचे. त्या मागील धार्मिक भावना अशी आहे, की दहावाटांनी येणारी संकटं तिथंच थांबवावीत.

आपल्या भक्ताच्या तारणहार श्रीगजानन नवसाला पावतो, त्यांना चिंता-मुक्त करतो, संकटहरण करतो अशी आजच्या जेट्युगातही असंख्याची श्रद्धा आहे. नव्हे ती वृद्धींगत होत आहे. संकष्टी चतुर्थी करणारे तरूण आजच्या पिढीतही किती तरी आढळतात. तामिळनाडूत एक दंतकथा प्रस्तुत आहे. ती या भावनेवर अधिक प्रकाश टाकते.

## एक आख्यायिका

अखयीयार नावाची कवियत्री गजाननाच्या पूजेत मग्न होती. हत्तीवर स्वार असलेला सुंदरमूर्ती नयनार व घोड्यावर स्वार असलेला चेरामन बेस्मल या दोघांनी तिला सांगितलं, " आम्ही कैलासाला चाललो आहोत तूही आमच्याबरोबर चल. " पण पूजा अर्धवट टाकून येण्यास तिनं नकार दिला. आणि ती परत पूजेला बसली. त्यानंतर तिला वाटू लागलं आपण कैलासाला जाणं कसं शक्य आहे? तिनं गजाननाची करूणा भाकली. गजानन तिच्या सहाय्याला धावला. तिला सोंडेनं उचलून त्यानं अलगद कैलासावर नेऊन ठेवलं व ती सर्व संत महंताच्या अगोदर कैलासाला पोचली. ( प्रत्यक्षात ती अशक्य कोटीतील गोष्ट वाटते. ) जगद्गुरू म्हणतात, अशा कथांवरून एक गोष्ट लक्षात घ्यायची की, प्रतिकूल परिस्थिती उद्भवते तेव्हा हातपाय गाळून रडत बसण्यातं काही साध्य होत नसतं. अशानंवेळी आपलं धैर्य, सामर्थ्य, यांची कसोटी लागते. यातून मार्ग कसा काढायचा यासाठी बुद्धीचा जास्त जास्त वापर केला पाहिजे. संकटं ही पुष्कळवेळा उपकारक ठरतात. संकटाचं आव्हान तुम्ही एकदा स्वीकारलंत की, तुमच्या गुणांची तुम्हाला प्रचीती येतेच. शिवाय तुमच्याजवळील अज्ञात गुणांचाही तुम्हाला साक्षात्कार होतो. तुमचा आत्मविश्वास, जिद्द, मानसिक शक्ती वाढीस लागते. तुम्ही बेडर बनता.

परमेश्वराने तुम्हाला बुद्धी दिली आहे त्याचा उपयोग संकटकाळी खचून
जाता केला पाहिजे.

कुठल्याही शुभकार्याचा आरंभ आपण मंगलमूर्ती मोरयाच्या पूजनानं करतो
येणाऱ्या अडचणींना तोंड देण्याचं सामर्थ्य श्री गजाननानं द्यावं हाच त्
मागचा खरा हेतू असतो.

तामिळनाडूत गणेशाच्या देवळात काही लोक 'दोरमी कर्ण' करताना आढळ
तात. म्हणजे दोन्ही हातांनी दोन्ही कान धरून उठाबशा काढणे. याच्
मागंही एक मजेदार दंतकथा आहे. गजाननानं एकदा श्रीविष्णूचं सुदर्शन च
घेतलं आणि ते गिळून टाकलं. ते आता परत कसं मिळवायचं हा श्रीविष्णूं
प्रश्न पडला. त्यावेळी गजानन बालक होता. सक्ती करून काम होणार नाह
याची श्रीविष्णूंना खात्री होती. मग श्रीविष्णूंनी एक युक्ती केली. त्यां
आपल्या चारी हातांनी आपले कान धरून नाचायला, उठाबशा काढायल
प्रारंभ केला. तो प्रकार पाहून विनायकाला इतकी मौज वाटली की, त्याल
हसू अनावर झालं. त्यामुळं त्याच्या मुखातून चक्र बाहेर पडलं. विष्णूंनी
हाती घतलं आणि सुटकेचा निश्वास टाकला. म्हणून दोरमी कर्ण प्रक
आजही चालू आहे. गजाननाला प्रसन्न करून घेतलं की, गमावलेलं देखी
परत मिळू शकतं अशी या मागची भावना.

आराधनेची 'गाणपत्य' पद्धत आहे. त्याच्या मागची भावना अशी अ
की, आपल्याला मुक्ती देणारा देव श्रीगजाननच आहे. गाणपत्य पद्धती
गजाननाचं भक्तिभावे स्मरण करीत राहिलं तर मोक्ष दूर नाही. ती अपेक्ष
पूर्ती एक गजाननच करू शकतो अशी भाविकांना खात्री वाटते.

महाराष्ट्रात तर गणेश महात्म्य फारच मोठं आहे. सर्वत्र गणेशोत्स
थाटात साजरा केला जातो. मोरगावच्या गणपतीचं वाहन मोर दाखवि
आहे. खरं पाहिलं तर परमेश्वराला वाहनाची जरूरच काय आहे ? पर
प्राण्यांनाही महत्त्व आहे ते दिलं पाहिजे याची जाणीव ठेवावी म्हण

देवादिकांची वाहनं प्राणी दाखविली जातात. कांची कामकोटी पीठाच्या जगद्गुरूंनी निवेदन केलेल्या श्रीगणेशाच्या पौराणिक कथा, त्या मागील कल्पना व भावना लक्षात घेण्याचा अर्थ अगदी थोडक्यात त्यांनी विषद केला आहे.

जयेंद्र सरस्वती स्वामी गल भक्तांना एकच उपदेश करतात, " या पौराणिक कथांचं केवळ अंधानुकरण करू नका. त्यातला भावार्थ लक्षात घेऊन श्रद्धेनं आणि नीतिमत्तेनं आपलं कार्य करीत राहा. संकटं देवादिकांच्यावरही आली आहेत. संकटं, अडचणी, या अटळ असतात. अशावेळी खंबीर मनानं, बुद्धी कौशल्यानं त्यांना सामोरे जा. मग मंगलमूर्ती तुम्हाला चिंतामुक्त करील. केवळ अंधश्रद्धा ठेऊन स्वस्थ बसाल तर संकटं तुमच्यावर मात करतील. देवाला दोष देऊ नका. प्रतिकूल परिस्थितीत मंगलमूर्तीचं चिंतन करा. तुमचं मनःसामर्थ्य शतगुणीत होईल. अशावेळी त्याचीच नितांत गरज असते. "

## ॐकारस्वरूपी श्रीगजानन

— गणेश पुराण

श्रीगजानन ही देवता ॐकारस्वरूपी आहे, आणि हत्तीची सोंड हे ॐकाराचे प्रतीक आहे. या देवतेचे महात्म्य वर्णन करताना सर्व सृष्टीचा उत्पन्नकर्ता गजाननच होय असे वर्णन गणेश पुराणात आलेले आहे. ते जिज्ञासूसाठी पुढे दिले आहे.

"ज्यावेळी प्रलयकाल होतो, त्यावेळी वायूने पर्वतसुद्धा उडून जातात. बारा सूर्य एकदम प्रकाशमान होऊन सर्व उदके आटून जातात. नंतर अग्नी प्रगट होऊन सर्व पृथ्वी जाळून टाकतो. नंतर संवर्तक नावाचे मेघ उदकाची वृष्टि करून सर्व सृष्टि जलमय करून सोडितात. त्यावेळी हत्तीच्या सोंडे एवढ्या

पाण्याच्या धारा आकाशातून पडत असतात अशा रीतीने सर्व महाभूतांचा रोष होऊन सर्व सृष्टीचा नाश होतो.

असल्या प्रलयाच्यावेळी परमात्मा गजानन अणुरूप धारण करून कोठे तरीं राहिलेला असतो. अशा स्थितीमध्ये बहुत काल गेला असता सर्व विश्व अंधःकारमय होऊन जाते. नंतर ॐकाररूप नादब्रम्ह मायेने युक्त होऊन पुनः सर्व सृष्टि निर्माण करते. तोच परमात्मा गजानन होय. त्याच्याचपासून त्रिगुण व ब्रम्हा, विष्णु, महेश यांची उत्पत्ती होते."

गणेशपुराणात श्रीगजाननचे स्वरूप वर्णन केले आहे ते असे :–

"एकदा ब्रम्हादिदेव उत्पन्न झाल्यावर आपण कोण व पुढे आपणास काय करावयाचे आहे, याचा त्यास समज पडेनासा झाला. आपणास कोणी उत्पन्न केले हे पाहण्यासाठी प्रथम एकवीस स्वर्ग, नंतर सर्व पृथ्वी व सप्त पाताले यांचा त्यांनी शोध केला. परंतु उत्पन्नकर्त्याचा शोध त्यास लागला नाही. म्हणून त्यांनी सहस्त्र वर्षेपर्यंत तीव्र तपश्चर्या केली. त्यांची दीनावस्था पाहून गजाननास त्यांची करुणा आली आणि आपले मनोहर रूप दाखविले.

त्याच्या पायावरील नखांच्या आरक्त वर्णाने कमळांना लाज आली होती. अंगाच्या रक्तकांतीने सायंकाळच्या सूर्यास जिंकले होते. त्याच्या कमरेतील कटिसूत्राच्या पिवळ्या कांतीने सुवर्णाच्या मेरूपर्वताचा पराजय केला होता. त्याला चार हस्त असून त्यात खड्ग, खेट, धनुष्य आणि शक्ति अशी चार आयुधे होती. त्याचे नाक हत्तीच्या सोंडेप्रमाणे सुंदर असून त्याच्या मुखमंडलाची कांति पौर्णिमेच्या चंद्राहून अधिक होती. वराहाच्या दाढेलाही हटविणारा असा एकदंत त्याच्या मुखाबाहेर आलेला होता व त्याच्या सोंडेचे अग्र पाहून ऐरावतादि आठ दिग्गजयांस भय उत्पन्न झाले होते. अनेक सूर्याहून तेजस्वी असा मुकुट त्याच्या मस्तकावर असून अंगावरील वस्त्राने तर ताऱ्यांचे तेज हिरावून घेतले होते. अशाप्रकारे ॐकारस्वरूपा परब्रम्हाची पूजा प्रचारात

आली आहे. त्याच प्रमाणे आपले पुराणरचनाकार इतिहासकार होते तसेच कवीही होते, ही गोष्ट असल्या वर्णनावरून ध्यानी येते.

# श्रीगणेश पूजनाच्या प्रथा आणि विविधता

श्री. प्रभाकर चेंदवणकर

आमच्या आध्यात्मिक, सांस्कृतिक तथा समस्त जीवनातच श्रीगणेशास महत्त्वाचे, आदराचे, मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. इतकेच काय तर कोणत्याही शुभकार्यारंभी किंवा मंगल प्रसंगी ते कार्य सिद्धीस नेण्यासाठी गणेश मान्य देवतेची सर्वप्रथम पूजा केली जाते. आवाहन केले जाते. आमच्या प्रत्येक बाबतीत गणपतीला अग्रस्थान आहे व ते अनादिकालापासून चालत आले आहे. आणि ते आजतागायत कायम आहे. हेच या देवतेचे खास करून वैशिष्टच म्हणावे लागेल.

श्रीगणेश विघ्नहारक व सुखकर दैवत आहे. विद्या व कला यांची अधिष्टात्री देवता आहे असे सारेजण मानतात. त्यामुळे कन्याकुमारी ते काश्मीरपर्यंत व जगन्नाथपुरीपासून ते थेट द्वारकेपर्यंत पसरलेल्या विशाल भारतात गणेश देवतेचीच अधिकतर अनन्यभावे पूजाअर्चा केली जाते.

विशेषतः महाराष्ट्रात श्रीगणेशाची पूजाअर्चा मनोभावे तथा फार मोठ्या प्रमाणात केली जाते. भाद्रपद चतुर्थीपासून ते अनंत चतुर्दशीपर्यंत दहा दिवस घरोघरी श्रीगणेशाच्या आगमनार्थ उत्सव मोठ्या धूमधडाक्याने, उत्साहाने, तथा उत्सवपूर्णतेने केले जातात. महाराष्ट्रातल्या प्रमाणेच गुजराथेत गणपतीची पूजा षोडशोपचारे केली जाते. तिथे गणेशचतुर्थीच्या दिवशी घरातील चांगली

जागा सारवून व रांगोळी काढून त्या ठिकाणी श्रीगणेशाची सुंदरशी मूर्ती स्थापन करण्यात येते. या मूर्तीसमोर विविध प्रकाराची मिठाई व गुळखोबरे ठेवण्यात येते. गुजराथ्यांचा असा विश्वास आहे की, हे खाद्यपदार्थ गणेशाचे वाहन जो उंदीर मामा तो संतुष्ट झाल्यानंतर नासधूस होणार नाही.

गणपती ही देवता म्हणजे समस्त भारताचेच एक आराध्य दैवत आहे. भारतातील बहुतेक धर्म पंथाचे व धर्ममताचे लोक गणपती पूजन आस्थापूर्वक करतात. इतकेच काय पण शैव व वैष्णव यांच्यात कितीही मतभेद असले तरी विघ्नहर्त्याची पूजा प्रार्थना या दोन्ही पंथात आदरपूर्वक केली जाते. गणपती हा शिवाचा पुत्र असल्याने शैव तर तो विष्णूचा अवतार मानला जात असल्याने वैष्णव. गणेशाला सर्वजण मोठ्या भक्तीभावाने भजतात. नेपाळपासून ते कन्याकुमारीपर्यंत गणपतीचे एकही देऊळ नाही असे गाव साऱ्या भारतवर्षात सापडणार नाही.

## हरियाणात १५ दिवस गणेशोत्सव

हरियाणा प्रांत व भिवानीनगर येथे तर गणेशपूजनाचा सोहळा संपूर्ण एक पक्ष पर्यंत चालतो. तेथल्या गणेशउत्सवात मुलांचाच भाग मोठा असतो. भाद्रपद महिना सुरू झाला म्हणजे तिकडील शाळांना मुद्दाम सुट्टी देण्यात येते. ज्या ज्या विद्यार्थ्यांच्या घरी गणपती पूजनाचा कार्यक्रम असतो त्या विद्यार्थ्यांच्या घरी शिक्षक आपल्या शिष्यमंडळींसह भेट देतात. गुरुजींचे मोठ्या आदराने घरोघरी स्वागत केले जाते. नंतर गुरुजींना व घरातील शाळेत जाणारी मुले यांना तिलक लावण्यात येतो. जमलेल्या सर्व मुलांना लाडू व गोड पदार्थ वाटण्यात येतात व शेवटी गुरुजींना यथाशक्ती भेट देऊन निरोप दिला जातो. गुरुजी म्हणजे साक्षात श्रीगणेशच आणि त्यांच्याबरोबर आलेली मुले म्हणजे त्यांचे गण शिष्य. तेव्हा बुद्धीची देवता गणेश हिच्या जन्मोत्सवी मुले व शिक्षक यांना जर प्रसन्न केले तर आपल्या मुलांचे कल्याणच होईल असा तेथील लोकांचा दृढ विश्वास आहे. या सणप्रसंगी तिकडील मुले, चीक

चांदनी अजव बहार, यह बच्चोंका बडा त्यौहार ' हे गीत गात नाचत नाचत मोठ्या आनंदाने बागडतात.

दक्षिण भारतात तर श्री गणेशाला मोठाच मान दिला जातो. तिथे गणपतीला 'बलम्बुरी विनायक' किंवा 'इंदुम्बुर विनायक' या नावाने संबोधून त्याची मोठ्या भक्तिभावाने पूजाअर्चा केली जाते. तामीळ प्रदेशात गणपतीला 'तुंबिकाई अलवर' म्हणजे बुद्धीमान गणेश गजानन असे म्हणतात. दक्षिण भारतात गणपतीबरोबरच शिवाची द्वितीय पूजा करून गणेशाचा जेष्ठ बंधु कार्तिकेय याचाही मान राखला जातो. या स्वामी कार्तिकेयास तिथे 'सुब्रम्हण्यम' या नावाने संबोधिले जाते. आज तेथील द्रविडांची अशी समजूत आहे की, गणेशाचा जन्म चतुर्थीला झाला असल्याने गणपती हा चतुर्थ वर्णाचा आहे. अशाप्रकारे श्री गणेश ही शुद्रांची देवता आहे. हत्ती या प्राण्याशी श्रीगणेशाचे बरेचसे साम्य आहे. म्हणूनच गजाननाला मिळालेली लंबोदर, गजानन, हत्तीमुख, वक्रतुंड आदी नावे हत्तीच्या विशिष्ट भागाच्या नामसादृश्यावरूनच मिळालेली आहेत. यावरून हत्ती व गणपती यामध्ये कोणताही फरक नाही असे येथील लोकांचे मत आहे. यामुळेच की काय उत्तर व दक्षिण भारतातील वृद्धजन रस्त्यातून जात असताना हत्ती दिसला की, त्यास मोठ्या आनंदाने लवून नमस्कार करतात. तेलगू प्रांतात तर गणेशाला 'ओलायटट्टू पिल्लेयार' किंवा 'लयन्तु पिल्लेयार' असे म्हणतात. तिथे कोणत्याही पूजेच्या आरंभी श्रीगणेशाला प्रथम मान दिला जातो व सर्वात प्रथम त्याचीच पूजा केली जाते.

नेपाळमध्ये 'सूर्य विनायक' किंवा 'लोडी विनायक' या नावाने संबोधून त्याची षोडशोपचारे पूजा केली जाते. तिथे बौद्ध व जैन दोन्ही पंथाचे लोक गणेश पूजन मनोभावे करतात. 'नृत्यगणपती' हा नेपाळमधला वैशिष्टयपूर्ण असा गणपती आहे. या गणपतीची अंगकांती तांबूस असून त्याचे पाय हिरव्या रंगाच्या उंदरावर असतात. या उंदराच्या तोंडात चिंतामणीनामक मौल्यवान रत्न असते. गणपतीचा डावा पाय सरळ व उजवा पाय गुडघ्यात वाकवून दुमडलेला असतो. चिंतामणी रत्न गळमाला देखील त्याच रत्नांची माळ असते.

हातात आयुधेही असतात. बौद्धचित्र परिपाठानुसार तेथील गणपतीना पाच तोंडे असलेली दिसतात. पांचमुखे असलेल्या गणपतीच्या मधल्या गणपतीचे नाव 'सूर्य विनायक' असून याला याच्या सभोवताली चार कोपऱ्यात 'रक्त विनायक', 'चंद्र विनायक' 'सिद्ध विनायक' 'व अशोक विनायक' असे गणपती असून या चार नावांनी ते ओळखले जातात. मधल्या सूर्य विनायक गणपतीस चार हात व एक तोंड असते. चार हातात कुऱ्हाड, भग्नदंत, लाडवांचे भांडे व जपमाळ अशी अनुक्रमे विविधता असताना तो उंदरावर उभा असतो. शंकराच्या डोक्यावर तांडवनृत्याच्यावेळी नागाचा फणा जसा असतो, त्याप्रमाणेच नृत्य अभिनयांच्या वेळी येथील गणपतीच्या स्कंदावर नाग धारण करून कपाळावर आडवे गंध लावलेले असते. याशिवाय नेपाळात 'हेरंब गणपति' या नावाने ओळखला जाणारा एक गणपती आहे. या गणपतीला दहा हात आहेत. त्याला पाच गजाननमस्तके असून पैकी तीन तोंडे खाली व दुसरी दोन मधल्या मस्तकावर एकावर एक तीन मजली माडीप्रमाणे असतात. या गणपतीचे वाहन मात्र सह आहे.

उत्तर भारतात खुजराहो या इतिहास कालीन प्रसिद्ध वस्तुसंग्रहालयात गणेशाची एक विशाल मूर्ती असून ती जवळ जवळ आठव्या शतकातील असावी असा तज्ञांचा कयास आहे. याप्रमाणेच तेथील खंदारिमानाच्या मंदिरात सप्तमातृका समवेत श्रीगणेशाची एक भव्यमूर्ति असून तिच्या सुंदर शिल्पाकृतीमुळेच पाहाणाऱ्यांचे मन वेधून घेते. उत्तर भारतातल्या बनपूर (टोकमगढ) येथील भव्य गणेशमूर्तीला एकोणीस हात आहेत. या भव्य व वैचित्रपूर्ण गणेशमूर्तीबद्दल भारतातच काय तर जगात गूढ व उत्सुकता आहे.

दक्षिण भारतातील मदुराई या प्रसिद्ध तीर्थक्षेत्री असलेल्या एका मंदिरात उंदरावर स्वार झालेली मोठी नयन-मनोहर अशी गणेशमूर्ती असून तिच्या उजव्या हातात शक्ति विराजमान असल्याचे दिसून येते. या गणेशमूर्तीस दहा हात असून त्यामध्ये अस्त्र किंवा शस्त्र असल्याचे दिसून येत नाही. नेगापट्टम या ठिकाणी श्रीगणेशाची धातूची मूर्ती असून ती फारच मोठी आहे. विशेष

म्हणजे या मूर्तीची चर्चा व वर्णन मुद्गल पुराणात वर्णिलेल्या श्रीगणेशाशी तंतोतंत आढळते. या विचित्र अजस्र धातुगणेश मूर्तीला हत्तीच्या मस्तकासारखीच पाच तऱ्हेची मस्तके असून ती अगदी एकसारखी आहेत. ही गणेशमूर्ती सिंहासनावर आरूढ झालेली आहे. ही गणेशमूर्ती हेरंब गणपती या नावानेच नेपाळात ओळखली जाते.

नेगापट्टम मूर्ती प्रमाणेच एक धातूची गणेश मूर्ती मद्रास जवळील टीरोटिटपूर येथे आहे. ती फारशी प्राचीन नसली तरी अतीव सौंदर्यामुळेच विशेष शोभायमान भासते. विशेष म्हणजे या मूर्तीची पाचही मस्तके मोठ्या कलात्मकतेने एकाच परिघात बसविलेली आहेत. दक्षिण भारतातील टेकांशी येथील विश्वनाथ मंदिरात असलेला गणपती 'लक्षी गणेश' या नावाने विख्यात आहे. त्याला दहा हात असून दहाही हातात विविध शस्त्रास्त्रे धारण केलेली आहेत. तसेच या गणपतीच्या दोन्ही बाजूस त्याच्या दोन्ही पत्नी ऋद्धी व सिद्धी त्याला अभिवादन करीत आहेत. अकराव्या शतकातील चोलकुलवंशी राजा रामराजा याने तंजावरच्या बृहदेश्वर येथील मंदिरात नृत्य करीत असलेल्या अनेक गणेश मूर्तीचे खोदकाम करवून घेतले. एक आगळ्या गणेशमूर्ती संबंधात हे मंदिर फारच पवित्र नि प्रसिद्ध आहे. विख्यात आहे. त्रिचनापल्ली येथील 'उच्छिपिल्लेमार' कोरीव लेण्यातील श्रीगणेशाचे देऊळ फार भव्य व नितांत सुंदर आहे. दक्षिणेकडे इगुंडजी येथील मंदिरात श्रीगणेशाची मूर्ती भव्य अशी असून ती गणेशमूर्ती द्विभूज आहे.

नालंदाजवळच्या मगध देशाच्या राजधानीतील राजगृहात अगदी अलिकडे गुप्तकालीन श्रीगणेशाची एक सुंदर मूर्ती सापडली असून संशोधनान्ति ती अतिशय महत्त्वपूर्ण असल्याचे समजते. काशी येथील भारत कलाभुवनात जतन करून ठेवण्यात आलेली ही गणेशाची मूर्ती दगड व चुना यांनी बनविलेली असून त्यावर कोरीव काम देखील करण्यात आले आहे. दगड व चुना मातींनी तयार केलेल्या या विशाल मूर्तीसारखी अन्य दुसरी मूर्ती अद्याप सापडलेली नाही. भूमरा येथील शैव मंदिरातील गणेशमूर्ती नवसास हटकून पावते अशी

आख्यायिका प्रसृत आहे. सारनाथ येथील बौद्ध निर्याणाच्या देखाव्यात इतर देवतांबरोबर उंदरावर बसलेला गणपतीही दाखविण्यात आला आहे. यावरून हिंदु व बौद्ध या दोन धर्मियांना त्या काळी गणेशाचे महत्त्व मान्य होते असे दिसते.

जगात विलक्षण समजली जाणारी श्रीगणेशाची मुर्ती भारतातच आहे. ती मूर्ती म्हणजे नेपाळातील 'मुडकठा गणेश' ही होय. नावाप्रमाणेच या गणेशमूर्तीला शीर नाही. परंतु तरी देखील या शरीर विरहीत गणेश-मूर्तीची यथासांग पूजाअर्चा केली जाते. पूजेच्या वेळी मूर्तीच्या छातीला गंध लावतात. पार्वतीने आपल्या अंगच्या मळाने बनविलेल्या पुत्राचा शंकराने शिरच्छेद केला. या कक्षेतीलच ही मूर्ती होय अशी तिकडील लोकांची दृढ श्रद्धा आहे.

उत्तर भारतातील काशी विश्वेश्वराच्या आठ ओवऱ्यात ५६ विनायक असून ते केवळ स्मरणानेच सिद्धी देतात अशी त्यांची ख्याती आहे. वाई येथील ढोल्या गणपती एवढा उंच व प्रचंड आहे की, त्याची शिडीवर चढून पूजा करावी लागते! कल्याण जवळ असलेले महावरद गणेशाचे श्री क्षेत्र गोकर्ण येथे द्विभूज गणपतीची मूर्ती विचित्र असून रावणाने गणपतीच्या डोक्यावर प्रहार केल्याची खूण अद्याप या गणेशाच्या मस्तकावर आहे.

मुंबापुरीत गणपतीची दोन प्रसिद्ध देवळे आहेत. एक गिरगावात पोष्टा-जवळील फडके गणपतीचे मंदिर व दुसरे प्रभादेवी येथील सिद्धी विनायक. ही दोन्ही स्थाने बरीच जुनी व जागृत आहेत असा भाविकांचा दृढ विश्वास आहे. या शिवाय भारतातील ठिकठिकाणीच्या प्रसिद्ध गणपती प्रमाणेच महाराष्ट्रा-तील अष्ट विनायकांनी भाविकांच्या मनात, हृदयात, स्थान निर्मिलेले आहे. श्रीगणेशाची अमाप लोकप्रियता पाहिली म्हणजे त्याच्या अलौकिकत्वाची साक्ष पटते. श्रीगणेशाचे कर्तव्य अगाध आहे. महिमा, महात्म्य थोर आहे.

# आदौ गणपति-पूजनम्

श्री. दामोदर मोरेश्वर भट

मुलांच्या लौकिक विद्यांचा वा धार्मिक अध्ययनाचा प्रारंभ असो की पुराण-पठणाचा प्रारंभ असो, पारायण पुनःश्चरण आरंभावयाचे असो किंवा वैदिक स्मार्त अथवा पुराणोक्त संस्कारकर्म आरंभावयाचे असो, नित्य-नैमित्तिक व्रत-वैकल्य असो अथवा एखादे प्रायश्चित कर्मारंभण असो, देवकार्य अतिथि-पूजा, गृहारंभ, वास्तुपूजा, राज्याभिषेक, संन्यासदीक्षा-ग्रहण, काहीही असो, मुख्य संकल्प सुटल्याबरोबर लागलीच, तत्रादौ किंवा 'तदङ्गम् आदौ निर्विघ्नता-सिद्धयर्थं श्रीमहागणपतिस्मरणं (ञ्चोपचारपूजनं) च करिष्ये' असा उपसंकल्प करून श्रीगणपतीची पूजा-प्रार्थना करावी व मग मुख्यकर्म यथासांग संपादावे असा प्रघात आज हजारो वर्षे आपणा भारतीय आर्यांमध्ये रूढ आहे.

ॐ ३।। गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमं २।। ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ।।

(ऋग्वेदसंहिता अष्टक २, अध्याय ६ वर्ग २८)

या मंत्राने प्रथमतः गणपतीचे आवाहन करण्यात येते व त्यापुढे—

"वक्रतुण्ड महाकाय, कोटिसूर्य-समप्रभ ।।<br>
निर्विघ्नं कुरु मे देव शुभं कार्येषु सर्वदा ।।

अशी पुराणोक्त प्रार्थनाही लागलीच म्हटली जाते. अथर्ववेदांतर्गत श्रीगणपत्य-थर्वशीर्ष नामक स्वतंत्र सूक्त या देवतेच्या उपासकांच्या उपासनाविधीत प्राधान्य पावलेले आहे. त्यात ॐ गं गणपतये नमः असा गणपतिवाचक एकाक्षरात्मक मंत्र सांगून पुढे——

एकदन्ताय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि तन्नो दन्तिः प्रचोदयात् ।

अशी गायत्री छंदात सवितागायत्रीप्रमाणे गणेशगायत्री सांगून टाकली आहे
तसेच--

त्वं ब्रह्मा त्वं विष्णुस्त्वं रुद्रस्त्वम् इंद्रस्त्वम्
अग्निस्त्वं वायुस्त्वं सूर्यस्त्वं चंद्रमास्त्वं ब्रह्म
भूर्भूवस्स्वरोम्"

या मंत्रपक्तीने 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' सारखे गणराजाचे आदिदेवत्व
वर्णिलेले आहे. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय आरण्यकाच्या परिशिष्टरू
नारायणीय उपनिषदात---

तत्पुरुषाय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि तन्नो दन्तिः प्रचोदयात्।

असा जो मंत्र आहे, तो अथर्ववेदातील 'एकदन्ताय' इत्यादि मंत्राच्या अपेक्षे
पुरातन असून अथर्वमंत्र अलीकडचा असावा.

'गणानां त्वा' या ऋग्वेदीय मंत्राचा ऋषि गुत्समद असून 'ब्रह्मणस्पति
सूक्त' त्याला कसे प्राप्त झाले याची कथा मुद्गल पुराणात आहे असे सांगतात
गणेशपुराणांतहि ही कथा आहे. गणेशपुराणाच्या २१ व्या अध्यायात मुद्ग
ऋषींचे थोरपण श्रीगजाननाइतके वर्णिलेले आहे, (दक्षकृतमुदगलस्तुति पहा
गणेशपुराणाच्या ३६, ३७, ३८ या अध्यायात अनुक्रमे गृत्समदजन्म, त्याक
गणानां त्वा, मंत्राचे ऋषित्व आणि मंत्राचे सामर्थ्य (त्रिपुरासुरकथा)
विषय आले आहेत. शंकरकृत गजाननप्रीत्यर्थ तपश्चर्या व त्रिपुरवध अध्या
४३ ते ४७ याप्रमाणे या गणेशदेवाच्या अनेक अद्भुतरम्य कथा गणेश
मुद्गल पुराणात गायिल्या असून 'गणेशभागवत' नावाचा एक प्रचंड ग्रं
संस्कृत पुराण वाङ्मयात असल्याचे सांगतात. महाभारताच्या आरंभी त्य
ग्रंथाचा लेखक या नात्याने श्रीगणपतीच्या नावाचा निर्देश केलेला आहे.

या सर्व प्रमाणांचे येथे एकत्र संकलन एवढ्याचकरिता केले आहे की
ह्या योगे गणेशदेवतेचे प्राचीनत्व, श्रेष्ठत्व आणि अग्रपूजा-मान्यत्व हे शोधण्या
सहाय्य व्हावे. यापैकी अति-प्राचीन म्हणून ऋग्वेदाचा काल सोडून दिला

भारत-रचना-काल त्या मानाने आपणास जवळचा म्हणून तो घेतला तरी, कमीत कमी तीन हजार वर्षांपासून गणेश ही देवता विद्याधिपति व कलाधिपति या नात्याने आम्हा भारतीयांस माहीत आहे.

गणेशाचे सर्वश्रेष्ठत्व व अग्रपूजामान्यत्व हे गुण वरील ऋग्वेदोक्त मंत्रावरूनच सिद्ध होतात. कसे ते पहा — सदर मंत्रात – (१) गणानां गणपति, (२) कवीनां कवि, (३) उपमश्रवस्तमं, (४) ज्येष्ठराजं (५) ब्रह्मणां ब्रह्मणस्पते इत्यादि विशेषणे आवाहित देवतेस गौरवार्थ योजिली आहेत. त्यांचे अर्थ क्रमशः – (१) गणांच्या गणांचा पति म्हणजे समुदायांच्या अधिपतींच्या समुदायाचा अधिपति, (२) कवींचा कवी म्हणजे शहाण्यामधला शहाणा, (३) ज्यांची कीर्ति तुलनीय आहे अशांमध्ये अत्यंत श्रेष्ठ म्हणजे अनुपमकीर्तिशाली. (४) सर्व वडिलांहून वडील व श्रेष्ठांहून श्रेष्ठ – थोरांत थोर, (५) ब्रह्म म्हणजे व्यापक, विस्तृत–विशाल, प्रसृत–प्रशस्त अशा ज्या जड चेतन वस्तु त्यांमध्ये ज्या मोठ्या त्यांचा पति म्हणजे रक्षक–स्वामी–मालक, अक्षरसमुदभव ब्रह्म म्हणजे प्रकृति, (गीता अ. ३) व परमं अक्षरं ब्रह्म म्हणजे परमात्मा (गीता अ. ८) अथवा दासबोधात निरूपिलेली चौदा ब्रह्मे –त्यामध्ये जे अविनाशी ब्रह्म ते, असे आहेत. पहिल्या चार विशेषणपदांनी आवाहन करून व शेवटच्या पदाने संबोधून आमचे (स्तवन) ऐकणारा तू (आमच्या) वासना-इच्छा, आकांक्षांसह अथवा रक्षक साधनांसह म्हणजे शस्त्रांसह (आमच्या) घरात येऊन बैस असे गौरवपूर्ण निमंत्रण आहे. ह्या मंत्रात संबोधनार्थी 'ब्रह्मणस्पते' असे पद असल्यामुळे ही ब्रह्मणस्पतीची स्तुति आहे असे कोणी म्हणतात. किंबहुना, या सूक्ताला ब्रह्मणस्पतिसूक्त असेच म्हणतात. पण त्याचा विनियोग आज प्रत्यक्ष गणपति देवतेच्या आवाहनार्थ होत असल्याने व मंत्रात अगदी प्रारंभीच 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' असे गणपति शब्दानेच स्पष्ट आवाहन असल्याकारणाने हा मंत्र सांप्रत ज्या गणपतिदेवतेस उद्देशून उपयोगात आणतात, तिच्या समान धर्मी गुणांनी युक्त अशीच मूळ वेदकालीन देवता अथवा ब्रह्मणस्पति देवता समजत असले पाहिजेत. सूर्य या देवतेलाच स्थलकालादि उपाधिभेदाने किंवा अवस्थाभेदाने

इंद्र, मित्र, वरूण, अग्नि किंवा गुणभेदाने पूषा, विष्णु असे म्हटले आहे
त्यासारखे हे आहे. यज्ञामधून अग्निद्वारा देवतांना संतुष्ट करण्याची प्रथा माग
पडून प्राधान्यत्वे मूर्तिद्वारा देवताराधन करण्याची चाल पडताच ज्या देवत
मूर्ति घडल्या असतील त्यातच श्रीगणपति महाराज घडले गेले असतील की
नाही, हे सांगणे कठीण आहे. तथापि श्रीमत् आद्य श्रीशंकराचार्य यांच्य
कालात मान्यता पावलेल्या देवना पंचायतनात गजाननाचे स्वरूप काहीसे
निश्चित झाले की सोंड उजवीकडे मुरडलेली की डावीकडे अशा काही गोष्ट
विकल्पाने दृष्टीस पडतात, त्या विवाद्य आहेत.

आज कर्मांगत्वाने कर्मारंभी जे गणपतिपूजन होत असे त्यासाठी मूर्तीऐवज
सुपारीचाच उपयोग करितात. याचा भावार्थ गणपति देवता साका
(आकारनिष्ठ) मानण्यापेक्षा जेव्हा सगुण (गुणनिष्ठ) मानीत असती
तेव्हापासून म्हणजे आचार्यपूर्वकालातच श्रीगणेशास अग्रपूजेचा मान मि
लागला असावा. लौकिक व्यवहारात देखील सर्वश्रेष्ठासच अग्रमान देण्याच
परिपाठ आपण पाहतो आणि प्रस्तुत ऋग्वेदमंत्रातील देवता तर संघ-श्रे
आणि व्यक्तिनिष्ठ अशा शहाणपण, वडीलकी, व्यापकता व उरल्यासुरल्या स
गुणात अनुपमत्व म्हणजे आगळेपण इत्यादि गुणांनीही श्रेष्ठ मानिली असल्या
अग्रपूज्य ठरली ह्यात काही नवल नाही. किंबहुना त्या मंत्राचा शब्दा
स्वरूपबोधक नसून गुणबोधन आहे, हे आपण अवश्य लक्षात घेतले पाहि
मनाच्या श्लोकांच्या आरंभी समर्थ रामदास पुढीलप्रमाणे मंगलाचरण करता

गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणांचा ।।

याच दृष्टीने पुराणांतरी गणेशास 'गुणेश' असेही म्हटलेले आढळते.

जसे प्रत्यक्ष पूजेने कार्यारंभी मंगलाचरण करावयाचे तसेच देवतेच
स्तुतिस्तोत्राने मंगलाचरण करण्याचा प्रघातहि आपल्यामध्ये दिसून येतो. प
सर्वांत सोपा प्रकार 'स्वस्ति' शब्दाने कार्यारंभ, विशेषतः लेखनारंभ क
हा होय. स्वस्ति-सु-अस्ति–मंगल आहे, असे म्हणावयाचे. ह्या 'स्वस्ति'

जागा या मूर्तींनी पटकावली तेव्हापासून ते 'मंगलमूर्ति' नामाभिधान ावले. अशा पद्धतीने गणपति देवतेस अग्रपूजेचा बहुमान देण्याचा जो एक ाचीनांचा दंडक, तो महाराष्ट्रीय संतकवींनी इतका चोखळला, चोखपणे ाळला की, त्यामुळे गणेशविषयक सुंदर अलंकारिक मराठी वाङमय विपुल-ने बहरलेले दृष्टीस पडते.

गुणवत्तेप्रमाणे गणपतीच्या रूपाविषयी व जन्मकर्माविषयी पुराणांतरी विविध कथा आहेत. तो विष्णूचा अवतार आहे, शंकराचा पुत्र आहे, असे हटले आहे. त्यातच अशीही कथा आहे की, पार्वतीने आपल्या अंगाची मळी काढून एक बालकाकृति तयार केली. त्या बालकाचे नाक अतीव सुंदर होते. (गणेशपुराण) दुसऱ्या एकेठिकाणी, पार्वतीने हा पुत्र आपण न्हात असता रात कोणी येऊ नये यास्तव दार राखण्यास तेथे बसवला. त्याने अजाणपणे शंकरासही त्यावेळी घरात येण्यास प्रतिबंध केला. त्यांनी वस्तुस्थिती न जाणून रागाच्या भरात त्याला छाटून टाकले. पार्वती शोक करू लागली, तेव्हा आपली चूक लक्षात घेऊन शंकरांनी स्वत: नुकत्याच मारलेल्या हत्तीचे मस्तक त्या बालकाच्या धडावर बसवून दिले. सौंदर्यात १. तेजस्वी अंगकांति, २. उन्नत व विशाल भालप्रदेश, ३. चांगले कोरदार शेंडा असलेले सुंदर सरळ नाक, ४. पाणीदार डोळे व बारीक असले तरी भेदक दृष्टी इत्यादी लक्षणे मुद्रेवर असावी, असा सौंदर्योपासकांचा सामान्य संकेत आहे. सोंड हे हत्तीचे लूप लांबलेले पण अतितीक्ष्ण घ्राणेंद्रिय (नाक) आहे. कोणा भाविक भक्तास ी आवडून त्याने, हत्तीचे मस्तक गणपतीस लावल्याची उपर्युक्त कथा जमेस रून तशी मूर्ति पूजेस पसंत केली. जसे 'गगनसदृशं' म्हणजे आकाशाप्रमाणे अप्रमेय विशाल व्यापक, असे गुणविशेषण भगवान विष्णूस लावता लावता गगनाप्रमाणेच केवळ नव्हे तर मेघयुक्त गगनासारखी मेघश्याम, घनश्याम अशी विष्णुमूर्तिची अंगकांती भक्तजनांनी ठरवून टाकली! तसेच, हे गणपति मूर्तीचे गजाननत्व असावे, असा तर्क केल्यास तार्किकांचे समाधान होण्याजोगे आहे.

लेखाप्रभागी दिलेल्या पुराणोक्त मंत्राचा वाच्यार्थ आकारदर्शक आहे तसा न मानता लक्ष्यार्थाने गुणबोधक आहे तसाच घेतला तर त्याची संगति पूर्वोक्त

वैदिक मंत्राशी नीट लागते. नाहीतर, वैदिक मंत्राने उपास्याची स्तुति व लगेच पुराणोक्तीने शिव्या दिल्या नसल्या तरी कुचेष्टा करावयाची हे अप्रयोजकपणाचे ठरले असते. शिवाय, खुद्द त्या श्लोकातील तिसऱ्या पदाशी आधीच्या दोन पदांचे वाच्यार्थ विरोधी पडतात हे वेगळेच! अर्थात त्याचे अर्थ पुढीलप्रमाणे अनेकांनी लाविले आहेत. तेच आपणही ग्राह्य समजले पाहिजेत–

१. **वक्रतुण्ड** – वक्रान्-विघ्नान्-विघ्नकर्तॄन्-शत्रून् वा तुण्डयति असौ– विघ्नांना किंवा विघ्नकर्त्या शत्रूंना तोडून टाकणारा, त्यांचा नाश करणारा. वक्रतुण्ड म्हणजे वाकडतोंड्या नव्हे.

२. **महाकाय** – भव्य शरीरी-शक्तिसंपन्न, विशाल छाती, बळकट खांदे, प्रचंड बाहू, खंबीर पाय इत्यादींनी युक्त असा ढेरपोटचा नव्हे.

३. **कोटि सूर्यसमप्रभ** – अनंत सूर्याप्रमाणे तेजस्वी किंवा पाठभेदाने सूर्य-कोटिसमप्रभ – सूर्य–कोटि ( जाति, वर्ग, ) सम-प्रभ – सूर्यजातिसम-वर्गीय-प्रकाशाचा. अशा देवा, सर्व कार्यात सर्वकाळ मला निर्विघ्न संकटरहित कर.

येथवर गणपतीसंबंधी वेदोक्त व पुराणोक्त मंत्राधारे त्याचे गुण, सर्व कार्यात अग्रपूजेचा मान त्यास का व कधी पासून मिळाला, त्याचा पुराणात वर्णिलेला आकार त्यास कसा प्राप्त झाला, इत्यादींचे विवेचन संक्षेपतः केले. आता लोकांत पूजित असलेल्या गणेशमूर्तीचे विस्तारतः निरूपण करून अखिल हिंदुसमाजात गणेशाविषयी आदरबुद्धि किती खोल व व्यापकपणे रुजलेली आहे, याची काही प्रमाणे दाखवून शेवटी उपासनेत आमचे काय चुकते याचाही विचार केलेला आहे. श्रीगणपतीचे उत्तमांग (गळ्यासुद्धा वरचा सर्व भाग ) हत्तीचे आहे. अर्थात कान सुपासारखे, डोळे बारीक पण नजर तीक्ष्ण व सोंड हेच नाक असून चार हात, ज्ञानेश्वर महाराजांचा वाङ्मयगणेश सहा हातांचा आहे व त्यास अनुलक्षून रा. व. चि. वि. वैद्य यांनी षड्भुज गणेश-मूर्ति कांगडा जिल्ह्यातील बैजनाथ गावी ( पंजावमध्ये ) असल्याचे लिहिले आहे. या मूर्तीच्या हातात पाश, अंकुश, हत्तीचा मोडलेला दात, ही आयुधे

असून एक हात भक्तांना वर अगर अभय देण्याकरिता मोकळा आहे. अन्यत्र पाशाऐवजी परशुफरशी कुऱ्हाड व मोकळ्या हातात मोदक असे वर्णन आहे. गणपतीचा एक दात बाहेर दिसतो. यावरून त्याला एकदंत हे विशिष्ट नाव पडले आहे. त्याला तांबडे वस्त्र, तांबडे गंध, तांबडे फूल प्रिय आहे. दूर्वा, ऊस, लाह्या व मोदकही प्रिय आहेत. त्याचे पोट मोठे आहे. त्याचे वाहन व ध्वजचिन्ह उंदीर आहे. सहा हातांच्या गणेशमूर्तीच्या तीन हातात परशु, अंकुश व मोडका दात ही आयुधे व एका हातात मोदक, एकात कमल व एक हस्त अशी योजना ज्ञानेशांनी केली आहे. हे गणपतीचे साकार वर्णन झाले. हत्ती शक्तिसंपन्न व चतुर असतो. मोदकः (मोदं करोति असौ) सुग्रास अन्नाचा प्रतिनिधी. 'अन्नं ब्रह्मेति व्यजानात्' अशी श्रुति आहे, "अन्नासाठी दाही दिशा। मज फिरविशी जगदीशा ।।" अशी आर्त भक्ताची पहिली आरोळी आज तरी जगाची सारी हालचाल जीवनकलहाच्या पायी अर्थात् मोदक हा पहिला वर. तो मिळविण्याचे व रक्षण्याचे साधन परशु. साधन हाती घे व उद्योग कर. 'उद्योग' हा दुसरा वर. "आधी मेळवी मग जेवी। गुंतल्या लोकास उगवी। शरीर कारणी लावी। काही तरी।" हा भाव दर्शविला. किंवा आयुधे दुष्ट दंडनार्थ–लंबोदर आहे. भक्तापराध सर्व पोटात घालून घेणारा असा अत्यंत क्षमाशील आहे. भक्तांविषयी क्षमाशील अभक्त दुर्जनांना दंडनशील आहे. सारांश, सगुण व साकार मिळून गणपती शास्त्री तसाच शस्त्रीही आहे. श्रीकृष्ण आहे व अर्जुन पण आहे, ब्राह्मण, क्षत्रिय दोन्ही आहे.

हा सर्वांचा देव आहे. म्हणून पूर्वापार सर्वांचे पूर्वज त्यास पूजित आले आहेत. तसेच आपण सर्वांनी त्यास पूजिले पाहिजे, कारण वैदिक मंत्रानुसार, श्रीगणपति सरसेनापति आहे व मुत्सद्दीही आहे. दिगंतकिर्ती गाजलेला व सर्वात वडील (पुराण पुरुष) म्हणजे अनुभवपूर्ण आहे. चार मुख्य वेदांप्रमाणे आयुर्वेदविशारद, धनुर्वेदपारंगत (युद्धकला निपुण) गांधर्ववेद- गायनविद्यापटु, स्थापत्य व शिल्पकला कुशल, चौदा विद्यांचा गोसावी, चौसष्ठ कलांचा स्वामी असा आहे.

ह्याहून सरस उपास्य कोणते असू शकेल ? कोठे कोठे गणेशमूर्तीच्या दो
बाजूस दोन स्त्रिया असतात. त्या ऋद्धि व सिद्धि होत. चित्रात क्वचित् आ
स्त्रिया असतात त्या 'अष्टनायिका'. त्या अष्ट महासिद्धीच्या वाचक आहे
त्याच्या त्या बायका नव्हेत. कोणास आश्चर्य वाटेल पण आमच्या माहिती
प्रमाणे गणपतीस बायको नाही व सरस्वती तर त्याची बायको नाहीच नाही
नित्य वर्णनाच्या साहचर्याने आपण सरस्वतीस गणपतीची पत्नी मानतो,
मात्र खरे पण भाद्रपद मासात गणेशपूजेत दुर्वायुग्मे वाहण्याचा विधि आ
त्यामध्ये 'पत्नीहीनाय नमः दुर्वायुग्मं समर्पयामि" असे एक नाव येते. दुसरे अ
की, सपत्नीक देवांची नावे पार्वतीपरमेश्वर, लक्ष्मीनारायण, सीतारा
भवानीशंकर, रुक्मिणीपांडुरग, अशी योजावी, असा नियम गीर्वाणलेखकांनी
पाळलेला दिसतो. गणेश व शारदाचे असे सजोड नाव कोठे सहसा आढळ
नाही. श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । अशी स्वतंत्र नावे योजून त्यांचा
अनुक्रम देखील ठरविलेला आहे. खेरीज ब्रह्मकुमारी शारदा व सरस्वती हि
लग्न झाल्याचे कथानक नाही. आता लक्षणेने गणपतीस अष्टमहासिद्धि कि
ऋद्धिसिद्धी यांचा पति, नायक, म्हटले तर वेगळे. परंतु त्यासुद्धा त्याच
गणपतीच्या दासी, सेविका, आहेत. तात्पर्य, गणपति ही देवता ब्रह्मचर्य-व्रतधा
दिसते. गणपतीसबंधी अखिल जनतेत असलेल्या सखोल व व्यापक आद
बुद्धीची निदर्शक काही प्रमाणे येथे देतो —

(१) कलौ चण्डीविनायकौ हे लोकप्रसिद्ध पुराण वचन.

(२) नेपाळपासून रामेश्वरपर्यंत व काशीसारख्या विख्यात क्षेत्रात त्य
महत्त्वाचे स्थान.

(३) हिंदुस्थानात खेडोपाडीसुद्धा शिवलिंग व मारूतीप्रमाणे गणेशमूर्ती

(४) घराच्या दाराच्या चौकटीच्या वरच्या बाजूस 'गणेशपट्टी'
विशेषनाव व मालक हौशी असेल तर गणेशपट्टीवर गणेशाकृति खोद
घेतो.

(५) मंगल कार्यात ठळक जागी गणपतीचे चित्र रंगविणे. निदान 'श्रीगणेशाय नमः', 'श्रीगजानन प्रसन्न', 'श्रीसिद्धिविनायकः वरदः भवतु' इ. लिहिणे.

(६) मूर्तिशिल्पात ऋद्धिसिद्धीसह गणेशशिल्प किंवा एकटे गणेशशिल्प असते.

(७) पौराणिक नाटकात प्रथम गणेशदर्शन व सूत्रधारकृत गणेशस्तवन.

(८) सूत्रबाहुलीच्या खेळात आरंभी गणेशमूर्ति दाखविणे.

(९) पारमार्थिक किंवा संतवाङमयाप्रमाणे, ऐहिक आणि निव्वळ रंगेल अशा पोवाडे, ग्रामगीते, स्त्रीगीते, लावण्या, यामधूनदेखील प्रथम गणेशस्तुतिपर थोडीफार पद्यरचना असावयाचीच.

(१०) गणेशचतुर्थी ( भाद्रपद शु. ४) च्या दिवशीचे प्रतिवार्षिक श्रीगणेश-पूजन हिंदूस्थानातील बहुतेक प्रांतात होते. महाराष्ट्रात तर सर्व जातीच्या प्रत्येक हिंदु कुटुंबात हे पार्थिव ( मातीच्या ) गणेशमूर्तीचे अर्चन होतेच होते. खेड्यात शुद्ध काळचा मातीचे कुंभारी ताजे ( ओले ) गणपती पूजतात.

(११) लहान मुलींच्या दरसाल हस्तनक्षत्राच्या वेळी चालणाऱ्या 'हादगा' समारंभाची जी फेर धरून म्हणावयाची गाणी आहेत त्यात देखील पहिल्या गाण्यात . . .

" ऐलम्मा पैलम्मा गणेश देवा ( स ) । माझा खेळ मांडू दे ( म्हणजे) करिन तुझी सेवा ।। " अशी विनवणी करावयास त्या आर्यबाला चुकत नाहीत. ह्या समारंभाचा व अर्थात गाण्याचाही उगम कर्नाटकात आहे. याची ओळख ऐल अम्मा, पैल अम्मा व कदाचित मांडू दे ( माडुबे ) या तीन शब्दात सापडते "ज्याच्या, ( अलिकडे व पलीकडे अम्मा – आई – देवी म्ह. ) दोन्ही बाजूस ऋद्धिसिद्धि आहेत अशा गणेशदेवा, माझा हा खेळ ( करू दे ) निर्विघ्नपणे शेवटास जाऊ दे म्हणजे मी तुझी सेवा करीन." असा नवसवजा वर येथे मागितलेला दिसतो.

(१२) आमच्या देशातल्या परधर्मीय लोकांपैकी अगदी अडाणी माणसास इतर काही नसले तरी आमचा 'गनेशा' म्हणजे गणेशदेव माहीत असतो गणेशास भालचंद्र असे पुराणप्रसिद्ध नाव आहे. त्याने प्रबल गजासुराचा किंव सिंदुरासुराचा निःपात केला अशी कथा आहे. त्याने परिधान केलेले सर्व पदार्थ गंध, फूल, उटी, वस्त्रे सर्व आरक्तवर्णीच का असावी व तो स्वतः एवढ विशालदेही असता उंदरासारखे चिमुकले वाहन त्याने कसे मान्य केले, याच आपण विचार करू लागलो म्हणजे कोणत्या उत्साहवर्धक सृष्टिदृश्याचे हे रूप असावे याच्या चिंतनाकडे लक्ष्य लागते. थंडीचे व दीर्घ रात्रीचे दिवस असावे त्यातहि (सिनीबाली) सचंद्र अमावास्या उजाडण्याचा समय असावा, आपण एखाद्या प्रसन्न व प्रशांत जलाशयासन्निध उभे असावे अथवा किंचित उंचश शिलाखंडावर बसलेले असावे, मंद शीतल अनिल-लहरी-आल्हादवीत असावी मधून मधून उमलत्या फुलांचा सुगंध सुखावीत असावा, प्रभातकालीच शब्द करणाऱ्या पक्ष्यांखेरीज व शेतकऱ्यांच्या गाण्याखेरीज चित्त-विक्षेपास दुसरे कारण नसावे, पूर्व-दिशा तांबूस झालेली असावी व रात्रीच्या भयाण काळोखा तून मुक्त होण्याची आशा पल्लवू लागावी. अशावेळी एकाग्रतेने पूर्वेकडे पहात रहावे तो प्रतिक्षणी, स्वतःसुद्धा सारी सृष्टि सचेतन व सोत्साह होत आहे असा अनुभव येतो. अंधःकार युद्धातून पळणाऱ्या योद्धयाप्रमाणे प्रतिपळी हटतीसा लयपास पाहातोसा दिसतो, तर उलट, प्राची-प्रभा विजयी वीरा प्रमाणे प्रतिपदी नवानवा प्रदेश आक्रमीत आहेशी वाटते. मूषक, चोर, घुबडे निशाचर प्राणी हेहि काळोखाच्या जगात तोंडे खुपसावयास जातात, क्षीण चंद्राची एक एक कला आकाशात दृग्गोचर होत असताच उर्विमंडल भेदून जणूकाय, बाल-सूर्याची प्रभा सर्वत्र फाकते. मस्तकावर चंद्राची कोर, सभोवा लालेलाल रंग पसरलेला, हत्तीच्या सोंडेसारखे आपले कर म्हणजे किरण जिकडे तिकडे फेकणारा, दिशा हेच ज्याचे कान, दशदिशा प्रकाशाने भरून टाकणाऱ्या अशा बालार्क रविमंडलालाच गणपति असे म्हटले, त्याच्या उदयाने विघ्ने पळाली. अंधःकार गजासुर मारला गेला व त्याच्या रक्ताने माखलेला आमचा देव सिंदूरवर्ण शोभू लागला. सर्व लोक निर्भयपणे आपापल्या उद्योगास

लागले, आता हा असेपर्यंत मूषक म्हणजे चोर अगर चोराप्रमाणे हल्ला करणारा कोणताही प्राणी (त्यातच उंदीर आले) उपद्रव देऊ शकणार नाहीत. उंदीर हे नुसते उपलक्षण, त्याला वाहन करून सर्व प्रकारच्या मूषकांवर त्याचा दबाव, दरारा, वचक असल्याचे दर्शविले. "तत् सवितुः देवस्य वरेण्यं भर्ग्यः धीमही यः नः धियः प्रचोदयात्" असे विद्वान् ब्राह्मणांनी त्याचे स्त्रोत केले. क्षत्रिय राजांच्या सैनिकांनी त्याला वीराभिवादन (मिलिटरी सॅल्यूट) केले. वैश्यांनी रत्नदीप ओवाळले व गोदुग्धाचा नैवेद्य समर्पण केला आणि शूद्रांनी साष्टांग प्राणिपात करून ते चारी वर्ण एक विचारे आपापल्या उद्योगास लागले.

**श्रीज्ञानेशांचा वाङ्मय गणेश**

श्रीज्ञानेश्वर महाराज –

ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ॥
जय जय स्वसंवेद्या ॥ आत्मरूपा ॥ १ ॥

या ओवीने पहिला नमस्कार करून "म्हणतात–– हे आद्या, हे वेदप्रतिपाद्या, हे स्वसंवेद्या, आत्मरूपा, तुझा जयजयकार असो. देवा, तूच गणेश आहेस म्हणून मी निवृत्तिदास प्रार्थना करितो की, जी–अजी–हे देवा, माझ्या (पुढील स्तवना) कडे लक्ष द्या. निःशेष वेद म्हणजे ज्ञानदायी वाङमय, हीच तुझी सुंदर मूर्ति आणि वर्ण हेच तुझे निर्मल शरीर आहे, स्मृति हे तुझे रेखीव अवयव असून सुंदर अर्थ किंवा अलर्थाकार हेच तुझ्या मूर्तीचे सौंदर्य-वैशिष्टच आहे. अठरा पुराणे हे तुझे रत्नालंकार असून सुरेख शब्दरचना हीच सिद्धात्नरत्नांस कोंदणे शोभत आहेत. उत्तम काव्य हे तुझे वस्त्र असून अलंकार-शास्त्ररूपी रंगाने रंगविल्यामुळे त्याला भरपूर तकाकी आली आहे. काव्य-नाटकादि कैतुकावह ललितवाङमय या रूणझुणणाऱ्या घागऱ्या असून त्यामधून सुंदर अर्थध्वनि उमटत आहेत. मोठ्या मार्मिकपणे बारीक कलाकुसर पाहू जाता असे दिसते की, तात्विक सिद्धान्ताची रत्ने योग्य शब्दांच्या कोंदणात कुशलतेने बसविलेली आहेत. व्यासवाल्मिकादिकांच्या बुद्धीचे मनोहर कटिसूत्र (त्वां धारण केले) असून त्याची पुढे लोंबणारी लांब टोके अतिशय तेजस्वी

आहेत. ज्यांना सहा दर्शने असे म्हणतात, तेच (देवा तुझे) हात आहेत. हे
दर्शने परस्परविरोधी आहेत, हा भाव त्या हातातील वेगवेगळ्या आयुधांनी
(व इतर वस्तूंनी) चांगला व्यक्त होतो. न्यायदर्शन हा परशु नीतिभेद (?) हा
अंकुश, वेदान्त (उत्तरमीमांसा) हा अति गोड असा मोदक, खंडित बौद्धम-
(वैशेषिक) हा (एकाहाती धरलेला) मोडका (हत्तीचा) दात, सत्कार्यवा
किंवा सत्तर्कवाद हा कमल धारण केलेला वरदहस्त व धर्मप्रतिष्ठा (पूर्व
-मीमांसा) तो (तुझा) भक्तास अभयदायी हात होत. महासुखदायक, अ
निर्मल विवेक हीच सरळ सोंड, संवाद तो शुभ्र एकदन्त व ज्ञानरूपी सूक्ष
दृष्टीचा असा तू विघ्नराज देव आहेस. 'मला असे वाटले' (ज्ञानेश्वर महारा
सांगतात) की, पूर्वोत्तर-मीमांसा ह्याच तुझ्या कानाच्या जागी आहेत. आ
तुझ्या गंडस्थलातून बोधमद पाझरत असून मुनिभ्रमर तो सेवन करीत आहे
तत्त्वार्थरूप दीप्तिमान पोवळे व द्वैताद्वैतसिद्धान्तरूपी दोन्ही गंडस्थळे गजमस्तका
शोभा देत आहेत. देवा, तुझ्या मुकुटावर उदारज्ञान-मकरंदाने थवथवलेल
उपनिषदे ही सुगंध कमले छान दिसतात. (ॐकारामधील) 'अ' कार
दोन पाय 'उ' कार हे विशाल उदर आणि 'म' कार दर्शक अनुस्वार मह
मण्डल हे, प्रभो (तुझे) मस्तक होय. ह्या तीन मात्रांत मिळून अवघे शब्दब्र
साठवलेले आहे, तेच आदिबीज मी येथे ग्रंथारंभी सद्गुरूच्या कृपेने वंदि
(नमनरूपाने गायिले) आहे.

(ज्ञानेश्वरी अध्याय पहिला – ओव्या १ ते २०)

**श्रीएकनाथकृत मंगलाचरण**

"श्री एकदंता तुला नमन असो. एकत्वाने असणारा तूच आता (सृ
उत्पन्न झाल्याच्या स्थितीत) एकाचेच अनेक पदार्थ झालेले दाखवतोस, प
त्यामुळे तुझे एकत्व मोडत नाही. तुझ्यात सर्व चराचर वस्तु राहतात म्हण
तुला लंबोदर म्हणतात व याच कारणास्तव तूच खरोखर सर्वांचा सोयरा म्हण
सखा नातेवाईक आहेस. तुला जो मनुष्य पाहतो म्हणजे जाणतो त्या
संसार–जगातले वास्तव्य–सुखमय होते. यास्तव, तुला विघ्नहर हे न
सन्मान दर्शक असे शोभते. आनंद हेच गणरायाचे मुख, धर्म, अर्थ, का

मोक्ष, हे चार पुरुषार्थ हेच तुझे चार हात. आपल्या तेजाने चंद्रसूर्यादिकांना प्रकाशविणारा असा तुझा तो एकदन्त झळकत आहे. पूर्वोत्तर मीमांसा हेच तुझे कान होत. परापश्यंती, मध्यया इत्यादी चार वाणी तुझ्या जिव्हाग्री हात जोडून सेवेस सादर आहेत. स्वत:सह अखिल सृष्टीचा पसारा एकेच वेळी आत्मत्वाने पहाण्याची जी (सहज) स्फूर्ती तीच हे विनायका तुझी सुख-संतुष्ट अशी मनोरम दृष्टि आहे. (चिर) सुख हेच तुझे मोठे पोट, (अखंड) आनंद हाच बेंबीचा सुगोल भोवऱ्यासारखा आकार व बोधाचे (ज्ञानाचे) दृढ बांधिलेले कटिसूत्र मोठे शोभा देत आहे. शुद्ध सत्वगुणाचे पांढरे शुभ्र वस्त्र तू नेसला आहेस व सोन्याचे अलंकार तुझ्या (अंगसंगा) मुळे शोभतात. अथवा, सोज्वळ शब्दघटित काव्यालंकार तुझ्या वर्णनानेच खरे शोभतात. प्रकृति, पुरुष, या दोन पायांची मांडी घालून सहजासनी बसलेला तू अतिशय सुरेख दिसतोस. क्षणभर तुझी भेट झाली तर शोधू गेले तरी विघ्ने आढळावयाची नाहीत, संसाराचा पाश तू तोडतोस तोच तुझा परशु होय. ज्या भक्ताचा भाविकपणा तुला आवडला त्याचे संसार-कोडे (संकट) सोडवून निजबोध (आत्मज्ञान) अंकुशाने त्याला तू आपणाकडे ओढून घेतोस (आत्मरत करतोस) जो खरोखरीच अगदी वासनारहित झाला त्याला स्वानंदाचे मोदक देऊन तूच आपल्या हाताने सुतृप्त (अधिक सुखी) करतोस. सूक्ष्माहून सूक्ष्म, त्यामध्ये तुझा वास म्हणजे रहिवास ( अणोरणीयान् ) यामुळे तुला 'मूषकवाहन' हे नाव शोभते. पहावे तर तू पुरता नर (नराकृति) नाहीस व पुरता ( कुंजराकृति ) हत्तीही पण नाहीस. याचा अर्थ 'तू व्यक्त (क्षर) व अव्यक्त (अक्षर) याच्या पलीकडे म्हणजे निर्विकार असा (पुरुषोत्तम) आहेस. असे जाणून तुला या (अध्यात्म) ग्रंथाच्या सिद्धर्थ सादर नमन केले. (पण नाथच विचारतात–) अशा या गणनाथा, या ग्रंथकथाविस्तारार्थ अकर्ताच कर्ता झालेला जो मी तो तुला 'मी' या वेगळेपणाच्या भावनेने कसा नमस्कार करणार?"

( नाथ भागवत अध्याय पहिला ओव्या २ ते १६ )

### श्रीसमर्थांचा चौदा विद्यांचा गोसावी

"देवसमुदायाचा (समाजाचा) पुढारी, सर्व प्रकारच्या सिद्धी देणारा, अज्ञाननाशक ज्ञानस्वरूपी देवा, तुला नमस्कार असो. तू कृपा करून माझ्या

हृदयात सदासर्वदा स्फूर्तिरूपाने राहून मला मुखदुर्बला वेडचाला बोलण्याचे सामर्थ्य दे. (कारण) जर तुझी कृपा झाली तर सर्व भ्रम नाहीसे होऊन विश्वभक्षक काळाच्याही तडाक्यातून सुटून कीर्ति रूपाने अमर होता येईल. तू कृपा केलीस म्हणजे संकटे भिऊन पळून जातात म्हणून तुला विघ्नहर म्हणतात. आम्ही अनाथ असलो तरी आईच्या पंखाखाली वावरणाऱ्या पिलांइतके निर्भय वाटते, हरिहरादि देवहि आमच्या वाटेस जात नाहीत. (पर्याय अर्थ यास्तव, हरिहरांसुद्धा (सारे) देव देखील तुला नमस्कार करतात.) मंगल-निधे, तुला नमस्कार करून कार्यारंभ केला म्हणजे सर्व अडथळे दूर करून कार्यसिद्धि होते, तुझ्या स्वरूप-चिंतनाने इतके समाधान वाटते व डोळे भरून तुझी मूर्ति मनी मानसी ठसली की, मति गुंगच होते! (पर्याय सर्व शरिरातील मनःशक्ति फक्त डोळ्यात येऊन राहते.) तू–तुझे–रूप अत्यंत सुंदर असून तुझे नृत्य नैपुण्य पाहून देवही तटस्थ होतात. तू नेहमी ध्यानमग्न सानंद हर्षभरित (मदोन्मत्त हत्तीप्रमाणे आपल्याच डौलात असणारा) असा सुप्रसन्न (वृत्तीत) असतोस. रूप भव्य, शरीर बळकट व धिप्पाड, (त्यास साजेसे) मस्तकहि विशाल, (शक्ति व युक्तिसामर्थ भरपूर) व सिंदूर तिलकाने शोभिवंत दिसते. तुझ्या गंडस्थलामधून स्रवणारा मद अति मधुर व सुगंधयुक्त असल्यामुळे भुंगे त्यावर गुंगारत घिरट्या घालीत असतात. तुझी सोंड सुरेख बाक घेऊन मुरडलेली, भालप्रदेशावरील शोभणारा उंच भाग, मधून मधून मंद मंद सात्विक रस गाळीत असलेला किंचित् लांब असा खालचा ओठ, चौदा विद्यांच्या प्राविण्याचे तेज मुखावर व्यक्त झळकत असून तुझ्या बारीक डोळ्यांची धूर्ततादर्शक चंचलता व लवलवीत कानांची हालचाल ही मोठी मनोहर आहेत. तुझ्या मुकुटावर जडलेल्या नानावर्णाच्या रत्नांच्या रंगदार प्रभा चहूकडे पसरतात व कुंडलावर बसविलेले इंद्रनीळ फारच चमकतात. एकच पांढरा स्वच्छ दात रत्नजडित सोन्याचा पट्टा व त्याला जडवलेली लहान लहान पदके, तसेच तुझे ते काहीसे पुढे आलेले गुबगुबीत पोट, नागाकृति कमरबंद व रूणझुणणाऱ्या त्याच्या घागऱ्या ह्यांची मोठी मौज दिसते. चार हात, नेसता पिंताबर, कमरेसभोवतीचा नागबंद, त्याची फणा, त्याच्या (चंचल) जिभा, (टकमक पाहतातसे वाटणारे) डोळे असा तो बेंबीशी

वाटोळे घालून बसलेला दिसत आहे. नागबंदापर्यंत लोंबणाऱ्या नानाप्रकारच्या पुष्पमाला व छातीवर रूळणारे जडावाचे पदक फारच छान दिसते. चार हातात अनुक्रमे फरशी-कुऱ्हाड (परशु), कमल, अंकुश आणि तुला अत्यंत आवडणारा मोदक ही तू धारण केली आहेस. नटाचा कलायुक्त अभिनय, नृत्याच्या अनेकगती व छंद टाळ मृदंग व दुसरे वाद्यविशेष यासह केवळ मूर्तिमंत सौंदर्य व सुलक्षणी असा तू अत्यंत अस्थिरपणे व वेगाने नृत्यगती दाखवीत असता बाहुभूषणे व पदभूषणे म्हणजे अंगद्या नुपुरे आणि कमरपट्ट्याच्या घागऱ्या यांचा मंजूमंजुल झणत्कार चालू झाला म्हणजे भगवान शंकराच्या सभागृहात फार आनंद माजे व तुझ्या नेसल्या पांघरत्या रेशमी जरतारी वस्त्रांची प्रभा जिकडे तिकडे फाकत असे. या तुझ्या स्तुतिस्तोत्राने मला या साहित्यसेवेत (काव्य रचण्यास) अष्टमहासिद्धीही सहज सहाय्य करतील. अशा सर्वांगसुंदर सकल विद्याधीश देवाला माझा उद्भावयुक्त साष्टांग नमस्कार असो. गणेशगुणचिंतनाने भ्रांतचित्त पुरूषांस उत्तम बुद्धि लाभेल व ह्या देवाचे गुणानुवाद श्रवण केल्यास सरस्वती प्रसन्न होईल. साक्षात ब्रह्मदेवासारखे देव ज्याला वंदितात, तेथे पामर मानवाचा पाड किती? (एवढ्यासाठी मंद बुद्धीच्या माणसाने गणेशाचे चिंतन करावे) जे अवलक्षणी, मूर्ख, सर्व बाजूंनी हीन, ते देखील उद्योगी, साक्षेपी व (हाती घेतलेल्या) सर्व विषयात प्रवीण—पारंगत—होतात. असा परम समर्थ, भक्तांच्या सकल कामना पूर्ण करीलच करील. प्रचीती पहा. मी स्वत: भजनस्वार्थ साधला (कारण पुराणे सांगतात) 'कलौचण्डीविनायकौ' कलियुगात देवी व गणपति ह्या देवता शीघ्र फलदायी होतात याचा प्रत्यय मला आला. 'असा हा मंगलमूर्ति गणेश,' श्रीसमर्थ म्हणतात, 'तो मी, मनात गरभार्थप्राप्तीची (प्रतिपादनाची) इच्छा धरून येथे (ग्रंथारंभी) दुसऱ्या समासात (माझ्या) बुद्धिसामर्थ्यानुरूप आळविला आहे.

(दासबोध, अध्याय पहिला, दशक दुसरा, ओव्या ३०)

### विद्यावंताचा पूर्वज

"त्रिनेत्र, एकदन्त, गजानन, चतुर्भुज, परशुधारी हा सकल विद्वानांचा पूर्वज (अग्रगण्य) आहे. ज्याप्रमाणे कुबेरापासून द्रव्य, वेदांतून परमार्थ किंवा

लक्ष्मीमुळे भाग्यप्राप्ती होते, त्याप्रमाणे आद्य मंगलमूर्तिपासून सर्व विद्या झाल्या व त्यामुळेच कवित्व-लाघव किंवा गद्यप्रबंध सत्पात्रसन्मान्य ठरले. जशी श्रीमंतांची मुले नाना भूषणांनी भूषविलेली सुंदर दिसतात, तसेच (आम्ही) कवि ह्या मूळ पुरुषाच्या कृपेने शोभा पावतो. अशा विद्याप्रकाश-युक्त पूर्णचंद्र गणेशास पाहूनच ज्ञानसमुद्रास अमाप भरती येत असते. तोच सर्वकर्तृत्वाचा प्रारंभ, (प्रकृति पसाऱ्याचा) मूळ पुरुष, मूळ आरंभ, स्वयंभू व सर्वश्रेष्ठ आणि आद्यन्त राहणारा आहे. जसे सूर्यामुळे मृगजळ त्याप्रमाणेच त्याची मानसकन्या प्रमदा शारदा ही समजा."

(दासबोध सातवा दशक पहिला, संस्कृत ओव्या १ ते ७)

याचप्रमाणे मुक्तेश्वर, श्रीधर, दासोपंत, महिपति इ. अनेक संतकवींनी आपापल्या ग्रंथारंभी सुंदर गणेशस्तवने केलेली आहेत.

**आणखी दोन वैदिक मंत्र**

ॐ ॥ "नि पुसीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कविनां । न ऋते त्वत्रि यते किंचनारे महाअर्क मद्यवन् चित्रमर्च ॥"

(ऋग्वेद संस्कृत अष्टक ८, अध्याय ६, वर्ग १३)

अर्थ– हे गणपते (आम्हा स्तोत्र) गणांमध्ये (स्तुतिश्रवणार्थ) येऊन बैस. तुला प्रज्ञावंतामध्ये अतिशय प्रज्ञावत् मेधावी म्हणतात (आणि) तुझ्यावाचून जवळचे वा दूरचे कोणतेच कर्म केले जात नाही. म्हणून हे इंद्र (हे धनिन्) आमचा हा मोठा यज्ञ किंवा समुदाय अथवा पुष्कळांचे स्तोत्र (महाअर्क) नानारूप शोभिवंत–कर अथवा शोभिवंत करून आमच्या शब्दाचा आदर कर."

"स इज्जनेन स विशास जन्मना स पुत्रैर्बाजि भरते धना नृभि. । देवानां य: पितरमा विवासति श्रद्धा-मना हविषा ब्रह्मणस्पति.

(ऋग्वेद संकृत अष्टक २, अध्याय ७, वर्ग ५)

अर्थ – "श्रद्धायुक्त होत्साता तो यजमान, देवांचा पालक (पिता) असा जो ब्रह्मणस्पति, त्याला यज्ञिय द्रव्याने सेवितो (संतुष्ट करतो) तोच

परिचारकांच्या सहाय्याने (नृभिः) अनेक प्रकारची धने (धनान्-धनानि) मिळविती (व) सर्व लोकांसह, प्रजा बंधुजनांसह मुलांबाळासह, जन्मना (आजन्म असा काय) (वार्ज-अन्नं भरते) (सुखाने) अन्नाचा उपभोग घेतो (जगतो.)

वरीलपैकी पहिला मंत्रही कोठे कोठे गणपतीच्या आवाहनार्थ म्हणतात. ह्यात फक्त 'गणपति' असे एकच पद आहे. (ब्रह्मणस्पति पद नाही.) हा या मंत्राचा विशेष आहे. दुसरा मंत्र, संहितेत 'गणानां त्वा' मंत्राला जवळचा असून त्यात ब्रह्मणस्पति देवतेच्या सेवेचे उत्कृष्ट फल वर्णिलेले आहे.

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

## श्रीगणेशमूर्ती (एकवीस प्रकार तितकीच नांवे)

प्रा. बाळकृष्ण शेजवलकर

गणेशोत्सवास सार्वजनिक स्वरूप देऊन लोकजागृतीचे तसेच लोकशिक्षणाचे कार्य सुरू करण्याचे श्रेय लोकमान्य टिळक यांना आहे, ही गोष्ट सर्वांस सुपरिचित आहे. गणेशोत्सव साजरा करण्याच्या या नव्या स्वरूपामुळे शिल्पकारांना गणेशमूर्ती बनविण्यास उत्तेजन मिळाले. अनेक प्रकारच्या गणेशमूर्ती या उत्सवातून लोकांच्या नजरेत पडू लागल्या. शिल्पकारांच्या कल्पनेला व शिल्पकौशल्याला त्यामुळे खूपच वाव मिळाला. प्राचीन काळातही श्रीगणेशाच्या अनेकविध मूर्ती होत्या असे आढळते. प्राचीन वाङमयात या मूर्ती कशा तयार कराव्यात, त्यांच्या हातात काय काय वस्तू असाव्यात, त्यांना कोणता रंग असावा, किती हात असावेत इत्यादी तपशील आढळतो. तद्नुसार श्रीगणेशाची निरनिराळी नावेही ठेवलेली आढळतात. गणेश जन्माच्या कथाही अनेक

आहेत. या लेखात या प्राचीन मूर्तीची नावे व त्यांच्या शिल्पासंबंधी माहिती देत आहे. गणेशभक्तांचा व शिल्पकारांना ती मोलाची वाटेल.

श्रीगजाननाच्या मूर्ती एकूण एकवीस प्रकारच्या आहेत व त्यांची नावेही तितकीच आहेत. ही नावे अशी–

(१) बाल गणपती, (२) तरुण गणपती, (३) भक्ति विघ्नेश्वर, (४) वीरु-विघ्नेश, (५) शक्ति गणेश, (६) लक्ष्मी-गणपती, (७) उच्छिष्ट गणपती, (८) महागणपती, (९) ऊर्ध्व गणपती, (१०) पिंगळा गणपती, (११) हेरंब गणपती, (१२) प्रसन्न गणपती, (१३) ध्वज गणपती, (१४) उन्मत-उच्छिष्ट गणपती, (१५) विघ्नराज गणपती, (१६) भुवनेश गणपती, (१७) नृत्य गणपती, (१८) हरिद्रा गणपती, (१९) भालचंद्र, (२०) शर्पकर्ण, (२१) एकदंत.

या मूर्तीचे वर्णन प्राचीन ग्रंथात पुढीलप्रमाणे आढळते :

(१) **बाल गणपती** : या मूर्तीचे स्वरूप बालकाप्रमाणे असावे. ही मूर्ती चतुर्भुज असते. आंबा, केळे, फणस आणि ऊस या चार वस्तू चार हातात असतात. शुंडेमध्ये कवठ धरलेले असते. या मूर्तीचा रंग उगवत्या सूर्याप्रमाणे असावा असे सांगितले आहे.

बालकाला आवडणाऱ्या खाद्यवस्तू गणपतीच्या हातात दिल्या आहेत हे लक्षात येईलच व त्याचा रंगही बालसूर्याचा सुचविला आहे.

(२) **तरुण गणपती** : या मूर्तीचे स्वरूप तरूण असते. हातात पाश, अंकुश, कवठ आणि जांभूळ, तीळ आणि वांबूची काठी अशा वस्तू असतात. त्याला सहा हात असतात आणि शरिराचा रंग तांबडा असावा लागतो.

(३) **भक्ति विघ्नेश्वर** : या मूर्तीलाही चार हात असतात. चार हातात नारळ, आंबा, साखरेचा खडा व खिरीची वाटी या वस्तू असतात. या मूर्तीचा रंग चंद्राच्या रंगाप्रमाणे पांढरा असतो.

(४) **वीर-विघ्नेश :** या प्रकारच्या मूर्तीला सोळा हात कोरावयाचे असतात. एका हातात वेताळ आणि शस्त्रे धनुष्य, बाण, शक्ती, ढाल आणि तलवार, हातोडा, गदा, अंकुश, पाश, शूल, कुंड, परशू आणि ध्वज या वस्तू असतात. या मूर्तीचा रंग लाल असावा लागतो.

(५) **शक्ती गणेश :** हे नाव गणेश मूर्तीच्या एका प्रकारास दिलेले आहे. या प्रकारात लक्ष्मी-गणपती, उच्छिष्ट गणपती, महागणपती, उर्ध्व गणपती, आणि पिंगळा गणपती या मूर्ती येतात.

(६) **लक्ष्मी गणपती :** या गणेशमूर्तीस आठ हात असतात. त्यात पोपट, डाळिंब, कमळ, पाण्यासाठी माणिकांनी मढवलेले सुवर्ण पात्र, अंकुश व पाश, कल्पकलता आणि वाण नावाच्या वनस्पतीची कळी या वस्तू असतात. तसेच सोंडेतून पाणी उडत असले पाहिजे. या मूर्तीचा रंग श्वेत असावा लागतो. अघोर शिवाचार्यांनी आपल्या "क्रियाकर्म ज्योति" या ग्रंथात या मूर्तीचे वर्णन दिले आहे. "मंत्र महोदधि" या ग्रंथात लक्ष्मी गणपतीला तीन नेत्र असावेत, दोन हातात दंत आणि चक्र असावे, तिसऱ्या हाताने अभय दाखवावे असे आहे. पण चवथ्या हातात काय असावे किंवा तो कसा असावा याचा उल्लेख नाही. तेव्हा तो हात लक्ष्मीच्या कटीभोवती असावा असा तर्क करता येतो. लक्ष्मी गणपतीचा रंग सोन्यासारखा असावा असे या ग्रंथकर्त्याचे मत आहे. त्याचप्रमाणे लक्ष्मीदेवीचा एक हात गणेशाच्या गळ्याभोवती कोरून दुसऱ्या हातात कमळ असावे असे सांगितले आहे.

(७) **उच्छिष्ट गणपती :** या मूर्तीची पूजाअर्चा करणारे या दिवसातही अनेक आहेत. कारण हा प्रसन्न झाल्यास अनेक प्रकारे भक्ताचे ईप्सित पुरे करतो, अशी त्याची श्रद्धा आहे. क्रिया कर्मज्योति या ग्रंथात या मूर्तीच्या हातात कमळपुष्प, डाळिंब, वीणा, भाताची रोपे आणि रूद्राक्षांची माळ असावी असे वर्णन आहे. मंत्र महार्णव आणि उत्तर कामिकागमातही या मूर्तीचे अधिक सविस्तर वर्णन आहे. पण या वर्णनाची उच्छिष्ट गणपतीची दगडातील मूर्ती कुंभकोणम् येथे नागेश्वर स्वामी मंदिरात आहे.

(८) **महागणपती :** महागणपतीच्या मूर्तीला दहा हात असतात. त्याच्या एका हातात कमळपुष्प, डाळिंब, रत्नजडित जलपात्र, गदा, स्वतःचा मोडलेला दात, ऊस, पाश आणि भाताच्या लोंब्या अशा वस्तू असतात. या मूर्तीचा रंग लाल असतो. शक्ति देवीची मूर्ती महागणपतीच्या मांडीवर बसलेली असते व तिचा रंग श्वेत असतो. तिच्या एका हातात कमळ असते.

(९) **ऊर्ध्व गणपती :** या मूर्तीला सहा हात असतात. कल्हर पुष्प, भाताच्या लोंब्या, ऊसाचे धनुष्य आणि बाण व मोडका दात अशा पाच वस्तू पाच हातात आणि सहावा हात मांडीवर बसलेल्या शक्तीदेवीच्या नितंबाभोवती टाकलेला असतो. या देवतेचा रंग सुवर्ण पीत असावा आणि शक्तीदेवीचा रंग विद्युल्लतेसारखा असावा.

(१०) **पिंगळा गणपती :** या मूर्तीलाही सहा हात असतात. आंबा, कल्पवृक्षाची फुले, ऊस, तीळ, मोदक आणि परशू अशा सहा वस्तू सहा हातात असतात. या गणपतीच्या बाजूस लक्ष्मीची मूर्ती असते.

**शक्ती गणपती :** विघ्नेश्वर प्रतिष्ठा विधी या ग्रंथात शक्ती गणपतीची सामान्य वैशिष्टये सांगितली आहेत. ती अशी : मूर्ती पद्मासनाधिष्ठित असावी. तिच्या बाजूस हिरवा रंग असलेली शक्ति असावी, तिच्या कमरे-भोवती गणेशाचा एक हात असावा, पण गजानन आणि शक्ति यांच्या नितंबाचा स्पर्श होत नसावा. मूर्तीचा रंग मावळत्या सूर्यासारखा असावा. पाश आणि वज्र ही आयुधे त्यांच्या हातात असावीत, मुद्रा भयदायक वाटावी. मंत्रमहावर्णव ग्रंथानुसार मूर्तीच्या हातात अंकुश, पाश, दन्त आणि अक्षमाला ही असावीत. गणपतीच्या सोंडेत मोदक असावा. सर्वालंकारयुक्त आणि भरजरी वस्त्रान्वित शक्तिदेवी बाजूस बसलेली असावी.

(११) **हेरंबगणपती :** विघ्नेश्वराच्या इतर मूर्तींपेक्षा हेरंबाची मूर्ती फारच निराळी असते. तिला पाच गजशीर्ष असतात. त्यापैकी चार तोंडे चार दिशांना आणि पाचवे या चार तोंडाच्या वरती ऊर्ध्वदिशेकडे पहात

असलेले असे असते. त्याचे वाहन सिंह असते. एका हातात मोदक असतो. उरलेल्या दोन हातांपैकी एक हात वरद व दुसरा अभय देणारा असावा लागतो. अशाप्रकारे हेरंव गणपतीला आठ हात असतात. हेरंव गणपतीचा रंग सुवर्णकांति असतो.

हेरंब या शब्दातील हे या अक्षराचा अर्थ दुर्बल असा असून रंव म्हणजे संरक्षक. हेरंब म्हणजे दुर्बलांचा संरक्षक.

(१२) **प्रसन्न गणपती :** ही गणेशमूर्ती सरळ उभी असते किंवा काही ठिकाणी शरिरास वक्रता असलेली असावी. काहींच्या मते ती सरळ असावी तर काही तज्ञांच्या मते ती तीन ठिकाणी वाकलेली असावी. ज्या स्थानावर मूर्ती उभी करावयाची ते आसन पद्मासन असावे. या मूर्तीचा रंग उगवत्या सूर्यासारखा शेंदरी असावा. अंगावर रक्तवर्णी वस्त्रे असावीत. दोन हातात पाश व अंकुश असावेत व उरलेल्या दोन हातांपैकी एक वरद आणि दुसरा अभय देणारा अशा अवस्थेत असावेत. याबाबतीत ग्रंथातील वर्णन आणि प्रत्यक्ष मूर्ती यात थोडा फरक असतो. प्रत्यक्षात एका हातात दात व दुसऱ्यात मोदक असून तो सोंडेने उचलून तोंडात घालण्याच्या अविर्भावात असतो.

(१३) **ध्वज गणपती :** याला चार हात असतात. एका हातात ग्रंथ, दुसऱ्यात अक्षमाला, तिसऱ्यात दंडा आणि चवथ्यात कमंडलू अशा वस्तू असतात. चेहरा रागीट असतो.

(१४) **उन्मत्त गणपती :** या मूर्तीला तीन नेत्र असतात. ही चतुर्भुज, श्वेतवर्णी असते. पाश, अंकुश, मोदकांनी भरलेले ताट आणि दन्त या चार वस्तू चार हातात असतात. ही मूर्ती पद्मासनारुढ असते. माज आलेल्या हत्तीसारखे गजमुख असते.

(१५) **विघ्नराज गणपती :** या मूर्तीच्या एका हातात पाश, दुसऱ्यात अंकुश असून तिसऱ्या हातात असलेले आम्रफल तो खात आहे अशी मूर्ती असते. ही मूर्ती मूषकारुढ असते. रंग सूर्याचा लालशेंदरी असतो.

(१६) **भुवनेश–गणपती** : ही गणेशमूर्ती अष्टभुजा असते. शंख इक्षुदंडा
धनुष्य, पुष्पबाण, तुटलेला दात, पाश आणि अंकुश, भाताच्या लोंब्या
वस्तू हातात असतात. या मूर्तीच्या शरीराचा रंग गोरा असावा लागतो.
मूर्तीच्या बाबतीत लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की, इक्षुदंड धनु व पु
बाण ही कामदेवाच्या हातातील आयुधे या गजाननाच्या हातात दिलेली आहे

(१७) **नृत्य गणपती** : ही मूर्ती नृत्य करीत असलेल्या अवस्थेत कोरले
असते. ती अष्टभुजा असते. एका हातात पाश, नंतर इतर हातात अंकु
मोदक, कठार, दात, वलय आणि अंगुलीय या वस्तू असतात. उरलेला द
नृत्याचा प्रकार दाखविण्यासाठी मोकळा असतो. मूर्तीच्या शरीराचा रंग सोन्य
सारखा पिवळा असतो, गणेश नृत्य करीत आहे असे दाखविण्यासाठी मूर्ती
डावा पाय किंचित वक्र व पद्मासनावर स्थिर केलेला व उजवा पायही हवे
उचलून वाकवलेला दाखवावा लागतो. प्रत्यक्षात आठाऐवजी या मूर्तीला चार
हात कोरलेले आढळतात.

(१८) **हरिद्रा गणपती** : या गजानन मूर्तीचे दुसरे नाव आहे रात्रिगणपत
या मूर्तीला चार हात असतात. या चार हातात पाश, अंकुश, मोदक व दन्त
वस्तू असतात. ही मूर्ती त्रीनयन असते आणि रंग हळदीसारखा पिवळा असत
अंगावर पीत वस्त्रे असतात.

(१९) **भाली चंद्र असे धरिला : भालचंद्र** : असे म्हणतात की, दर्भ
दिलेल्या शापामुळे चंद्र निस्तेज होऊ लागला तेव्हा श्रीगजाननाने त्या
उचलून आपल्या कपाळी तिलक म्हणून धारण केले आणि त्याच्यावरी
संकट दूर केले ! तेव्हापासून कपाळावर चंद्र धारण करणाऱ्या गणेश मूर्त
भालचंद्र असे नाव प्राप्त झाले. ब्रम्हानंद पुराणात ही कथा आहे.

(२०) **शूर्पकर्ण** : शूर्पकर्ण गणपतीसंबंधी आख्यायिका अशी की, एक
ऋषींनी अग्नीला शाप दिला की तू विझून जाऊन नष्ट होशील. त्याम
अग्नी अगदीच निःसत्व झाला. तो गजाननाकडे गेला. तेव्हा त्याच्यावर कृ

करण्यासाठी गजाननाने आपल्या कानाने त्याला वारा घालून प्रज्वलित केले. गजाननाचें कान, शूर्प म्हणजे सुपासारखे मोठे असतात. त्यामुळे वारा घालण्यासाठी त्यांचा उपयोग झाला. या वरून या गजानन मूर्तीला शूर्पकर्ण हे नाव पडले.

(२१) **एकदन्त :** यासंबंधीची कथा ब्रम्हांड पुराणात सांगितली आहे. परशुरामाने शंकरांनी दिलेल्या परशूच्या सहाय्याने पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर आपल्या हितकर्त्याला भेटण्यासाठी तो कैलास पर्वतावर गेला. त्यावेळी कैलासावर शिव आणि पार्वती एकांतात होते. द्वारावर श्रीगजानन द्वारपालाचे काम करीत होता. त्याने परशुरामाला अडवले व शंकर पार्वती बोलत बसले आहेत व आत कोणासही जाण्यास मनाई आहे असे परशुरामाला सांगितले. परशुरामाला राग आला. त्याने गणपतीला आपला परशू फेकून मारला. परशु निष्प्रभ करण्याचे सामर्थ्य गजाननात होते. पण आपल्या पित्याने दिलेले अस्त्र विफल होऊ नये म्हणून त्याने आपला डावा दात त्याच्यापुढे केला. त्यामुळे तो दात मोडला. तेव्हापासून गणपती एकदन्त झाला. ब्रम्हांड पुराणात गणपतीचा डावा दात मोडका असे नमूद असले तरी बहुतेक शिल्पकार गणपतीचा उजवा दात मोडलेला दाखवतात.

# दंतकथांचा नायक एकदन्त

*संग्राहिका : भारती आचार्य*

टाकीचे घाव सोसल्या शिवाय दगडालाही देवपण येत नाही. निदान गणपतीच्या बाबतीत तरी हे खरं असावे. कारण या देवतेसारखी, सगळ्याच गोष्टीत वादविषय ठरलेली दुसरी कोणतीही देवता नाही. आज जगभर

पूज्य मानल्या गेलेल्या या देवतेसंबंधी, विविध संशोधकांनी भरपूर वैविध्यपूर्ण आणि वैचित्र्यपूर्ण संशोधन केले आहे.

मंगलमूर्ती संपूर्णपणे वैदिक असल्याच्या भावनेला पहिला धक्का दिला तो पाश्चात्य संशोधकांनी. त्यांच्या मते ही अनार्याची देवता असून ती इतर देवतांच्या जोडीने झाडाखाली असे आणि सम्भवत: तिच्यापुढे नरबळी देऊन तिच्यावर रक्ताचा अभिषेकही केला जात असे ! हे अनुदार संशोधन सनातनी भक्तांना कसे बरे रुचावे ? त्यांनी सगळे वेद उलथेपालथे करुन अथर्ववेदातील गणपति अथर्वशीर्ष तसेच ऋग्वेदातील ब्रह्मणस्पतिसूक्त यांचा आधार देऊन ही देवता संपूर्णपणे वैदिक असल्याचे एकदाचे सिद्ध केले.

या वादावादीत एक गोष्ट विसरता येणार नाही की, या सशोधकांनी ग्रामदेवता म्हणून का होईना, निदान देवता म्हणून तरी गणपतीला मान्यता दिली. पण याज्ञवल्क्य स्मृतीत तर गणपतीला चक्क "मनुष्यांना झपाटणारा" आणि त्यांच्या कार्यात विघ्ने आणणारा म्हटले आहे. विघ्न उत्पन्न करण्यासाठीच विधात्याने विनायकाला म्हणजे गणपतीला उत्पन्न केले अशी पुराणकथाही आहे !

मग विघ्नकर्त्या या विनायकाचे विघ्नहर्त्या गणेशात कसे काय रूपांतर झाले ? म. म. काणे यांच्या अंदाजानुसार ही प्रक्रिया गुप्त काळात घडून आली. गुप्तकाळात सर्व पुराणग्रंथाना नवा उजाळा मिळाला. त्यात गणपतीचे हे नवे स्वरूप पुढे आले. त्यानंतरच्या सर्व पुराण वाङमयात मात्र गणपतीची एकमुखी प्रशंसा केलेली आढळते.

सांप्रत गणपति हा शिवपार्वतीपुत्र म्हणून ओळखला जातो. परंतु त्याविषयी पुराण-पुराणांमध्ये एकवाक्यता अजिबात दिसत नाही. गणपति हा केवळ शिव-पुत्र असल्याच्या काही कथा आहेत, तर तो केवळ पार्वती-पुत्र असल्याचेही काही कथांमध्ये रंगवण्यात आले आहे. गणपती हा शिव-पार्वतीला आयोजित पुत्र असल्याचा उल्लेख ब्रह्मवैवर्त पुराणात आढळतो तर शिव-पार्वतीने पुत्र

जन्माला यावा अशी गजरूपात रतिक्रीडा केली आणि त्यातून हा गजमुख पुत्र जन्मला अशी कथाही आढळते.

या गजमुखावद्दलही विविध कथा आढळतात. त्यात शिवाने केवळ तपः-सामर्थ्याने निर्माण केलेल्या गणपतीचा मत्सर वाटून पार्वतीने शाप देऊन त्याला गजमुख आणि बेडौल केले, ही एक कथा. दुसरी म्हणजे, सज्जनांच्या कार्यात येणारी विघ्ने पाहुन चिंतित झालेले देव आणि ऋषि रुद्राकडे गेले. त्यांची चिंता ऐकून रुद्र उमेकडे एकटक पाहू लागला व त्यांच्या मुखापासून एक तेजस्वी कुमार जन्मला, त्याला पाहून उमा क्रुद्ध झाली. त्याचे प्रतिरूद्र रूप तिला आवडले नाही. त्यामुळे तिने त्याला गजमुख, लम्बोदर आणि सर्पवेष्टित होशील असा शाप दिला. किंवा स्वपुत्राचा अभिमान बाळगणाऱ्या पार्वतीने मोठ्या अहंकाराने शनीला आपल्या पुत्राकडे बघण्यास सांगितले आणि शनीची वक्रदृष्टी फिरताच गणपतीचे मस्तक जळून खाक झाले. मग ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरुन प्रथम दिसलेल्या प्राण्यांचे म्हणजे हत्तीचे मस्तक गणपतीला लावल्यामुळे तो गजवदन झाला. अशीही कथा सांगितली जाते. थोडी वेगळ्या धर्तीची म्हणजे, गणपति जन्मतःच कुरूप होता, त्यामुळे पार्वतीने त्याला रानात टाकून दिले, पुढे पराशर ऋषींनी त्याचा प्रतिपाळ केला, हीही कथा पुराणात आढळते.

गजमुखाप्रमाणेच त्याच्या एकदंताबद्दलही बऱ्याच वैचित्र्यपूर्ण कथा पुराणात आढळतात. शिव आणि गणेश या देवता पूर्वी एकरूप होत्या असा दावा बऱ्याच पुराणांनी केला आहे. वराह पुराणानुसार विनायक हा शिवाने उत्पन्न केलेला साक्षात रूद्रच आहे, तर अग्निपुराण गणेशाला त्रिपुरान्तक म्हणते. वराहपुराण लम्बोदर आणि गजेन्द्रकर्ण म्हणते. सौरपुराणही गणेश हा वास्तविक शिवच असल्याचे सांगते. अथर्वशीर्षातही गणपतीला "त्वं ब्रह्मा, त्वं विष्णूस्त्वं रूद्रः" असे म्हटले आहे. आणि ते तत्वतः तसेच दैवतशास्त्राच्या दृष्टीनेही बरोबर असल्याची संशोधकांची धारणा आहे. त्यांच्या मतानुसार शिवगणेशामधील साम्य फार ठळक आहे. भालचंद्र, तृतीयनेत्र आणि नागभूषणे ही दोघांची वैशिष्टचे आहेत.

## साम्य आणि भेद

गंमत म्हणजे शिव आणि गणेश यांच्या अभिन्नत्वाबद्दल पुराणांचे एकमत झाले असले तरी या दोन देवतांमध्ये दिसणारे भिन्नत्वही तेवढेच पराकोटीचे आहे. आज गणपती ही कृषिदेवता समजली जाते तर शंकराला स्मशानाचा स्वामी म्हणतात. गणपतीचे वाहन उंदीर, की जे विध्वंसाचे प्रतीक मानतात, तर रुद्राचे वाहन नंदी म्हणजे बैल, की जो जननाचे प्रतीक मानला जातो. या वाहनांवरूनही भांडाभांडी आहेच. उंदीर हा गणेशाचा पशू असल्याचे गणेश विज्ञान सांगते, तर " हे रुद्रा, उंदीर हा तुझा पशु आहे " असे तैत्तिरीय संहितेतील मंत्र म्हणतो.

शिवपूजन आजपर्यन्त तरी भारताबाहेर गेलेले दिसत नाही. पण आजचा शिवपुत्र गणपती मात्र "बापसे बेटा सवाई" न्यायाने संपूर्ण जगभर पूजिला जात आहे. "भालचंद्र", "त्रिनेत्र" ही नावे रूद्र आणि गणपती यांचे अभिन्नत्व दाखविण्यासाठी दोघांनाही वापरली असली तरी सध्याच्या मूर्तीमध्ये भालचंद्र त्रिनेत्रधारी म्हणून शंकरच दाखविला जातो. गणपतीच्या मूर्तीमध्ये या दोन्ही गोष्टींचा अभाव दिसतो. शिवाय गणपती ऋद्धिसिद्धीचा पति किंवा समृद्धीचा देव मानला जातो. तर शिव हा भूपती किंवा विनाशाचा देव म्हणून ओळखला जातो.

## चंद्र–गणेश साम्य

रूद्र आणि गणपती यांचे अभिन्नत्व दाखवून आपल्या संशोधकांचे समाधान झालेले नाही. त्यांनी चंद्र आणि गणपती यांचेही अभिन्नत्व सिद्ध करून दाखविले आहे. याबाबतची एक कथा अशी सांगितली जाते की, मृगनक्षत्र हा आकाशातील गजासुर होय. या मृगनक्षत्राच्या मागचा व्याधतारा तो शिव. या शिवाने गजासुरावर त्रिशूळ मारला. त्याच्या खुणा म्हणजे मृग नक्षत्राच्या पोटात दिसणारे तीन तारे. हे मृगशीर्ष उत्तरा त्रिमुख आहे. त्याचा स्वामी चंद्र आहे. सूर्य या मृगनक्षत्रावरून उत्तरेकडे जातो त्यावेळी गजासुराचे शीरच

तुटल्यासारखे होते. पुढे चंद्र हस्तनक्षत्री आल्यावर तेच हस्तिशिर गणेश-चंद्रावर दिसू लागते.

दुसरी कथा अशी की, गणेश हा पार्वतीपुत्र. पार्वती म्हणजे पर्वत धारण करणारी पृथ्वी. पृथ्वीपासून चंद्र निघाला हे शास्त्रीय सत्यच आहे. तेव्हा चंद्र हा पार्वतीपुत्र. पार्वतीच्या मळापासून म्हणजेच पृथ्वीवरील मातीतून गणपती निर्माण झाला. म्हणजे गणपती आणि चंद्र हे अभिन्न आहेत. गणपती हा शिवही आहे आणि तो चंद्रही आहे. परंतु "अग्निवैरूद्र:" म्हणून अग्नि आणि रूद्र यांना अभिन्न मानलेले आहे, त्याचे काय ? म्हणजे गणपती हा रूद्र आहे, आणि रूद्र हा अग्नि आहे म्हणून तर्कशास्त्रानुसार गणपती हाही अग्नि झाला. शिवाय "गं" हा गणेशाचा बीजमंत्र आहे आणि अग्नीचेही तेच बीज आहे. आता गणपतीला जर अग्निस्वरूप मानले तर शीतलतेचेच प्रतीक असलेल्या चंद्राशी त्याचे अभिन्नत्व दाखविण्यात विसंगती नाही का ?

गणपतीच्या संदर्भात आणखी एक कथा सांगितली जाते. अनलासूर जग जाळीत सुटला तेव्हा गणपतीने त्याचे भक्षण केले. त्यामुळे गणपतीच्या शरीराचा जो दाह झाला तो शांत करण्यासाठी त्याने चंद्र धारण केला. आता ही कथाही खरी मानायची आणि गणपती हाच चंद्र आहे हा संशोधकांचा दावाही खरा मानायचा म्हणजे गणपतीने स्वत:च स्वत:ला धारण केले असे मानावे लागेल!

गणपतीला शिव, चंद्र आणि आग्नि मानूनच संशोधक थांबलेले नाहीत. गणपती हा सूर्यही असल्याचे काहींनी सप्रमाण सिद्ध करून दिले आहे. नेपाळात सूर्य गणपती आहे. द्रविड लोकही सूर्याला गणपतीस्वरूप मानतात. द्रविड लोक सूर्योपासक आणि उंदीर हा त्यांच्या मते रात्रीचे अंधाराचे प्रतीक त्यामुळे अंध:कारावर आक्रमण करणारा सूर्य म्हणजेच उंदरावर स्वार झालेला गणपती. एलिस गेअटी यानेही आपल्या "श्री गणेश" या ग्रंथात दिलेला अर्थ असाच आहे की, दिवसा पृथ्वीखाली लपलेला अंधार म्हणजेच मूषक होय. आणि त्या अंधारावर स्वार होणारा सूर्य म्हणजेच गणपती. म्हणजे गणपती हा एकाच वेळी चंद्रही असू शकतो आणि सूर्यही असू शकतो.

गणपतीच्या सगुण साकार रूपाबद्दलचाच उहापोह करून आपली पुराणं थांबलेली नाहीत. त्याचे अध्यात्मिक, पारमार्थिक आणि ब्रह्मस्वरूप रंगविण्यातही त्यांची अहमहमिका लागलेली दिसते. वेदान्त्यांनी आणि तत्वचिंतकांनी त्याला वाङमयाच्या तळाशी आणि वादांच्या मुळाशी वसवले आहे. योगविद्येत तो मूलाधारचक्रावर अधिष्ठित झालेला आहे. तर वागविद्येत तो ओमकार रूप आहे. गणपतीवरच्या रूपकांनी तर वैचित्र्यपूर्णतेचा कळस गाठला आहे. गणपती अथर्वशीर्षनिही "तू तत्त्व आहेस, तू आत्मा आहेस, तू ज्ञानमय, विज्ञानमय आहेस. प्रत्यक्ष ब्रह्म म्हणजेच तू" असे म्हणून गणपतीला ब्रह्मरूपत्व बहाल केले आहे.

गणपतीचे निर्गुण निराकार रूप न कळणारा निष्ठावान भक्त, पुराणकथांमधील ही विसंगती लक्षात घेऊनही असेच म्हणेल की, गणपती रूद्र असो, चंद्र असो, सूर्य असो नाहीतर ब्रह्म असो. आम्हाला हो त्याचे काय ? संकटनिवारक असा तो आमचा गणपती गजानन आहे एवढेच आम्हाला पुरे. तेव्हा गणपती देवतेपेक्षाही भक्तांच्या या दृढ निष्ठेचे आणि अढळ श्रद्धेचेच अधिक कौतुक करायला हवे की नाही ?

# कहाणी गणेश देवाची

श्री. दा. वि. कुलकर्णी

**फार** फार वरसं झाली. ब्रह्मदेव राजा होता, तो एकदा शिकारीला निघाला. वाटेत एक तळं लागलं. तळ्यात तरण्याताठ्या पोरी आंघोळ करीत होत्या. त्यातली एक पोरगी राजाला आवडली. त्यानं तिच्याबरोबर लग्न केलं. महाजृंभा नाव होतं तिचं. ती जृंभासुर नावाच्या राक्षसाची पोरगी होती. तिचा बाप राक्षसांचा राजा होता.

पोरगी मोठी वस्ताद! तिनं लवकरच ब्रह्मदेवाला आपल्या मुठीत ठेवल. ती म्हणेल ती उगवती दिशा झाली. सारा कारभार तीच करू लागली. ब्रह्मदेव नावाचा राजा राहिला.

लवकरच तिला मुलगा झाला. राजाने मोठा उत्सव केला. तो तांबूस वर्णाचा होता. म्हणून त्याचं नाव सिंदुरासुर ठेवलं. दिवसेंदिवस सिंदुरासुर मोठा झाला. त्यानं बापाला कैदेत टाकलं व स्वत: राजा झाला.

एक दिवस एक शास्त्रीबाबा आले. त्यांनी त्याचा हात पाहिला. त्याची कुंडली मांडली.

"राजा, तुला एका राजपुत्राच्या हातून मरण येणार आहे. तो राजपुत्र भाद्रपदात जन्मलेला असेल पण अजून १०–१५ वर्षे धोका नाही.

तो राजपुत्र १६ वर्षांचा होताच तुझ्याशी युद्ध सुरू करील व युद्धात तुला ठार मारेल.

"स्वामी मला सावध केलेत. मी तुमचा ऋणी आहे. कोण व कुठल राजपुत्र ते आपण सांगू शकाल काय?"

"राजा, मी असमर्थ आहे. ती गोष्ट माझ्या ज्ञानाबाहेरची आहे. तुम्ह सावधपणाने वागा." शास्त्रीबुवा दक्षिणा व भरजरी शालजोडी घेऊन तिथ गेले.

कंसाप्रमाणं सिंदुरासुर घाबरून गेला. त्यानं आपले प्रधान व सेना बोलाविले. टाळक्याला टाळकी घासली. सगळीकडचे पाच वर्षांच्या अ राजपुत्र पळवून आणावयाचे ठरले. त्या राजपुत्राना ठार मारून टाकलं धोका संपला. चांगले चांगले गुप्तहेर सगळीकडे रवाना झाले.

कैलास नगरात आनंदी आनद झाला. भाद्रपद चतुर्थी दिवशी गौ बाळ झालं. शंकरांना आनंद झाला. साऱ्या नगरात हत्तीवरून साखर व लोकांनी फार मोठा, फार मोठा, उत्सव केला. बाळाला पाळण्यात घ

त्याचं नाव गुणेश ठेवलं. बाळ वाढू लागला. रांगू लागला. गुणेशाच्या बाळलीला आणि खोडचा बघून शंकर व गौराई यांना फार आनंद होत होता.

सिंदुरासुराचे गुप्तहेर कपट वेषानं येणार आहेत, बाळाला पळवणार आहेत, अशी वीरभद्रानं बातमी आणली. बाळाला सुरक्षित कुठे ठेवायचा? शंकर व गौराईनं विचार केला, महिकावतीचा राजा वरेण्य शंकराचा मित्र होता. तिकडं गुणेश बाळाला पाठवायचं ठरलं. गौराईला रडू कोसळलं. माझा बाळ मोठा होऊं दे, कुठंही सुखात असूं दे म्हणाली.

गुणेश बाळाला गुप्तरीतीने पाठविण्यात आलं. वीरभद्र, शंख भैरव, रंक भैरव, वगैरे विश्वासू माणसं बरोबर गेली. गुणेश बाळाच्या गळचात एक ताईत घातला. तो ताईत हत्तीच्या दातांचा होता. ताईतावर हत्तीचं तोंड कोरलं होतं.

वीरभद्र बाळ गुणेशासह महिकावतीला सुखरूप आला. वरेण्य राजानं सर्वांचं स्वागत केलं, गुणेशाला बघून वरेण्याला आनंद झाला. त्यानं बाळाच्या संगोपनाची व्यवस्था केली. वीरभद्र आपल्या भैरवगणासह परत गेला.

राणी पुष्पावतीला गुणेश बाळ आवडला. पण ती धोका अंगावर घ्यायला तयार नव्हती.

महाराज, आपल्या चंदूबाळाचं काय झालं ? खुंटीनं हार गिळला ना ? रत्नमहालात खेळणारं बाळं नाहीसं झालं. आपण ही जोखीम घेऊ नका. गुणेश बाळाला परत पाठवा.

राणीच्या सांगण्याप्रमाणे चार विश्वासू माणसांबरोबर गुणेशाची पाठवणी करण्यात आली.

ही माणसं आडवाटेनं निघाली. वाटेत मोठं अरण्य लागलं, एका तळ्याजवळ मुक्काम पडला. एकजण बाळाला खेळवत होता. दोघे जेवण तयार करीत होते. एकजण पाणी आणीत होता.

पाणी आणीत होता त्याच्यावर वाघानं हल्ला केला. ते बघून जेवण कर- णारे घाबरून पळून गेले. गुणेश बाळाला खाली ठेवून चौथा माणूस तीरकमठा सरसावू लागला. पहिल्याला ठार मारून वाघानं तीरकमठेवाल्यावर उडी घेतली. त्या माणसाचा निकाल लावला.

वाघ माणसाच्या मासावर ताव मारत बसला. तो रक्त पीत होता.

गुणेश बाळ रडत रडत रांगत होता. दगडाला ठेचकळून तो पडला आणि जोराने रडू लागला.

त्यावेळी पाराशर ऋषी कंदमुळे व फळे शोधण्यासाठी त्या अरण्यात आले होते. त्यांनी बाळाचं रडणं ऐकलं. आवाजाच्या दिशेनं ते निघाले. त्यांना काय दिसलं? एक गोजिरवाणं मूल रडत पडलं आहे. वाघ माणसाला फाडून खात आहे. त्यांनी धनुष्याला बाणं लावला आणि वाघाला ठार मारलं.

पाराशरांनी बाळाला उचलून घेतलं. त्याचं अंग पुसलं. लहान सहान जखमा झाल्या होत्या. त्यांना झाडपाल्याचा रस लावला. मग ते बाळाला घेऊन आपल्या आश्रमात आले.

या आश्रमात ब्रह्मदेवांची पहिली राणी राहत होती. तिचं नाव सरस्वती होतं. त्यांनी या बाळाला तिच्या स्वाधीन केलं. सरस्वतीला बाळ फार आव- डला. तिनं त्याला दूध पाजून झोपविला.

बाळ गुणेशाच्या गळ्यातील ताईत पाराशरांनी पाहिला. त्यावरील हत्तीचं तोंड पाहून त्यांनी बाळाचे नाव गजानन ठेवलं. त्यावेळी बाळ दोन वर्षांचा होता.

दिवसेंदिवस बाळ मोठा होऊ लागला. लहानपणापासूनच पाराशरांनी गजाननाला शिकवायला सुरुवात केली.

बाळ गजानन लहानाचा मोठा झाला. तो सर्व कला व विद्या यामध्ये तरबेज झाला. तो सुंदर अक्षर काढीत होता. तो लढाईचे कामात तरबेज

झाला. लहानपणापासूनच त्याच्या भोवती सवंगडी गोळा झाले. तो सगळीक
फिरत होता.

गजाननाने जंगली लोकांचं सैन्य तयार केलं. जंगलातले हत्ती पकडून 
माणसाळविले. त्यांना शिक्षण देऊन-त्यांचं गजसैन्य तयार केलं.

सारा देश, सिंदुरासुर, त्यांचे राक्षस अधिकारी, यांच्या अत्याचारांन
त्रासला होता. लोकांना स्वतंत्र व्हायचं होतं. उठाव करण्यास कोणी धज
नव्हतं. राक्षस सर्वांच्या कत्तली करीत होते.

ऋषिमुनींचे यज्ञयाग बंद पडले. नगरं ओस पडू लागली बायकांना अब्रू
जगता येईना. पोरीबाळींच्यावर अत्यार होऊ लागले.

तोंडपुजे लोक सिंधुरासुराचे दास बनले. मांजराच्या गळयात घाट को
बांधणार ? सारेच उंदीर! पण उंदरावर बसणारा गजानन लोकांच्या मदतील
धावून गेला.

गजाननाने स्वातंत्र्याचा झेंडा उभारला. हजारो लोक त्याला येऊन मि
लागले. तो गणेश झाला. गणपती झाला. गणेश म्हणजे गणांचा परमेश्व
गण म्हणजे समुदाय. गणपती म्हणजे समुदायाचा चालक व पालक. गजान
लोकनेता झाला. लोकांचा पुढारी झाला. तो शतावधानी होता. शतावधान
म्हणजे एकाच वेळी शंभर कामाकडे लक्ष ठेवण्यात पटाईत.

राक्षस तरवार व गदा यांनी लढत असत. त्यांना धनुष्य बाण, भा
वापरायचं माहीत नव्हतं. गजाननाचे जंगली लोकांचे सैन्य होते. ते अचू
नेम मारण्यात तरबेज होते.

गजाननाने युद्धाचा भडका उडू दिला नाही. त्याची चाल आस्तेकद
होती. पाराशरांनी त्याला रणपंडित व राजनीति पंडित बनविले होते.

सिंदुरासुर पराक्रमी होता. त्याने आपले राज्य खूप वाढविले होते. बरे
राजे लढाईत मारले गेले. त्यांचे राज्य आपल्या राज्याला जोडले. जे शर
आले. त्याना ताटाखालची मांजरं बनविली. त्यांना मांडलिक राजे केले.

काही धाडसी तरुणांनी सिंदुरासुराचे राज्य उलथून पाडायचं ठरवलं. कट चांगला होता. उठावाचा दिवस ठरला. पण कुऱ्हाडीचा दांडा गोताचा काळ ठरला. एका घरभेद्यानं पैशाच्या लोभानं कटाची बातमी दिली. सिंदुरासुराच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्याने कटाची पाळेमुळे खणून काढली. काही कटवाल्यांना जिवंत जाळलं तर काहींना भर चौकात सुळावर चढविले. त्यांची प्रेतं वेशीवर टांगून ठेवली. अनेकांना कैदखान्यात अंधार कोठडीत डांबून ठेवले.

ही सर्व हकीकत गणेशाला माहीत होती. अज्ञातवासात असलेले शूर तरुण व विद्वान पंडित भराभर गणेशाच्या झेंड्याखाली जमा झाले. त्याने स्वातंत्र्य सैनिकांचे रण मंडळ नेमले.

पाराशर युद्धकला विशारद होते. त्यांच्या सल्ल्यानुसार गणेश वागत होता. गणेशानं सिंदुरासुराविरुद्ध युद्ध पुकारलं. गनिमी काव्याची लढाई सुरू झाली. जाईल त्या ठिकाणी गणेशाचं स्वागत होऊ लागलं. मांडलिक राजे आपल्या सैन्यासह गणेशाच्या झेंड्याखाली आले.

गणेशाचं बळ खूप वाढलं. त्याचा सारा भर गजसैन्यावर होता. एक हजार हत्तींचं गजसैन्य तयार केलं होतं.

गजाननाचा जन्मदिन भाद्रपद शुद्ध चतुर्थी. त्याचे वाढदिवसादिवशी रणसिंग फुंकण्यात आले. बराच प्रदेश त्याचे ताब्यात आला. तेथील सुव्यवस्था लावून त्याने पुढे चाल केली.

सिंदुरासुराला ही गोष्ट कळली. कालमुख राक्षसाला सेनापती केले. राक्षसाचे प्रचंड सैन्य घेऊन कालमुख निघाला.

गणेशाचे हत्तीचे सैन्य आघाडीला होते. दोन्ही सैन्यांची समोरासमोर गाठ पडताच रणदुंदुभी वाजविण्यात आल्या.

गजसैन्याची चाल तुफान होती. त्यांचा हल्ला जोरदार होता. या सैन्यापुढे राक्षसांचा टिकाव लागेना. हत्तींच्या पायाखाली कित्येक राक्षस चेंगरून मेले.

प्रत्येक हत्ती आपले समोरील राक्षसाला सोंडेने वर उचलून घेत. हत्तीवर बसलेले वीर त्या राक्षसांची मुंडकी उडवीत.

हत्तीवर बसलेले वीर आपल्या धनुष्यानी बाणांचा पाऊस पाडीत होते. त्यांचा मारा अचूक होता. गणेश हत्तीवर बसून आपला सैनिकांना उत्तेजन देत होता. प्रेतांचा खच पडला. रक्ताचे पाट वाहू लागले. मांसाचा चिखल झाला. भयंकर रणधुमाळी माजली

गजसैन्यापुढं राक्षसांचा टिकाव लागला नाही. कालमुख वर्मी बाण लागून ठार झाला. सेनापती पडलेला कळताच राक्षस सैन्य पळत सुटले. गणेशाने त्यांचा पाठलाग केला व त्यांची लांडगे तोड केली. राक्षसांचा पराभव झाला. गजानन विजयी झाला. पण हा अंतिम विजय नव्हता. सिंदुरासुराचा नायनाट करणे आवश्यक होते.

ही लढाई एक महिना चालली होती. लढाईचा पहिला अंक संपला. दुसरा सुरू झाला. सिंदुरगड नावाचा बळकट भुईकोट किल्ला होता. ही सिंदुरासुराची राजधानी होती.

गडासभोवती दहा हात उंचीचा बळकट दगडी तट होता. त्या बाहेर आठ हात रुंदीचा व तेवढ्याच खोलीचा खंदक होता. खंदक पाण्याने तुडुंब भरला होता. खंदकात प्रचंड सुसरी होत्या.

गडाला चारी दिशांना चार दरवाजे होते, दरवाज्यासमोर खंदकावर काढते घालते पूल होते.

गणेशाने सिंदुरासुराची कोंडी करण्याचे ठरविले. राजधानी सभोवारचा सर्व प्रदेश गणेशाने ताब्यात घेतला. सिंदुरगडाला वेढा पडला. सिंदुरासुर गडात

कोंडला गेला. गडात पाण्याची व धान्याची विपुलता होती. गड बळकट होता. गड पडण्याचे लक्षण दिसेना.

वेढा घालून चार महिने होत आले. सिंदुरासुर शरण येईना. माघ महिना सुरू झाला. गणेशाचे रणमंडळाने गडावर धडक मारण्याचे ठरविले.

गडाचे चारी दरवाज्यांसमोरील खंदक मुजविण्यास प्रारंभ झाला. तटावरून राक्षस सैनिक दगडांचा मारा करीत होते. आगीचे गोळे फेकीत होते. गणेशाचे धनुर्धारी तटावरील राक्षस सैनिकांना बाणांनी अचूक टिपीत होते.

गजाननाने आपल्या सैन्यांचे चार भाग केले. त्यावर चार सेनापती नेमले. चारी बाजूंनी एकदम चढाई केली. खंदक पार करण्यात यश आले.

गडाच्या बंद दरवाज्यावर हत्ती धडका देऊ लागले, दोन दिवसात दरवाजे कोलमडून पडले. चारी दिशांनी गजाननाचे सैनिक नदीच्या लोंढ्याप्रमाणे नगरात घुसले.

रस्त्या रस्त्यावर हाणामारीला व कापा कापीला सुरुवात झाली. गजाननाचा सेनासागर खवळला होता. गजाननाची सिंदुरासुराशी गाठ राजवाड्याबाहेरील मैदानात पडली.

गजानन हत्तीवर बसला होता. सिंदुरासुर रथातून त्याला सामोरा आला. गजाननाने रथाचे घोडे, सारथी यांना बाणाने ठार केले. रथाचा विध्वंस केला.

सिंदुरासुर गदा घेऊन धावला. तो चक्राकार फिरत होता. गजानन गदा घेऊन हत्तीवरून उतरला. दोघांचे भयंकर युद्ध झाले. कोणी कोणास आटोपेना.

सिंदुरासुराने गजाननाची गदा उडविली. गजाननाने आपला फरश हाती घेतला. फरशाचा मारा होताच सिंदुरासुराची गदा मोडून पडली. तो तरवार उपसून गजाननावर धावला.

गजाननाने आपल्या फरशाने सिंदुरासुराचे मस्तक उडविले. सिंदुरासुर रणांगणावर मरण पावला. सिंदुरासूर पडलेला कळताच राक्षस सैन्य व त्यांचे मंत्रीमंडळ बिनशर्त शरण आले.

राक्षसांचे दुष्ट प्रवृत्तींचा नाश झाला. गजाननाच्या सद्प्रवृत्तींचा विजय झाला. तो दिवस माघ वद्य चतुर्थीचा होता. त्या दिवशी मंगळवार होता. त्या दिवसापासून मंगळवारी येणाऱ्या माघ वद्य चतुर्थीला फार महत्त्व आले. तो विजयदिन होता. स्वातंत्र्यदिन होता.

गजाननाने शरणागतांना अभय दिले. सिंदुरासुराचा अंत्यविधी मोठ्या इतमामाने करण्यात आला. सिंदुरासुराची आई महाजृंभा व इतर मंडळी राक्षसांचे देशाला निघून गेली.

बंदी शाळेतील सर्वांची सुटका करण्यात आली. ब्रह्मदेवांची राजसिंहासनावर स्थापना करण्यात आली. राणी सरस्वतीने गजाननाचे पोटच्या पोराप्रमाणे पालनपोषण केले होते. गजानन तिला आईच म्हणत होता.

गजाननाने सरस्वती मातेला हत्तीवरून मिरवत आणले. तिची महाराणी पदावर प्रतिस्थापना करण्यात आली.

गजानन स्वतः राजा झाला नाही. त्याने कोणत्याही प्रकारची अधिकाराची अथवा मानसन्मानाची जागा स्वीकारली नाही. तो स्वतःला लोकसेवक म्हणवून घेत होता. तो लोकनायक झाला. देशाला स्वातंत्र्य मिळवून देणारा व राक्षसी प्रवृत्तींचा नायनाट करणारा तो महान स्वातंत्र्यवीर होता.

त्या काळी तोंडावर मुखवटे चढविण्याची पद्धत होती. मारूती वानर नव्हता. त्याने तोंडावर माकडाचा मुखवटा चढवला होता. त्याचप्रमाणे गणेशाने हत्तीचे तोंडाचा मुखवटा चढवला होता. तो हत्तीसारख्या बारीक डोळ्याचा म्हणजे तीक्ष्ण नजरेचा होता. कान सुपासारखे मोठे होते. म्हणजे गणेश हलक्या कानाचा नव्हता. हत्तीची ताकत त्याच्या तोंडामध्ये म्हणजे सोंडेमध्ये असते.

तोंडाची ताकत म्हणजे वाणीची ताकत प्रचंड आहे. तोंड माणसं जोडते व माणसं तोडते. गजाननाने तोंडाचा फार चांगला उपयोग केला. असंख्य माणसं जोडली. तो लंबोदर आहे. लंबोदर म्हणजे मोठ्या पोटाचा. तो आपल्या विशाल पोटात चांगल्या वाईट सगळ्या गोष्टी सामावून घेतो.

गजाननाने तोंडावर चढविलेल्या मुखवटयामुळे तो आपणाला आजच्या त्याच्या स्वरूपात दिसतो.

गणपतीला कृत्तायुगामध्ये दहा हात होते. त्याचे वाहन सिंह होते. त्रेता युगात सहा हात व मोर हे वाहन होते. द्वापार युगात चार हात व उंदीर हे वाहन झाले. तेच कायम आहे. कलियुगात तो दोन नि:शस्त्र हातांचा गणोबा झाला. आपण द्वापारयुगातील गणपतीची व कली युगातील गणोबाची सध्या पूजा करतो.

सर्व देवांची सुटका झाली होती. ऋषींचे यज्ञयाग व अध्ययन अध्यापन सुरू झाले. सर्वत्र आनंदी आनंद झाला. भाद्रपद शुद्ध चतुर्थी हा विजयोत्सव दिन ठरविण्यात आला.

ब्रह्मदेवांनी, सर्व देवांनी, लोकांनी ऋषीमुनींनी, गजाननाचा प्रचंड सत्कार करण्याचे ठरविले. शंकर व गौराई यांना निमंत्रण गेले. समारंभाला राजा वरेण्य, राणी पुष्पावती व पाराशर ऋषी आले होते.

गजननाची टोलेजंग मिरवणूक काढण्यात आली. सर्व नगरात विजय पताका व तोरणे उभारण्यात आली. रस्त्यावर हरिद्रा कुंकुमाचा सडा घातला. दारादारातून सुंदर रांगोळ्या काढल्या होत्या. प्रत्येक दारात सुवासिनींनी गजाननाला ओवाळले. सर्वांनी गजाननाला अलंकार, भरजरीवस्त्रे दिली. गणेश, गणपती, गणनायक ह्या पदव्या देण्यात आल्या.

गजाननाने सर्वांना नम्रपणे अभिवादन केले. गुरुजनांना साष्टांग नमस्कार घातला व तो बोलू लागला.

"पूज्य माता पित्यासमान असणाऱ्या सर्वांना माझा नम्र नमस्कार आहे. हा सत्कार माझा नसून सर्व जनतेचा आहे. लोकांनी मला आपला नेता मानला व जनतेची सेवा करण्याची मला संधी दिली. त्याबद्दल मी आजन्म कृतज्ञ राहीन व अखंड लोकसेवा करीन. सर्वांना धन्यवाद देऊन मी माझे भाषण संपवितो".

पाराशरांनी उठून सांगितले, हा मुलगा दोन वर्षांचा असताना अरण्यात सापडला. त्याच्या गळ्यात फक्त एक हस्तीदंती ताईत होता. हा पहा तो ताईत, असे बोलून त्याने सर्वांना ताईत दाखविला.

शंकर व गौराईने ताईत ओळखला. राजा वरेण्य व राणी पुष्पावतीने ताईत ओळखला. सर्वांना आनंदी आनंद झाला. शंकर गौराईचा गणेश सापडला. गणेशाला आईबाप मिळाले. गौराईला आनंदाचे भरते आले. गणेश शंकर गौराईबरोबर कैलास नगरीला गेला. तेथे त्याचा प्रचंड सत्कार करण्यात आला. तो कैलास नगरीचा युवराज झाला.

पुढे लवकरच "ऋद्धि व सिद्धी" या राजकन्यांच्या स्वयंवराचे निमंत्रण आले. ते इच्छा स्वयंवर होते. दोन्ही राजकन्यांनी गणेशालाच वरमाला घातल्या. पुढे कैलास नगरीत मोठ्या थाटामाटाने विवाह समारंभ करण्यात आला.

गणेश सापडला एवढेच नाही तर तो मोठा विद्वान झाला. पराक्रमी राष्ट्रवीर झाला. स्वातंत्र्यवीर बनला. लोकनेता झाला. लोकनायक झाला. या गोष्टीचा शंकर गौराईला अत्यानंद झाला.

गणेशाने लोकसेवेत व राष्ट्रसेवेत आयुष्य खर्च करण्याचे ठरविले. माता सरस्वती त्याच्या मदतीला धावून आली. दोघांनी विद्येचा प्रचार व प्रसार केला.

आपण जे शब्द बोलतो ते जसेच्या तसे लिहिता यावेत म्हणून त्यांनी राष्ट्रलिपी तयार केली. या लिपीला देवनागरी किंवा बाळबोध लिपी म्हणतात. संस्कृत, हिंदी व मराठी याच लिपीत लिहितात.

गणेशाने गायींची जोपासना करण्यास शेतकऱ्यांना शिकविले. तरुणांत व्यायामाची आवड निर्माण केली. गूळ खोबऱ्यांचा स्वस्त व पौष्टिक खुराक प्रचारात आणला.

सारी शेते हराटीने भरली होती. गणेशाने नांगराचा शोध लावून हराटीचा संपूर्ण नाश केला. हराटी म्हणजे दुर्वा औषधी आहेत. आपल्या देवांना आवडणारा बेल, तुळस, फुले ही सर्व औषधी आहेत. इतकेच नाही तर भंडारा, बुक्का, कुंकू हे सुद्धा औषधी आहेत.

गणपतीला दुर्वाच का वाहतात, याची एक कहाणी आहे. ती सांगतो :–

यमराजाच्या राजमंदिरात नाच गाणे चालू होते. तिलोत्तमा नावाच्या अप्सरेचा नाच चालू होता. तिला पाहून यमराज चळला व त्याचे तेज सांडले. त्या तेजातून राक्षस निर्माण झाला. त्याच्या डोळ्यातून आगीचे लोट बाहेर पडू लागले. तो सगळे जग जाळीत सुटला. त्याच्या अंगातून जाळ बाहेर पडत होता. म्हणून त्याला अनलासूर म्हणू लागले.

सर्व देव, ऋषीमुनी व मानव गिरीकंदरात लपून बसले. समोर दिसेल त्याला अनलासूर जाळीत होता. भगवान विष्णूनी अनलासूराला मारण्याची कामगिरी गणेशावर सोपविली.

अनलासूर गणेशावर धावून गेला. गणेशाने त्याच्यावर "कृतांत" नावाचे अस्त्र सोडले. या अस्त्राने सारा अग्नि गिळून टाकला. नंतर दोन बाणात त्याचे दोन्ही डोळे फोडले. त्याबरोबर त्याच्या शरीरातून बाहेर पडणारे आगीचे लोट बंद झाले. तो निर्बल व निस्तेज झाला. एका बाणात गणेशाने त्याचे मस्तक उडविले. अनलासूर जमिनीवर कोसळला.

गणेशाने साऱ्या जगावर आलेले संकट दूर केले. पण त्याच्या अंगाची भयंकर आग होऊ लागली. सर्व देव, धन्वंतरी धावत आले. खूप उपाय केले. पण अंगाची आग कमी होईना.

इंद्राने गणेशाच्या डोक्यावर थंडगार चंद्र ठेवला. म्हणून त्याला "भालचंद्र" म्हणतात. विष्णूंनी थंडगार कमळ त्याचे हाती दिले. म्हणून तो " पद्मपाणी" झाला. शंकराने आपले गळ्यातील थंडगार नाग गणेशाच्या गळ्यात घातला. वरुण राजाने वरंधार पाऊस पाडला. हिमालयाने नातवाच्या डोक्यावर हिमवर्षाव केला, पण कशाचाही उपयोग झाला नाही. गणेश तळमळत गडबडा लोळू लागला.

त्या ठिकाणी अठ्याऐंशी हजार ऋषी आले होते. प्रत्येकाने एकवीस याप्रमाणे गणपतीला दुर्वांकूर वाहिले. गणपतीचे सारे अंग दुर्वांनी झाकले गेले. त्याबरोबर आग शांत झाली. गणपती बरा झाला. तेव्हापासून त्याला दुर्वांकूर फार आवडू लागले. ऋषींनी एकवीस दुर्वांकूर वाहिले तेव्हापासून एकवीस दुर्वांची जुडी वाहण्याची चाल पडली.

गणेश कृपावंत, सुख देणारा, विघ्ने दूर करणारा आहे. सर्व जगाचे त्याने कल्याण केले. म्हणून सर्व देवांनी त्याला प्रथम पूजेचा मान दिला. आपण कुठल्याही कार्याच्या प्रारंभी प्रथम गणेशपूजन करतो.

भाद्रपद शुद्ध चतुर्थी हा त्याचा जन्म दिवस आहे. ही गणेश जयंती आहे. ही जयंती साल दर साल मोठ्या उत्साहाने साजरी होते.

गणपती संकटे नाहीशी करतो. त्याची आठवण म्हणून प्रत्येक महिन्यातील पौर्णिमेनंतरच्या वद्य चतुर्थीला "संकष्टी" म्हणतात. मंगळवारी येणाऱ्या चतुर्थीला अंगारक संकष्टी किंवा अंगारकी म्हणतात.

भारद्वाज नावाचे ऋषी होते. त्यांना एक मुलगा होता. त्याने वडिलांचे आज्ञेप्रमाणे नर्मदा नदीचे तीरावर उग्र तपश्चर्या केली. माघ वद्य चतुर्थी दिवशी गणराज त्याच्यावर प्रसन्न झाले. त्यांनी त्याला दर्शन दिले व वर मागण्यास सांगितले.

"देवा, आपलं दर्शन झालं. तृप्त झालो. मला काही नको. मला अढळपद द्या आपण माझ्यावर कृपा केलीत तो दिवस तुमचे भक्तांना सुखकारक व्हावा एवढीच इच्छा आहे."

"तुला 'मंगल' या नावाने सर्व जग ओळखील. आकाशात मंगळ तारा म्हणून जगाच्या अंतापर्यंत तू प्रकाशत राहशील.

अंगार म्हणजे लालबुंद निखारा. निखाऱ्याप्रमाणे तुझा वर्ण लालबुंद आहे म्हणून तुला अंगारक म्हणतील. भूमातेच्या पोटी तुझा जन्म झाला म्हणून तुला "भौम" म्हणतील."

सर्वांनी संकष्टी व्रत करावे. त्या दिवशी दिवसभर उपवास करावा. संध्याकाळी अंघोळ करावी. गणपतीची पूजा करावी. गणपती स्तोत्र म्हणावे. गणपतीला गंध, दुर्वा व लाल फुले वाहावीत. एकवीस मोदकांचा नैवेद्य अर्पण करावा. नंतर रात्री चंद्र उगवला की, चंद्राची पूजा करून, नैवेद्य दाखवावा. नंतर चंद्राची, गणपतीची आरती व प्रार्थना करून उपवास सोडावा.

हे संकष्टी व्रत करणाऱ्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. पण हे सर्व श्रद्धायुक्त अंतःकरणाने व भाव भक्तीने केले तरच इच्छिलेले फळ मिळते.

गणेश हा सत्व, रज, तम या गुणांचा अधिपति आहे. गणेश चतुर्थी दिवशी चंद्रदर्शन घेत नाहीत. चंद्र ही मनाची देवता आहे. मन फार चंचल आहे. चंद्रदर्शन न घेणे म्हणजेच मनोनिग्रह करणे होय.

गणपती उंदरावर बसलेला आहे. उंदीर हा काल स्वरूप जाणावा. उंदीर रात्रंदिवस सर्व पदार्थ कुरतडत असतो. त्याचप्रमाणे काळ जगातील सर्व पदार्थ व प्राणीमात्रांचा नाश करीत असतो. अशा ह्या कृतांत काळाला श्रीगणेशाने जिंकले. त्याला वेसण घालून आपले वाहन बनविले. म्हणून सर्व प्राणीमात्रांचा अधिपति गणराज सर्वश्रेष्ठ ठरला आहे.

अनुक्रम :–

१

संग्राहिका : श्रीमती सरस्वतीबाई गोखले

आधी नमन करू चिंचवडीच्या मोरया
रत्नजडित तुळया मंडपात
आधी नमन करू चिंचवडीच्या मोरया
रत्नजडित समया तेवतात
आधी नमन करू आळवाचं पान
नाव गजानन मोरयाचं
आधी नमन करू आळवाची देठी
नाव जगजेठी मोरयाचं
आधी नमन करू आळवाची देठी
गणपती पुढं मोठी सरस्वती
आधी नमन करू आळवाचं पान
गणपती पुढं ध्यान सरस्वती
आधी नमन करू नमनाचं झालं पाणी
नाव चिंतामणी मोरयाचं

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

(१)

घाणा भरियेला विडा ठेवियेला
आधी नमियेला गणराज
घाणा भरियेला साचा खंडेश्वरी मातेचा
मोठा भार तो गोताचा गणराज
आम्हा घरी कारणी गणराज पुराणी
मांडव दणाणी चारी दिवस
आम्हा घरी तुम्ही देवे गणराज यावे
मांडवी राहावे पाच दिवस
गणराज गणपती त्याशी शेंदुरे लिंपिती
जे मनी कल्पीती तेची होय
आधी मूळ धाडी घुंगुरांची गाडी
शालजोडीचा वऱ्हाडी गणराज
आधी मूळ धाडा अंबेचे हो गावा
मग तेल लावा कृष्णनाथ
पानाचा की पुडा फुलाचा हो तुरा
आधी मोरेश्वरा नमियेला
आधी मूळ धाडा इरीचीये हो दूरी
आम्हा कुळाचारी अंबेश्वरी माय

(२)

**गणेशस्थापना**

जयजयाजी देवा गणेशा । मुहूर्ते स्थापी खांबाच्या प्रकाशा ॥
ढवळा गाईन सुरेशा । रघुनाथ नोवरा ॥
देव भक्तांचा कैवारी । गणेश विघ्ने निवारी ॥
नवरदेव नोवरी । दया करी तयावरी हो ॥
बरवे दोंद देवाचे । कंठी पदक नवरत्नांचे ॥
हिरे जडिले तयावरचे । उजेड पडी भुजांवरी ॥
शेंदुर चर्चिला मस्तकावरी । जास्वन सुमनांची पूजा शिरी ॥
मोदक झेली तो हातावरी । विघ्नहरण गणराज ॥
बरवी सोंड या देवाची । कंठी माळ मोतीयाची ॥
हिरे शोभती तयाची । प्रकाश पडे उदरी ॥
सभे बैसला गणराजा । चरणी नमीते सारजा ॥
ब्रीद तोडा संकट निवारणा जा । भक्ता विघ्न हरणा गणराजा ॥

३

---

*संग्राहिका* : डॉ. सरोजिनी बाबर

(१)

यावे नाचत गौरीबाळा
हाती घेऊनी पुष्पांच्या माळा

सर्वे ठायी मी वंदितो तुला
यावे नाचत गौरीबाळा

चौदा विद्येचा तूं माता पिता
सर्वे ठायी हाय तुजी सत्ता
चार वेदा ध्यावे वेळोवेळा
यावे नाचत गौरीबाळा

साही शास्त्रे अठरा पुराण
तुझ्यापासून झाले निर्माण
भक्त देव येती मंडपाला
यावे नाचत गौरीबाळा

मुळारंभी सत्व धरी पाया
संगे घेत सरस्वती माया
किती विनवी तुला भक्तमेळा
यावे नाचत गौरीबाळा

(२)

मोरया गंणपती रे गणराजा
किती विनवूं तुला म्हाराजा

तेहतीस कोटी देव दैवता
सर्वा आधी गण नायका
दैत्य मारूनी केलीस दशा
लाविली पळवून धाही दिशा

चेडा झुटिंग वेताळ म्हैशा
दुष्टाला देशी तू सजा
किती विनवू तुला म्हाराजा

तुझा धाक तिन्ही ताळाला
दिला सराप तूं चंद्राला
चतुर्भूज तू मंगलमूर्ति
संगे घेऊनी सारजा सती
हाती त्रिशूळ डमरू बाजा
किती विनवू तुला म्हाराजा

अष्टभैरव सिधू सोळा
चौसष्ट जोगीणींचा मेळा
गण शंभर कोटी जमले
माझ्या अंगणी येऊनी गमले
पीर पैगंबर हे रमले
गाऊ नाम लावू ध्वजा
किती विनवू तुला म्हाराजा

संग्राहिका : सौ. मंगला नावडीकर

## हरिजागर

नमन माझे सद्‌गुरुनाथा शिवशंकराच्या सुता
त्याचे चरणी ठेऊनि माथा पंढरीनाथा आळविते
रुक्मिणीचा प्रिय कांत प्रगटला हृदयात
जागर केलासे त्वरित जागर माथा आळविते
अश्विन शुद्ध दशमीचे दिवशी आरंभ होतो जागरणासी
तेहतीस कोटी देव ऋषी दही दुधाशी पाहु येती
देव सर्वांगी सावळा पंचामृताचा सोहळा
मुखी लोणीयाचा गोळा अनंतकळा न कळे
पहाटेचे प्रहर रात्री आनंद होतो घरोघरी
दह्या दुधाच्या घागरी श्रीहरीसी अर्पिती
साखर मधाचे मर्दन मोगरेल अभंजा चर्चून
उष्ण उदक शुद्ध स्नान मनमोहना शोभतो
पुजाऱ्याचे पुण्य थोर अखंड पूजा करीती लवकर
नाना परीचे उपचार दिनोद्धारा भोगिती
पूजा पहाती थोर थोर काशीखंडाचे शंकर
त्रिशुळ हातीचा डमरू गळा हार शेषाचा
भैरव शोधी बाळराजा याच्या तिही क्षेत्री ध्वजा
हाती काठी सन्निध उभा पाहतो शोभा देवाची
चतुर्भुज गजानन यांचे उंदिराचे वाहन
प्रेमे नाचे आनंदाने जगज्जीवना पाहतसे

वायुपुत्र हनुमंत याची सेवा अखंडित
दोन्ही जोडोनिया हस्त चरणी मस्तक ठेवितसे
ब्रह्मदेव शिरोमणी तिन्ही त्रिभुवनींचा तो धनी
पंचामृताशी पाहुनी अंतरी ध्यान करीतसे
राधा रखुमाई भामा त्यांची प्रिती असे मेघश्यामा
मिळुनी गेली आत्मारामा देहभान विसरल्या
लक्ष्मीचा अहंकार नारायणे केला दूर
झाली पायांची किंकर सर्वाहूनी वरिष्ट
पुंडलिक भीमरथी मुख्य गोदा भागिरथी
नित्य नेमाशी येती हरी जागरा सावध
नारद म्हणे ऋषिश्वर वीणा योगेश्वर
रामनामाचा गजर निरंतर ध्यान असे
तुळजापूरची निवासीनी नाव तुझे वरदायिनी
घाट शिळेचे वरुनी अंतरी ध्यान करितसे
नरसिंगपुरचा नरहरी कोळे नरसिंगपूर भोवरी
अतुल अनुष्ठान करी हरी जागरा सावध
करवीर कोल्हापूरवासिनी तू तर विश्वाची जननी
दक्षिण केदार घेऊनी धाऊनी येसी जागरा
निवृत्ती ज्ञानदेव मुक्ताबाई सोपानदेव चौथा माई
चोखा नामदेव जनाबाई अक्षय पायी राहिले
पैठणचा एकनाथ अरण भेंडींचा सावता
तो तर देवाचा पंडियता प्रति येतो जागरा
नरसिंह हुंडीवाला गोरा कुंभार बहुत भला
बालक तुडवूनि काला केला आत्मा नेला जागरा

नमन माझे सद्‌गुरुनाथा शिवशंकराच्या सुता
त्याचे चरणी ठेवूनी माथा पंढरीनाथा आळविते

५

संग्राहिका : सौ. प्रेमलता सावंत

(१)

### नामू बा नामू गणेसा

नामू बा नामू गणेसा चारी बा दूधा परवेसा
चारी इद्याचं कवाड ठेविलं गणोबा फुडं
गणु कवरीचं बाळु पाया घागरीचं चाळु
गणूच्या मस्तकी तुरा गणूच्या बेंबीला हिरा
गणूच्या पायी पद्म गणूच्या मुखी रतन
गणू भावरा खेळतो गणू भावरा नाचतो
गणू भावरा नाचत आला महादेव अवचित
आला महादेव अवचित शिर गणूचं उडविलं
शिर गेलंय गगनी धड पडलंय अंगणी
गवराईला कळू गेलं गवराईला रडू आलं
गवराई आरडूबा लागली गणू कुणीबा मारीला
न्हवं चोरी शिंदळकीचा न्हवं लांडी लबाडीचा

न्हवं लांडी लबाडीचा न्हवं पाप करमाचा
धरणी गडबडा लोळती केस कंगर तोडीती
महादेवाला काकळूत आली महादेवाला दया आली
गेला हात्तीच्या पागंला हत्ती त्यानंबा सोदीला
शिरं हात्तीचं उडविलं गणू बाळाला जोडिलं
डावी करंगाळी कापिली कुषी आमृत शिंपिली
गणू साजिवंत झाला गणू खेळाया लागला
गणू आला चवथे रोजी गबर आली पाचवे रोजी
माय लेकरं भेटली गबराबाई सुकी झाली

(२)

हितं बस तिथं बस गणू माज्या बाळा
गणू माज्या बाळा
आमी जातो आमी जातो सोनारू साळा
सोनारू साळा
सोनारणी बाई ग सोनारू दादा
सोनारू दादा
बाळाच्या बिंदल्या झाल्या का न्हाई
झाल्या का न्हाई
फिरून ये जा फिरून ये जा गवराबाई
गवराबाई
हितं बस तिथं बस गणू माज्या बाळा
गणू माज्या बाळा
आमी जातो आमी जातो सोनारू साळा
सोनारू साळा

सोनारनी बाई ग सोनारू दादा
सोनारू दादा
बाळाची अंगठी झाली का न्हाई
झाली का न्हाई
फिरून ये जा फिरून ये जा गवराबाई
गवराबाई

हितं बस तिथं बस गणू माज्या बाळा
गणू माज्या बाळा
आमी जातो सोनारू साळा सोनारू साळा
सोनारू साळा
सोनारनी बाई ग सोनारू दादा
सोनारू दादा
बाळाचे पैंजण झाले का न्हाई
झाले का न्हाई
फिरून ये जा फिरून ये जा गवराबाई
गवराबाई
हितं बस तिथं बस गणू माज्या बाळा
गणू माज्या बाळा

(३)

आल्याड नमन पल्याड नमन गणेशा तू देवा
आमी खेळ मांडियेला करू तुजी सेवा
आमी खेळ मांडियेला येसीच्या ग दारी
येसीच्या ग दारी

येसीच्या दारी ग पारवा घुमतो
पारवा घुमतो
पारव्या पाखराचं गुंज गुंज डोळं
गुंज गुंज डोळं
गुंज गुंज डोळं ग सबेमंदी खेळं
सबेमंदी खेळं
सबेच्या नारींनी ग पंच आरती केल्या
पंच आरती केल्या
आरती घालू सोनं का परती घालू सोनं
परती घालू सोनं
आमच्या गणेबाचं कंठीयाचं लेणं
कंठीयाचं लेणं
आरती घालू सोनं का परती घालू सोनं
परती घालू सोनं
आमच्या गणोबाचं पैंजणाचं लेणं
पैंजणाचं लेणं
आरती घालू सोनं का परती घालू सोनं
परती घालू सोनं
आमच्या गणोबाचं अंगठीचं लेणं
अंगठीचं लेणं
आल्याड नमन पल्याड नमन गणेशा तू देवा
आमी खेळ मांडियेला करू तुजी सेवा

# आरती

समर्थ रामदास

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची
नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची
सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची
कंठी झळके माळ मुक्ताफळांची
जय देव जय देव जय मंगलमूर्ती
दर्शन मात्रे मन कामना पुरती
जय देव जय देव ...
रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा
चंदनाची उटी कुंकुम केशरा
हिरेजडित मुकुट शोभतो बरा
रुणझुणती नूपूरे चरणी घागरिया
जय देव जय देव जय मंगलमूर्ती
दर्शन मात्रे मन कामना पूरती
जय देव जय देव ...
लंबोदर पीतांबर फणिवर बंधना
सरळ सोंड वक्र तुंड त्रीनयना
दास रामाचा वाट पाहे सदना
संकटी पावावें निर्वाणी रक्षावें सुरवर वंदना
जय देव जय देव जय मंगलमूर्ती
दर्शन मात्रे मन कामना पुरती
जय देव जय देव ...

अनुक्रम :—

१. श्री. प्रभाकर चेंदवणकर

२. डॉ. सविता जाजोदिया

३. कु. कुसुम शिवाजीराव देशमुख

४. डॉ. त्रि. ना. धर्माधिकारी

# गणानां त्वां गणपति हवामहे

*निवेदन :* श्री. प्रभाकर चेंदवणकर

श्रीगणेश. . .श्रीगजाननाची पूजा करताना 'गणानां त्वां गणपति हवामहे' या मंत्रोच्चाराने प्रारंभ केला जातो. गणेशपुराण तथा मुद्गल पुराणात मंत्रोच्चाराचा जनक ऋषिगृत्समद वर्णिला आहे. हा गृत्समद कोण, कोठला व त्याला हा मंत्रोच्चार कसा स्फुरला त्याची कथा अशी आहे--

भीमराजाचा पुत्र राजकुमार रूक्मानंद एकदा शिकारीसाठी वनात गेला असता दमला व विश्रांतीसाठी जवळच असलेल्या वाचक्नवी ऋषींच्या आश्रमात गेला. वाचक्नवी हे मध्यान्ह स्नानासाठी नदीवर जाण्यासाठी निघाले होते. त्यांनी रूक्मानंदाचं स्वागत केलं. त्यांना मुकुंदा नावाची तरुण रूपवती पत्नी होती. पत्नीला रूक्मानंदाचे यथायोग्य आदरातिथ्य करण्यास सांगून ते निघून गेले. रूक्मानंद अतिशय सुंदर, सुदृढ व कुलशिष्ठाचार तथा विचारसंपन्न राजपुत्र होता. रूक्मानंदाने पिण्यास पाणी मागितले. मुकुंदा पाण्याचा कलश घेऊन बाहेर आली. मनमोहक, स्वरूपवान रूक्मानंदाला पाहून त्याच्यावर मोहित झाली व क्षणार्धात कामातूर झाली. तिने निर्लज्जपणे त्याच्यापाशी आपली कामेच्छा व्यक्त केली. तिच्या त्या निर्लज्जपणाच्या वक्तव्याने सदाचरणी रूवमानंदाला धक्काच बसला व त्याने तात्काळ तीव्र शब्दात तिची निर्भत्सना केली व तो पाणीसुद्धा न पिता परत जाण्यास निघाला! परंतु कामातूर मुकुंदेला त्याच्या सदोपचाराला उपदेश कसा बरे सुचावा ? तिने रूक्मानंदाला अडविले. त्याचा हात धरून त्याला आलिंगन देऊ लागली. परंतु रूक्मानंदाने तिला दूर लोटले व तो जाऊ लागला. निघाला. कामातूर मुकुंदेची घोर निराशा झाली. अतृप्त कामवासनेने प्रज्वलीत झालेल्या मुकुंदाने क्रोधायमान होऊन त्याला शाप दिला, "तू कुष्ठि होशील, बनशील!"

रूक्मानंद आश्रमाबाहेर पडला व पाहतो तो त्याच्या सर्वांगावर कुष्ठ निर्माण झालेले. रूक्मानंदाचे घराणे गणपतीचे उपासक होते व रूक्मानंद हा स्वत: एकनिष्ठ गणेशभक्त होता. आपल्या सच्छिल, सदाचाराच्या वागणुकीला मुकुंदेसारख्या कामातूर शापवाणीने सर्वांगावर कुष्ठे यावीत याचेच त्याला अतिशय दु:ख झाले व त्या दु:खवेगातच तो गणेश मंत्राचा सातत्याने जप करीत प्रायोप्रवेशनाला बसला. श्रीगणेश त्याच्या आळवणीने प्रसन्न झाले व त्यांनी नारदाला रूक्मानंदाच्या भेटीला पाठविले. नारदाने रूक्मानंदाची भेट घेऊन त्यास चिंतामणी क्षेत्रात जाऊन तपश्चर्या करण्यास सांगितले व काही काळातच रूक्मानंद कुष्ठरोगापासून संपूर्ण बरा होऊन विमुक्त झाला.

इकडे रूक्मानंद रागाने निघून गेला तरी मुकुंदेचे कामातूर मन त्याच्या भोवतीच धिरटचा घालीत होते. रूक्मानंदाच्या सुंदर, रूपयौवन, मूर्तीभोवती पिंगा घालीत होते. ध्यान करीत होते. किमान तिला त्याचा ध्यासच लागला होता. रूक्मानंदाबरोबर काम-रतिक्रीडा करण्यास ती कामातूर बनली व विरहाने व्याकूळ होऊन तशीच निपचित पडून राहिली. तितक्यातच तिला झोप लागली. कितीतरी दिवसापासून देवेंद्र इंद्रदेव रूपयौवना मुकुंदेवर पापदृष्टी ठेवून होते. परंतु देवेंद्राना सुयोग्य संधी मिळत नव्हती. मुकुंदा रूक्मानंदाशी भोग घेण्यासाठी कामातूर झाल्याचे त्यांनी जाणले व ही संधी त्यांनी साधली. रूक्मानंदाच्या वेशात तिथे प्रगटून देवेंद्रानी तिला जागे केले. रूक्मानंदच तिच्यावर मोहित होऊन परत आल्याचे पाहून मुकुंदेला अत्यांनदच झाला व तिने आनंदाने प्रेमाने आपले शरीर त्याच्या स्वाधीन केले रूक्मानंदरूपी देवेंद्रानी तिची कामेच्छा-कामना पूर्ण केली. तिला संतुष्ट केले व वाचक्नवी ऋषि परतण्यापूर्वी निघून गेले. रूक्मानंदरूपी देवेंद्रापासून मुकुंदेला गर्भ राहिला. नवमास पूर्ण होताच ती प्रसूत झाली. तिला पुत्र झाला. बिचाऱ्या वाचक्नवी ऋषींना मुकुंदेच्या व्यभिचाराची काहीच कल्पना नव्हती. पुत्रप्राप्तीमुळे त्यांनाही आनंद झाला. मोठ्या थाटात बारसे होऊन मुलाचे नाव गुत्समद ठेवण्यात आले. गुत्समद पाच वर्षांचा झाल्यानंतर त्याचे मौजीबंधन करून त्यास वेदविद्या शिकविण्यास सुरुवात झाली. हळूहळू गुत्समद

वाढू लागला. मोठा होऊ लागला. वेदशास्त्रात पारंगत झाला. इतकेच काय तर गुत्समदाची वेदशाळा अभ्यासातली पारंगतता, निपुणता, पंडितांमध्ये गणना होऊ लागली. मान्यता प्राप्त झाली.

एकदा मगधेश्वराकडे श्राद्धासाठी मोठमोठे विद्वान पंडित आमंत्रित केले होते. गुत्समदालाही अगत्यपूर्ण आमंत्रण होते. विद्वान पंडित एकत्र जमले असता काही विषयांवर चर्चा सुरू झाली. वादविवाद झाले. त्यात गुत्समदानेही भाग घेतला. परंतु गुत्समदाकडून चर्चेसमयी वारंवार सगर्व भाषा वापरली जाऊ लागली. अत्रि ऋषींनी त्यास सगर्व भाषा न वापरण्यासंबंधात शांतपणाने सांगितले. परंतु गुत्समद काही केल्या ऐकेना. त्याने सगर्वानेच जेष्ठ अत्रि-ऋषींचा सर्वांसमोर आर्धक्षेप अपमानच केला. हे त्याचे कृत्य जमलेल्या साऱ्यानाच आवडले नाही. अखेरीस अत्रिऋषींनीच त्याला चांगलेच खडसावले व "तू वृथा गर्व करू नकोस. तू वाचक्नवीचा औरस पुत्र नाहीस तू रूक्मानंदा-पासून जन्मास आला आहेस म्हणून तू अशा तऱ्हेची उर्मटपणांची उद्दाम-पणाची भाषा सगर्वाने बोलतोस. आमच्यात बसून बरोबरीने वागण्याचा तुला आधिकारच नाही ! तू मुकाटयाने येथून निघून जा."

अत्रिऋषींच्या या भयंकर बोलण्याने अपमानित झालेला गुत्समद अत्यंत क्रोधकंपित स्वरात म्हणाला, 'तुमचे हे बोलणे खोटे ठरले तर मी तुम्हा सर्वांना शाप देऊन भस्मसात करीन !' व रागारागात तो घरी आला.आईला पहाताच त्याचा राग उसळून उफाळून आला. तो आपल्या जन्मदात्या आईला म्हणाला, "दुष्ट स्त्रीये.. खरं सांग कुणापासून माझा जन्म झाला तो ?... नाही तर मी तुला दग्ध करीन..."

गुत्समदाची ती क्रोधायमान मूर्ती पाहून मुकुंदा भयकंपितच झाली. तिने गुत्समदाला घडलेली सत्य हकिकत सांगितली. मगधेश्वराकडे जमलेल्या ऋषिमुनींनी सांगितलेले खरे होते तर ! आता त्याची त्यालाच लाज वाटू लागली. त्याचा क्रोध अधिकच उफाळून उठला व त्या क्रोधाच्या भरात त्याने जन्मदात्या आईला शाप दिला, "तू काटेरी बोरीचे झाड होशील. तुला फळं

येतील, परंतु त्याला कुणीही हात लावणार नाही. भोग आपल्या कर्मांची फळं !"...

आपल्या मुलाने, गुत्समदाने शाप देताच मुकुंदा क्रुद्ध झाली व बोलती झाली, "विकारवशात माझ्या हातून पाप घडलं. तथापि मी तुझी जन्मदाती आहे. तुझी पूज्य आई आहे. तू अत्यंत कठोरपणे मला शाप दिलास म्हणून तुलाही मी शाप देते, तुलाही कठोर हृदयी क्रूरकर्मी असा पुत्र होईल."

गुत्समदाची शापवाणी खरी ठरली. त्याची जन्मदाती आई मुकुंदा बोरीचे झाड झाली. रागाच्या भरात आपण आपल्या जन्मदात्या आईला कठोर शाप दिला याचे त्याला भारी दुःख झाले. परंतु त्याहीपेक्षा आपल्या किळसवाण्या कुजन्माची त्याला लाज वाटू लागली. घृणा वाटू लागली. त्याला स्वतःचाच उद्वेग आला. त्याच्या ठाई जीवनाविषयीची विरक्ती निर्माण झाली त्या विरक्तीतच तो रानात तपश्चर्येसाठी निघून गेला. वनात त्याला देववाणीने कळून चुकले की त्याचा जन्म रूक्मानंदापासून झाला नसून रूक्मानंद रूपी इंद्रापासून झाला.

गुत्समद पुष्पक अरण्यात गेला आणि तिथे त्याने श्रीगणेशाला उद्देशून स्मरून एकाक्षरी बीज मंत्राचा जप केला. त्याची निग्रही पाच हजार वर्षे खडतर तपश्चर्या पाहून श्रीगणेश त्याच्यावर प्रसन्न झाले व त्याला त्यांनी पृच्छिले 'वत्सा' माग तुला काय हवे ते ...'

यावर गुत्समद उत्तरला, " श्रीगणेशा, गजानना त्रिखंडातील सर्व ब्राह्मणांपेक्षा श्रेष्ठ असा ब्रह्मवेत्ता .... वेदवेत्ता मला करा .."

श्रीगणेशाने गुत्समदाला सर्व ब्राह्मणामध्ये श्रेष्ठत्व, वरिष्ठत्व, तर बहाल केलेच शिवाय 'गुणांना त्वां गणपति हवामहे' या आद्यमंत्राचे ऋषित्व जनकत्वही बहाल केले. प्रदान केले.

त्या क्षणापासून वेदवेत्या मंत्रदृष्टया ब्राह्मणात गुत्समदाचा आदरार्थी समावेश–अंतर्भाव–होऊ लागला. गणना होऊ लागली. इतकेच नव्हे तर ... 'गणानां त्वां ..' हा मंत्र गुत्समद ऋषींच्या नामोच्चाराशिवाय म्हटला जात नाही.

गुत्समदाने ज्या पुष्पक अरण्यात श्रीगणेशाची मनोभावे आराधना केली, तपश्चर्या केली, साधना केली, ते भद्रक क्षेत्र नावाने प्रसिद्ध पावले. गुत्समदाने या ठिकाणी वरद विनायकाची प्राणप्रतिष्ठा केली. गुत्समदाच्या शिंकेपासून जास्वंदीच्या फुलासारखा मुलगा जन्माला आला. तोच पुढे त्रिपुरासुर नावाने कुविख्यात झाला. मुकुंदेने दिलेल्या शापामुळे पृथ्वीला त्रिपुरासुराचा छळ सोसावा लागला. अखेरीस भगवान शंकरांनी कार्तिक शुद्ध पौर्णिमेला एका बाणाने संहार करून त्याच्या छळापासून पृथ्वीला भयमुक्त केले. खरे म्हणजे त्रिपुरासुर हा देखिल आपल्या पित्याप्रमाणेच मोठा गणेशभक्त होता ....

## चार कहाण्या

*निवेदन : डॉ. सविता जाजोदिया*

### ( १ ) बारा दाणे घेतले, बारा वर्षे चाकरी केली

एकदा गणपतीची स्वारी फिरायला निघाली होती. वाटेने एका सावकाराचे शेत लागले. गणपतीने सहज जाता जाता त्या शेतातून धान्याचे बारा दाणे तोडून घेतले. पुढे गेल्यावर गणपतीच्या लक्षात आले की, अरे आपण त्या सावकाराला न विचारताच त्याच्या शेतातून धान्याचे दाणे घेतले हे काही ठीक केले नाही. तेव्हा चोरीच्या त्या पापप्रक्षालनार्थ गणपतीने त्या सावकाराकडे बारा वर्षे नोकरी करण्याचे ठरविले. साधे मानवरूप धारण करून तो

सावकाराकडे नोकरी करू लागला. एकदा काय झाले सावकाराची बायको परसाकडे जाऊन आल्यावर राखेने हात धुऊ लागली. गणपतीने ते पाहताच सावकाराच्या बायकोचा हात पिरगळून तिला राख खाली टाकायला लावली आणि मग मातीने तिला हात धुवायला लावले. गणपतीचा हा आगाऊपणा पाहून सावकाराची बायको चिडली. तिने सावकाराकडे तक्रार केली. सावकाराने गणपतीला असे धिटाईने वागण्याचे कारण विचारले तेव्हा गणपती उत्तरला, "राखेने हात धुतल्यास ऋद्धिसिद्धी निघून जातात म्हणून मी बाईंना मातीने हात धुवावयास लावले." सावकाराने मनात म्हटले गणपती समजूतदार आहे. त्यानंतर कुंभमेळ्याची पर्वणी आली. तेव्हा सावकाराने गणपतीस म्हटले, "गणपत्या, बाईंना गंगास्नानास जावयाचे आहे. तू त्यांच्याबरोबर यात्रेला जा." गणपती बाईंबरोबर गेला. गंगेकाठी गेल्यावर बाई काठाशीच बसून स्नान करू लागली. गणपतीने तिला आत ढकलून दिले आणि चांगले गंगेच्या मध्यावर नेऊन बुडी मारायला लावली. बाई चिडली. घरी आल्यावर तिने सावकाराजवळ पुन्हा तक्रार केली. "या गणपत्याने इतक्या लोकांसमोर माझी नाचक्की केली." सावकाराने गणपतीला जाब विचारला तेव्हा गणपतीने खुलासा केला, "काठावरचे पाणी इतरांच्या स्नानामुळे दूषित झालेले असते म्हणून मी बाईंना गंगेच्या मध्यावर नेऊन स्नान करवून आणले. असे स्नान केले म्हणजे त्याचे फळ म्हणून पुढच्या जन्मी राज्य मिळते." सावकाराला गणपतीचे बोलणे पटले.

त्यानंतर एकदा सावकाराने यज्ञ करावयाचे ठरविले. यज्ञ सुरू झाला. सावकाराने गणपतीला म्हटले, "गणपत्या, जा बाईंना बोलावून आण." गणपती बाईना बोलवावयाला गेला. बाई जरीचे छानदार पातळ नेसून तयार होत्या. त्यांची चोळी मात्र काळ्या रंगाची होती. गणपतीने बाईंची चोळी फाडून टाकली. त्यांना लाल रंगाची चोळी घालून चलण्यास सांगितले. बाई भयंकर चिडल्या व रुसून आपल्या खोलीत जाऊन झोपी गेल्या. सावकाराने येऊन रुसव्याचे कारण विचारले तेव्हा बाईने घडलेला प्रकार सांगितला. नोकरमाणसाने मालकिणीची चोळी फाडायची म्हणजे काय ? सावकाराने गणपतीला असे का केलेस म्हणून

विचारले तेव्हा गणपतीने खुलासा केला, "काळा कपडा नेसून शुभकार्य केले म्हणजे ते कार्य सफल होत नसते." सावकाराला ते पटले. त्यानंतर पूजेला सुरुवात झाली. अचानक उपाध्येबुवांना आठवण झाली. गणपतीची मूर्ती घरीच राहिली. आता काय करावे ? गणपती जवळच उभा होता. लगेच पुढे होऊन म्हणाला, "मूर्ती नसली म्हणून काय झाले ? माझीच पूजा करा म्हणजे झाले.' आता मात्र सावकाराला अनावर राग आला. गणपतीचे मानगूट पकडीत तो ओरडला, "काय रे, इतके दिवस बाईंची चेष्टा करता करता आता माझीच चेष्टा करायला लागलास होय ? " गणपतीने शांतपणे उत्तर दिले, "मी खोटे थोडेच बोलतोय ? खरे तेच सांगतोय" आणि त्याने आपले मूळ रूप धारण केले. सर्व लोक चकीत झाले. षोडशोपचारांनी त्यांनी गणपतीची पूजा केली. पूजा संपल्यावर गणपती अंतर्धान पावला. सावकार व त्याची बायको आता पश्चाताप करू लागली की, "पहा देव आपल्या घरी आला आणि आपण त्यांच्याकडून काम घेतलं, चुकलं आपलं" तेव्हा गणपतीने त्यांना स्वप्नात दर्शन देऊन सांगितले की, "तुमची चूक नाही. मी तुमच्या शेतातून बारा दाणे घेतले होते. म्हणून बारा वर्षे तुमची चाकरी केली" त्यानंतर गणपतीच्या कृपेने सावकाराकडे अपार माया जमली. तो सुखाने राहू लागला. देवा त्यांना जशी धनदौलत दिलीस तशी ती सर्वांना दे.

## ( २ ) तुझ्या विनायकाला बोलाव !

दोन बेडूक होते. त्यांपैकी जी बेडकी होती ती रोज विनायकाचे स्मरण करीत असे. एकदा बेडूकराव रागावले व बेडकीला दम दिला, तूं रोज "पर-पुरुषाचे नाव घेतेस हे फार वाईट आहे. पुन्हा कधी त्या विनायकाचे नाव घेतलेस तर डोक्यात मुसळ घालीन". सर्वज्ञ विनायकाला हे समजले. त्याने बेडकाला अद्दल घडविण्याचे ठरविले. त्याच दिवशी एका कोळयाच्या जाळयात दोघे बेडूक अडकले. राजाच्या दासीने माशाबरोबर या बेडकांनादेखील तेलाच्या कढईत घालून कढई चुलीवर ठेवली. तेल गरम होण्यास सुरुवात झाली. आता बेडूकराव घाबरले आणि बेडकीला म्हणाले, "बेडके, तुझ्या त्या विनायकाला बोलाव नाही तर आपण दोघेही मरून जाऊ". "छे, मी मुळीच विनायकाचे नाव घेणार नाही.

तुम्ही माझ्या डोक्यात मुसळ घालणार ना? "बेडकीने आढे वेढे घेतले. इकडे तेल चांगलेच तापू लागले. बेडकाचे प्राण कासावीस होऊ लागले. हात जोडीत तो म्हणाला, "चुकलो, पुन्हा नाही असं बोलणार. पण आता लवकर विनायकाला बोलाव". बेडकीने सात वेळा अगदी मनापासून विनायकाचे नाव घेतले. तत्क्षणी दोन बैल एकमेकांना टकरा देत तेथे आले. त्यांच्या शिंगांनी कढई उलटली आणि बेडूक-बेडकीने जी धूम ठोकली ती थेट सरोवराच्या काठी जाऊन श्वास घेतला. तेव्हापासून बेडकीबरोबर बेडूक देखील रोज विनायकाचे स्मरण करू लागला. देवा, बेडकाचे संकट निवारण केलेस तसे ते सर्वांचे कर.

## ( ३ ) आजी, तू खीर उष्टावलीस !

एक गणपती होता. एके दिवशी चिमूटभर तांदूळ आणि चमचाभर दूध घेऊन तो सर्वांना विचारीत सुटला, "याची खीर करून देता कां ?" प्रत्येकाने नकार दिला. अखेरीस एका म्हातारीने म्हटले, 'आण, ते चिमूटभर तांदूळ व चमचाभर दूध. मी त्याची खीर करून देते. म्हातारी खीर करण्यासाठी वाटी घेऊन आली. तेव्हा गणपती म्हणाला "आजी, वाटीत कसली खीर करतेस ? मोठं पातेलं घे खीर करायला" म्हातारीने म्हटले, 'अरे, वेड्या मोठ्या पातेल्यात चमचाभर दुधाची खीर कशी होणार ?" "तूं करून तर बघ." गणपती आग्रहाने म्हणाला. तेव्हा म्हातारीने मोठे थोरले पातेले आणले. तिने दुधाचा चमचा त्यात टाकला. त्याबरोबर ते पातेले दुधाने भरून गेले. म्हातारी खीर करायला बसली. तेव्हा गणपती पुन्हा म्हणाला, "आजी तू खीर बनवतेस तोवर मी जरा बाहेर जाऊन येतो". गणपती निघून गेला. इकडे खीर तयार झाली. पण गणपती काही आला नाही. म्हातारीने बराच वेळ वाट पाहिली. शेवटी तिला काही रहावेना. तिच्या तोंडाला पाणी सुटले. तेव्हा गणपतीला नैवेद्य दाखवून ती एकटीच दारामागे लपून खीर खायला बसली. पहिला घास घेतला तोच गणपती आला. "आजी, आजी, तू खीर उष्टावलीस". "छे, तूलाच अगोदर नैवेद्य दाखवून मी खायला बसले, चल ये आत आणि बैस माझ्यावरोबर खीर खायला." म्हातारीने गणपतीला

ओळखले गणपतीने तिला दर्शन दिले. आशीर्वाद दिला. "आजी, जोपर्यंत तू हे पातेले उलटणार नाहीस तोपर्यंत हे सदैव खिरीने भरलेले राहील." म्हातारीने देवाला विनविले, "देवा, माझी परीक्षा घेतलीस तशी दुसऱ्या कोणाची घेऊ नकोस. सर्वांवर कृपादृष्टी राहू दे". "तथास्तु" म्हणून देव अंतर्धान पावला.

## (४) देवा मी चुकले !

एक म्हातारी होती. तिला एक मुलगा होता. सून होती. मुलगा पैसे मिळवायला परदेशी गेला. त्याच्या मागे म्हातारी सुनेचा छळ करायला लागली. तिला ती पोटभर खायला काही देत नसे. तेव्हा ती सून चोरून खाऊ लागली. फराळाचा जिन्नस ठेवलेला दिसला की ती त्यांतून थोडंसं खाऊन घेई आणि थोडंसं त्याला सांडून ठेवी. सासूने विचारले की फराळाचे पदार्थ कोठे गेले तर ती चक्क खोटं सांगून देई, "मला काय ठाऊक ? उंदरांनी खाल्ले असतील". त्यांच्या घरात उंदीर खूप होते म्हणून सासूला ते खरे वाटे. पण असा उंदरावर आळ घेता घेता बारा वर्षे निघून गेली. तेव्हा गणपती रागावला त्याने सुनेला धडा देण्याचे ठरविले. एके दिवशी त्या सुनेचा नवरा परदेशाहून घरी परतणार होता. त्याच्या आदल्या दिवशी रात्री सुनेने नेहमीप्रमाणे आपले लुगडे खुंटीला टांगून ठेवले आणि खोलीची दारे खिडक्या बंद करून ती झोपी गेली. रात्री गणपतीने उंदरांना ते लुगडे बिळात पळवून न्यायला सांगितले. उंदरांनी लुगडे बिळात पळवून नेले. दुसऱ्या दिवशी सकाळी सून जागी झाली. लुगडे घ्यायला गेली तर खुंटीवर लुगडे दिसेना. आता खोलीबाहेर कसे पडायचे ? बाहेर सर्वजण तिला हाका मारू लागले. तेवढ्यात तिचा नवराही परदेशाहून आला पण सूनबाई काही केल्या बाहेर येईना. तिने आतून उत्तर दिले, 'माझे लुगडे कुणी-तरी चोरून नेले आहे, मी बाहेर कशी येऊ ?' अखेर तिचा धनी खोलीत गेला. दारे खिडक्या बंद असताना चोर लुगडे कसे नेतील? त्याला वाटले बायको खोटे बोलतीय. त्याने तिला मारायला सुरुवात केली. तेव्हा सुनेच्या मनात आले, आज माझ्यावर खोटा आळ आलाय. मी देखील उंदरावर खोटा आळ घेत असे. तेव्हा त्यानी मला तर अद्दल घडविण्यासाठी असं केलं नसेल नां ?" सुनेने मनातल्या मनात गणपतीची प्रार्थना केली. "देवा चुकले मी. क्षमा कर. पुन्हा

असं करणार नाही. माझं लुगड सापडू दे. मी सव्वा रुपयाचा प्रसाद तुझ्या नावान टाकीन!" गणपतीने तिला क्षमा केली. त्याचवेळी सुनेच्या नवऱ्याला लुगडयाचे टोक बिळाशी दिसले. गैरसमज दूर झाला. सून शहाणी झाली. तिला आपली चूक उमजली. तेव्हापासून ती रोज नित्यनियमाने गणपतीची पूजा अर्चा करू लागली. सर्वजण सुखाने राहू लागले. ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण

## अग्रपूजेचा मान

*निवेदन : कु. कुसुम शिवाजीराव देशमुख*

एकदा स्वर्गलोकात सगळयात देवांची सभा भरली. सगळयांत मोठा देव कोणता म्हणून जो तो वाद घालू लागला. तेव्हा स्वर्गाचा राजा इंद्र म्हणाला की, जो कुणी सर्वांत प्रथम पृथ्वी प्रदक्षिणा करून परत येईल त्याला सर्व देवात श्रेष्ठ समजायचे.

झाले ! सगळे निघाले पृथ्वी प्रदक्षिणेला. सगळयांचे पाहून गणपतीला वाटले आपणही जावे, करावी पृथ्वी प्रदक्षिणा. आपले लंबोदर आणि वाकडी सोंड सावरीत तो मूषकावर स्वार झाला. ते ध्यान पाहून सारे हसू लागले. गणपतीला आला राग, तो गेला आपल्या आईकडे. त्याला पाहून जगन्माता पार्वती म्हणाली, "काय झाले तुला गणेशा ?" त्याने सारी हकीगत आईला सांगितली. आई म्हणाली, "बाळा, तू काळजी करू नकोस. पृथ्वी म्हणजे आई. आईला प्रदक्षिणा घातलीस म्हणजे तुझी पृथ्वी प्रदक्षिणा होईल." गणपतीने आईचे म्हणणे ऐकले. आपल्या मातेला प्रदक्षिणा घालून, तिचा

आशिर्वाद घेऊन सगळ्यांच्या आधी तो हजर झाला. एकामागून एकेक देव येऊ लागले. सर्वांच्या आधी गणपतीला पाहून सर्व देवांना खूप आश्चर्य वाटले. सगळेजण विचारू लागले, "तू आधी कसा काय आलास ?" त्याला हसणाऱ्यांची तोंडे खाली झाली. मग गणपतीने सगळ्यांना घडलेली हकीगत सांगितली. मातेचे महात्म्य जाणून देवांचा, गणांचा, अधिपती म्हणून गजाननाची श्रेष्ठता कबूल केली. गणपती मात्र भली खोड मोडली देवांची म्हणून गालात हासत होता व 'मातृ देवो भव' म्हणून मनातल्या मनात त्याने कितीतरी वेळा आईला वंदन केले.

असा हा गणपती, मातृभक्त, आईची आज्ञा शिरसावंद्य मानणारा, म्हणूनच बिचाऱ्याला आपले शीरही गमवावे लागले व त्या जागी हत्तीचे तोंड बसविल्यामुळे गजानन (म्हणजे ज्याचे तोंड हत्तीचे आहे असा) नाव पडले. तेही स्वीकारावे लागले.

# श्रीगणेशचतुर्थीपूजा

संग्राहक : डॉ. चिं. ना. धर्माधिकारी

चतुर्थ्यां प्रातः शुक्लतिलैः स्नात्वा कृतनित्यक्रियः कर्ता मध्यान्हे कदलीस्तम्भतोरणस्रक्पल्लवरंगावल्यादि शोभितं पूर्ण कुंभादिमंगलोभ्दासितं देवगृहमेत्य सौवर्णीं राजतीं ताम्रीमशक्तौ मृन्मयीं वोक्तलक्षणां गणेशमूर्तिं संपाद्य कृताग्न्युत्तारणां तां पीठे निधाय पूजयेत् ।

आचमनादिदेशकालकथनान्ते मम श्रीसिद्धिविनायकप्रीतिद्वारा सकलपापक्षयपूर्वकं सर्वकर्मनिर्विघ्नपुत्रपौत्राद्यभिवृद्धिमहैश्वर्यविद्याविजयसंपदादि—कल्पोक्तफलसिद्ध्यर्थं श्रीसिद्धिविनायकपूजनं करिष्ये ।

आसनविधिं शरीरशुद्ध्यर्थं भूशुद्ध्यादिन्यासान् कलशाद्यर्चनं च करिष्ये। भूशुद्ध्यादिभिः पुरुषसूक्तादिन्यासैश्चात्मानं पावयित्वा।

अस्य श्रीहेरम्बमंत्रस्य हेरम्बऋषिः। विनायको देवता। त्रिष्टुप् छन्दः। गं बीजम्। ॐ शक्तिः। अभीष्टकामनासिद्ध्यर्थे न्यासे विनियोगः।

ॐ नमो हेरम्बाय। अङ्गुष्ठाभ्यांनमः। हृदयाय नमः। मदमौदिततर्जनीभ्यां नमः। शिरसे स्वाहा। मम संकष्टं मध्यमाभ्यां नमः। शिखायै वषट्। वारय अनामिकाभ्यां नमः कवचाय हुं। निवारयकनिष्ठिकाभ्यां नमः नेत्रत्रयाय वौषट्। हुं फट् स्वाहाकरतलकरपृष्ठाभ्यां नमः अस्त्राय फट् इति दिग्बंधः। ततः कलशशंखघंटादीपान् संपूज्य द्वारपूजां कुर्यात्। पुष्पाक्षतान् गृहीत्वा।

ॐ पूर्वद्वारेश्रियै नमः। गौर्यै नमः। गौरीपतये नमः। दक्षिणद्वारे श्रियै नमः। देव्यै नमः। देवीपतये नमः। पश्चिमद्वारे श्रियै नमः। रत्यै नमः। रतिपतये नमः। उत्तरद्वारे मह्यै नमः। महीपतये०। इतिद्वारपूजा। ततः पीठपूजा। पूर्वादिक्रमेण।

इन्द्रं वो विश्वतस्परि ऋक् इन्द्रम् आवाहयामि।

अग्निं दूतं वृणीमहे०। अग्निमा०। यमाय सोमं०।

यममावा०। मोषुणः परापरा०। निर्ऋतिं०। तत्त्वायामित्र०।

वरुणं०। तववायवृतस्पते०। वायुमावा०। सोमौ धेनुं०।

सोममावा०। तमीशानं०। ईश्वरं०। मध्ये गणपतिमावाहयामि।

प्राच्यां वज्राय नमः। दक्षिणस्यां दण्डाय०।
पश्चिमस्यां खड्गाय० उत्तरस्यां पाशाय नमः
प्राच्यां ध्वजाय०। दक्षिणस्यां चक्राय०।
पश्चिमस्यां पद्माय०। उत्तरस्याम् अङ्कुशाय।
दलाब्दहिः पूर्वादिदिक्षुक्रमेण आवाहयेत्।

धर्माय नमः । ज्ञानाय० । वैराग्याय० ।
ऐश्वर्याय० । अधर्माय० । अज्ञानाय० । अवैराग्याय० ।
अनैश्वर्याय० ।। ततो दलेषु । अनन्तं आवाह० ।
पद्मं० सूर्यं० वह्निं० सर्वात्मानं० रजसात्मानं०
तमसात्मानं० मध्ये सर्वशक्ति पीठात्मने ।। ततः केसरेषु० ।।
तीव्रां० ज्वालिनीं० नन्दां० भोगदां० उग्रा० तेजोवतीं०
सह्यां० मध्ये विघ्ननाशिनीं० ।। ततः आधारशक्तये०

मूलप्रकृतये० कूर्माय० अनंताय० पृथिव्यै० कंदाय० नालाय०
पत्रेभ्यो० दलेभ्यो० बीजेभ्यो० अष्टदलकमलाय० केसरेभ्यो०
सर्वशक्तिसहिताय० स्वर्णकमलाय नमः । इति पीठपूजा ।।

**अथ प्राणप्रतिष्ठा ।**

अस्यां मूर्तौ देवत्वसंनिधानेन पूजार्हतासिद्ध्यर्थं प्राणप्रतिष्ठां करिष्ये । अस्य श्रीप्राणप्रतिष्ठामंत्रस्य ब्रह्मविष्णुमहेश्वरा ऋषयः । ऋग्यजुः सामानि छन्दांसि । [वरा] प्राणशक्तिर्देवता । आं बीजम् । ह्रीं शक्तिः । क्रों कीलकम् । अस्यां मूर्तौ [प्र]ाणप्रतिष्ठापने० । देवस्य हृदि करं दत्वा जपेत् । ॐ आं ह्रीं क्रों यं रं लं वं [शं] षं सं हं हंसः सोऽहम् । देवस्य प्राणा इह प्राणाः । आं ह्रीं० सोऽहम् । देवस्य [ज]ीव इह स्थितः । आं ह्रीं० सोऽहम् । देवस्य सर्वेन्द्रियाणि । आं ह्रीं० सोऽहम् । [दे]वस्य वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रघ्राणप्राणाइहागत्य सुखं सुचिरं तिष्ठन्तु स्वाहा । [इ]मं मंत्रं त्रिः सकृद्वा जपेत् ।

असुनीते पुन० ।। चत्वारिवाक्० । रक्तांभोधिस्थ० ।

[दे]वस्य गर्भाधानादि पञ्चदशसंस्कारसिद्ध्यर्थं पञ्चदशप्रणवावृत्तीः क०
। ॐ १५ ।।

अञ्जति त्वामध्वरे देवयन्तो वनस्पते मधुना दैव्येन ।
यदूर्ध्वस्तिष्ठाद्द्रविणेह धत्ताद्यद्वाक्षयो मातुरस्या उपस्थे ।।

इति स्वर्णादिशलाकया देवस्य नेत्रे अभ्यज्योपहारं निवेदयेत्। एवं विस्त
संभवे प्रतिमायाः कपोलौ स्पृशन्।

"अस्यै प्राणाः प्रतिष्ठंतु अस्यै प्राणाः क्षरंतु च ॥
अस्यै देवत्वमर्चायै मामहेति च कश्चन ॥"
इति परिभाषोक्तं श्लोकं पठेत्।
एकदन्तं शूर्पकर्णं गजवक्त्रं चतुर्भुजम्।
पाशाङ्.कुशधरं देवं ध्यायेत् सिद्धिविनायकम् ॥

**ध्यानम्**

( यद्वा – ध्यायेद्गजाननं देवं पद्मकाञ्चनसंनिभम्।
चतुर्भुजं महाकायं सर्वाभरणभूषितम् ॥
दन्ताक्षमालापरशुपूर्णमोदकधारिणम्।
मोदकासक्तशुण्डाग्रमेकदन्तं विनायकम् ॥)

सहस्रशीर्षा०।

**आवाहनम्**

आवाहयामि विघ्नेश सुरराजार्चितेश्वर।
अनाथनाथ सर्वज्ञ पूजार्थं गणनायक।

पुरुष एवेदं ०।

**आसनम् :–**

विचित्ररत्नरचितं दिव्यास्तरणसंयुतम्।
स्वर्णसिंहासनं चारु गृहाण सुरपूजित ॥

एतावानस्य ० ॥

**पाद्यम् :–**

सर्वतीर्थसमुद्भूतं पाद्यं गंधादिभिर्युतम्।
विघ्नराज गृहाणेदं भगवन् भक्तवत्सल ॥

त्रिपादूर्ध्व ० ॥

**अर्घ्यम् —**

अर्घ्यं च फलसंयुक्तं गन्धपुष्पाक्षतैर्युतम् ।
गणाध्यक्ष नमस्तेऽस्तु गृहाण करुणानिधे ॥

तस्माद्विराळ ० ।

**आचमनम्**

विनायक नमस्तुभ्यं त्रिदशैरभिवंदित ।
गङ्गोदकेन देवेश शीघ्रमाचमनं कुरु ॥

यत् पुरुषेण ० ॥

**मलापकर्षितं स्नानम् —**

गङ्गासरस्वतीरेवापयोष्णीयमुनाजलैः ।
स्नापितोऽसि मया देव तथा शांतिं कुरुष्व मे ।

दधिक्राव्णो ॥

**मधुपर्कम् —**

दध्याज्यमधुसंयुक्तं मधुपर्कं मया हृतम् ।
गृहाण सर्वलोकेश गणनाथ नमोऽस्तु ते ॥

आप्यायस्व ० ॥

कामधेनु ० ॥ पयःस्नानं ॥ दधिक्राव्णो ० ॥

चंद्रमंडल ० ॥ दधि ० ॥ घृतं मिमिक्षे ० ॥

आज्यं सुराणा ० ॥ घृत ० ॥ मधुवाता ० ॥ सर्वौषधि ० ॥

मधु ० ॥ स्वादुः पवस्व ० ॥ इक्षुदण्ड ० ॥ शर्करास्ना ० ॥

**अङ्गोद्वर्तनम् ।**

सुगंधिद्रव्यसंमिश्रं तैलं सह हरिद्रया ।
दिव्यं सुरभिपुष्पोत्थं गृहाणोद्वर्तनं विभो ॥

कनिक्रदज्जनुषं ० ॥

**उष्णोदकम् –**

नानातीर्थाहृतं यत्नात् तोयमुष्णं मया कृतम् ।
मङ्गलं गात्रसुखदं स्नानार्थं देव गृह्यताम् ।।

गन्धद्वारां दुरा० ।

**गन्धोदक स्नानं–**

चन्दनागरूकर्पूर-सुरभिस्वादु-शीतलम् ।
एलोशीरलवङ्गाढ्यं स्नानार्थं वारि गृह्यताम् ।।
आपो हि ष्ठा० ।। शुद्धोदकस्नानं ।। आचम० ।।
गन्धादिभिः पूर्वपूजान्ते वैदिकसूक्तैः सुरास्त्वामित्याद्यैश्चाभिषेकः ।
तदस्तु० ।। तं यज्ञं० ।।

रक्तवस्त्रयुगं देवदेवतार्हं सुमङ्गलम् ।
सर्वप्रद गृहाणेदं लंबोदरहरात्मज ।।
सर्वप्रदाय० रक्तवस्त्रद्वयं ।। आचमनं० ।।
तस्माद्यज्ञात् सर्व० ।।

**यज्ञोपवीतम्–**

राजतं ब्रह्मसूत्रं च काञ्चनस्योत्तरीयकम् ।
विनायकनमस्तेऽस्तू गृहाण सुरवंदित ।

**भूषणानि–**

नानविधानि दिव्यानि नानारत्नोज्ज्वलानि च ।।
भूषणानि गृहणेश पार्वती प्रियनंदन ।।

**विलेपनम्–**

तस्माद्यज्ञा ०

कस्तूरीसहितं दिव्यं कुङ्कुमेन विराजितम् ।
विलेपनं सुर० । गणाध्यक्षाय० चंदनं ।

**रक्ताक्षतान्–**

रक्ताक्षतांश्च देवेश गृहाण द्विरदानन ।
ललाटपटलेचन्द्रस्तस्योपर्यवधारय ॥

**सिंदूरम्–**

सिन्दूरमरुणाभासंबालार्क सदृशद्युति ।
वीरालङ्करणं दिव्यं गृहाण गणनायक ॥
अहिरिव० ॥

**परिमलद्रव्यम्–**

कस्तूर्याद्यैर्विमिश्रं चनानाचूर्णैः सुगंधिभिः ।
प्रीत्यर्थं ते गृहाणेदं गंध-द्रव्यं गणेश्वर ॥
तस्मादश्वा० ॥ माल्यादीनि ॥ विनायकाय० । पुष्पाणि ॥

**अथाङ्गपूजा–**

गणेशाय नमः । पादौ पूजयामि ॥
विघ्नराजाय० जानुनी० ॥ आखुवाहनाय० ऊरू० ॥
हेरम्बाय० । कटिं० । कामारिसूनवे० नाभिं० ॥
लम्बोदराय० उदरं० ॥ गौरीसुताय० हृदयं० ॥
स्थूलकण्ठा० कंठं० ॥ स्कन्दाग्रजा० स्कन्धौ० ॥
पाशहस्ताय० हस्तौ ॥ गजवक्त्राय० वक्त्रम् ॥
विघ्नहर्त्रे० नेत्रे० ॥ सर्वेश्वराय० शिरः० ॥
गणाधिपाय० सर्वाङ्गपू० ॥

**अथ नामपूजा–**

विघ्नराजाय० गजाननाय० लम्बोदराय० शिवात्मजाय० वक्रतुण्डाय० शूर्पकर्णाय० गणेश्वराय० विघ्ननाशिने० विकटाय० वामनाय० सर्वदेवाय० सर्वदुःखविनाशिने० विघ्नहर्त्रे० धूम्राय० सर्वदेवाधिदेवाय० एकदन्ताय० कृष्णपिङ्गलाय० भालचन्द्राय० गणनाथाय० शंङ्करसूनवे० अनङ्गपूजिताय नमः ।

**अथावरण पूजा–**

गणनाथाय० हेरम्बाय० इभवक्त्राय० मूषकवाहनाय०
शिवप्रियाय० उमापुत्राय० ॥
दयाब्धे त्राहि संसारसर्पान् मां शरणागतम् ।
भक्त्या समर्पयेत् त्वाऽहं प्रथमावरणार्चनम् ॥
प्रथमावरणपूजां सम० १ ॥

वरगणपतये० सुरगण० चण्डगण० इभवक्त्रगण०
क्षिप्रगण० प्रसादगण० लम्बोदरगण० ॥ द्वितीयावरणं २ ॥

इन्द्राय० अग्नये० यमाय० निर्ऋतये० वरुणाय० वायवे०
कुबेराय० ईशानाय० तृतीयावरणं ३ ॥

विनायकाय० द्वैमातुराय० विघ्नराजाय० गणाधिपाय० हेरम्बाय०
एकदन्ताय० लम्बोदराय० ॥ चतुर्थावरणं० ४ ॥

तीक्ष्णदंष्ट्राय० सूतरूपाय० गजास्याय० त्रिनेत्राय०
रक्तप्रियाय० बृहदुदराय० सुखन्द्याय० शिवसुताय०
पञ्चमावरणम् ५ ॥

भद्रकालिने० भैरवाय० शेषाय० वरुणाय० सतांपतये०
संवत्सराय० शान्ताय० ॥ षष्ठावरणम् ६ ॥

सरस्वत्यै० लक्ष्म्यै० भारत्यै० ब्रह्मणे० विष्णवे० रुद्राय० आकाशाय०
वेदाय० वास्तुपुरुषाय० ॥ सप्तमावरणम् ७ ॥

**अथ पत्रपूजा–**

सुमुखाय० मालतीपत्रं ॥ गणाधिपाय० भृङ्गराज० ॥
उमापुत्राय० बिल्व० ॥ गजाननाय० श्वेतदूर्वा० ॥
लम्बोदराय० बदरी० ॥ हरसूनवे० धत्तूर० ॥
गजकर्णाय० तुलसी० ॥ गुहाग्रजाय ० अपामार्ग० ॥
वक्रतुण्डाय० शमी० ॥ एकदन्ताय० केतकी० ॥ विकटाय० करवीर० ॥

विनायकाय० अश्मंतक० ॥ कपिलाय० अर्क० ॥
भिन्नदन्ताय० अर्जुन० ॥ पत्नीयुताय० विष्णुक्रान्त० ॥
बटवे० दाडिमी० ॥ सुरेशाय० देवदारु० ॥ भालचन्द्राय० मरुबक० ॥
हेरम्बाय० सिंदुवार० ॥ शूर्पकर्णाय० जाती० ॥
सर्वेश्वराय० अगस्ति पत्रं० २१ ॥

**अथ पुष्पपूजा —**

सुमुखाय० जाती-पुष्पं० ॥ एकदन्ताय० शतपुष्पं ० ॥
कपिलाय० मालती० ॥ गजकर्णाय० चम्पक० ॥
लम्बोदराय० कल्हार० ॥ भक्तप्रियाय० धत्तूर० ॥
भालचन्द्राय० बकुल० ॥ पत्नीयुताय० मन्दार० ॥
उमापुत्राय० करवीर० ॥ अघहन्त्रे० पारिजात० ॥
द्वैमातुराय० मल्लिका० ॥ गिरिजात्मजाय० कर्णिका० ॥
दीर्घदन्ताय० कुमुद० ॥ स्थूलकर्णाय० मुनि० ॥
विघ्नेश्वराय० पुंनाग० ॥ गणाधिपाय० जपा० ॥
नागभूषणाय० नागचम्पक० ॥ विकटाय० पाटल० ॥
सुरेश्वराय० कुरण्टक० ॥ शिवप्रियाय० तगर० ॥
गणाधिपाय० यूथिकापु० ॥ २१ ॥

यत् पुरुषं —

दशाङ्गं गुग्गुलं धूपमुत्तमं गणनायक ॥
गृहाण देवदेवेश उमासुत नमोऽस्तु ते ॥
उमासुताय धूपं ॥

ब्राह्मणोऽस्य० ॥

दीप्तं ज्ञानप्रदं चारुघृतवर्तिसमन्वितम् ।
गृहाण मङ्गलं दीपं रुद्रप्रिय नमोऽस्तु ते ॥
रुद्रप्रियाय० दीपं । चन्द्रमा० ॥

सफलं सगुडं देव मोदकं धृतपाचितम् ।
नैवेद्यं सघृतं दत्तं नमस्ते विघ्ननाशिने ॥
विघ्ननाशिने० नैवेद्यम् ० ॥

फलान्यमृततुल्यानि सुस्वादून्यघनाशन ।
आनीतानि मया भक्त्या गृहाणेमानि सर्वदा ॥
फलं । पूगीफलं० ताम्बूलं ० ॥
हिरण्यगर्भ० दक्षिणां० ॥ श्रियेजातः० ॥

**नीराञ्जनम् —**

कर्पूरनिर्मितं रम्यं स्वर्णपात्रे निवेशितं ।
नीराञ्जनं गृहाणेदं चन्द्रकान्ति हरं प्रभो ॥
नाभ्या आसी० ॥

नमस्ते विघ्नसंहर्त्रे नमस्तेऽभीप्सितप्रद ।
नमस्ते देव देवेश गणाधिप नमोऽस्तुते ॥
नमस्कारम् ॥

सप्तास्यासन्० ॥

विघ्नेश्वरविशालाक्ष सर्वकामफलप्रद ।
प्रदक्षिणीकरोमि त्वामभीष्टं देहि मे सदा ॥
प्रदक्षिणाः ।

तत एकविऽशतिदूर्वाङ्कुरानादाय वक्ष्यमाण दशनामभिरेकैकं दूर्वायुग्मं सगन्धमर्पयेत् ।

गणाधिपाय० उमापुत्रा० अघनाशना० विनायका० ईशपुत्रा०
सर्वसिद्धिप्रदा० एकदन्ता० इभवक्त्रा० मूषकवाहना०
कुमारगुरवे० ॥ १० ॥

अवशिष्टमेकदूर्वांकुरं दशनामभिर्दद्यात् ॥ यज्ञेन यज्ञ०

**पुष्पाञ्जलिम् —**

मालतीमल्लिकाजातीपद्ममंदारचम्पकैः ।
भक्त्यार्ऽपितं मया देव गृहाण कुसुमाञ्जलिम् ॥

**राजोपचारान्—**

(क्वचिदर्घ्याणि ।
गौर्य-कमलसंभूतज्येष्ठस्वामिकुमारक ।
गृहाणार्घ्यं मया दत्तं गजवक्त्र नमोऽस्तुते ॥ इदमर्घ्यं० ॥
गणेशाय नमस्तुभ्यं सर्वकामफलप्रद ।
वाञ्छितं देहि मे नित्यं गृहाणार्घ्यं नमोऽस्तुते ॥ इदमर्घ्यं० ॥
व्रतमुद्दिश्य विघ्नेश गन्ध पुष्पाक्षतैर्युतम् ।
गृहाणार्घ्यं मया दत्तं सर्वसिद्धि प्रयच्छ मे ॥ इदमर्घ्यं० इति ।)
यन्मयाऽऽचरितं देव व्रतमेतत् सुदुर्लभम् ।
त्वत्प्रसादाद्गणेश त्वं सफलं कुरु सर्वदा ॥
कार्यं मे सिद्धिमायातु पूजिते त्वयि धातरि ।
विघ्नानि नाशमायान्तु सर्वाणि सुरनायक ॥
मन्त्रहीनं० ॥ रूपं देहि० ॥ प्रार्थनां० ॥

तत एकविंशति मोदकान् गणेशाग्रे संस्थाप्य तत्रैकं
सनैवेद्यं देवाय निवेद्य व्रतोपदेष्टारं ब्राह्मणं संपूज्य
तस्मै दश मोदक-वायनं व्रतपूर्त्यै दद्यात् । तत्र मन्त्रः ।

विनायक नमस्तुभ्यं सततं मोदकप्रिय ।
अविघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥
दशानां मोदकानां च दक्षिणाफलसंयुतम् ।
विप्राय तव तुष्टचर्थं वायनं प्रददाम्यहम् ॥
ततः शक्त्या विप्रान् संभोज्य भूयसीं दत्वा ॥

"गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ स्वस्थाने त्वं गणेश्वर ।
व्रतेनानेन मे नित्यं यथोक्तफलदो भव" इति प्रतिमां विसृज्य
ब्राह्मणाय दद्यात् ।

विनायकस्य प्रतिमां वस्त्रयुग्मसमन्विताम् ।
तुभ्यं संप्रददे विप्र प्रीयतां मे गजाननः ॥
गणेशः प्रतिगृह्णाति गणेशो वै ददाति च ।
गणेशस्तोरकोऽभाभ्यां गणेशाय नमो नमः ॥
विनायकगणेशान सर्वदेवनमस्कृत ।
पार्वती प्रिय विघ्नेश मम विघ्नं विनायश ॥
स्वर्णपूजातर्पणादि गणेशगायत्र्या कुर्यात् ।
जपोप्यष्टसहस्त्रादि यथाशक्ति कुर्यादिति निर्णयामृते ॥
ततः पूर्वविवशिष्ट-दश-मोदकसहितं तैलवर्जमन्नं भुञ्जीतेति ॥

इदानीं शिष्टास्तु ब्राह्मण भोजनान्ते देवमविसृज्य स्वेच्छया यथा कुलाचारं वा कतिचिद्दिनानि संस्थाप्य मंत्रपाठ-पुराण-श्रवण नृत्यगीतादिभिरुत्सवं कृत्वा तदन्ते देवं विसृज्य नद्यादौ क्षिपन्ति । तत्र ब्राह्मणान् भोजयेत् । पश्चात् जागरं च विशेषत इति स्यमन्तकोपाख्यानस्थं स्कान्दं पूर्वोक्तं गाणेशं च मूलमिति भाति । केचित् तु प्रतिमां विसृज्य गृह एव स्थापयन्ति । इति गणेशचतुर्थ्यां सिद्धिविनायकपूजा संपूर्णा ॥

**पूजाविधि–फलश्रुतिः ।**

पापक्षयोऽभिषेकेण साम्राज्यं पीठपूजनात् ।
गन्धदानाच्च सौभाग्यमायुरक्षत-दानतः ॥
धूपदानेन सौगन्ध्यं कान्तिर्दीप प्रदानतः ।
नैवेद्येन महाभोगो लक्ष्मीस्ताम्बूलदानतः ।
धर्मार्थकाममोक्षाश्च नमस्कार प्रभावतः ।
अष्टैश्वर्यादि सिद्धीनां जप एव हि कारणम् ।
होमेन सर्वसौख्यानां समृद्धिरुपजायते ॥
सर्वेषामेव देवानां तुष्टिः संयमिभोजनात् ।
इत्थमाराधय शिवं सोमवारे शिवामपि ॥

(व्रतराज पृष्ठ ४५०)

अनुक्रम :—

स्वरविलास

# स्वरविलास

गळ्यातला सूर आणि गीताची लय जमली तरच गाणं ऐकायला, लक्षात घ्यायला, बरं वाटतं. त्यातून चार चौघीजणी एकत्र जमल्या आणि सणासुदीच्या कारणानं खेळगाणी गायला लागल्या म्हणजे तर हे फार आवश्यक असतं. म्हणून खेळ खेळताना गीतं म्हणायची वेळ आली की, वडीलधाऱ्या बायका सांगतात, "एका सुरात घ्या ग!" आणि होतंही तसंच. अशावेळी पायातील घुंगूरते पैंजण वाळे, जोडवी, मासोळ्या आणि हातातील खुळखुळत्या बांगड्या आपोआप ताल धरतात. लय साधतात. कधी कधी हातांचे टाळ न् देहाचा मृदंग होतो! मधून मधून पाय झणकारतात, दणाणतात. तोंडाचा पक्वा (पिंगा) घुमतो. त्या कारणानं झक्कासपैकी संगीत सभा साजरी होते.

सणासुदीची खेळगाणी म्हणूनच सगळं अंगण घुमारून न् दणाणून सोडतात. रात्री रात्री सुखावतात. घरदार या स्वरविलासानं मधाळून जातं. पारंपारिक सुरावटीचा कचकून उपसा होतो न् जनजागराणातला आगळा आनंद ऐश्वर्यशाली ठरतो.

# लोकसंगीत

श्री. सोपानदेव चौधरी

लोकसंगीत आले ते जनमनातून. आतल्या आत मन बसे सारखे गात, अशा मनातून. कामं करता करता कष्ट हलके करण्यासाठी उत्स्फूर्त झालेले हे संगीत. घाम गाळता गाळता निर्माण झालेला हा साम. या संगीताला कोणत्या एकाद्या दरबारी वाद्याची साथ मिळाली नाही. मिळालीच असेल तर जात्याच्या घरघरीची, हाती घेतलेल्या टिपऱ्यांची, झोक्यावरील वाऱ्याच्या झोतांची, घागर घुम्म्याची, मोटेवरील कुर्कुचुंग कुर्कुचुंग या आवाजाची. फार झाले तर घरी बैठकीत एकतारीची अन् डफ दिमडीची, एवढेच.

लोकगीतातील संगीताचा विस्तार मर्यादित आहे. त्याला विस्तार म्हणणेही योग्य होणार नाही. आटोपशीरपणा हेच या संगीताचे वैशिष्टच म्हणता येईल. स्वरविस्तारापेक्षा इथे गोडव्याला जास्त महत्त्व आहे. स्वरातील आळवणीला व मिळवणीला जास्त महत्त्व आहे. शास्त्रीय संगीताप्रमाणे त्यात स्वरांचा विकास आणि विलास नसला तरी त्यातील खुमारीला स्वतंत्र स्थान आहे. हे संगीतासाठी संगीत नसून गीतासाठी संगीत आहे. स्वरविस्तारा-ऐवजी येथे स्वर मुरत असतात, भिनत असतात, भिजत असतात. रब्बीच्या भीजपावसाप्रमाणे हे भीजसंगीत आहे. आणि म्हणूनच हे मर्यादित संगीत अमर्याद आनंद निर्माण करते. लोकसंगीताची ही बाजू भारतातील काही सिनेसंगीत दिग्दर्शकांनी राबवून घेतल्याचे दिसून येईल. जनतेच्या ओठांवर असलेली बहुतेक सिनेमातली गाणी लोकसंगीतातून घेतलेली आहेत असे आढळून येईल. शास्त्रीय संगीतात देखील आपण एक गंमत पहा, बिसमिल्ला यांनी कितीही रागरागिण्या शहनाईवर सुनावल्या तरी कजरी केव्हा सुरू होते, याची रसिकजन उत्सुकतेने वाट बघत असतात. कारण 'कजरी' हा प्रकार लोकसंगीतातूनच उचलला आहे. सर्वस्पर्शी काव्याप्रमाणेच सर्वस्पर्शी स्वर-समूहालाही तितकेच महत्त्व आहे. वादनकाराच्या बैठकीप्रमाणेच गवैय्याच्या

बैठकीतही आपणास हाच अनुभव येईल. तालाची साथ देणारा तबलजी ठुमरीला साथ देताना लोकसंगीतातील एकादी लग्गी लावतो. त्यावेळी गाण्याला किती रंग चढतो हे मीच सांगायला हवे, असे नाही.

लोकगीतातील काही गीतांना नुसती एक अस्थाई असते. अधूनमधून तिचा घाट तेवढा बदलत असतो. त्याच स्वरावर गाणारांचे भाराभर निवेदन चाललेले असते. गीतातील स्वर षड्जाची चाहूल घेत घेत त्याच्या आसपास घुटमळत असतात. ज्या लोकगीतांना अंतरे असतात ते देखील आटोपशीर गंधार मध्यमपर्यंत, फार झाले तर पंचमपर्यंतच असतात. शास्त्रीय संगीताइतका पल्ला ते गाठू शकत नाहीत. परंतु वर्ण्य विषयाचे दर्शन ते घडवितात.

ही लोकगीते ज्यांना स्फुरली तेच याचे संगीतकार आहेत हे उघड आहे. एकाद दुसऱ्या साक्षर माणसाला ही गीते स्फुरली तरी बहुधा निरक्षर जनतेच्या मुखातूनच ही गीते स्फुरलेली आढळून येतील. माणूस निरक्षर असला तरी तो निर्बुद्ध नसतो. अशिक्षित असला तरी तो अरसिक नसतो.

**माळी हाकी मोट**
**माळीण धरी वारं**
**दोन्हीच्या इच्यारानं**
**मळा दिसे हिरवागार**

पतिपत्नींच्या दोन जिवांची एकरूपता बघून मळा देखील हिरवागार दिसायला लागतो. या माळी-माळिणीचा जिव्हाळा विहिरीचे झरे उसळायला लावतो. ओसंडलेल्या मोटेचा घोघोंकार थारोळ्यात येऊन पडतो. असा या ओवीचा संकेत आहे.

दळण दळणारी बाई जात्यात धान्याचे घास टाकते. त्याचे पीठ होते. ही वस्तुस्थिती आहे. परंतु त्या वस्तुस्थितीत देखील दिव्यानुभूति घेणाऱ्या संतवाणीचा संस्कार घडलेल्या काही माय-माउल्या असतात. त्यांच्या जीवाची आणि जात्यांतल्या जीवाची एकरूपता होते. आणि म्हणूनच आमचे आधुनिक कवि मधुकर केचे म्हणतात–

जेव्हा संतांच्या वाणीचा वेदनांचा वेद झाला
तेव्हा जात्यातला जीव पीठ होऊन हासला

'ज्याच्या हाताला घट्टे त्याला देव भेटे.' अशांनाच जात्यातला जीव पीठ होऊन हासताना दिसेल. तसेच या जात्यावर बसून सुचलेल्या गाण्यातील स्वर नाचताना दिसतील. कविमन असलेल्या माणसाच्या हृदयातील भावना बोलू लागल्या म्हणजे त्या रसानुकूल असे स्वर घेऊन येतात. बोलता बोलता तो गाऊ लागतो. स्वरांच्या वाहनावर त्याचे ते गेय निवेदन चालू असते.

आदिवासी जनांच्या परिसरांमध्ये मी कंसारीची गाणी ऐकली. जवळ जवळ रात्रभर ते लोक स्वरांच्या धूनमध्ये गाणी गात होते. संगीतशास्त्राच्या दृष्टीने त्यात काय होते असे जर कुणी विचारले तर 'विशेष काही नाही.' असेच उत्तर द्यावे लागेल. परंतु कडव्यागणिक शेवटच्या अक्षरावर येताच स्वरांची कंपायमान गिरकी घेऊन पुन्हा दुसऱ्या ओळीवर येण्याची त्यांची करामत वाखाणण्यासारखी होती. टारपीच्या साथीवर त्यांचा निषाध स्वर षड्जामध्ये विरघळून जात होता. मला वाटते एकादा खानदान गवयीसुद्धा त्यावेळी 'बहोत अच्छे' असे उद्‌गार काढल्याशिवाय राहिला नसता. तो स्वरातील आनंद येथे लिहिता येणे अशक्य आहे. हृदय कसे चालते या बाबतीत स्पेशालिस्ट डॉक्टराकडून यंत्राच्या सहाय्याने त्यातून कागदी लेखन समजले तरी त्यातील भावना उमगत नाहीत! त्याचप्रमाणे या ठिकाणी स्वरांचे नोटेशन केले तरी त्यातील आर्ततेचे दर्शन घडविता येणे अशक्य आहे. त्यासाठी प्रात्यक्षिक करूनच अशा गोष्टी उमजण्यासारख्या असतात. ज्या अर्थाचे गाणे असेल त्या अर्थाशी ते इतके तल्लीन होतात की, गाणे गाता गाता त्यांना माहीत नसलेले गोड स्वर देखील तेथे हजेरी देऊन जातात. फार वर्षापूर्वी ऐकलेले ते गाणे मला आठवत नाही. परंतु त्या गाण्यातील स्वर आणि टारपीची साथ अजूनही कानात घुमते आहे. त्या गाण्यातील स्वर ज्या एका लोकगीतात येऊन गेले त्यातील स्वर सादर करून दुधाची तहान ताकावर भागवितो

माझी भवरी गाय भिंगरी रे राजा
चारा चरे डोंगरी कि जिला
राखीतो शिरिहारी
गाऊनि नानापरी

ठराविक स्वरातच ही गीते गायिली गेली असल्यामुळे एकापेक्षा अधिक अक्षरे एकाच स्वरावर येत असतात. परंतु आश्चर्य असे की, अक्षरागणिक त्याच स्वरांची आंदोलने निरनिराळी असतात, असे जाणत्याला आढळून येईल. धृव-पदावर येताना स्वरांची मिळवणी देखील याच वैशिष्ठ्याने होत असते.

आता तालाच्या दृष्टीने बघू गेल्यास आपणाला असाच अनुभव येईल. चतुरस्र जातीतील केरवा आणि तिरस्र जातीतील दादरा, खेमटा अशा प्रकारचे चार आणि सहा मात्रांचे तालच विशेषतः या लोकसंगीतात येतात.

नशिबी दगड गोटे काट्याकुट्याचा धनी
पायाले लागे ठेचा आलं डोयाले पानी
वरून तापे ऊन आंग झालं रे लाही
चालला आढवानी फोड आले रे पायी
जानच पडीत रे पायी तुले लोकाच्यासाठी
वाटंच्या वाटसरा वाट बिकट मोठी

येथे सहा मात्रांचा दादरा असला तरी शास्त्रीय संगीतातील धातीना धातीना हे बोल त्याला मंजूर नसतात.

'धिन्नाक्डं तिन्नाक्डं'
तडबी
गांबड गंबा काण्डे गंबा

या बोलांनी तो येत असतो ( हे बोल विशेषतः घागरघुम्मा या नाचाचेवेळी आम्ही प्रत्यक्षात ऐकले आहेत )

आता हा पाच मात्रांचा ताल पहा –

आले हरी आले हरी
बसले पलंगावरी जी
माझा हात माझा हात
हरीच्या मांडीवरी जी

झपताल या दहा मांत्राच्या तालाचा अर्धा तुकडा येथे येऊन जातो.

| धी | ना | ती | त्ती | ना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |

लोकसंगीतातील ताल एकादे वेळी समेवर येताना कशी झेप घेतो ते सांगू? सांगतोच–

आता फुगडी फूऽ नारी फुगडी फूऽऽ
ब्रह्मचारी तूऽशिणलास काय माझ्या गोविंदा तूऽऽ

**भैरवी**

हुक्का कोठे ठेवला ग नारी हुक्का कोठे ठेविला....

ती : बाई नारळाच्या मिषेनं तो मी देवापुढं फोडिला
तो : हुक्का गेला तर जाऊं दे ग नारी चिलीम कुठे ठेवली
ती : बाई खोबऱ्याच्या मिषेनं ती मी मस्साल्यात वाटली
तो : चिलीम गेली तर जाऊंदे ग नारी तमाकु कोठे ठेवली
ती : बाई आमसूलाच्या मिषेनं ती मी कढीमध्ये टाकीली
तो : तमाकु गेली तर जाऊंदे ग नारी खडा कोठे ठेवला
ती : बाई सुप्पारीच्या मिषेनं तो मी तोंडामध्ये टाकीला
तो : खडा गेला तर जाऊंदे ग नारी छापी कोठे ठेवली
ती : फाटलं तुमचं अंगातलं आंगडं ठिगळासाठी लावली
तो : छापी गेली तर जाऊंदे ग नारी विस्तव कोठे ठेविला
ती : तापत नव्हतं पाणी म्हणूनी पाण्यातच मी टाकीला

तो : सगळंच वाया गेलं तर मग नवरा कशाला ठेवला
ती : नवरा नवरा चिलिमीचा ह्यावरा तल्फीसाठी राहिला

देवदर्शनाला जाताना पायरीला वंदन करून नंतर तिच्यावर पाय ठेवून आपण पुढे जातो. लोकसंगीताकडे कुणी दुर्लक्ष केले तरी हे वंदन त्याला करावेच लागते. लोकसंगीताच्या चाली आधुनिक कवींनी किती उचलल्या याची मोजदाद नाही. ती मोजदाद कै. माधवराव पटवर्धन यांनी आपल्या छंदोरचना ग्रंथात केली आहे. कविवर्य तांबे यांच्या 'डोळे हे जुल्मि गडे' पासून तर मर्ढेकरांच्या 'डोळे हे फिल्मी गडे' पर्यंत आधुनिक कवींच्या ज्या ज्या कविता झाल्या त्या बहुतेक लोकसंगीताचे स्वर घेऊन आल्या आहेत.

# लोकगीते आणि संगीत

डॉ. सरोजिनी बाबर

आमचा भारत देश स्वतंत्र झाला आणि या देशाच्या पुनरुत्थानाचे कार्य स्वयंस्फूर्तीने सुरू झाले. पंचवार्षिक योजना निघाल्या. गावोगावचा विकास सुरू झाला. दळणवळणाची साधने वाढली. सामान्यांचे जीवन सुधारू लागले. त्यांचेजवळील असामान्य गुणांचा विकास घडत चालला. गुणांची पारख होऊ लागली. सर्वसामान्यांच्या जवळचे असामान्यत्व बघून त्यांचा सन्मान होऊ लागला. गौरवाची भाषा निघाली. देशाच्या वैभवाचे मोजमाप होऊ लागले.

हे मोजमाप होत असतांना ज्या अनेक बाबींचा विचार झाला, त्यापैकी लोकगीते व लोकसंगीत ही देखील एक महत्त्वाची बाब म्हणून लक्षात घेतली गेली. भारताच्या हर ठिकाणच्या आकाशवाणीने या गोष्टीची दखल घेतली, त्यामुळे एके काळी सर्वसामान्य जनलोकाच्या मनात लोकप्रिय असलेली लोकगीते

व त्यांचे संगीत पुन्हा लोकमान्य होत चालले. सामान्य कलाकार जगापुढे येत चालले. त्यांचा सहानुभूतीने विचार होऊ लागला. मानसन्मान घडू लागला. चार मोठ्या माणसात त्यांची उठबैस होऊ लागली. त्यांच्या अंगच्या कलेची वाहवा होत चालली.

म्हणून आजकाल लोकगीते व लोकसंगीत यांचा सगळीकडे बोलबाला होऊ लागला आहे. ज्या गोष्टीकडे विचारवंताचे दुर्लक्ष झाले होते, त्याच गोष्टी आता संशोधनाचा विषय म्हणून मानाने पुढे येऊ लागल्या आहेत. त्यांची लोकप्रियता वाढत्या वयाचे लेणे लेवू लागली आहे.

आमच्या मराठी मायबोलीतील लोकगीते आणि त्यांचे संगीत ह्यांनी आमच्या आम जनतेची संस्कृति सांभाळली आहे. आपल्याजवळ साठवलेल्या सुंदर कल्पनांनी आणि चित्तवेधक स्वरसजावटींनी त्यांनी विचारवंताची मने जिंकली आहेत. एवढेच नव्हे तर आपल्यामुळे जीवनातील उच्चतम सौंदर्याची पारख करायला मानवाला शिकविले आहे. पिढ्यान् पिढ्यांनी जिवाभावाने सांभाळ-लेल्या ह्या धनदौलतीची त्या कारणाने निरनिराळ्या कलाकारांनी मोठ्या आवडीने जोपासना केलेली आहे.

लोकगीतांच्या व संगीताच्या ह्या कला विलासामुळे लक्ष्मी आणि सरस्वती यांचा मोठा सुंदर मेळावा बसविला आहे. साहित्य लक्ष्मीबरोबरच त्यामुळे स्वरलक्ष्मीही मानाने आज वावरते आहे. आणखी म्हणून रस्त्याने एकतारीवर गीत गात जाणारा एकतारीवाला किंवा कोका वाजवीत दारोदार भिक्षा मागीत फिरणारा कोकेवाला हा एक सन्माननीय कलाकार म्हणून मानला जाऊ लागला आहे ! आमच्या देशात घडू पाहणारे पुनरुत्थान जे होते आहे म्हणावयाचे ते किंवा सांस्कृतिक जीवनाची जी जोपासना होते आहे म्हणावयाची ती हीच होय.

काव्याचे माध्यम स्वीकारून निर्माण झालेली लोकगीते अंतःकरणाने जेवढी श्रीमंत असतात व कल्पनेने जेवढी वैभवशाली असतात, तेवढीच ती सुरावटीच्या दृष्टीनेही प्रतिभासंपन्न असतात. मनाने ती गावरान असली तरी विचाराने

नागर असतात. त्यांचा जन्म जनलोकांच्या भावनेतून व अंतःकरणातील सर्वोत्तम विचारातून होत असल्यामुळे त्यांची भाषा रोजच्या बोलीतील असली तरी तिची छाप भाषाशास्त्र जाणणाऱ्याच्या मनावर पडते, मोहिनी घालते. तसेच हा लोकगीतांचा स्वरविलास हा दिसायला व ऐकायला साधा वाटला, तरीही संगीताचा तो पाया आहे व भारतीय संगीताचे ऐश्वर्य आहे, ही भाषा जाणत्या संगीततज्ञाला करायला तो भाग पाडतो.

म्हणून लोकगीते व त्यांचे संगीत या गोष्टी वाटतात तेवढ्या साध्या तर नाहीतच पण त्या म्हणाव्या एवढ्या सोप्या देखील नाहीत. कारण हा एक तर संस्कृतीचा वारसा आहे आणि परिपाठाचा भाग आहे व दुसरे म्हणजे जिव्हाळ्याचाही विषय आहे. त्या कारणाने उगाच कोणालाही लोकगीते मिळत नाहीत, येतही नाहीत. आणि सांगायचे म्हणजे पाहिजे तशी ती समजतही नाहीत! मनाला व जिभेला ह्यांचे वळण असावे तरच त्यांचा सहवास लाभतो अशी वस्तुस्थिती आहे. त्यामुळे लोकगीते म्हणताना त्यांची परंपरागत चाल-सुरावट-जेवढी महत्त्वाची तेवढाच शब्दांचा उच्चारही महत्त्वाचा. त्याखेरीज खरा ढंगदारपणा या गीतांना लाभत नाही.

संगीत शास्त्राच्या दृष्टीने विचार करताना ही लोकगीते चार ते पाच स्वरातच गाईली जातात व कोणताही एक राग ते आळवीत नाहीत. त्यांची स्वररचना होते ती गीतानुकूल भावनाविष्काराप्रमाणे व म्हणून ती नेहमीच बदलती रहाणारीही असते. निरनिराळे मिश्र राग ही गीते थोड्याबहुत प्रमाणात आळवतात व प्रामुख्याने 'केरव्या'चा तोल सांभाळतात.

लोकगीतातील ओवी कशी गाईली जाते याचे या संदर्भात नमुन्यादाखल म्हणून जरूर उदाहरण घेता येईल.

प्रत्यक्ष ओवीचे प्रकार म्हणजे चार चरणी ओवी, साडेतीन चरणी ओवी, तीन चरणी ओवी किंवा क्वचित प्रसंगी पाच चरणांचीही ओवी असते. शिवाय ही निरनिराळ्या प्रकारची ओवी गाताना तिला पूरक म्हणून ध्रुवपदासारखी खास अशी वेगवेगळी चरणे जोडण्याचाही प्रघात आहे.

(१)

राम अवतारी सीताबाईला दुःख भारी
कृष्ण अवतारी राज रुक्मीन करी

ही ओवी गाताना दर ओळीला 'साजणीबाई' हा शब्द तर जोडावयाचाच शिवाय–

"राम त्यो घरी न्हाई सुकली जाई"

हा स्वतंत्र चरणही जोडावयाचा व नंतर ओवी पुरी गावयाची.

(२)

चूल बानवशी कसा देवारा लखलखी
आता माजी मैना माझ्या आईची गवळण शिकी

ही ओवी गाताना या दोन्ही ओळी गाऊन झाल्यानंतर 'सई माजे' हे शब्द प्रथम जोडावयाचे व नंतर

सई माज्या गडनीला ग चैन पडना
सुरूच्या झाडाखाली ग राघूमैना

या ओळी ध्रुवपदाप्रमाणे जोडून दरवेळी म्हणावयाच्या असतात.

(३)

किती ग पुण्यं केलं तू तर कुंभाराच्या विटं
विठू दयाळाची माज्या चरणं सापडली कुठं

ही ओवी गाताना प्रत्येक ओळीनंतर–

आट्यापाट्याचा खेळ मोत्याचा
कृष्ण गारुडी बाई गारुडी
गौळण झाली वेडी
सर्व सोडूनी बाई सोडूनी

हा सर्व भाग म्हणावयाचा व नंतर दुसरी ओळ म्हणून मग पुन्हा हाच सर्व भाग म्हणत ही ओवी पुरी गावयाची अशी एक पद्धती आहे.

(४)

तुळशीबाई नको फिरुस जंगलात
जागा मी तुला देते चिरेबंदी ग वाड्यात

ही ओवी गातेवेळी प्रत्येक चरणानंतर–

काळी चोळी मोत्या जाळी
हार गुंफी गळ्या घाली
काळी करटूली कारली
वटी मैनाची भरली
आमी गौळणी बायका
इंद्रावानी गोष्ट सांग दिल्लीच्या नायका
झाडावर मोर काय बोलतो ऐका

एवढी सगळी गोष्ट ढंगदार रीतीने म्हणावयाची व नंतर ओवीचा दुसरा चरण संपवून पुन्हा तेच सर्व गीत गात तिची अखेरी साधावयाची अशी देखील एक मोठी सुंदर रीत आहे.

(५)

मल्हारी देव बोल ग म्हाळसा रागामंदी
गेलोवतो शिकारीला बानू सापडली बागामंदी

ही ओवी गातेवेळी या ओवीच्या प्रत्येक चरणानंतर–

एकशेची चंची, दोनशाची पानं
तिनशाचा कात, जायफाळं आठ
लवंगा साठ, नगरीच्या नारी
पग भिरीभिरी, हातामंदी वजरी
पायामंदी जोडा, कौलारी वाडा

बंधू माज्याला दिष्ट झाली
पदर की ग घाला

एवढी हकीकत सांगणारी गोष्ट जोडावयाची व नंतर दुसऱ्या चरणाला देखील हाच भाग गाऊन ती ओवी पुरी करावयाची, असाही ओवी गावयाचा एक प्रकार आहे.

(६)

बापाजी समींदर बया मालन व्हाती गंगा
दोगांच्या सावलीत कर आंगूळ शिरीगंगा

ही ओवी गावयाची झाली म्हणजे मग प्रत्येक ओवीनंतर —

सई बाई सलाल ग
बंधूच्या दरवाज्यावरी
केवढा दलाल ग!
हरिश्चंद्र जागा झाला
सूर्या चमाकला !

ह्या ओळी म्हणावयाच्या व नंतर दुसरी ओळ म्हणून पुन्हा ह्या सर्व ओळी म्हणत ती ओवी संपवावयाची अशीही एक पद्धत रूढ आहे.

आन् ती लाडकी मैनाबाई पिवळ्यापायानं दारी येई
आन् ती मिरवती वरमाई पायघड्यावरूनी जाई

ही ओवी गावयाची झाली तर या ओवीच्या दोन चरणांनंतर " सई बाई ग सखूबाई " असे म्हणताना दुसरा चरण त्यास जोडीत या ओळीचा पहिला भाग संपवून दुसरा तसाच म्हणीत ओवी पुरी करण्याचा आणखी एक प्रकार आहे.

ही ओवी प्रत्यक्ष कशी म्हटली जाते व त्यावेळी सुरावट कशी राहते तसाच काही बदल घडलाच तर तो कसा घडला जातो याचे प्रात्यक्षिक घेता यावे म्हणून या ओवीच्या गाण्याच्या पद्धतीचे 'सा रे ग म' येथे देत आहे.

**राग–मिश्र** **ताल–केरवा**

| धं | सा | सा | सा | सा | सा | रे | ग | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ◡ | ◡ |
| १ | | | | + | | | | |
| आ | न् | ती | मि | र | वि | तीं | · | · |

| सा | सा | ऽ | रे | सा | नीं | धं |
|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | ० | ० | — |
| १ | | | | + | | |
| व | र | · | मा | ई | · | · |

| सा | सा | ऽ | सा | रे | ग | रे | सा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | — | ◡ | ◡ | ० |
| १ | | | | + | | | |
| ना | य | · | घ | ड्यां | नीं | · | · |

| सा | सा | ऽ | रे | रे | रे |
|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | — | — |
| १ | | | | + | |
| व | री | · | जा | ई | · |

| रे | रे | ऽ | रे | रे | ग | प | म | ग | म |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | ० | ० | ◡ | ◡ | ◡ | ◡ |
| १ | | | + | | | | | | |
| त | ई | · | बा | ई | · | ग | · | · | · |

| ग | ग | ऽ | रे | सा | नीं | धं |
|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | ० | ० | — |
| १ | | | | + | | |
| स | खू | · | बा | ई | · | · |

| धं | धं | ऽ | नीं | सा | रे | ग | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | — | ० | ◡ | ◡ |
| १ | | | | + | | | |
| ा | य | · | घ | ड्यां | नीं | · | · |

| नी | सा | ऽ | रे | सा | ऽ |
|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | — | — |
| १ | | | | + | |
| व | री | · | जा | · | · |

याशिवाय ओवी गाण्याचे आणखी पुष्कळ वेगळे प्रकार आहेत. तसेच एका ओवीची चाल इतर अनेक ओव्यांना लागू शकते असाही प्रकार घडून येतो. मात्र त्या सर्व एकाच अंगलटीच्या असल्या पाहिजेत इतकेच काय ते.

एखादी ओवी कोणत्याही चरणानंतर कसल्याही शब्दांची जोड न घेता देखील गाईली जाते. त्या दृष्टीने उदाहरणार्थ म्हणून पुढील ओवी पाहता येईल.

**हे बाई थोरलं माजं घर हंड्या गल्लास लोंबत्याती**
**सासूबाईचं बाळराज धनी वाड्याला सोबत्याती**

ह्या प्रकारच्या ओवीची स्वररचना अशी केली जाते.

"हे बाई थोरलं माजं ग घर"

एवढाच एक चरण या गायन-प्रकारात दोनदा म्हटला जातो व पुढे तीच पद्धति प्रत्येक चरणासाठी अवलंबिली जाते.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| हे | बा | ई | थो | र | लं | मा | जं | ग | घर |
| ग | प | ध | ध | म | प | ग | प | ध | धनी |
| हे | बाई | | थो | र | लं | मा | जं | ग | घ र |
| ध | प— | | ध | म | प | म | ग | म | प प |

ओव्यांच्या प्रमाणेच खेळांची व इतर गाणी – लोकगीते – म्हणण्याचे प्रकार देखील अनेक आहेत.

यापैकी बरीचशी गाणी सामुदायिक रीतीने ( कोरस ) फेर धरताना म्हटली जातात. परंतु सुरवातीला एकदोघींनी ती सांगावयाची व नंतर इतरांनी त्याबरहुकूम म्हणावयाचे असा हा प्रकार असतो.

ही गाणी म्हणताना ठराविक प्रकारची लय आपोआप निर्माण होते. त्यामुळे एका तालात व एका सुरात ही गाणी सर्वांकडून म्हटली जातात. गाण्यातील भाव असेल त्याप्रमाणे आवाज येथे कमीजास्त प्रमाणात फेकला जातो. करतालांनी त्यांची लय कायम राखली जाते. शिवाय डोळ्यांनीही त्याबद्दलची खूण सांगितली जाते ! म्हणजे डोळे बोलके होतात व सर्वांना एकत्र यायला खुणावतात !

शेतातील प्रसंग उभा करतांना व शेतीवाडीचे सौंदर्य सांगताना काही लोकगीते खास शेतीविषयक म्हणून म्हटली जातात. तर अशा वेळचे शेत-मळ्यातील विहिरीच्या पाटावरचे पाणी व पावसाने पडलेले पाणी कोठे जावे व त्याचे पुढे कशात रूपांतर व्हावे किंवा त्यामुळे कोणती निर्मिती व्हावी याची कल्पना झिम्म्याच्या पुढील लोकगीतात दिलेली आहे –

**पाणी जाऊं द्या जाऊं द्या**
**पलाणी पाटाव**

तिथं लिंबाचा लिंबाचा
आहे साटाव
कोथमिर म्हणीती म्हणीती
माजा सुवास देखा वो
कांदा म्हणीतो म्हणीतो
सभेला मांडू नको वो
कारलं म्हणीतं म्हणीतं
उघडुनी पाहू नका वो
वांग म्हणीतं म्हणीतं
माजा रूबाब देखा वो
लसूण म्हणीतो म्हणीतो
माजा सुवास देखा वो
मेथी म्हणीती म्हणीती
पैशाला पेंडी वीका वो
पाणी जाऊं द्या जाऊं द्या
पलाणी पाटाव

हे गाणे म्हणावयाचे तर त्याची रीत सुरावटीच्या व ते म्हणण्याच्या ढंगाप्रमाणे अशी –

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पाऽ | णीऽ | जा | ऊ | द्या | जा | ऊ | द्या |
| गऽ | पधऽ | ध | नी | धम | ध | नी | धप |
| प | ला | णी | पा | टा | व | | |
| ग | प | ध | ध | ध– | प | | |
| प | ला | णी | पा | टा | व ऽ ऽ ऽ | | |
| ग | प | ध | ध | (ध) | प | ग | रे |
| प | ला | णी | पा | टा | व | | |
| ग | प | ध | ध | (ध) | प | | |

ह्या एका ओळीच्या या पद्धतीनेच बाकीच्या सर्व ओळी म्हणावयाच्या –

लोकगीते म्हणावयाची म्हणजे त्यांची पारंपरिक अशी पद्धती ठरलेली असते. उच्चार स्पष्ट असावे लागतात. त्यांच्या श्रवणाने वर्णित प्रसंग साक्षात् असा समोर उभा रहावा लागतो. त्याखेरीज ही गीते परिणामकारी होत नाहीत. म्हणूनच ती गाण्याची सवय गळ्याला हवी असते. कान पटाईत असावे लागतात. ऐकताक्षणिच ती गाता आली पाहिजेत अशी ती गाणारांची अपेक्षा असते.

ह्या गीतांसाठी साथीला लागणारी वाद्ये देखील ठराविक असावी लागतात. त्यापैकी ढोलक, ढोल, मृदंग, झांजा, शहनाई, एकतारी इत्यादि वाद्ये होत. यांच्या जोडीला लोकनृत्यांचे वेळी पायांतील घुंगूर बोलत असतात ते आणखी वेगळे. या वाद्यांच्या ढंगदार साथीवर ही गीते भारी शानदार असा शृंगार धारण करतात व विलोभनीय अशा स्वरविलासांनी धरणीवर एक आगळीच दुनिया उभी करतात.

लोकगीते व त्यांचे संगीत ही आमच्या भारत देशाची एक फार मोठी अशी धनदौलत आहे. भारत देशाचे मन अशाच वाडवडिलार्जित धनदौलतीवर सुखाने पोसलेले आहे. म्हणून या लोकसंगीताचा अभ्यास होणे व जतन होणे हे आजच्या युगधर्माचे प्रधान कर्तव्य होय.

कारण ह्या संगीताचे व गीतांचे पालनकर्ते आज मावळत चालले आहेत. व नव्या पिढीला त्याची अद्याप गोडी लागलेली नाही. म्हणून ह्या गीतांचे त्यांच्या पारंपारिक सुरावटींसह ध्वनिमुद्रण होणे अगत्याचे आहे. कारण ह्या गीतांना व संगीतास नव्या धाटणीचे किंवा शास्त्रीय संगीताचे जग मानवणारे नाही. ती त्यांच्याच मूळच्या थाटात सौंदर्यशाली झाली आहेत. नव्या पेहरावाची त्यांना मुळीच गरज नाही.

अनुक्रम –

# माणसानं व्रतस्थ असावं !

माझ्यासारखीला चार चौघींच्या प्रमाणं रोजचा देवदेव लागत नसला अगर सण उत्सवांच्या निमित्तानं आवश्यक वाटणारे उपासतापास ठाऊक नसले तरी अधूनमधून बरीक मनात येतं की, या क्षेत्रातल्या मंडळींप्रमाणं आपणही कधी मधी व्रतस्थ असायला हरकत नाही.

आमच्या घरातल्या वडीलधाऱ्या बायका श्रावणमास निघाला की, उपास-तापासाच्या, व्रतवैकल्यांच्या आणि सण उत्सवाच्या धांदलीत स्वतःला एवढ्या गुरफुटून घेतात की, त्यांना बाकी कशाचं भानच उरत नाही ! त्यामुळं मनात असूंदे नाहीतर नसूंदे त्यांच्या हाताखाली वावरावं हे लागतंच आणि त्यादृष्टीनं आपसूकच आमचंही मन विचार करायला लागतं.

चंदनाचं खोड सहाणेवर उगाळून लहानशा वाटीभर गंध गोळा करताना दंडबाह्या दुखल्या तरी त्या चंदनाच्या निर्मळ सुगंधानं जीव मोहरून उठतो. वरच्या बागशाहीतील रंगबेरंगी पानाफुलांची पत्री गोळा करताना मंत्रमुग्ध व्हायला होतं. देवकापसाच्या फुलवाती वळताना न् त्यांना अष्टगंधानं सुशो-भित करताना जीव हारखून जातो. देव्हाऱ्यातल्या देवांना शिकेकाईनं लख्ख धुवून जिथल्या तिथं पुसून ठेवतांना मन कसं प्रसन्न होतं. झालंच तर दुर्गा-देवीला लाल रंगाची फुलं लागतात, सरस्वतीला पांढऱ्या रंगाची फुलं

आवडतात आणिक गणपतीला कमळ हवं असतं असलं काही ऐकलं की, त्या त्या देवदेवतांच्या गुणवैशिष्ट्यांनी भारून जायला होतं. या पूजेमागची रसिकता लक्षात येते. त्याचप्रमाणं क्षमा, सत्य, दया, दान, अग्निहवन, संतोष, देवपूजा, इंद्रियनिग्रह इत्यादी सर्व सामान्य धर्मभाव व्रतस्थ राहण्यासाठी अत्यावश्यक असतात ही भविष्य पुराणातील गोष्ट ध्यानीमनी घुमायला लागते आणि मग कळून चुकतं की, हा सगळा खटाटोप केला जातोय तो केवळ मनाच्या आणि शरीराच्या शुद्धीसाठी ! त्यासाठी निवडली जातेय ती निसर्ग शोभा. शुद्ध आणि पवित्र वातावरण. वरच्या दर्जाचे आचार आणि विचार.

उपासतापास म्हणजे तरी काय ? भक्ति, ज्ञान, कर्म आणि योग यांचा सुंदरसा समन्वय. उपासामुळे माणसाला सहजी अंतर्मुख होता येतं. आपल्या ध्यानीमनी सात्त्विकता आली पाहिजे हे कळतं. या योगे ईश्वर सान्निध्यात राहण्याची संधी चालून येते हे उमगतं. श्रद्धाभावानं देवदेव करणं शक्य होतं. त्या धांदलीत स्वतःलाही हरवून बसता येतं !

व्रतस्थ माणसाची काय गंमत आहे बघा हं ! तो जेव्हा एखादं व्रत धारण करतो म्हणजे एखाद्या विशिष्ट नियमाला स्वतःला बांधून घेतो तेव्हा त्याच्या पूजेमधील देवदेवताना तो निमंत्रित करीत असतो म्हणे ! एवढंच नाहीतर हे आपलं निमंत्रण त्या इष्ट दैवतांनी पत्करलं असून ते जातीनं येऊन हजर देखील झालेत या भावनेनं त्याला भुलून जायला होतंय तर ! खरं ना ? त्यामुळं आपल्या इच्छित दैवताची पूजा नीट व्हावी, त्यांना चांगलं आसन मांडलं जावं, त्यांचं चांगलं स्वागत करण्यात यावं, त्या निमित्तानं केला जाणारा दानधर्म नीटपणे पार पडावा, सगळं वातावरण सुगंधित रहावं, धूपदीप नीट असावेत, नैवेद्य चांगला व्हावा, सुंदर सुगंधित पाना फुलांच्या परड्या सज्ज असाव्यात आणि मुख्य म्हणजे आपण पूजेपूर्वी अभ्यंगस्नान करून पवित्र, शुचिर्भूत, झालेलं असावं अशा विचारात माणूस गुरफटून जातो. आणि मग त्याच्या ध्यानी मनी केव्हातरी वाचलेलं ऐकलेलं असं पुराणातलं – अर्घ्य, पाद्य, आचमन, मधुपर्क, उवटन, स्नान, आरती, वस्त्र, उपवीत, पुनराचमन,

अलंकार, भूसेचन, करोद्वर्तन, पान, अनुलेप, पुष्पदान, गीत, वाद्य, नृत्य, स्तुति, प्रदक्षिणा, पुष्पांजली, नमस्कार आदि–उपचारपर्व– त्याला अस्वस्थ करून सोडतं! ... यातलं कोणतं करू न् कोणतं सोडू त्यातला अंदाज न आल्या-मुळं मग त्याला कुणीतरी घरातलं असं बोलून जातं की, "ओंजळभर पाण्यानं न् गंध फुलांसह मंत्राक्षतांनी भागवून घे त्यात सगळं येतं." मग त्याचा जीव भांड्यात पडतो. त्याला हायसं वाटतं. अशा सात्विकतेनं माणूस विचाराला अगर आचाराला लागला म्हणजे मग सर्वसामान्य माणसाप्रमाणं देव घडव-ताना त्याला सोनं अगर चांदी यापैकी श्रेष्ठ कोण आहे अशातला भ्रम रहात नाही. अशा वेळी त्याचं मन जुन्या काळच्या कथा गीतांचा मागोवा घ्यावा म्हणतं न् अवचितच त्याला गणेश पुराणातील एक गोष्ट आठवते.

काय झालेलं की, कोण्या एकेकाळी कौंडिण्य ऋषींनी आपल्या पत्नीला एक दुर्वांकूर देऊन इंद्राकडं पाठविलेलं. आणिक तिच्याजवळ इंद्रानं निरोप दिलेला की, हा दुर्वांकूर जोकून घेत त्या तोलाचं सोनं घेऊन यावं. तशी इंद्रानं या पाव्हणीला कुबेराकडं पाठवली. म्हणताना एका तागडीत तो दुर्वां-कुर आणि एकात अंदाजानं सोनं घालीत कुबेरानं ती तागडी उचलली. पण काय गंमत की, त्याच्या खजिन्यातलं सगळं सोनं तोललं तरी वजन भरेनाच तुळी त्या दुर्वांकुराचं ! आता काय करायचं ? कुबेर आच्यारा की विच्यारी झाला आणि ही कौंडिण्याची पत्नी पण भुलून गेली ... त्यासरशी तिला हे कळून चुकलं की, एका गवताच्या काडीची किंमत सोन्याचांदीनं होऊच शकत नाही ! म्हणून मग त्या बाबतीत तिनं आपल्या मनातला भ्रम काढून टाकला आणि नवऱ्याशी घातलेला वाद सोडून दिला.

म्हणजे पूजेसाठी अमूकच पाहिजे तरच पूजा होते असं नसून ती मना-पासूनच्या श्रद्धाभावानं झाली की, सगळं पावतं ही गोष्ट त्या व्रतस्थ माणसाच्या लक्षात येऊन तो आपलं मन आणि आचरण शुद्ध राहील इकडे आपलं लक्ष केंद्रित करतो.

आमच्या घरी हरतालिकेच्या व्रताचं भारी दांडगं प्रस्थ. आमची आजी झाडून सगळ्या पोरींना न् लेकी सुनांना ते करायला लावायची. कारण काय तर म्हणे हरताळका पुजली की चांगला नवरा मिळतो. माझ्या सारखीला हा खुळेपणा वाटला. म्हणून या उपासाचा अगर या व्रताचा मी विचारच सोडून दिला.

पण मग उत्सुकता म्हणून जुन्या ग्रंथात कुठं काय सापडतं का या संदर्भात बघूया म्हटलं. तशी भविष्य पुराणात एक कथा योगायोगानं मिळाली. ही कथा सांगते की, "लहान वयात पार्वतीनं उग्र तप धारण केलेलं. झाडपाला खाऊन आणि पाणी सेवन करून ती तपाला बसलेली. भगवान विष्णूंनी हे पाहिलं मात्र न् हिला आपली स्वत:ची करायचं ठरवलं. त्यांनी हे वर्तमान नारद मुनींना सांगितलं आणि त्यांच्याकरवी आपला मनोदय पार्वतीच्या वडिलांना कळविला. त्यावेळी हिमाचल (पार्वतीचे वडील) सचिंत मनानं पार्वतीचा विवाह कुणाशी करावा या कल्पनेत विचारमग्न झालेले. त्यामुळं नारद-मुनींची भेट होताच श्रीविष्णूंची विनंती त्यांनी चटकन मान्य केली. ठीक आहे म्हणाले. नारदमुनी निघून गेले.

इकडे पार्वतीला जेव्हा हे वर्तमान कळलं तेव्हा तिला फार वाईट वाटलं. वडिलांच्या घरातून ती एका मैत्रिणीकडे गेली व तिला म्हणाली की, "अग, मी तर सदाशिवांना आपला पती निवडू इच्छिते. पण माझे वडील तर मला विष्णूला द्यायला निघालेत?" तशी मग तिची मैत्रिण तिला रानावनात घेऊन गेली. जिथं हिमाचल येऊ शकणार नाहीत अशा जागेची निवड करून पार्वतीनं मैत्रिणीसमोर पुन्हा महान तपस्या सुरू केली. अन्नपाणी वर्ज्य केलं. पार्वतीच्या या प्रचंड तपस्येमुळं भगवान शिवदेवांचं आसन हादरलं आणि ते स्वत: वरदानासाठी म्हणून पार्वतीसमोर उपस्थित झाले. त्यावेळी प्रसन्न चित्तानं पार्वती म्हणाली की, मी आपल्याला पतीरूपानं पाहू इच्छिते. तशी 'तथास्तु!' म्हणून शिवदेव अंतर्धान पावले. त्याचवेळी हिमाचल नेमके तिथं आले आणि त्यांनी शिवदेवांबरोबरच तुझं लग्न करीन असं पार्वतीला वचन दिलं. ते

तिला घरी घेऊन आले आणि सदाशिवांबरोबर पार्वतीचा विवाह संपन्न झाला."

तर सांगायचं म्हणजे आम्ही मुलींनी हे हरतालिकेचं व्रत स्वीकारून चांगला नवरा मिळविण्यासाठी अशी तपश्चर्या करावी असं आजीचं म्हणणं ! आणि म्हणूनच हा उपास धरायचा तिचा आग्रह, मनोनिग्रहही.

त्यातलं बाकीचं सगळं सोडलं तर एक गोष्ट घेण्याजोगी अशी की, मनो-निग्रहाच्या बळावर आत्म्याची उन्नती साधता येते आणि आकांक्षापूर्तीही होऊ शकते. म्हणून प्रत्येकानं इच्छित वस्तूच्या प्राप्तीसाठी असा काही निश्चय करावा. व्रतस्थही व्हावं !

माणसाच्या अशा निग्रही वागण्यामुळं आपलं मन शुद्ध व्हायला मदत होते. चित्ताला शांती लाभते. आणि सात्त्विक विचारधारणेबरोबरच अल्पसं अन्न सेवन झाल्यामुळं शरीरही सतेज राहू शकतं. माणूस प्रफुल्लीत दिसतो. ध्येय प्राप्ती होते आणि आपलं सामाजिक मनही आदर्श संस्कृती सांभाळण्यासाठी शक्तिशाली बनू शकतं.

तसं पाहिलं तर उपवास करून व्रतस्थ व्हायचं म्हणजे ध्यानधारणा करा-वयाची. चिंतन मनन करायचं. परंतु सर्वसामान्यांना यातलं रहस्य कळत नाही. उलगडतही नाही. पापपीडेपासून मुक्तता मिळविण्यासाठी आणि चांगले गुणधर्म प्राप्त करून घेण्यासाठी उपवास उपयोगी पडतो एवढंच त्यांना ठाऊक असतं ! अशा उपवासामुळं देवाची मर्जी सांभाळली जाते आणि मग आपण पुण्यवान ठरतो एवढीच त्यांची खुळी समजूत आणि श्रद्धाही !

व्रतांचे तसे दोन प्रकार मानले गेले आहेत. पैकी पहिला प्रकार म्हणजे 'काम्य' व्रतं. मनात काही हेतू बाळगून केली जाणारी व्रतं या विभागात मोडतात. आणि ज्यांच्यामध्ये केवळ भक्ति आणि देवाबद्दलच अगाध प्रेम आहे अशी व्रतं ही 'नित्य' व्रते प्रकारात मोडतात. ही व्रतं निष्काम, निःस्वार्थी. त्यांचं स्थान जीवनात वरच्या दर्जाचं. व्रतवैकल्यात सण उत्सवांचाही

समावेश होतो. त्या त्या व्रताला विशिष्ट कथांची पार्श्वभूमी असल्यामुळं ती मानवी मनात प्रभावी स्थान व्यापून राहिलेली आहेत.

अगोदरच माणूस गोष्टी वेल्हाळ. त्यामुळं कोणती एक गोष्ट समजावून सांगताना पुराणातल्या गोष्टीचा दाखला दिला न् ती विशिष्ट गोष्ट लक्षात घेत सांगितली की, काम भागतं. त्या गोष्टीचा माणसाच्या मनावर चांगला ठसा उमटतो न् मग एखादवेळ आपणही असलं व्रत आचरणात आणायला हरकत नाही अशी त्याच्या मनाची अवस्था होऊन बसते.

तसं पाहिलं तर आमच्या घरात आमची बायका माणसंच अशा व्रतवैकल्यात स्वतःला गुंतवून घेतात आणि कळती पुरुष मंडळी जुन्या काळच्या पोथ्यापाठ ठरल्यावेळी वाचून दाखवतात. त्यामुळं आपल्या सौभाग्यवर्धनाशी आणि वंश वाढीशी निगडित असलेली व्रतं लक्ष्मीशी अगर पार्वतीशी संबंधित ठेवून आमच्याकडं आचरिली जातात आणि म्हणूनच चातुर्मास निघाला की, आम्ही त्यांच्या हाताखाली वावरणार हेही ठरलेलं असतं.

परवा गंमत झाली. आमच्या घरी कुणीसंसं पावणं होऊन आलेलं. तर चौकशी झाली की, नवरात्राचं व्रत तुमच्याकडं केव्हा असतं ? आमच्या घरी दसऱ्याच्या वेळी नवरात्राचा उपासतापास फार. तर चटकिनी आम्ही सांगून टाकलं, "आमची आजी न् आई करते नवरात्र. त्यावेळी दसऱ्याचे दिवस असतात. हस्तनक्षत्र रहातं."

पण मग त्या पावण्यांकडून कळलं की, दर तीन महिन्यांनी असं वर्षाकाठी चार वेळा नवरात्र असतं म्हणून ! आम्हाला ही गोष्ट अगदीच नवीन. तर केली चौकशी. वर्षाकाठी चारवेळा येणाऱ्या या नवरात्र व्रताचे वेळी प्रतिपदेला भल्या पहाटे स्नान करतात. विंध्यवासिनीच्या प्रांगणात वास्तव्य होतं. त्यामुळं रामप्रहराला देवळाच्या चारी कोनात मंगलकलश आणि दुर्गा देवीची प्रतीमा स्थापन केली जाते. त्यासाठी पंचांग पाहिलं जातं. पुराणातील चालीरीती लक्षात घेतल्या जातात.

या मंगलकलशात निवळशंख निर्मळ पाणी भरतात. त्या सात मृत्तिका,
ाच पानं, सुपारी, सर्वौषधी, पंचरत्नं आणि सोनं घालून वरती लाल वस्त्र
ुंडाळण्यात येतं. कलशाच्या तोंडावर पूर्ण पात्र ठेवतात आणि त्यावर दुर्गेची
स्थापना होते. या दुर्गेला लाल चंदन, लाल अक्षत, लाल फुलं, धूप, दीप, नैवेद्य
विडा इत्यादी पूजेसाठी लागतं. या देवीची सर्वांगपूजा होते. नवमीपर्यंत
त्येक दिवशी पहाटेला स्नान करून देवळात वेदपाठ होतो. जपज्याप्य चालतं.
ेवीभागवताची पोथी वाचली जाते. नवव्या दिवशी देवीपुढं तुपाच्या अगर
तिळाच्या तेलाचा दिवा अखंडपणे तेवता ठेवतात. अष्टमीला व नवमीला
िलपत्राचं व तुपाचं हवन करतात. या व्रतात देवीची पूजा मनापासून होते.
यामुळं हे नवरात्र व्रत शक्तिदायी मानलं जातं. हे व्रत धारण करणारा
ाणूस तेजस्वी होतो म्हणतात.

तर अशी व्रतं अनेक. ऋतूंशी निगडित असणारी. मानवी मनाची उंची
ाढविणारी. मनोविकार काबूत ठेवणारी. संयमशीलवृत्ती धारण करायला
ावणारी. चित्ताची एकाग्रता साधणारी. म्हणून त्यांचं महात्म्य मोठं.
ळवतीकही अमाप.

आमच्या घरी नवरात्र असलं की, उपासतापास कडक. फलाहार, दूध घेणं,
जूर खोबरं खाणं. त्यामुळं हा उपवास करणारांसाठी नातलग चोळखण
ऊन येतील. फराळाचं आणतील. विचारपूस करतील. देवादिकांचं ही
ाणसं फार करतात म्हणून वाहवा मांडतील. अशा व्रतींना भाग्यवान ठरव-
ील. घराण्याचा तो एक कुलाचार आहे म्हणतील. त्यातूनच आमच्या घराचा
ौकिक वाढीला लागतो. आमची पण चौकशी होते.

आम्हाला मग काय नसेना का मोठ्या माणसांगत या उपासाचं ? पोटभर
ध प्यावं, फराळाचं दाबून खावं आणिक हातांवर, तोंडावर, गंध माखीत
ापल्यानं स्वत:ला चित्रित करून सुशोभित व्हावं हा आमचा आनंद ! त्या
ारणानं आजीच्या हाताखाली खूप खूप वावरलं की, ती म्हणणार, "तुमच्या
ापानं देवच घरात नांदतोय. आऊक्षवान व्हा बाळांनो !" बस्स ! यापेक्षा
ाणखी काय हवंय आम्हाला तरी ? नाही का ?

# आमचे सण, आमची व्रते

श्रीमती गिरिजाबाई केळकर

भारतीय संस्कृती व आपला हिंदु धर्म हा जगातील सर्व धर्मपंथात व संस्कृतीत श्रेष्ठ समजला गेला आहे. त्याचे प्रमुख कारण म्हणजे निसर्ग, प्राणी, मानव, मानवी आरोग्य, मानवी मन व बुद्धी आणि इतिहास या सर्वांतील प्रमुख उपयुक्त घटक लक्षात घेऊन केलेला समन्वय. या समन्वयाद्वारे सर्व समावेशक अशा धर्माची चौकट आपल्या पूर्वजांनी निर्माण केली आहे. या भरभक्कम चौकटीत विविध रंगछटांचे सण, आचार व व्रते, चपखल बसवून दिली आहेत. कालानुरूप या रंगछटात बदल होत गेले असले व काही रंग अगदी फिकट झाले असले वा उडून गेले असले तरी मूळची चौकट इतकी भरभक्कम, विस्तृत व सर्वसमावेशक पायांवर उभी आहे की, त्यामुळे आपल्या संस्कृतीला वा सर्वसमावेशक उदार धर्माला धक्का पोहोचू शकत नाही, हे विशेष होय. या दृष्टिकोनातून आपल्या सणांकडे व व्रतवैकल्यांकडे आपण डोळसपणाने पाहिले तर त्यातील अर्थ सहज ध्यानात येईल.

आपला वर्षातील पहिलाच सण गुढीपाडवा पहा. आम्हा हिंदूंचा नव्या वर्षाचा हा पहिला दिवस. त्याची परंपरा आहे शालिवान शकाच्या सुरुवातीची. वर्षातील साडेतीन मुहूर्तांपैकी तो एक आहे. आदर्श राजा श्रीराम याच्या नवरात्रीच्या उत्सवाचाही तो पहिला दिवस. इंद्राने वृत्रासुरास मारून ध्वजा फडकाविली ती याच दिवशी. श्रीरामचंद्र सीतेसह अयोध्येस परत आले व त्यांनी विजयध्वजा उभारली. त्यांच्या स्वागतास घरोघरी गुढ्या-तोरणे उभारून जनतेने विजयोत्सव साजरा केला तोच हा दिवस. त्या इतिहासाचे स्मरण करून देणारा हा वर्षातील प्रमुख सण होय. या दिवशी सकाळी

सडासंमार्जन करून विधिपूर्वक दारापुढे गुढी उभारायची. तिला साखरेच्या पदकांची माळ, पुष्पहार, कडुलिंबाची डहाळी बांधून तिची पूजा व नैवेद्य असा क्रम पार पाडायचा असतो. कडुलिंबाची कोवळी पाने वाटून त्यात मिरी, ओवा, मीठ घालून त्याच्या गोळ्या लहान-थोरांनी भक्षण करावयाच्या असतात. आरोग्यदायी कडुलिंबाचा वापर सक्तीने करविण्यापेक्षा धर्मबंधनात त्याला अटकवून त्याचा वापर करावयास लावण्याच्या या कल्पक प्रथेबद्दल खरोखरच आपल्या पूर्वजांविषयी कौतुक वाटते. यानंतर पंचांगातील वर्षफल सर्वांनी बसून श्रवण करण्याची प्रथा आहे. रामाचे नवरात्र याच दिवसापासून सुरू होते. देवळातून नऊ दिवस कथा, कीर्तने, भजने यांचा धूमधडाका सुरू होतो. सकाळी उभारलेली गुढी सायंकाळी सूर्यास्ताबरोबर अक्षता टाकून उतरविली जाते व पाडवा संपतो.

पाडव्यापासून सुरू झालेल्या राम नवरात्राची समाप्ती चैत्र शुद्ध नवमीला दुपारी रामाचा जन्म होऊन संपते. एकवचनी, एकबाणी व एकपत्नी अशा आदर्श पुरुषोत्तम श्रीरामाची जागृत प्रतिमा या उत्सवामुळे जनमानसावर ठसविली जाते. पाडव्यानंतरच्या तृतीयेला चैत्रगौर बसते. देव्हाऱ्यातील अन्नपूर्णेची मूर्ती काढून झोपाळ्यावर बसविली जाते. सोवळ्याचे कोरे वस्त्र घालून तिची पूजा करतात. हा क्रम वैशाख शुद्ध तृतीयेपर्यंत चालतो. ह्या महिन्यात घरोघरी गौरीचे हळदीकुंकू एकेक दिवस होत असते. आरास करून गौर मांडायची. तिच्यापुढे विविध फराळांचे जिन्नस, चित्रे इत्यादी मांडून सजावटीने गौरीपुढे रम्य देखावा निर्माण करायचा. ओळखीच्या बायकांना हळदीकुंकवाला बोलवायचे, पहिल्या पाचजणींचे पाय धुवायचे, गंध लावायचे, उटी लावायची अशी चाल होती. आता ती चाल लोप पावली जाते आहे. आलेल्या बायकांना हळदकुंकू अत्तर-गुलाब, डाळीची खिरापत द्यायची, ओल्या हरभऱ्यांनी त्यांची ओटी भरायची व त्यांना आंब्याचे पन्हे द्यायचे ही चाल मात्र अद्याप चालू आहे.

चैत्री पौर्णिमेला सूर्योदयाबरोबर मारूतीरायांनी जन्म घेतला. शक्तीचे उपास्य दैवत असलेल्या मारूतीच्या देवळातून व तालमीच्या आखाड्यातून

भजन कीर्तनादी कार्यक्रम गावागावातून साजरे होतात. सुंठवड्याच्या प्रसादाने या कार्यक्रमाची सांगता होऊन मारूतीरायाच्या उज्ज्वल कर्तृत्वाची महती अंत:करणात साठवीत लोक घरोघरी परत जातात.

मग येते वैशाखातली तीज. तिला अक्षयतृतीया म्हणतात. वर्षातील साडेतीन मुहूर्तांपैकी हिला अर्धा मुहूर्त मानतात. या दिवशी जे पुण्य करावे ते अक्षय्य होते असा समज आहे. पितरांचे तर्पण या दिवशी करण्याचा प्रघात आहे. त्यांचे नावाने थंड पाण्याने भरलेल्या उदककुंभाचे दान दिले जाते. सुरू होणाऱ्या कडक उन्हाळ्यात तहानलेल्यांना थंड पाणी देण्याची सामाजिक जाणीव निर्माण करण्याचा यात हेतू असावा. या दिवशी गौर झोपाळ्यावरून काढून व तिची पूजा करून तिला पूर्ववत देव्हाऱ्यात ठेवतात. मुद्दाम सवाष्ण जेवावयास सांगून व गव्हल्याची खीर करून तिला सुग्रास भोजन घालतात. शक्य असल्यास माहेरवाशीण सवाष्ण यावेळी जेवावयास बोलावण्याची चाल आहे. चैत्र शुद्ध तृतीयेपासून सुरू झालेला चैत्र गौरीचा उत्सव या दिवशी समाप्त होतो. सुवासिनींना एकमेकींचे घरी हळदीकुंकवास बोलावून गौरीव्रताची सांगता होते. वसंत ऋतूत सृष्टीतील वृक्ष फलद्रूप होतात. सृष्टीला यौवन व मातृत्व प्राप्त होते व म्हणूनच जणू काही धर्मशास्त्रकारांनी या तात्विक, हर्षदायक व प्रणयोत्पादक कालास देवतेच्या ठिकाणी कल्पून हा गौरीमास ठरविला असावा असे वाटते.

त्यानंतर येते ती वटपौर्णिमा. जेष्ठी पौर्णिमा. स्त्रियांचे अंत:करणात आपल्या पतीबद्दल निष्ठा व प्रेम जागृत करणारा असा हा दिवस आहे. यमाच्या तावडीतून आपल्या पतीचे प्राण सोडवून आणणारी सावित्री आदर्श म्हणून डोळ्यासमोर ठेवून स्त्रिया हे वटसावित्रीचे व्रत करतात. पूर्वी तीन दिवसांचे हे व्रत असायचे. यावेळी स्त्रिया तीन दिवस उपवास करीत, पण हल्ली फक्त वटपौर्णिमेलाच उपवास करून वडाची पूजा करतात. जमलेल्या बायकांची कोणी आंब्याने ओटी भरतात. दुपारी देवळात पोथी व सावित्रीचे गाणे असते. तेथे स्त्रिया भाविकतेने श्रवणास जातात. शहरात पूजेसाठी वड

मिळणे दुरापास्त होऊ लागल्याने वडाची एखादी फांदी मिळवून ती कुंडीत रोवून तिची भक्तिभावाने पूजा केली जाऊ लागली आहे.

जेष्ठ सरतो आणि आषाढ सुरू होतो. पावसाची झड जोरात लागते. तोंड बाहेर काढणे मुष्कील होते. आरोग्यरक्षणाचे दृष्टीने काळजी घ्यावी लागते. अशावेळी आरोग्यरक्षणाचा उपाय म्हणजे लंघन होय. पण तो आपण होऊन कोण पाळणार? म्हणून धर्माच्या बंधनात त्याला अडकवून तो लोकांच्या गळी उतरविला जातो. आषाढी एकादशीच्या रूपाने. या दिवशी वस्तुतः संपूर्ण उपवास निराहार अशी भावना असते. परंतु आता फराळाचे विविध प्रकार करून रुचिपालट करणे एवढेच त्याचे स्वरूप राहिले आहे. आषाढ शुद्ध एकादशी ही पंढरपूरच्या विठोबाची एकादशी मानतात. या दिवशी विष्णू शयन करतात. म्हणून हिला शयनी एकादशी असेही म्हणतात. यावेळी श्रीज्ञानदेवतुकारामांच्या पालख्या आळंदी देहूहून निघतात व वारकऱ्यांच्या लोकगंगेबरोबर या एकादशीस पंढरपुरास पोचतात. सर्व जातीजमातींना भक्तिप्रेमाच्या जोरावर परमेश्वराचा मार्ग मोकळा करून देणारा व परमार्थाच्या प्रांतात लोकशाहीचे रूप विकसित करणारा वारकरी सांप्रदाय म्हणजे विकसित वैष्णवधर्मच होय. चातुर्मासास याच दिवसापासून सुरुवात होते. स्त्रियांच्या नेमधर्माचीही या दिवसापासून गडबड सुरू होते. नव्याने लग्न झालेल्या मुली पूर्वी गोपद्मे घालायच्या, वाती लावायच्या. प्रौढ स्त्रिया इतरही अनेक धर्म पाळीत असत. पूर्वी नळ नव्हते तेव्हा ब्राह्मणाच्या घरी पाण्याची घागर घालायची व उद्यापनाला तांब्याची घागर दान द्यायची पद्धत होती. बाळभूक म्हणजे पसाभर तांदूळ, डाळ व चमचाभर तूप असे रोज गरीब ब्राह्मणाच्या मुलाला द्यायचे व शेवटी भाताची व तुपाची तांबली द्यायची. दोन पावशेर दूध गरिबाच्या मुलाला द्यायचे, सवाशिणीची वेणी घालायची असे अनेक प्रकारचे नेम घरोघरी स्त्रिया करीत असत. याचे उद्यापन कार्तिक एकादशीला होत असते.

आषाढातील पौर्णिमा ही गुरूपौर्णिमा म्हणून मानतात. आपापल्या क्षेत्रात गुरूस्थानी असलेल्या थोर व्यक्तींबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याचा हा दिवस. परात्पर गुरु श्री व्यास यांचेही या दिवशी पूजन करतात.

पावसाची झड कमी होऊन प्रसन्न व हिरवीगार बनलेली सृष्टी चराचराला सुखवू लागते व तिच्या संगतीनेच सर्वांना प्रिय असलेला श्रावण केव्हा येतो हे समजतही नाही. स्त्रियांचा तर हा सर्वांत लाडका मास. त्यांच्या स्वागतासाठी त्या उत्सुकतेने सज्ज असतात. नववधू दागदागिने लेवून, पैठण्या शालू नेसून, शिवामूठ वाहण्यासाठी श्रावणी सोमवारी शंकराचे देवालयात गडबडीने जावू लागतात. श्रावणी सोमवार हा शंकराच्या व्रताचा दिवस. दुपारी उपवास करून शंकराचे दर्शन व पूजन व्हायचे आणि संध्याकाळी लवकर गोडधोड करून उपवास सुटायचा. लगेच येणारे मंगळवार म्हणजे नव्या नवऱ्यांचे सर्वांत मोठ्या उत्सवाचे दिवस. मंगळागौरीचे वार. त्यांचा थाट काही वेगळाच असतो. मंगळागौर पाच वर्षे पुजायची असते. पहिल्या वर्षी सासर माहेरी एकेक मंगळागौर पूजिली जाते. आपल्या ओळखीच्या लग्न झालेल्या मुली पूजेला सांगतात. सर्वजणी शुचिर्भूतपणे पूजेचे सामान घेऊन पूजेस बसतात. चौरंगावर गुरूजी अन्नपूर्णा मांडतात, पूजा सांगतात. नाना प्रकारची पत्री, पूजासाहित्य व सुंदर सुंदर फुले यांनी गौरीची पूजा करतात. केळीचे खांब बांधून व फुलांनी सजवून मंगळागौर रमणीय बनवितात. मंगळागौरीची कहाणी वाचून झाली की, मेजवानीचा थाट उडतो. जेवताना पहिल्या वर्षी मुली बोलत नाहीत. सासर माहेरची माणसे एकत्र आल्याने हा एक संस्मरणीय सोहळा सर्वांच्या स्मरणात अनेक वर्षे रेंगाळत राहतो. रात्री ओळखीच्या स्त्रिया व पूजेच्या मुलींसमवेत फराळाचा बेत असतो. करंज्या, लाडू, मटकीची उसळ, साखर गुळांबा अशा साध्या पण रूचकर बेताने हा फराळ उरकतो. जेवणाचे आधी आरती केली जाते. नंतर स्त्रियांच्या जागरणाला सुरुवात होते. फुगड्या, झिम्मा, खुर्ची का मिर्ची इत्यादी खेळ, उखाणे, गाणी यांनी रात्रभर मंगळागौर जागविली जाते. दुसरे दिवशी सकाळी आंघोळ करून, उत्तरपूजा करून व पिठले भात जेवून मुली आपापल्या घरी जातात. अशा रीतीने मंगळागौर साजरी होते.

श्रावणात नागनरसोबाचे कागद घरोघरी लावतात. दर मंगळवारी, शुक्रवारी सुवासिनी जिवतीची पूजा करतात. शनिवारी नरसोबाची, बुधवारी

बुधाची व गुरुवारी ब्रहस्पतीची पूजा करतात. कापसाची गेजमाळ व आघाडा-दुर्वा यांची माळ जिवतीला वाहतात. एका शुक्रवारी लेकुरवाळी सवाशीण जेवावयास बोलावून जिवतीला पुरणाचा नैवेद्य दाखवितात व पुरणपोळीचे जेवण करून शुक्रवार साजरा करतात. घरातील लहान मुलांची आरती करतात. सायंकाळी सुवासिनींना हळदीकुंकू व दूध-साखर, फुटाणे देतात. श्रावणी शुक्रवारी घरात फुटाणे हे हमखास असायचेच.

श्रावणातला दुसरा महत्त्वाचा सण म्हणजे नागपंचमीचा. मातीचे नाग घरी आणून त्यांची पूजा करतात किंवा गंधाने नऊ नागकुळे पाटावर काढून त्यांची लाह्या, बत्तासे, दूध यांचा नैवेद्य दाखवून साग्रसंगीत पूजा केली जाते. या दिवशी चिरायचे नाही, तळायचे नाही आणि तवा चुलीवर ठेवायचा नाही अशी प्रथा असे. त्या दिवशी पक्वान्न म्हणजे पुरणाचे दिंडे होत. सकाळपासून गारूडी नाग घेऊन घरोघरी येऊ लागतात. त्यांची पूजा होते. त्यांना लाह्या, दूध व नैवेद्य अर्पण करून स्त्रिया मनोभावे नमस्कार करतात. खेड्यापाड्यातून स्त्रिया व मुली गावाबाहेर वारूळांची पूजा करून फेर धरून गाणी म्हणतात. झाडांना झोपाळे बांधून उंच उंच झोके घेताना देहभान विसरून जातात. आर्य लोकांनी प्राचीन काळी नागांना आपल्यात सामावून घेतले तेव्हापासून त्या एकतेच्या आनंदाप्रीत्यर्थ हा सण साजरा होत असावा.

श्रावण पौर्णिमा म्हणजेच नारळी पौर्णिमा. या दिवशी नारळाचे खास महात्म्य. समुद्राजवळचे लोक समुद्राला नारळ अर्पण करून त्याची शांती करतात व नारळाचे गोड पदार्थ करून हा सण साजरा करतात. हीच राखी पौर्णिमा म्हणूनही साजरी होते. बहीण भावाच्या हातात राखी बांधते व भाऊ तिच्या रक्षणाची जबाबदारी आपल्यावर घेतो. बहीण भावांचे नाते दृढ करणारा हा एक श्रेष्ठ व सांस्कृतिक परंपरा लाभलेला असा सण समजला जातो. उत्तर हिंदुस्थानात हा सण फार मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. सामुदायिक श्रावणी ह्या दिवशी साजरी करून प्रत्येकजण गळ्यात नवीन जानवे विधिपूर्वक धारण करतो. आजही श्रावणीची प्रथा कोठे कोठे चालू आहे.

रामनवमीप्रमाणे कृष्णजन्माष्टमी हा श्रावणातील एक मोठा जन्मोत्सव. श्रावण वद्य अष्टमीचे मध्यरात्री कृष्ण जन्म झाला व म्हणून कृष्णाच्या व विष्णूच्या देवळातून भक्तिपूर्वक कृष्णजन्म सोहळा पार पाडतात. सर्व रात्र भजनात व उत्सवात घालवून दुसरे दिवशी दही, दूध, पोहे यांचा काला करतात, उंचावर दहीहंडी टांगतात, एकमेकांच्या खांद्यावर चढून ती हंडी फोडतात व काला प्रसाद म्हणून वाटतात. दुर्जनांचा नाश, सुजनांचे संरक्षण आणि मानवीधर्माची संस्थापना करणाऱ्या श्रीकृष्णाचा आदर्श या उत्सवाचे रूपाने समाजापुढे ठेवला जातो.

श्रावणाचे वैशिष्ट्य बनू पाहणारे दुसरे अंग म्हणजे सामुदायिक सत्यनारायणाची पूजा.

अमावास्या ही चांगल्या मुहूर्तात तर नाहीच नाही पण शुद्धही समजत नाहीत. पण श्रावणी अमावास्या मात्र त्याला अपवाद आहे. तिला पिठोरी अमावास्या म्हणतात. अखंड सौभाग्य व दीर्घायु पुत्र यासाठी स्त्रिया या दिवशी विशिष्ट देवतांचे व्रत करीत असत. शेतकरी लोक या अमावास्येला बैल-पोळा सण साजरा करतात. बैलांना स्वच्छ आंघोळ घालून त्यांच्या अंगाला हिंगूळ व शिंगांना बेगड लावतात. गळ्यात सुंदर माळा व पायात घुंगरू बांधतात. पाठीवर रंगीबेरंगी झुली घालून त्यांना नाना तऱ्हेने सजवितात. दुपारी पुरणपोळीचे जेवण करून बैलांनाही तो चारतात व रात्री बैलांची वाजत गाजत मिरवणूक काढतात. कोठे कोठे मातीचे बैल करून त्यांची पूजा करतात. अशा रीतीने वेगवेगळ्या स्वरूपात येऊन आपले वैभव दाखविणारा श्रावणातील प्रत्येक दिवस सर्वांना सौख्य व आनंद देऊन भाद्रपदात नेऊन सोडतो.

भाद्रपदातील पहिल्या चतुर्थीलाच सर्व कार्य तडीस नेणारी मंगलमय श्रीगजाननाची स्वारी प्रवेश करते व शुभदायी भाद्रपद महिना सुरू होतो. गजाननाच्या आगमनाच्या आदल्या दिवशी म्हणजे भाद्रपद शुद्ध तृतीयेला मुली व सुवासिनींचे हरितालिकेचे व्रत असते. सखीपार्वतीच्या मातीच्या

प्रतीमांची जवळ असलेल्या शिवलिंगासह अनेकजणी एकत्र जमून पूजा करतात. या दिवशी उपवास करतात. तोही दूध, केळी, फळं खाऊन करतात. कित्येक स्त्रिया कडक उपवासही करतात. रात्री हरतालिकेची कहाणी ऐकून व जागरण करून मध्यरात्री नंतर रूईचे पानावर दही घालून ते पान चाटतात व उपवास सोडतात. दुसरे दिवशी उत्तरपूजा करून प्रतिमेचे विसर्जन करतात व त्याच दिवशी म्हणजे चतुर्थीला श्रीगणरायाचे आगमन होते. बुद्धी आणि विद्या यांचे दैवत समजल्या गेलेल्या श्रीगणरायाच्या आगमनाची लहानथोर सर्व मंडळी वाट पाहत असतात. चैत्र–वैशाखापासून कारागीर लोक गणपतीच्या सुंदर सुंदर मूर्ती घडविण्यात मग्न झालेले असतात. तृतीयेलाच बहुधा लोक गणपती आणतात. घरातील वडिलधाऱ्या पुरुषाने बाळगोपाळांच्या जयजयकारांत आणलेल्या मंगलमूर्तीचे स्वागत दारातच दूध–पाणी पायावर घालून स्त्रिया करीत असत व ठरविलेल्या सुशोभित जागेवर मूर्ती विराजमान होत असे. दुसरे दिवशी पुरोहितांकडून श्रीची शास्त्रोक्त पद्धतीने प्राणप्रतिष्ठा व पूजा व्हायची. एकवीस मोदकांचा नैवेद्य व्हायचा. आरत्या मोठ्या गजराने व्हायच्या व प्रसाद वाटून सकाळची पूजा पार पडायची. पूर्वी कोकणात अशी चाल होती की, प्रत्येकाने एकवीस गणपतींचे दर्शन घ्यायचे. त्यासाठी बोलावणे लागत नसे. मुलांच्या पलटणी तर घरोघरी दर्शन घेत फिरत असत. आता सार्वजनिक गणपती हे फार मोठे आकर्षण निर्माण झाले आहे. गणपती असेपर्यंत दररोज सकाळ संध्याकाळ साग्रपूजा होते. एकवीस दुर्वा, पत्री, कमळे इत्यादी वाहिलेली गजाननाची मूर्ती पावित्र्याची, आनंदाची लयलूट करणारी अशी साक्षात देवताच अवतीर्ण झाल्यासारखी भासते. दुसऱ्या, पाचव्या, सातव्या अगर गौरीबरोबर, दहाव्या दिवशी म्हणजेच अनंत चतुर्दशीचे दिवशी प्रथेनुसार मुडपलेल्या साखरेच्या कानवल्यासह श्रीगजाननाची पाठवणी जड अंतःकरणाने नदीवर अगर विहिरीवर होत असते. येताना मोकळ्या ताम्हणातून आणलेली विसर्जनाच्या जागची वाळू-माती घराच्या कानाकोपऱ्यात पसरवून घरात ऐश्वर्य सतत टिको अशी भावना व्यक्तविली जाते. गणपती-उत्सवाचा असा हा आनंददायी सोहळा म्हणजे सण आणि उत्सव यांची सांगड साधून धर्म नि राष्ट्र यांच्या कल्याणाचा मार्ग दाखविणारा एक पवित्र सणच होय.

भाद्रपद शुद्ध पंचमीला ऋषीपंचमी म्हणतात. आपल्या धर्म व संस्कृतीची स्थापना करणारे ऋषी हेच सर्वश्रेष्ठ मानले जातात. त्यांच्याच पूजनासाठी हा दिवस मानला जातो. पाटावर सप्तर्षी व अरूंधती यांच्या सुपाऱ्या मांडून त्यांची स्त्रिया पूजा करतात. या दिवशी बैलांच्या श्रमाचे असे पदार्थ खात नाहीत. स्वतःच्या हातचे पदार्थ उपजवून भक्षण करण्याचा प्रघात आहे. स्वावलंबनाचे महत्त्व पटविण्याचा यामागे हेतू आहे.

भाद्रपदातील दुसरा महत्त्वाचा सण म्हणजे गौरीचा. ज्यांच्या घरी गौरी असतात त्यांची धांदल तर विचरता कामा नये. गौरी तीन दिवस असतात. पहिले दिवशी यायच्या त्यावेळी कापडाच्या बाहुल्या सजवून उभ्या करतात व त्यावर मातीचे वा पितळेचे मुखवटे बसवून आरास करतात. दुसऱ्या दिवशी गौरीचे भोजन असते. सवाष्ण जेवावयास सांगायची, पाच पक्वान्ने करायची. आनंदात दिवस साजरा करायचा व तिसरे दिवशी त्यांना पाठवावयाचे. यावेळी कोठे कोठे भागवत सप्ताह बसतो. सात दिवसात भागवत वाचावयाचे. ते ऐकणे मोठे पुण्यकृत्य समजले जाते. पौर्णिमेला त्याची समाप्ती होते.

गणपती अनंत चतुर्दशीला जातात. चौदा गाठी मारलेल्या विशेष प्रकारच्या तांबड्या रेशमी दोऱ्याची पूजा करून अनंत म्हणून तो हातावर बांधतात.

भाद्रपद वद्य प्रतिपदेपासून पक्ष पंधरवडा किंवा पितृ पंधरवडा सुरू होतो. घरोघरी आपल्या दिवंगत वडिलांचे किंवा पितरांचे श्राद्ध करतात. स्वर्गवासी तीन पिढ्यातल्या आप्तांचा नामनिर्देश करून त्यांना तिलांजली देतात. गावातील आप्तस्वकीयांना जेवायला बोलावून वाडवडिलांच्या स्मरणात दिवस घालवितात.

दसरा–दिवाळीच्या आगमनाची चाहूल देणारा आश्विन महिना सुरू होतो आणि प्रतिपदेपासून नवमीपर्यंत घरोघर देवीचे नवरात्र सुरू होते. कुळाचारानुरूप घटस्थापना करतात. कोठे कोठे देवीचा सप्तशतीचा पाठ वाचतात. देवाजवळ अखंड नंदादीप लावतात. रोज एकेक फुलांची माळ चढवितात.

घटाशेजारी धान्य पेरलेले असते. नवमीचे दिवशी होम करतात. आश्विन शुद्ध पंचमीला ललितागौरीची पूजा करतात. अष्टमीला कोकणस्थात महालक्ष्मीची मूर्ती बनवितात. उकडीचा मुखवटा करून व उंच ठिकाणी शरीराचे कापडी अवयव करून त्यावर तो बसवितात. दागदागिने घालून तो सजवितात. रात्री स्त्रिया घागरी फुंकतात. या प्रकारातील उत्कटता बघण्यासारखी असते.

नवरात्राचा शेवटचा दिवस म्हणजे दसरा. साडेतीन मुहूर्तातील एक मुहूर्त. लहान मुलांच्या शिक्षणास या दिवशी प्रारंभ होतो. नवीन कार्यास शुभ असा हा दसरा समजला जातो. सरस्वती, पोथ्या, शस्त्रे व हत्यारे, यंत्रे यांची या दिवशी पूजा करतात. पूर्वी घोड्यांचा उपयोग अतिशय असल्याने या दिवशी घोड्यांची शृंगारून मिरवणूक व पूजा होत असे. दुपारी साधारणत: श्रीखंड-पुरीच्या जेवणाचा थाट असतो. संध्याकाळी स्नेहीमंडळी जमून सीमा उल्लंघून घरी येतात. आपट्याच्या झाडाची पाने सोने म्हणून एकमेकांना आदराने देतात. “ दसरा सण मोठा, नाही आनंदा तोटा ” असा हा गोड सण पांडवांच्या विजयाची आठवण करून देऊन संपतो.

“ को जागर्ति ? ” विचारीत कोजागिरी पौर्णिमा येते. या दिवशी रात्री चंद्राची पूजा करतात. दूध आटवूत चंद्राच्या शीतल चांदण्यात जाऊन, जागरण करून मित्रमंडळींसह त्याचे सेवन करतात.

आश्विन महिना संपता संपताच दिवाळीची आनंददायी शुभ पाऊले उमटू लागतात. आश्विन वद्य द्वादशीला गोबारस म्हणतात. त्या दिवशी सुवासिनी आपणा हिंदूंना प्रिय अशा गोमातेची वासरासह पूजा करतात. दुसरे दिवशी धनत्रयोदशी येते. बायकांच्या न्हाण्याचा हा दिवस. या दिवसापासून दिवाळीचा सर्वात मोठा सण सुरू होतो. दुसरे दिवशी नर्कचतुर्दशी. या दिवशी श्रीकृष्णाने नरकासुर या बलाढ्य राक्षसाचा वध केला म्हणून हा दिवस पाळतात. पहाटे उठून दारापुढे पणत्या लावायच्या. अंगाला सुवासिक उटणी लावून भल्या पहाटेच आंघोळ उरकतात. आंघोळीचे वेळी फटाक्यांचा दणका उडविण्यात मुले दंग होतात. घरातल्या बायका फराळाच्या तयारीकडे असतात. उजाडले की,

रांगोळ्या घालून फराळासाठी पाने तयार होतात. जावयांचा पहिला दिवाळसण म्हणजे तर मोठी पर्वणीच. गृहिणींनी कुशलतेने तयार केलेले फराळाचे पदार्थ पानांची शोभा वाढवितात आणि मजेत फराळ होतात. दुसरे दिवशी आवस. या दिवशी सायंकाळी लक्ष्मीपूजनाचा सोहळा असतो. सडा-संमार्जन करून रांगोळ्या घालतात. पणत्यांचे दिवे लावून सर्व परिसर उजळला जातो. संध्यासमयी लक्ष्मीची थाटाने पूजा करतात. व्यापाऱ्यांकडे तर लक्ष्मीपूजनाचा थाट आगळ्याच वैभवाने साजरा करतात. मग येतो पाडवा. याला बलिप्रतिपदा असे म्हणतात. वामनाने बलीचे राज्य घेतले परंतु त्याच्या स्मरणार्थ आनंदोत्सव साजरा करण्याचा त्याला वर दिला. या दिवशी कोठे कोठे बलीची पूजा करतात. व्यापाऱ्यांचे नवे वर्ष या दिवसापासून सुरू होते. वहीपूजनाचा मोठा समारंभ दुकानातून व कारखान्यातून होत असतो. ( मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला देवदिवाळी साजरी करतात ) कार्तिक शुद्ध द्वितीयेला भाऊबीज असते. बहीण भावांच्या पवित्र प्रेमाचे प्रतीक असलेला हा सण. यमाने या दिवशी आपली बहीण यमी हिच्या घरी भोजन केले व तिने त्याला ओवाळले. तीच परंपरा या सणामागे चालू आहे. भावाला आपल्या घरी जेवावयास बोलावून त्या ओवाळतात. भाऊ या दिवशी आपल्या शक्तीनुसार तिला बंधुप्रेमाची भेट म्हणून ओवाळणी घालतो. भाऊ नसलेल्या स्त्रिया चंद्राला ओवाळून भाऊबीज साजरी करतात.

दिवाळी पाठोपाठ कार्तिकी एकादशी येते. पंढरीची वारी नेमाने जात असते. कार्तिक शुद्ध चतुर्दशी ही वैकुंठचतुर्दशी. या दिवशी शिव व विष्णू यांची रात्री बारा वाजता भेट होते म्हणून त्यावेळी बेल व तुळस वाहून त्यांची पूजा करतात. सर्व देव अखेर एकाच ईश्वराची रूपे हे सत्य यात व्यक्त होते. पौर्णिमेला त्रिपुरी पौर्णिमा म्हणतात. शंकराचे देवळातून त्रिपूरवाती लावतात. देवळात दीपोत्सव करतात. चातुर्मासाची या दिवशी समाप्ती होते. धुंधुरमास सुरू होतो. मार्गशीर्षात गुरूचरित्र पारायणे व पौर्णिमेला दत्तजयंती साजरी होते. याच महिन्यात चंपाषष्ठीचे नवरात्र असते. धुंधुरमास पहाटे उठून खिचडी, गुळाची पोळी करून चांगले उजाडले की, पाने बसायची चाल आहे.

मग पौष डोकावू लागतो. तिळगूळ हलव्यांची हालचाल सुरू होते. मकर संक्रांत हा या महिन्यातील मोठा सण. संक्रांतीच्या आदल्या दिवशी भोगी असते. सुवासिनी स्त्रिया न्हाऊन सवाष्ण बोलावून तिला खिचडीचे भोजन घालून संतुष्ट करतात. संक्रांतीला सकाळीच स्त्रिया वाण देतात. सुवासिनी हळदकुंकू व संसारोपयोगी वस्तू लुटतात. लहानथोर एकमेकांना तिळगूळ-हलवा देऊन गोड बोलण्याबद्दल आवाहन करतात. लग्न झालेल्या मुलींच्या सासरी संक्रांतीचा सण हलव्याचे दागिने करून साजरा करतात. तिळाचे स्नान, तिळाचे दान, तिळाचे भक्षण व तिळगूळ हे या सणाचे एक वैशिष्टय आहे. येणाऱ्या थंडीचे दिवसात शरीरात उष्णता निर्माण करणाऱ्या तिळाचे महत्त्व ओळखून त्यांना धर्मात गोविल्यामुळे केवढी सोय न कळत झाली आहे पहा. रथसप्तमीपर्यंत हा तिळगूळ चालू शकतो. रथसप्तमीला सूर्य सात घोड्यांच्या रथात बसून निघतो. त्याचे निदर्शक म्हणून हा सण पाळतात. सूर्यपूजा म्हणजे साक्षात तेजाची पूजा करण्याची थोर परंपरा या सणामागे आहे.

त्यानंतर येणारा माघ महिना हा शंकराचा महिना. माघ वद्य चतुर्दशीला महाशिवरात्र मानतात. महादेवाच्या देवळात जाऊन शंकरावर बिल्वपत्रे वाहतात. दिवसभर उपास करून रात्री भजनात रंगून काळ घालवितात. माघी पौर्णिमेला नव्याची पौर्णिमा म्हणतात. नव्याने तयार झालेली धान्ये देवाला अर्पण करतात.

महाराष्ट्रात ज्याने राष्ट्रधर्माची ज्योत पेटविली त्या समर्थ रामदासस्वामींची दासनवमी साजरी होते.

या वर्षातील सणांचा शेवटचा महिना म्हणजे फाल्गुन. होळी पौर्णिमा. हा सर्व आबालवृद्धांचा खेड्यापाड्यातसुद्धा साजरा होणारा सणाचा दिवस. शंकराने मदनाचे दहन केले त्यानिमित्त हा सण साजरा करतात. घराघरात तुळशीपुढे व चौकांतून सार्वजनिक होळ्या सायंकाळी पेटविल्या जातात. होळीत पूर्वी असलेले ग्राम्य बीभत्स प्रकार आता बंद झाले आहेत. या दिवशी पुरणपोळीचा नैवेद्य करून होळीला अर्पण करण्याची प्रथा आहे. दुसरे दिवशी

धुळवड व पाचवे दिवशी रंगपंचमीचा सुखद सोहळा होऊन वर्षातील सर्व सणांची सांगता होते.

असे हे आपले सण व व्रते म्हणजे आपल्या श्रेष्ठ संस्कृतीचे व धर्माचे चालते बोलते प्रतीकच होत.

# श्रावण मास

सौ. शैलजा राजे

आपला हिन्दुधर्म म्हणजे नेम-नियमनांची शिकवण देणारा. आपल्या प्रत्येक सणामागे, प्रत्येक दिवसामागे, कुठली ना कुठली शिकवण असते. मुलांची सांगड त्याच्याशी घातलेली असते. त्याग, नीती, दया यांची शिकवण साध्या सोप्या गोष्टीतून जोपासलेली दिसते. प्रत्येक सण एखादा संस्कार घडवून देतो. संक्रांत आली की सांगते, " सारे राग, द्वेष संपवा, एकमेकांशी गोड बोला." दसरा म्हणतो, " उठा आळस झटका, जरा सिमोल्लंघनाला चला. पराक्रमाला सामोरे जा. "

असे हे नाना सण अनेक संस्कार करणारे. चैत्री पाडव्यापासून या सणांना तशी सुरुवात होते. पण श्रावण आणि भाद्रपद म्हटला की, सणांची एकच गर्दी. अगदी आजच्या धावपळीच्या धकाधकीच्या जीवनातही एखादी संस्कारी तरुणी घरातल्या फळीवरच्या दोन देवांच्या कडेला जिवतीचे चित्र टांगील, सकाळी जमत नाही म्हणून संध्याकाळी कचेरीतून येताना फुलवाल्याकडून

एखादा सुवासिक गजरा आणील, शुक्रवारची आठवण ती विसरणार नाही. मग सकाळी जमले नाही म्हणून संध्याकाळी त्या जिवतीची पूजा करील, आपल्या बाळाला घरात पाट नसेल तर जेवणाच्या खुर्चीवरच बसवील न् त्याला जिवतीचे औक्षण करून ओवाळील, वाण देईल. दोन मिनिटे जिवतीपुढे लीन होईल व म्हणेल, " आई जिवतीमाते, माझ्या बाळावर कृपा असू दे ग ! "

हे सारे करीत असताना तिच्या मनाला आजच्या युगाचे, वर्तमानकाळाचे भान नसते असे नाही, तरी पण मनावर झालेले संस्कार असे पटकन पुसू म्हटले तरी पुसले जात नाहीत आणि हेच तर आपल्या या लोकाभिमुख कहाण्यांचे आणि व्रतांचे महत्त्व.

श्रावणातल्या सोमवारपासून सुरू झालेल्या या व्रतांची सांगता होते पिठोरी अमावास्येला. श्रावण महिन्यातल्या प्रत्येक दिवसाने जनमानसावर आपला ठसा उमटवून ठेवला आहे.

सोमवारची म्हातारीच्या खुळचाभर दुधाची कहाणी काय सांगून जाते? व काही सारे मला वाहून टाका असे म्हणत नाही. शंकराचा गाभारा णाच्या हण्डचाच्या दुधाने भरला नाही, तर तो म्हातारीने खुळचाभर दूध ातल्याबरोबर भरला ! कारण तिने घरादाराला पोटभर जेवू खाऊ घातले, ुलावाळांना दूध पाजले, सर्वांना संतुष्ट केले आणि मगच ती राजाज्ञेप्रमाणे ंकराच्या पिंडीवर दूध घालायला गेली. कोरड्या देवधर्मापेक्षा सर्वांचा प्रेमाने तिपाळ करणे हीच देवभक्ती असेच ही कहाणी सांगून जात नाही का ?

सोमवार नंतर येतो मंगळवार. नवविवाहित मुलींचा उत्सव सोहळा. पण या त्सवाला नुसताच आनंदाचा, उत्साहाचा सोहळा म्हणता येईल का? या व्रताागे श्रद्धा तर असतेच, पण मंगळागौरीची कहाणी खूप काही सांगून जाते. ाजाने मोटलीभर आंबे काढावे, खाली येऊन पहावे तर मोटलीत एकच आंबा! खेर गणपती त्याला सांगतो, " अरे राजा, तुझ्या नशिबी एकच पुत्र आहे. गाच का मला त्रास देतोस ? "

आणि आपण अल्पायुषी पण सद्गुणी, लहानशाच आयुष्यात आपल्या गुणांनी किर्तीवंत होणारा पुत्र मागितलाय हे त्याच्या लक्षात येते !

म्हणजे माणसाने कशाची इच्छा करावी हेच नाही का या कहाणीतला राजा सांगून गेला ?

या कहाणीत आणखी एक महत्त्वाची गोष्ट वाचायला मिळते. या अल्पायुषी राजपुत्राच्या चिमुरड्या राणीचा आत्मविश्वास तिची दृढ श्रद्धा आणि त्यासाठी तिने घेतलेले परिश्रम! मी आणि माझी आई एवढ्या सत्वशील आहोत आणि आमची आमच्या व्रतावर एवढी श्रद्धा आहे की, आम्हाला कधी वैधव्य येणारच नाही हा तिचा विश्वास ती आपल्या वागण्याने सिद्धही करते! या मंगळागौरीची कहाणी इतकी सुरस आणि मधुर आहे की, ती आजही पुनःपुन्हा वाचावीशी वाटते. अगदी आजच्या सुशिक्षीत मुलीलाही तिचा मोह पडावा अशी ही कहाणी सुंदर आहे.

मंगळवार नंतर येतात बुधवार – गुरुवार ! बुध–बृहस्पतींना आमच्या कहाणीत एकत्रच गुंफले आहे. ही कहाणी आहे बुद्धीची आणि चातुर्याची राजाच्या सात सुना! दानधर्म न करण्याची वरच्या सहाजणींची प्रवृत्ती. धाकटी मात्र दयाळू! दारी आलेल्या अतिथीला विन्मुख पाठवायचे नाही ही तिची वृत्ती. म्हणून एक दिवस येतात तिच्या दारी ब्राह्मणाच्या वेषाने बुध आणि बृहस्पती! भोळी सून त्यांना पत्रावळीवर घरात होते तेवढे वाढते. त्यांचा आत्मा संतुष्ट करते. “आशिर्वाद माग” म्हणताना स्वतःसाठी काहीच न मागता दानधर्म न केल्यामुळे दरिद्री झालेल्या आपल्या घरासाठी सुखसंपत्ती मागते. पण ती गर्वाने फुगत नाही, दानाचे व्रत सोडत नाही. अशी ही कहाणी स्वार्थी होऊ नका सांगणारी, जवळ असेल त्यातले दुसऱ्याला द्या, त्यालाही तुमच्या सुखाचा आनंदाचा वाटेकरी होऊ द्या असे शिकवणारी.

श्रावणातला शुक्रवार म्हणजे महान मंगल दिवस ! . . . मातृत्वाची महती सांगणारा आणि पुत्रधर्माचे पालन करावे असे शिकवणारा ! . . . या कहाणीची

गोडी तरी किती अवीट ! आज वर्षानुवर्ष झाली तरी तिची माधुरी कमी होणार नाही. या मौखिक कथा. कुणी असे सांगणाऱ्या, कुणी तसे सांगणाऱ्या! मी ऐकलेल्या कहाणीत राजाच्या सुनेवर सासूसासरे व्यभिचाराचा आरोप करतात. तिला हाकलून देतात, माहेरी आसरा मिळत नाही. मग तिला एक कलावंतीण आसरा देते. खरे तर ती व्यभिचारिणी नसतेच. शत्रूशी लढायला नगरापार गेलेला तिचा पती, पत्नीच्या ओढीने रात्री घोडा भरधाव सोडून तिच्या महाली येतो. पण ही गोष्ट ती कुणाला सांगत नाही. का तर त्यामुळे आपल्या पतीला दोष लागेल ! स्वत: आरोप सहन करते, आपत्ती ओढवून घेते, पण पतीची प्रतिष्ठा सांभाळते.

ज्या राज्यातील कलावंतीण होती त्या राज्याचा राजा निपुत्रिक होता. या अनाथ सात्विक सतेज मुलीबद्दल त्या कलावंतिणीच्या मनात वात्सल्य निर्माण होते. आपल्या मुलीला गर्भ राहिला आहे हे लक्षात येताच ती गावातल्या निष्णात सुईणीला बोलावून आणते. तिची सारी काळजी घ्यायची विनंती करते. सुईणीच्या ध्यानी येते की, या मुलीच्या उदरात वाढणारा गर्भ पुत्राचा आहे. ती कारस्थान करते. राणीला सारे सांगते आणि मग या कलावंतीणीच्या घरापासून राजाच्या राजवाड्यापर्यंत भुयारी मार्ग तयार करून घेते. राणीला दिवस राहिल्याची वार्ता राज्यभर होते आणि ज्या दिवशी ही मुलगी प्रसूत होते त्याच दिवशी राणीला मुलगा होतो, हिला मात्र वरवंटा पोटी आल्याचे करंटीपण पदरी बांधून घ्यावे लागते! राजसत्तेपुढे इलाज नसतो हेच खरे नाही का ?

या वरवंट्याच्या संदर्भावरूनच तर आपल्याकडे मुलाला पाळण्यात घालण्याआधी वरवंट्याला नटवून थटवून गोपा नाचवायची पद्धत पडली नसेल ? अशा या रूढी जेव्हा समाजात स्थिर होतात तेव्हा त्याच्यामागे अशाच काही मौखिक आख्यायिका असाव्यात ! . . .

इकडे राजवाड्यात मुलगा वाढत असतो. इथे त्याची जन्मदात्री आई जिवतीचे व्रत करीत असते. दर शुक्रवारी लेकुरवाळ्या स्त्रीची ओटी भरते,

भिंतीवर हाताने अशीच लेकुरवाळी जिवती चितारते आणि मनोमन आपल्या बाळाची आठवण करून अक्षता टाकते आणि म्हणते, "आई जिवतीमाते, जिथं असेल तिथं माझा बाळ सुखी राहू दे !"

पुढे मुलगा मोठा होतो. त्याचा तथाकथित पिता मरण पावतो, आणि हा काशीला त्याचे श्राद्ध करायला निघतो. परंतु मध्येच एक गोष्ट घडते. राजपुत्र काशीला जायला निघालाय म्हणताना सारा गाव त्याला पहायला लोटतो. त्यावेळी ही त्याची जन्मदात्री त्या गर्दीत उभी असते. मनोमनी जाणत असते. राजपुत्राला डोळे भरून पहात असते. तरण्याबांड झालेल्या त्या राजाचे तिच्याकडे लक्ष जाते. कलावंतीणीचेच घर ते ! राजा रात्री त्या घरी येतो. दारात बांधलेल्या गायीला पाय लागतो आणि गायीला वाचा फुटते, "गायीला जो गायत्री म्हणत नाही तो आईला काय सावित्री म्हणणार ?"

हे असे लागोपाठ तीनवेळा होते, अखेर नाद सोडून तो पुढे निघतो. वाटेत एका ठिकाणी मुक्काम करतो. त्या पाटलाच्या सुनेचे प्रत्येक मूल पाचवीला मरते. हा नेमका त्याच दिवशी तिथे मुक्कामाला असतो. रात्री सटवाई मूल न्यायला येते आणि जिवती तिला आडवते. म्हणते, "माझं मूल ओलांडायचं नाही. याची आई माझं व्रत करते"

मूल वाचते. याला सारे विचारतात, त्या व्रताची माहिती. पण याला कुठे काही माहीत असते ? तो पुढे काशीला जातो. तिथेही चमत्कार होतो. पिंड देताना दोन हात वर आले. लोक हसायला लागले. त्याच पावली तो परत आला. आपल्या आईला म्हणजे त्या राणीला त्याने खरे काय आहे असा प्रश्न केला आणि खरी हकीगत समजून घेतली. आता त्याला जन्मदात्या आईचा ध्यास लागला. तिच्या शोधासाठी त्यानं गावजेवण घातलं. हिनं अटी घातल्या. कोरी वीट ओलांडणार नाही. कारल्या पडवळाच्या वेलाखालून जाणार नाही. एक का दोन. त्या त्यानं मान्य केल्या. आई जेवायला बसली. राजा अवघ्या पंगतीला तूप वाढत होता. हिच्या पानासमोर आला आणि हिला पान्हा फुटला. मायलेकांची ओळख पटली, गायीचे बोलणे आठवले. आईचे पाय

धरले. सारी हकीगत समजून आली. इकडे काय झाले होते, हिचा नवरा युद्धाहून परत आला. पत्नी कुठे आहे विचारले, सारी हकीगत कळली, त्याचक्षणी रागाने निघाला अवघ्या त्रिखंडाची यात्रा करता करता या गावी आला. भिक्षेकरिता राजाच्या दारात उभा राहिला. आता राजाने आपल्या दोघी आयांना सन्मानाने जवळ ठेवून घेतले होते. दारात आलेल्या अथितीचा आवाज हिने ओळखला. मुलाला म्हणाली, "तुझा पिता दारी उभा आहे, त्याला सन्मानाने घरात आण!"

मग शेवट गोड झाला. जिवतीच्या व्रताची महती वाढली. आजही युगानुयुगे तिची पूजा घरी होते आहे. रूपे बदलली, पद्धतीत फरक पडला पण श्रद्धा तीच राहिली आहे.

ही कहाणी सविस्तर सांगण्याचे कारण, या एका कहाणीत अनेक संस्कारांची उत्तम गुंफण केलेली आहे. निष्ठा, पतिप्रेम, पत्नीप्रेम, मातृप्रेम, अनाथाला आसरा, सत्याची कास अशा किती तरी गोष्टी ही एक कहाणी सांगत असते! आणि म्हणूनच या कहाणीची मोहिनी आजही कमी झालेली नाही.

श्रावणातला शनिवार हा संपत शनिवार म्हणून संबोधला जातो. मुळात आपल्याकडे दर शनिवारी मारूतीची उपासना करण्याची पद्धत आहे. मारूती हा बलोपासक आहे. सेवाभावी आहे. निरपेक्ष आहे. अशा मारूतीला आपल्या जीवनात अनन्यसाधारण महत्त्व आहे. हे महत्त्व पुरातन कालापासूनचे आहे. पण संत रामदासांनी तत्कालीन परिस्थितीचा अभ्यास केला आणि सर्वसामान्यांना, दऱ्याखोऱ्यातून मारुतीची स्थापना करून, एक नवा दृष्टीकोन दिला. अडाणी, दीनदुबळ्या, दलित, अपंगांना सर्वांनाच मारूती आपला वाटायला लागला.

पण श्रावणातला शनिवार हा नृसिंहाचा! संपत्ती देणारा! त्याचे व्रत वेगळे. गोरगरिबांनी सहज करावे असे. या देवाला काय लागते नैवेद्याला? तर बाजरीची भाकरी न् कुठलीतरी केनीकुर्डची नाहीतर टाकळ्याची भाजी न् गुळाचा खडा!

कहाणी कोणती तर एका पाटलाच्या सुनेची ! तिच्या औदार्याची, तिच्या सत् चरिताची. शनीदेव कुष्ठरोग्याच्या रूपाने दारी येतो. पाटलाची गरीबी. चार सुना ! तीन शेतावर, धाकटी घरात रांधायला, कामाला. घरात चिमूटभर पीठ. त्यात मीठ मीरचीही नाही ! पण ही त्या दारी आलेल्याला न्हाऊमाखू घालते. असेल ते चिमटीभर तेलही लावते, असेल तेवढेच पीठ मळते, त्याचा आत्मा तृप्त करते. पाळीपाळीने आधी घरात असलेल्या तिघींनी त्याला परतवून लावलेले. घरात खरच खडखडाट झालेला. पण ही आपल्या कुवतीनुसार त्याचे अतिथ्य करते. तो आपली पत्रावळ वळचणीला खोवतो आणि निघून जातो. ही घरात येऊन पहाते तर गाडगीमडकी धनधान्याने भरलेली ! शनिदेव प्रसन्न झाला. घरात सुखसमृद्धी आली.

तशीच ही आदित्य रेणुबाईची कहाणी. आपल्या आसपासचे, आजूबाजूचे कुणी उपाशीतापाशी नाही ना राहिलेले असा शोध करून त्याच्या मुखी घास घालून नंतरच आपण घास घ्यावा. जे मिळाले असेल त्याचे चातुर्याने रक्षण करावे हे सांगणारी ही कहाणी. याचा वसा साधा सोपा. सर्वांमुखी घास घालावा असा.

या साऱ्या कहाण्या आपल्याला किती देतात याचा अभ्यास केला तर समजून येते की, जे मोठेमोठे ग्रंथ वाचून कळणार नाही ते सारे उत्तम असे तत्त्वज्ञान या साध्या बोलीभाषेने कानाकोपऱ्यात नेऊन ठेवले आहे. या कहाण्या ऐकण्याची पद्धत तरी कशी मनोहारी ! हातात तांदळाच्या अक्षता घेऊन लहानथोरांनी बसायचे. मग ही कहाणी मनोभावे ऐकायची न् म्हणायचे, ‘जसा त्यांना वसा पावला, तसा तो तुम्हाआम्हाला पावूदे. ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपन्न !”

असा हा कहाण्यांचा महिमा या शिवाय श्रावणात सणांची धामधूम! नागपंचमी आली. वारूळाची पूजा करा. सासूरवाशिणी, माहेरवाशिणी एकत्र या. झाडांना हिंदोळे बांधा, झोके घ्या, झिम्माफुगडी घाला. याचे महत्त्व आज वाटत नाही. पण त्यावेळी, स्त्रीला मोकळ्या मनाने हसायची बोलायची

चोरी, तिला असे मुक्त मनाने हसता, गाता, खेळता कुठून मिळणार ? पण या दिवशी ती मुक्त ! रानपाखरू होणार जशी. आपल्या माहेरी जाणार, नाहीच गेली तर मनोभावे म्हणणार, "देवा, माझे लांडोवा, भुंडोबा सुखी ठेव."

हे लांडोबा-भुंडोवा म्हणजे तिचे नागभाऊ. एका पाटलाच्या सुनेला कुणी नव्हते. साऱ्या माहेरी जायला निघाल्या. ही नदीवर झुरूमुरू होऊन बसली. सरपांना आपली कथा सांगितली. नागाने ती ऐकली. मामा होऊन आला. माहेराला घेऊन गेला. सुख भोगले. पण मामीचे बाळंतपण झाले न् ते वळवळणारे नाग पाहून घाबरली. हातातला दिवा पिलांच्या शेपटीवर पडला. शेपट्या तुटल्या. मामाच्या घरून धनधान्य घेऊन आलेल्या या सुनेच्या घरी दुसऱ्या वर्षी नागपंचमीच्या दिवशी हिने आठवण येत होती म्हणून नाग-नागीण-नागाची पिले यांची चित्रे काढली. त्यांच्याकडे पहात बसली. आपली शेपटी तोडणाऱ्या वहिणीला दंश करायला ती शेपटी तुटलेली पिले येऊन लपून बसली होती. हिने मनोमनी त्यांची आठवण केली न् हात जोडून देवाला म्हणाली, "हे देवा, माझे लांडोबा भुंडोवा सुखी ठेव !"

तिची ती सद्भावना पाहून ती नागाची पिले परत गेली. आपल्या या मानलेल्या वहिणीच्या कल्याणासाठी झटली. मग तेव्हापासूनच हे नागपंचमीचे व्रत करतात. या दिवशी चिरायचे नाही, कापायचे नाही! का तर कुठे रानावनात लपलेल्या नागांना दुखापत होऊ नाही म्हणून ! असा हा नागपंचमीचा सण असे हे त्याचे व्रत ! सर्वांभूती प्रेम करावे, आनंदाने, प्रेमाने नांदावे, हसावे, हसवावे असे सांगणारा हा उत्साहाचा सण !

श्रावण महिन्यातला आणखी एक महत्त्वाचा दिवस म्हणजे शीतला सप्तमी! कुठे कुठे याला शीळासप्तमी म्हणतात. गुजरात, मारवाड वगैरे प्रांतात या दिवशी बायका फेर धरतात, टिपऱ्या खेळतात, नटतात, थटतात. काही ठिकाणी तर चुलीवर चक्क आंब्याचे कोवळे रोप आणून ठेवतात. चूलच पेटवायची नाही म्हणून.

पण आपल्या महाराष्ट्रात याच्यामागे एक उदात्त कहाणी आहे. आपल्या नगराला पाणी नाही म्हणून सारी प्रजा पाण्यावाचून तडफडतेय. मग कुणीतरी सांगते, "तुझ्या मुलाचा मुलगा, तुझा नातू, या तळ्यात सोड. पाणी लागेल."

मन कचरते, प्रत्यक्ष नातवाचा बळी ? पण प्रजेच्या हितासाठी मुलगाच बापाची समजूत घालतो. गावचा प्रमुख म्हणजे पाटील, राजाच तो, अखेर तयार होतो. सुनेला कसे हे सांगणार ? तिच्या देखत तिचा बाळ कसा बळी देणार ? मग तिला तिची आई आजारी असल्याचा सांगावा आलाय म्हणून माहेरी पाठवतात, आणि मुलाला नटवून थटवून पाळण्यासकट तळ्यात सोडतात ! तळ्याला असंख्य झरे फुटतात !

सून माहेरी येऊन पहाते तर सर्व ठीक ! म्हणते, "माझ्या मामंजींना कुणी फसवले हो ? सासूबाईंना त्रास देईल बाळ." त्याच पावली परत फिरते. आई तांदुळाचे घावन आणि आंब्याचे लोणचे याची शिदोरी देते. सून गावाच्या वेशीशी येते. काठोकाठ भरलेले तळे पाहून संतुष्ट होते. वडाच्या झाडाखाली बसते, त्या जलदेवतेला नमस्कार करते, बरोबरीच्या शिदोरीचा नैवेद्य दाखवते. तशी वडाखालच्या सात आसरा (अप्सरा) समोर उभ्या राहतात. सारे सांगतात. क्षणभर मन कातर होते. पण दुसऱ्याच क्षणी पुढ्यातला घास त्या सातजणींच्या समोर ठेवते न् म्हणते, "माझा बाळ तुमच्याकडे आहे ना ? त्याला नीट सांभाळा. गावाला पाणी मिळालं, गाव तृप्त झाला."

तिच्या मनाचा मोठेपणा, प्रजेबद्दलचे प्रेम, पाहून त्या तिच्यावर प्रसन्न होतात. पाळण्यासकट तिचा बाळ देतात. सून घरी येते, बाळाला पाहून घरादाराला आनंद होतो.

अशी ही कहाणी. अजूनही कित्येक घरात वडाची फांदी पुजतात, सात खडे पाण्यात ठेवतात, त्यांची पूजा करतात आणि सात नैवेद्य दाखवतात. आपल्या बाळांना आयुष्य मागतात.

गोकुळ अष्टमी हा श्रीकृष्ण जन्माचा सोहळा. नारळी पौर्णिमा हा सागराची
जा करायचा दिवस ! श्रावणातले हे सण अवघ्या भारतभर या ना त्या
द्धतीने साजरे होतात. सागर किनारी राहणारे सागराची पूजा करतात
णि जेष्ठ आषाढाच्या वादळी तुफानानंतर आपल्या होड्या समिंदरात
डतात. दोन अडीच महिन्यांची मरगळ झटकून टाकतात.

यानंतरचा श्रावणातला शेवटचा दिवस पिठोरी अमावास्या ! यालाच
तृदिनही म्हणतात. आईच्या पूजेचाच हा दिवस ! कारण या दिवशी एका
ीने आपल्या बाळाच्यासाठी अतिथी व्रत घेतले. तिचे दुर्दैव असे होते की,
च्या सासऱ्याच्या श्राद्धदिनीच ती प्रसूत व्हायची न् मूल मरण पावायचे !
द्ध होत नव्हते. अखेर चिडून नवऱ्याने हाकलून दिली. लागोपाठ सहा वर्षे
क्रम चालू होता म्हणून ! बिचारी मेलेले सातवे मूल ओटीत घेऊन
ावनी हिंडत होती. देवकन्या, नागकन्या शिवलिंगाची पूजा करायला
त. खीरपुरीचा नैवेद्य दाखवतात, आणि विचारतात, "अतिथी आहे का
?" भुकेलेली ही "मी आहे" असे म्हणते. "कोण?" म्हणून विचारतात.
ारी कथा ऐकवते. त्यांना आलेल्या या अतिथीची इच्छा पुरी करावी
ते. तिची सारी मुले परत मिळतात. सर्वांना घेऊन ती घरी येते. आनंदी
द होतो. ही पीठोरीची थोडक्यात कहाणी.

से हे दिवस ! अवघा श्रावण महिना जे सारे मंगल ते शिकवत असतो.
व्रतवैकल्ये करायची असतात. पण ती स्वत:पेक्षा दुसऱ्यांना सुख, धन,
य लाभावे म्हणून ! नि:स्वार्थ वृत्तीचे दर्शन घडवणारा हा श्रावण
ाच श्रेष्ठ मानला जातो.

# चातुर्मास

सौ. मुक्ता केणेकर

आखाडाचा महिना आला की, ढग आभाळावर चढाई करतात. उन्हाला धाकदपटशा होतो. वारा उतून मातून दाही दिशा हुंदाडू लागतो आणि पिसाटासारखे पाणी पडू लागते.

धर्माकर्माची जमीन भिजून जाते. व्रतवैकल्यांचे आणि सणावारांचे नवे नव्हाळे लवलवू लागतात. जपतपाचे कोवळे कोंब वर डोकावू पहातात. टाळ पखवाजांच्या नादावर काळचाशार जमिनीचा कण न् कण घुमायला लागतो.

आखाडाची दशमी आली की, गणपतीच्या पूजेने चातुर्मासाची सुरुवात होते. श्रीगणेशाच्या पाठोपाठ नंदीसह शिवपार्वतीची आणि श्रीविष्णू या पंचायतनाची पूजा करून चातुर्मास व्रतवैकल्ये नि कुळधर्म कुळाचाराचा वसा घेतो. आखाडच्या दशमीचा हा वसा कार्तिक दशमीस पुरा होतो.

कसा असतो वसा ? उतायचे नाही, मातायचे नाही, घेतला वसा टाकायचा नाही. निष्ठेने जपायचा. जिद्दीने पार पाडायचा. पिढ्यान् पिढ्या पार पाडायचा. भवतीच्या चार भिंती नि वरचे छप्पर उभे आहे तोवर घराण्याची प्रतिष्ठा पणाला लावून जगवायचा.

आखाडीत दर मंगळवारी देवीला पाणी वहायचे. मातीचे घडे, कडुनिंबाचे टाळे वहाणारे सचैल ओले. सवे ताशेवाजंत्री. मागे गुळाच्या शेरणीची परात झाकलेली. पुढे शीतल झालेली शीतळादेवीची वाट.

वरून पाऊस, खाली चिखलाचा राडा. काटे कुटे, दगडधोंडे पण हाती टाळ व मुखी नाम असलेले हे विठ्ठलाचे गाढे वीर कशाला न जुमानता भगव्या त्रिकोणी पताका खांदी घेऊन पंढरी जवळ करतात. चढ उताराचे रस्ते चालतात. नदीनाले पार करतात. तहानभुकेशी झगडतात. दर्शनाचा लाहो घेऊन झपाटल्यागत नाचत असतात. तिकडून ज्ञानोबाची पालखी येते. तुकोबाची येते. नाथांची, सोपानकाकांची येते आणि इकडून ही वारकऱ्यांची दिंडी.

**पाऊस पडतो झिरीमिरी पंढरीच्या माळावरी**
**ज्ञानिया नामया माझे भिजले वारकरी**
**पांडुरंग म्हणे ऐक रूक्मिणी झणत्कार**
**हाती वीणा टाळ आले आले ज्ञानेश्वर**

तेव्हा गावच्या तेल्या विष्णूच्या नाहीतर कोष्टी विठोबाच्या देवळात नामसप्ताह सुरू व्हायचा. विठोबा रखमाईचा गजर सात दिवस सात रात्री गल्लीत घुमत रहायचा. खेड्यापाड्यातले, गल्लीबोळातले, सगळे विठ्ठलवेडे एकत्र यायचे आणि विठ्ठलाच्या नावाने रात्रंदिवस धुमाकूळ घालायचे.

एकादशी – महाएकादशी! आबालवृद्ध सगळ्या सगळ्यांना उपवास. उपासा पोटी दुपारी बारा वाजेपर्यंत देवळात कुणाचे कीर्तन प्रवचन ऐकता ऐकता आम्हा मुलांचा जीव भुकेने गलबलून जाई. पण मग मात्र एकादशी नि दुप्पट खाशी !

मग येई गुरूपौर्णिमा. घरातल्या पुस्तकांची पोथ्यांची रीतसर पूजा होई. क्वचित् एखाद्या मोठ्या घरी "गाणे बजावणे" होई. घराणे, गुरू, गायकी इत्यादी शब्द गुरूपौर्णिमेच्या दिवसाचे संस्कार करून जायचे.

आखाड सरायला यायचा नि सरता सरता यायची दिव्याची अवस. सगळे दिवे साफसूफ-चकाचक करून पुजायचे. लाह्या फुले वहायची, कणकीचे बाजरीचे दिवे करायचे. कुलदीपकांना उज्ज्वल भविष्य मागायचे. दीर्घायुष्य मागायचे.

आखाडानंतर श्रावण. हिरवागार ओला कच्च! उन्हापावसाचा श्रावण. नव्या नवतीचा, सासुरवाशिणींचा, भावावहिणींचा श्रावण. शिवपार्वतीचा, मंगळागौरींचा श्रावण. उपासातापासाचा आणि पुरणावरणाचा श्रावण. आवडत्या नावडत्या राण्यांचा, निरागस राजांचा आणि त्यांच्या आटपाट नगरांचा श्रावण.

श्रावणी सोमवार आधी जाणीव करून द्यायचा. घरातली वडील मंडळी, व्रतस्थ असायची. पण महादेवाला पाणी घेऊन जायचे घरच्या मुलींनी. सुरेख मोठे सोमेश्वराचे मंदिर. चहुबाजूला ओवऱ्या, सभामंडप, लागून गाभारा, पुढे भला थोरला नंदी. इतका हुबेहुब की, लहान मुलांना जवळ जायची भीती वाटायची. गाभारा चांगला भार हात खोल, अंधारलेला. वर घुमटाचा कळस "शंभोऽऽ" म्हटले की, बापरे! काय घुमायचा आवाज!

समयांच्या उजेडात मधल्या खूप मोठ्या लिंगाभोवती पाट मांडून ब्राह्मण बसलेले. वर भले थोरले अभिषेक पात्र. मंत्रांचे आवाज घुमताहेत, पाण्याची धार सतत स्रवते आहे. चंदनाची वाटी. अक्षतांची थाळी. बेलाची पाटी. गुलाब फुलांची दुरडी.

दिवसभराचे उपास सांजवातीला सुटायचे.

पहिली विनायकी यायची तीही अशीच. श्रावणचौथीचा वसा घेऊन. आई, देवा गणेशालाच कहाणी सुनवायची. संस्कृतीच्या नीतळ तळासारखी, गोड झुळझुळणाऱ्या स्वच्छ पाण्यासारखी कहाणी.

निर्मळ मळे, उदकाचे तळे, बेलाचा वृक्ष, सुवर्णाची कमळे, विनायकाची देवळे रावळे, तिथे मनातल्या गणेशाची स्थापना व्हायची. सासुरवाशिणींच्या गोड हालचाली, गोटपाटल्यांची न् बांगड्यांची मंजुळ किणकिण, मऊ रेशमी वस्त्रांची नाजूक सळसळ. डोळ्यांची फड् फड्, शब्दातला कापरेपणा! सगळेच कसे लक्षात रहाण्यासारखे.

विनायकानंतर नागोबाची पंचमी. नागकुळांच्या कलाकुसरीत भिंती रंगायच्या. प्रत्येक नागमस्तकी हळदकुंकू, मुखावर गुळाचे बोटभर लिंपण, सर्वांभोवती पिवळा तातू, दुर्वा, आघाडा, चाफा जास्वंदीची माळ, धूपदीपाची दरवळ. दूधलाह्यांची छोटी हजेरी आणि पुरणाच्या दिंडांचा महानैवेद्य.

दुपारी, संध्याकाळी रानात वारूळाभोवती, नाचगाण्यांचे फेर. "चल ग सये वारूळाला, नागोबाला पूजायाला" सरसर सर येऊन शालू पैठण्या भिजल्या तरी फेराची गाणी चालूच! वडपिंपळांला, लिंबाला, बांधलेले झोके आभाळात दडलेल्या पावसाची विचारपूस करायला ऊंच ऊंच जायचे.

श्रावणातला प्रत्येक वार, प्रत्येक तिथी, ही व्रताची. वैकल्याची. उपवासाची, दानधर्माची, वाणवशाची आणि कहाण्यांची.

पतिव्रता गृहिणीला औट घटकेचे माहेर देणारा शिवशंकर आणि नावडतीच्या सत्वासाठी रत्नखचित शिवमंदिर निर्माण करून, तिची लाज राखून नावडतीला आवडती करणारा शंभूमहादेव. खुलभर दुधात सारा गाभारा दुधाने भरवून सर्वांचे आत्मे थंड करण्याचा धडा म्हातारीकडून राजाला शिकवणारा हा भोळाशंकर कहाणीतून परत परत वाचावासा वाटायचा. सोळा सोमवाराची व्रते, नित्यनियमाच्या उपावासाचे सोळा सोमवार आचरायचे, सतराव्याला महादेवाची षोडशोपचारे महापूजा. गूळचुर्म्यांचा महाप्रसाद, सोळा मेहुणे.

सोमवारच्या व्रताला शिवशंकराची आळवणी चालू असते. मंगळवारी नवपरिणीत आपल्या सयासवे मंगळागौर पूजीत असते. केळीकर्दळीचे खांब, परीपरीच्या पत्री, रंगीबेरंगी फुले, खाली रांगोळ्यांची महिरप, अन् समयीच्या स्निग्ध प्रकाशात चौरंगावर सजलेली मंगळागौरीची पूजा पहातच राहावी.

लग्नानंतरचे हे पहिलेच नटणे थटणे. बुट्ट्यांचा शालू, मोत्यांच्या परड्या, हिऱ्यांच्या कुड्या, आयन्याची नथनी, सयांचे खिजवून बेजार करणे, तरी मनोभावे पूजा करणे, चित्तभावे कहाणी ऐकणे, नवऱ्याच्या जीवनाबरोवर

आपले अहेवपण मागणे आणि रात्री अगदी पहाटेपर्यंत फुगड्या, झिम्मा, पायाच्या दणक्या ठेक्यावर परंपरेची गीते म्हणून जमीन खिळखिळी करून सोडणे हे त्या कोवळ्या सुवासिनींचे व्रत. सालोसाल ते भोगले तरी तृप्ति झालीशी वाटतच नाही.

श्रावणात एकही दिवस असा जात नाही की, ज्या दिवशी काही विशेष असत नाही. बुधबृहस्पती, जिवतीचा शुक्रवार, संपत शनिवार आणि आदित्य-राणूबाईचा रविवार सारेच महत्वाचे. पण नारळी पौर्णिमा श्रावणीसाठी बसलेले ब्राम्हण आणि भाऊबहिणींच्या प्रेमाला उगवलेले केशरी रेशमी फूल स्नेहाच्या दोरांनी बांधून भावाच्या मनगटावर झुलू लागते. वर्षभर बहिणीची ही भेट, राखी, भावाला मोहरून टाकते. समिंदराचे कायमचे सोबती असलेल्या कोळ्यांचा तर हा महोत्सवच. दोन महिने विश्रांती घेत असलेली होडी, समिंदराला नारळ देऊनच आत लोटली जायची.

रात्र अपरात्र, पाऊस आणि गडद काळोख यांचे दाट साम्राज्य पसरलेले, विजा आणि गडगडाट मधेच भीती दाखवताहेत. पण त्या सर्वांना न जुमानता देवळादेवळांतून मुले माणसे, आयाबाया, कृष्णलीला ऐकण्यासाठी जमल्या आहेत. हरदासबुवा मधे उभे आहेत. दरवर्षीचे आख्यान त्याच जोमाने, त्याच उत्साहाने चालू आहे. "आकाशवाणी होय सांगे सकळासी । तळमळ मानसि करू नका । देवकीच्या गर्भा येईल भगवान । रक्षील ब्राम्हण गाई भक्त" इथपासून सुरू झालेली कथा "दशरथे मारिला तोची होता मास" असे चातुर्याने महिन्याचे नाव सांगून वर्षाऋतु, कृष्णपक्ष, वसूंच्या संख्येइतकी तिथी, वार बुधवार, प्रहर रात्र, रोहिणी नक्षत्र असा स्थळकाळाचा नीट तपशील देऊन नामयाचा स्वामी प्रगटल्याचे जाहीर करायचे.

श्रोत्यांच्या लहानथोर हातातून फुले, गुलाल उधळली जायची. गुजराती नागरांचा मेळा मंदिरा मंदिराला भेट देत टिपऱ्यांच्या तालावर रंगून जायचा.

**प्रगट भयो भगावन व्रज माँ**

सईबाई म्हणायची,

कृष्ण गोकुळी जलमला  सजला हाती घोडा
यशोदा त्याची माता  वाटी दुरड्यांनी सुंठवडा

पाळणा हालायचा. गायला जायचा. मंदिराच्या छोट्या जगात गोकुळा-सारखी धांदल उडून जायची.

गौळण सांगे गौळणीला यशोदेशी पुत्र झाला
येक धावे येकीपुढे वाटिताती सुंठवडे

त्यांची आणि आमचीही तोंडे सुंठवड्यांनी आणि धणेगुळांच्या पंजरीने तिखट गोड होऊन जायची. आम्ही घरी परतायचे पण दुसऱ्या दिवशीच्या काल्याकडे मन लागून रहायचे. अन् ते बुवा !

चला बाई पांडुरंग पाहू वाळवंटी
मांडियेला काला भवती गोपाळांची दाटी

असं नुसतं म्हणाले की, आमच्या तोंडी खळखळून पाणी सुटायचे. तो दही-काला चटकदार व्हायचा. अगदी दरवर्षी !

पिठोरीच्या कहाणीतली सातवेळा अपत्यसुख नसलेली अभागी आई वाचली की, देवकीचीच आठवण होते. देवकीनेही कंसाच्या कारागृहात चौसष्ट योगिनींच्या पूजेचा वसा घेतला होता की, काय कुणास ठाऊक ? कारण तिलाही शेवटी गेलेली सगळी अपत्ये परत मिळाली ! जिवतीच्या कहाणी सारखीच ही पिठोरीचीही कहाणी !

पिठोरीचा दिवस मुलांना आवडायचा तो पोळा म्हणून. मातीचे बैल आणायचे. त्यांना बाशिंगे करायची, गोंडे लावायचे. त्यांच्या गळ्यात मणी घालायचे. पाटावर मांडून ते पुजायचे. पुरणावरणाचे निवद शेतावरच्या बळीराजांना जायचे. मग संध्याकाळी ते सारे नंदी सजून बाहेर पडायचे. पायन्यांच्या झुली, रेशमाचे गोंडे, चांदीच्या शेल्या आणि चौपायात तोडे, ताफा कण्हेरीच्या माळांचे पदर कानांनी हालवीत आणि आरशाभिंगांचे

बाशिंग मिरवीत काजळल्या डोळयांचे हे सारे बलीवर्द गाव मारूतीकडे ढोल लेझमीच्या ताशावाजंत्र्याच्या आणि उखळीबारांच्या दणदणाटात जायचे.

भादवा आला की, कहाण्यांची, माजघरातली कुजबूज पुढे चालू व्हायची. सर्व दुकाने व बाजार गणपतीच्या मूर्तींनी भरून जायचे. घरात मखर करण्यात मुले गुंतायची. पण कहाणीचं माजघर इष्टवर प्राप्तीसाठी, चिरकाल सौभाग्या-साठी, हरतालिकेचे व्रत करायचे. हरितालिकेची उत्तरपूजा झाली की, गणपतीची प्राणप्रतिष्ठा.

**मस्तकीं मुकुट कर्ण कुंडले, विशाल भाली गंडस्थळे**
**केशरी गंध चर्चुनी भाळी, प्रसन्न झाला मोरेश्वर, घरासी आला**

गणपतीबाप्पा घरच्या मखरात पार्थिव पूजेचा थाट स्वीकारायला येऊन बसतो. पंचोपचार पूजा आणि पंचरवाद्य. एकवीस दुर्वा आणि एकवीस मोदक.

लोकवाङ्मयाच्या आणि शाहीरांच्या नित्य नव्या प्रतिभांची दरसाल दर-शेकडा उधळण होते. गणपतीबाप्पा भोवती रात्री रात्री सजतात, गाजतात.

त्याचे सगळे पूजा नैवेद्याचे आणि दुवक्त आरत्यांचे निगुतीने करत अस-तानासुद्धा घरधनिणीचे सारे लक्ष असते महालक्ष्म्यांकडे नाहीतर गौरींकडे. घाटावरच्या गृहिणींकडे भादव्याच्या सप्तमीला महालक्ष्म्या येतात तर कोकण-कन्येच्या रूपाने घरी गौरी माहेराला येतात. त्यांना वाजत गाजत आणवून त्यांच्या सासुरवासाचा शीण घालवण्यासाठी आणि त्यांच्या आगत स्वागतात कुठ्ठे म्हणून कुठ्ठे उणे पडू नये यासाठी प्रत्येक घरी कोण धांदल उडालेली असते. त्यांचेही सत्व असे की, त्या घरात आल्या की, त्यांच्या पूजेत, नैवेद्यात त्या काही कमी पडू देत नाहीत. मग घर किती का चंद्रमौळी असेना आणि त्या घरची गृहिणी कितीका लंकेची पार्वती असेना !

" आटपाट नगरात सगळे गौरी घेऊन आले. मुलांनी हट्ट धरला आपल्या-कडे आणा. घरात अठराविश्वे दारिद्रच. काही मिळत नाही. जुळत नाही,

म्हणून जीव द्यायला निघालेल्या वत्सल बापाला एक वृद्धा भेटली. त्याच्या-बरोबर ती घरी आली. आजी म्हणून तिचं स्वागत झालं. मग घरातलं रिकामं मडकं कण्यांनी भरून गेलं. भिक्षेत सपाटून गूळ मिळाला. ओक्या-बोक्या खुंटचाशी गोधन आलं. आणि आजीच्या आग्रहावरून साऱ्यांना खिरीचं भोजन मिळालं. आजीने तिसऱ्या दिवशी त्या कुटुंबाचा निरोप घेतला. सांगि-तलं मी ती ज्येष्ठागौर. गरिबीतही दरसाल माझं असं आदरातिथ्य करावं. याला कुळाचार कुळधर्म म्हणतात ह्याने संतत संपत अक्षय वाढते."

हा वसा घेऊन घरोघर गौरी येतात. घरात उत्साहाची एकच लाट उसळून जाते. महालक्ष्मीचा थाट अधिक प्रशस्त असतो. ज्येष्ठा, कनिष्ठा किंवा सोवळी, ओवळी अशा सगुणस्वरूपात दोघीजणी अनुराधा नक्षत्रावर उभ्या रहातात. ांधाच्या बाहुल्या, रांगोळीची पाऊले, पळी-ताम्हणांचे आवाज, ती औक्षणे नग ते साजरे मुखवटे बसले की, शालू शेले नेसलेल्या महालक्ष्म्यांचे ध्यान गोठे सुंदर दिसते. तीन दिवस घर गजबजून जाते. अष्टमीस महापूजा. नवार्थाने षोडशोपचारे. सर्व गोष्टींचे सोळा प्रकार. फूलपत्रीपासून पक्वान्ना-र्यंत ! आरतीपासून शाक चटण्यापर्यंत !

दहाव्या दिवशी येते अनंत चतुर्दशी. अनंताचे व्रत. सत्यनारायणाच्या ूजेसारखे. अनंत नि अनंतीची पूजा करायाची चौदा प्रकारांनी. गौरीबरोबर गेलेले गणपतीबाप्पा अनंताबरोवर त्यांच्या घरी जातात. अन् मग येते ामन द्वादशी. मुंजा मुलाचे पूजन, त्यांना करदोरा, लंगोटी, पानसुपारी, क्षिणा, वाटी भरून गोड धोड नैवेद्य.

आश्विनाच्या पहिल्याच दिवशी घटस्थापना होऊन देवी घटी बसते. तच्यापुढे ओल्याशा मातीत गहु, जव, ही तपश्चर्येत गढून जातात. नंतर पंधरा दवस सुस्त झालेला उत्सव आणि उत्साह पुढे चालू होतो. रोज एक माळ ाढते. रोज काळचा मातीतून कौमाची लवलव वाढते. आरती आणि मंत्र-ागराचा गजर होतो.

कोणाचा अष्टमीचा कुळधर्म, कुणाचा नवमीचा तर कुणाचा दसऱ्याचा. पुरणावरणाचे स्वैपाक, ब्राम्हण सवाष्णींचे पाट, ऊद, गुगुळांचे सुवास घरच्या देवीला आणि गावदेवीला कडकण्यांचा फुलवरा.

नवमीला नववी माळ, दशमीला दसरा. आनंदाची लयलट. उत्साह जसा झेंडूच्या फुलांनी आणि रुप्याच्या साजांनी नटलेला, शिलंगणाला निघालेल्या उमद्या घोड्यासारखा फुरफुरणारा. दसरा हा कुळधर्म कुळाचारांचा व सोनेरी उन्हात, झेंडूच्या बनात साजरा होणारा महोत्सव. शस्त्रांच्या मिषाने शमीची पूजा होते. सोन्याच्या द्विदळी हिरव्या पानांची देवघेव आणि हे सगळे रणांगण पार करून दारी आलेल्या "मोरू"साठी पंचारती घेतलेली सुलक्षणी काशी दरवाजात ओवाळायला उभी !

ज्ञानेश्वरांनी वर्णन केल्याप्रमाणे "आजि सोनियाचा दिनु। वरुषे अमृताचा धनु" तशी अमृतवर्षा शरदपौर्णिमा, कोजागिरी.

**शरदाच्या पुनवेला आनंदाचा होतो खवा**
**किसनाचा वाजे पावा उभा गोपिकांचा थवा**

अशी चांदणी रात्र. चांदण्याचे सारे वैभव घेऊन आलेली कोजागिरी विचारीत येते, "कोण जागं आहे ?" आटवले दूध, खोबऱ्याचा तुकडा आणि माण्याबजावण्यांचे सूर पिऊन जाते.

मग दिवसरात्र दिवाळीची तयारी. दिवाळी मुंगीच्या पावलांनी येते आणि वसुबारस उजाडली की, हत्तीच्या पायाने चालते !

वसुबारसेपर्यंत आकाशदिवे तयार होतात. घरोघरी खच्चून फटाके येतात. सवत्स धेनू दारोदार पुजल्या जातात. दिवाळीचे पहिले गोडधोड गाईवासरांच्या मुखात जाते.

धनत्रयोदशीचा दिवस. काही ठिकाणचा कुळाचार. ब्राह्मण सुवासिनी पंक्तीला. पुरणाचा सैपाक, धनाची पूजा. चतुर्दशीच्या पहाटेपासून मात्र दिवाळी

सगळीकडे संचारते. अर्धवट झोपेतून उठवायला कुणालाही कष्ट पडायचे नाहीत. कुणाची काही तक्रार नाही. सुगंधी उटणे आणि भरपूर गरमागरम पाणी. आई ताईच्या नि मावशी माम्यांच्या हातचे तेलाचे माखणे आणि अंघोळीतली औक्षणे. अभ्यंगस्नानंतर फक्त दिवाळीच देऊ शकेल असा तो फराळ.

दुसऱ्या दिवशी अंधारल्या आभाळात लुकलुकत्या पणत्यांचा नि झगमग-णाऱ्या दीपमाळांचा प्रकाश दाखवीत लक्ष्मीपूजनाचा सोहळा दणक्यात पार पडतो. शेट सावकारांच्या पेढ्यांवर स्वच्छ शुभ्र बैठका, चांदीच्या तबकात तेवणारी चांदीची निरांजने तर घरात देवघराजवळ सोवळ्यात लक्ष्मीची पूजा सारख्याच भक्तिभावाने होते. बाहेरच्या कडकडाटात, नळेचंद्रज्योतीच्या रंगीबेरंगी प्रकाशात आणि सहस्त्र ज्योतींच्या साक्षीने, नाना सुगंधाच्या वासांनी विविध पक्वांनाच्या रसांनी आणि कृतज्ञताभरल्या प्रत्येक प्रार्थनास्वरातून गृहालक्ष्मी पूजिली जाते.

बळीचा पाडवा आणि भाऊबीज ह्याही दिवाळीच्या महत्त्वाच्या पणत्या. त्यातही बीजेचा अधिक स्नेहाळ उजेडाचा दिवा. सासुरवाशिणीला भाऊ भेटावा. त्याची सतत वाट बघत बसणाऱ्या दूर देशी पडलेल्या बहिणींनी नेत्रांच्या ज्योतींनी स्वागत करावे. न्हाऊ माखू घालावे. कलाकुसरीचा शाक पाक करावा. जीव ओवाळून औक्षण करावे. रक्ताची उर्मी डोळ्यांच्या पाण्यात साठवून डबडबत्या डोळ्यांनी त्याची पाठवणी करावी. अशी ही भाऊ-बीज कौतुकाच्या आसवांची दिवाळीच.

दिवाळी संपली की, राहिली फक्त महाएकादशी. प्रबोधिनी परत ती यात्रा. विठूरायाला घेरून रहाणाऱ्या, टाळमृदंगाच्या महोत्सवात दंग अस-लेल्या त्या चातुर्मासाला कार्तिकीनंतर निरोप द्यायचा... त्या दिंड्या पताका पंढरीहून परतल्या की, बरोबर आणलेल्या कळसेला गावचा त्रिपुरीपुनवेचा दीपोत्सव दाखवून पुढल्या वर्षी लवकर येईन असे आश्वासन देत कुणालाही न सांगता मग चातुर्मास हळूच निघून जातो.

# कहाण्यांचे जग

प्रा. आशा मुंडले

चातुर्मास म्हणजे आषाढ शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध एकादशीपर्यंतचा काळ. यावेळी मान्सूनचा पाऊस सुरू असतो. शेतात उभी पिकं डोलत असतात. पण हवा अशी धोकेबाज असते की, जरा खाण्यापिण्यात अस्वच्छता, गैर-व्यवस्था झाली अगर जास्त खाणं झालं तर पोटानं दगा दिलाच म्हणून समजावं ! दसऱ्यापर्यंत हे असंच चालतं. पुढे सुगी येते. आणि शेतकऱ्याच्या घरात वर्षातून निदान एकदा तरी दूधदुभतं, अन्नधान्य यांची चंगळ राहते.

शहरामध्ये जरी असा वेगळा दिनक्रम नसला तरी शहरात येऊन राहणारे बरेचसे लोक खेड्यापाड्यातूनच येतात. त्यामुळे त्यांनाही चातुर्मास वर्षाच्या बारा महिन्यातून वेगळा काढलेला विशेष असा भाग वाटतोच.

हे चार महिने म्हणजे धार्मिक व्रतांची नुसती लयलूट. त्यातल्या त्यात श्रावणामध्ये आणखी विशेष. कोणत्यातरी वाराला धरून नेमनियम, व्रत-वैकल्ये, उपासतापास किंवा नागपंचमी, गोकुळाष्टमीसारखे सण.

भारतीय लोक जुन्या चालीरीती बदलण्याच्या बाबतीत खूपच संथ आहेत. त्यामुळे एरवी रोजची राहणी कालमानाने बदलली असली तरी धार्मिक परं-परा मात्र कटाक्षाने जुन्या पद्धतीने पाळल्या जातात.

उदाहरणच द्यायचे झाले तर सायकलवरून भटजी येतात. कॅसेटवर अस-लेली पूजा लावून देतात. पूजा संपल्यावर टेरिकॉटचा शर्ट घालतात. पण नैवद्य मात्र सोवळ्यातलाच लागतो ! रोज घरी पोळ्या भाकरी करायला

हल्ली प्रत्येकजण जी मिळेल ती बाई पत्करतो ! पण त्या दिवशी नैवेद्याला मात्र त्या बाईचा स्वयंपाक चालत नाही. आणि यामध्ये आपण त्यांचा 'माणूस'' म्हणून अपमान करतो हे कुणाच्या गावीही नसते.

सांगायचे असे की, चातुर्मासात अजूनही पुष्कळशा बायका नेमाने आणि भक्तिभावाने कहाण्या वाचतात व ऐकतात. पण शब्द वाचत असताना यातला अर्थ मात्र त्यांच्या मनामध्ये भिनत नाही. या कहाण्या मराठीत लिहिल्या असल्या तरी पोपटाने न कळणारी भाषा पाठ म्हणावी तसा प्रकार होतो. 'खुलभर दुधाची' कहाणी वाचता वाचता मुलाबाळांना उपाशी ठेवून किंवा न परवडेल असे कर्ज काढून धर्माचे अवडंबर केले जाते !

वास्तविक कहाण्यांचे हे जग डोळसपणे पाहिले तर बरेच काही शिकवील आपल्याला. लोकवाङ्मयाची गंमत हीच की, ते अमुक एका माणसाने लिहिले असेल हे आपल्याला माहीत नसते. परंतु कहाण्यांमध्ये सर्वसामान्य माणसाच्या भावना, विचार, रहाणी ही प्रतिबिंबित झालेली असते. इतिहासाचे अभ्यासक, संशोधक अशा वाङ्मयाचा सखोल अभ्यास करून त्यावेळच्या लोकजीवनावर प्रकाश पाडतात. त्यावरून त्यांना भारतातल्या लोकांच्या निरनिराळ्या काळातल्या रहाणीची कल्पना येते. पूर्वीचे लोक त्यांच्यापुढे येणाऱ्या अडचणी कशा सोडवत हे समजते. असे लक्षपूर्वक वाचले तर लोककथा, लोकगीते हा अनुभवांचा अमोल खजिना आपल्याला या काळात उपयोगी पडेल असे खूप काही शिकवून जातो.

यावेळी आपण फक्त कहाण्यांचा विचार करूया. पाहू तरी त्यात आपल्याला कायकाय नवीन सापडते ते !

कुठे राहतो आमचा देव ? गावा बाहेर तळ्याकाठी. भोवताली झाडी. पाण्यात कमळं. आजूबाजूला कसे शांत. " निरमळ मळे, मुदकाचे तळे, बेलावृक्ष सुवर्णांची कमळे, विनायकाची देवळे रावळे." (गणपतीची कहाणी)

गावाबाहेर तळ्याकाठी देवळात जावे हे इतरही अनेक कहाण्यांतून सापडेल. आजकाल प्रदूषण हा शब्द प्रत्येकाच्या कानावर पडतो. शुद्ध मोकळ्या

हवेत निसर्गाच्या सहवासात वावरण्याची संधी प्रत्येकाला हवी हे शिकवले जाते. यूरोप-अमेरिकेतले तज्ञ सांगतात की, माणसांची वस्ती फार दाट नसावी. एकजुटीने बांधलेली घरे संपली की, दुसरे गाव सुरू होण्यापूर्वी "वनराजींचा हिरवा पट्टा" हवाच. कारखाने, गिरण्या वगैरेंनी दूषित हवा झाली की, माणसांच्या शारीरिक आणि मानसिक आरोग्यावर विपरीत परिणाम होतो. इतकेच काय पण घरेसुद्धा एकमजली, फार तर दुमजली हवीत. प्रत्येक घराभोवती थोडी मोकळी जागा हवी. उंच उंच चाळीत खुराड्यातल्या कबूतरांसारखी एकावर एक रचून कुटुंबे राहिली की, गुन्हेगारीवृत्तीत आणि गुंडगिरीतसुद्धा वाढ होते. दुसऱ्या महायुद्धानंतर या बाबतीत खूपच नवे संशोधन झालेले आहे. युरोप-अमेरिकेत आता प्रयत्नपूर्वक पुन्हा छोटी छोटी स्वतंत्र घरे, शेजारी पाजारी मैत्रीचे संबंध, गावाभोवती आणि शहराच्या आसपास "हिरवा पट्टा" आणि भरपूर पायी चालण्याचा, धावण्याचा, सराव असे जीवन घडवले जात आहे.

आमच्या कहाण्यातली गावे आणि शहरे त्या काळातही हा विचार जगताना दिसतात. कोणाच्याही घराचे वर्णन पहा. पुढचे दार, मागचे अंगण, त्यात भाजीपाला लावलेला. श्रीमंताच्या घरात शिवाय मध्ये चौक, माडी, पण घराभोवती झाडे, फुले, सगळ्यांच्याच.

हद्दपार केलेल्या राणीने झोपडी बांधली तरी ती पण अशीच अंगणासहित ! टाकून दिलेल्या पाटमाधवराणीने राजाच्या स्वागताची तयारी केली. त्यात झाडांची थंडगार छाया, पाय धुवायला पाणी, चंदनाची उटी, कापुरी विडा, वाळ्याचा पंखा आणि राणी रहात होती, ऋषींच्या आश्रयाने. आश्रमाची, अंगणाची झाडपूस, सारवण करीत. (महालक्ष्मीची कहाणी)

शहरे तर कशी ? तर आटपाट नगराची. म्हणजे काय ? मध्ये राजवाडा. त्याच्या भोवती प्रमाणशीर रुंद रस्ते. आठ पाकळ्यांचे शहर. एकेका पाकळीत (पाटात) एकाएका प्रकारची पेठ. कारागीर वेगळे, सरदार दरकार वेगळे वगैरे. शासकीय कचेरी (अर्थात राजाची) कुणालाही केव्हाही खुली.

आज जनताजनार्दनाची सेवा करणाऱ्यांची भेट घ्यायची तर काय त्रांगडे असते ते सर्वांना माहीत आहे. अर्थात कहाण्यातले जग म्हणजे स्वर्ग नव्हे. त्यातले सगळे जसेच्या तसे परत येणारही नाही आणि त्यातल्या प्रत्येक गोष्टीला चांगले म्हणावे हा आंधळेपणा होईल. उदाहरणार्थ तळ्याला पाणी लागावे म्हणून लहान मुलगा बळी दिला! राजाने चांगला दिवस पाहिला. मुलाला न्हाऊ माखू घातलं, जेऊ घातलं, दागदागिने अंगावर घातले आणि एका पलंगावर निजवून तो पलंग तळ्यात नेऊन ठेवला. जलदेवता प्रसन्न झाल्या. तळ्याला महापूर पाणी आलं. ( कहाणी शिळासप्तमीची ) हे ऐकून शहारे येतात. तसेच राजा सापडत नव्हता म्हणून हत्तिणीच्या सोंडेतल्या माळेच्या पद्धतीने कोणीही सोम्यागोम्याला राजा केला! हे वाचून हसू येते. नगराचा राजा मेला. दुसरा राजा गादीवर बसवल्याशिवाय प्रेत दहन करायचे नाही. म्हणून तेथील लोकांनी काय केले? हत्तीणीच्या सोंडेत माळ घातली आणि गावभर फिरवली. या बाईच्या नवऱ्याच्या गळ्यात माळ पडली. त्याला राज्याभिषेक केला. ( बुधबृहस्पतींची कहाणी ) राजे-राण्या आता कालबाह्य झाल्या. आपला देश स्वतंत्र आणि लोकशाही मानणारा झाला. प्रत्येकाला मतदानाचा हक्क आहे. आपण आपल्या मर्जीने आपले प्रतिनिधी निवडतो. आपल्या संमतीचा कानोसा घेत घेत ते कारभार पहातात. त्यांची कामगिरी पसंत पडली नाही तर पुढच्या निवडणुकीत त्यांची उचलबांगडी होते. प्रत्येक राज्यात निरक्षर लोक असूनसुद्धा अशा उलथापालथी होतात. शासन म्हणेल ती पूर्वदिशा असे आता कोणीच समजत नाही.

तरीपण या नाहीशा झालेल्या राजेराण्यांकडून शिकण्यासारख्या काही गोष्टी निश्चित आहेत. राजा कसा? तर म्हणतो "करारे हाकारा, पिटा रे ढंढोरा, नगरात कोणी उपाशी नाही ना? कोणावर काही अन्याय नाही ना?" हे पाहून सर्वांच्या नंतर जेवायला बसणारा. मंत्र्यांच्या मेजवान्यांची वर्णने वाचली आणि दुष्काळासाठी जमविलेले फंड कधी कधी हडप केल्याच्या गोष्टी ऐकल्या म्हणजे मग हे कनवाळू राजे निरंकुश सत्ता असूनही जास्त कर्तव्यदक्ष होते असे मानावे लागते! सगळेच राजे मात्र तसे नव्हते. खुलभर दुधाची

कहाणी तर मला फारच आवडते. मानवी स्वभावाचे मजेदार दर्शन त्यात आहे. स्वतःच्या बडेजावासाठी सगळ्यांचे दूध जमा करणारा राजा, त्याची फजिती वाचून बरे वाटते मनाला. म्हातारीच्या स्वतंत्र विचारांचे कौतुक वाटते.

भाऊ-बहिणींची गोष्टही मला आवडते. दरिद्री वहिणीला तो पानावरून हाकून लावतो. तिच्या मुलांना लेंडार म्हणतो. पण पुढे वैभव आल्यावर ती पक्वानांचे घास दागिन्यांवर ठेवते. आणि दागिने पाटावर ठेवून आपण बाजूला उभी राहते. ताईने भात कालवला, मोठासा घास केला, तो उचलून सरीवर ठेवला. भाजी उचलून ठुशीवर ठेवली, लाडू उचलून चिंचपेटीवर ठेवला. (शुक्रवारची कहाणी) भावाच्या डोळ्यात अंजन घातले. आजसुद्धा असा अनुभव आलेली भावंडे प्रत्येकालाच माहीत असतील.

एक गोष्ट मात्र त्यात फार छान आहे. गावातल्या तळ्यावर सगळे पाण्याला येतात. "पाणी वाढा वो माय" म्हणत कोणी कडेला बसलेले नाही. याला शिवू नका, त्याला शिवू नका असे कुठेही नाही.

उलट " काणा डोळा, मासाचा गोळा " ला जवळ बसवून कहाणी सांगितली आहे, दारी आलेल्या कुष्ठरोगी अतिथीला धाकटी सून आंघोळ, जेवण देते आहे. शनिदेव कुष्ठचाच्या रूपाने आले. बाई बाई, माझे सर्व अंग ठणकत आहे. माझ्या अंगाला तेल लाव. ऊन पाण्याने आंघोळ घाल. तिला दया आली. बरे म्हणाली. तिने तसे केले. आंघोळ घातली. भाकरी दिली. (संपत शनिवाराची कहाणी) अस्पृश्यता, अपंगांचा तिरस्कार हे आजच्या भारतातले मोठे कलंक आहेत. कहाण्यांच्या जगात तसे कुठे नाही याबद्दल माझ्या मनाला फार संतोष वाटतो. तसेच आज आपण तसे नाही याबद्दल खंतही वाटते फार.

अप्पलपोटेपणाबद्दल या कहाण्यातून नेहमीच निषेध आहे. व्रताचे उद्यापन कसे करावे? अठरा लाडू केले तर सहा आपल्याला, सहा देवाला, सहा ब्राम्हणाला वगैरे. आपण कष्टाने जरी कमावले तरी ते सगळे आपल्या एकटचासाठी वापरू नये. त्याचा काही भाग इतरांसाठी खर्च करावा याची जाणीव

त्येक कहाणीत आहे. त्यासंदर्भात कोणत्याही व्रताचे उद्यापन पहाता येईल.

अर्थात काळाप्रमाणे यात वेगळी दृष्टी हवीच. आता आपण जातीवरून
कुणाला मोठे, कुणाला लहान मानणार नाही असे आपल्या घटनेमध्ये मान्य
केलेय. तेव्हा ब्राह्मणाचा वाटा काढण्यापेक्षा कोणीही दीनदुबळा, गरजू,
निराधार पाहून त्याला मदत करणे केव्हाही श्रेष्ठ ठरेल.

पण लग्नकार्यातून "ओ" येईस्तो जेवून उष्ट्यामाष्ट्यासाठी भिकाऱ्यांची
रांज लावून देणारांना खरोखरच हे शिकण्यासासारखे आहे की, जे द्यायचे,
सेल ते सन्मानाने आपण होऊन आणि आपण खातो त्याचवेळी द्यावे.
सऱ्याला "लाचारी" भाग पाडून दिलेले ना त्याच्या अंगी लागते ना
पल्याला मोठेपणा देते.

काही काही बाबतीत मात्र हे कहाण्यांचे जग आजच्या आपल्या जगाइतकेच
र आणि नाठाळ आहे. ते म्हणजे त्यातली बायकांची स्थिती. आवडती
सली घे डोक्यावर. नावडती झाली ठेव गोठ्यात नाहीतर लाव हाकलून!
ल नसले तर कर तिचा छळवाद. सुनेची चोळी उंदराने पळवली तर घे तिच्या
ारित्र्यावर संशय! (दिव्यांची कहाणी) एखादीचे माहेर गरीब असले तर
चारीने ते लाजेने लपवावे. नावडतीला जेवायला उष्टे, नेसायला जाडे भरडे,
ायला गुरांचे बेंडे. (शिवामुठीची कहाणी) सून नावडती असली तर तिने
ष्टेमाष्टे, शिळे, अपुरे जेवावे आणि मरमर राबावे. पतीसह चालली. मनी
कराची प्रार्थना केली, मला अर्ध घटकेचं माहेर दे. तो वेळूचे बेट आले.
ठा एक वाडा आला,...... दासी बटकी राबताहेत, शिपाई पहारा देताहेत
र्या वाटेत परत फिरले. माहेर अदृश्य. (साधी कहाणी सोमवारची)

आज काय आणि तेव्हा काय घरातल्या प्रत्येक स्त्रीशी माणुसकीनेच वागले
हिजे ही जाणीव समाजाला नाहीच. एक माणूस म्हणून मला भारतीय परं-
च्या या भागाची फार शरम वाटते. दुबळेपणाने सोसतच राहणाऱ्या
यांची कधी कणव येते तर कधी त्यांच्या नेभळेपणाबद्दल संताप!

दोन हात, दोन पाय आणि एक डोके यांचा मजबूत वारसा जवळ असताना एकीने लाथा माराव्या आणि एकीने त्या निमूट खाव्या यात कमीपणा आहे.

पण जाऊ दे ते. वाचता वाचता माझे मन फार गंभीर विषयाकडे वळले.

आणखीसुद्धा फालतू गोष्टी कहाण्यांमध्ये आहेतच. आता शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार झाल्यामुळे टाकाऊ वाटणाऱ्या अशा. उदा. विटाळाची शिवाशिव आपल्याला कळते की, मासिकधर्म ही नैसर्गिक गोष्ट त्यात अपवित्र काय असणार ?

पण असे मन लावून वाचले तर प्रत्येक कहाणीत काही तरी घेण्यासारखे, काही टाकण्यासारखे सापडते.

अक्षराला अक्षर लावून केवळ पारायणे करण्यापेक्षा चौकस बुद्धी जागी ठेवून वाचले, त्यावर आयाबायांनी मिळून विचार केला तर मग हे कहाण्यांचे जग आधुनिक काळातही काही शिकवून जाईल हे निश्चित.

तुमची आमची बुद्धि या डोळसपणे जीवनाकडे पाहू दे. म्हणजे चातुर्मासात काहीतरी वाचण्याचा नेम सार्थकी लागला असे होईल. नाहीतर सगळे उपड्या घड्यावर पाणी ! चातुर्मास येईल, बायका कहाण्या वाचतील, हळद-कुंकू वाहतील. विसरून जातील. अशातलाच प्रकार !

# लीळाचरित्रातील उत्सव, सण व व्रते

सौ. शरदिनी मोहिते

मानवी संस्कृतीचा अभ्यास करताना मानवाची रहाणीकरणी, तिच्यातून व्यक्त होणारी मानवाची ऐहिक प्रगती आणि विचारसरणीची धाटणी यांचा मुख्यतः विचार केला जातो. प्रागैतीहासिक, ऐतिहासिक मानवी संस्कृती आपल्या अवशेषांद्वारा, वाङ्मयाद्वारा, पुष्कळ काही सांगून जाते. विचारांची झेप, मनोभूमिकेची बैठक आणि एकूणच ध्येयधोरणे कोणत्या समाजाची, कोणत्या काळी कोणत्या स्वरूपात होती हे या खुणांवरून पहाणे मोठे उद्‌बोधक तसेच मनोरंजकही ठरते.

मानव कोणत्या काळी कोणते उत्सव साजरे करीत होता, सण साजरे करीत होता, हेही आपल्याला संस्कृतीचे एक महत्त्वाचे अंग म्हणून विचारात घ्यावे लागते. कोणती संस्कृती नागाची पूजा करेल, तर कोणती बैलाला अनन्य साधारण महत्त्व देईल. हा ज्या त्या परिस्थितीचा, अवस्थेचा, रहाणीमानाचा आणि विचारसरणीचा दृश्य भाग ठरतो.

आनंदोत्सव, सण, पर्वकाळ या बाबतीतले तेराव्या शतकातील मराठी माणसाचे वर्तन, तो पाळीत असलेले नेमधर्म, रीतिरिवाज, तो करींत असलेले आचरण, अंगीकारीत असलेली व्रते यांचा विचार करीत असताना व वाङ्मयाद्वारे या गोष्टींचा मागोवा घेत असताना आपल्याला तत्कालीन काव्यरचना, गद्यरचना खूपच मदत करतात. ज्ञानेश्वरीच्याही अगोदर चार वर्षे लिहिला गेलेला, मराठीतील अनेक विद्वानांच्या मते आद्य ठरलेला, ग्रंथ म्हणजे लीळाचरित्र. तेराव्या शतकात, शके १२०८ पूर्वी, महानुभाव संप्रदायाचे संस्थापक

श्री चक्रधरस्वामी यांनी 'उत्तरापंथे गमन केल्यावर' त्यांच्या आठवणी त्यांच्या म्हाइंभट नावाच्या एका प्रमुख शिष्याने संकलित केल्या. गद्य स्वरूपातल्या या ग्रंथाचे महत्त्व मराठीच्या अभ्यासकांना अनन्य साधारण वाटते. कारण तत्कालीन मराठी बोली आपल्याला या ग्रंथातून पुष्कळशी समजते. साध्या, सरळ, रसाळ अशा मराठीतून या ग्रंथात अनेक आठवणी सांगितल्या गेल्या आहेत.

या ग्रंथाच्या सुरुवातीच्याच भागात एक मोठा नाटयपूर्ण चमत्कार ठरेल असा प्रसंग वर्णन करण्यात आला आहे. तो एक आनंदोत्सव आहे. उत्कट आनंदाचा आविष्कार आहे. गुजरातेतील भरवस गावी एक राजा राज्य करीत होता. या राजाचा प्रधान विशाळदेव. त्याची पत्नी माल्हाइसा. या दोघांना हरिपाळदेव नावाचा एक अत्यंत सुंदर व सर्वगुण संपन्न मुलगा झाला. हा हरिपाळदेव म्हणजेच चक्रधरांचा पूर्वावतार. तो आणि त्याची रूपगुणसंपन्न पत्नी कमळाइसा अतिशय सुखात नांदत असताना एका एकी आजारी पडून हरिपाळदेव मृत्यू पावला. त्याचे शव अंत्यविधीसाठी स्मशानात नेण्यात आले...

त्याचवेळी द्वारावतीला द्वारावतीच्या चांगदेव राऊळ नावाच्या प्रसिद्ध योग्याने योगसामर्थ्याने आपल्या शरीराचा त्याग केलेला होता. तो करावा लागण्याचे कारण चमत्कारिक आहे. काउरळीची कामाख्या नावाची एक हटयोगिनी चांगदेव राउळांच्याकडे 'रतीचिया चाडा' आली. सात दिवस अहोरात्र ती अपेक्षेने उभी होती. चांगदेव राउळांची ब्रह्मचर्याची प्रवृत्ती. त्यांनी रती देण्याचे नाकारले. बळजबरीने गुहेत प्रवेश करणाऱ्या कामाख्येला बाहेरच्या बाहेर थोपवले. परंतु तिचा आग्रह सरेना तेव्हा त्यांनी पुरत्याग केला व आपल्याला प्रवेश करण्यायोग्य असे दुसरे शरीर शोधले. जाळण्यासाठी स्मशानात आणलेले हरिपाळदेवाचे शरीर त्यांना अत्यंत योग्य वाटले व त्याच्यात त्यांनी प्रवेश केला. शवात ईश्वरावतार संचारला. ते उठून बसले. चक्राधरावतार साकारला. लोकांना, हरिपाळदेवाच्या मातापित्यांना, पत्नीला,

र्वांना वाटले की हरिपाळदेव जिवंत झाला. (वस्तुत: हरिपाळदेवाचा ाकार चांगदेव राऊळ रूपी ईश्वरावताराने धारण केलेला होता. तो रिपाळदेव नव्हता ! ) सर्वत्र आनंदी आनंद झाला. आश्चर्यचकित झालेल्या र्वांनी आनंदाचा जल्लोष केला. कारण हरिपाळदेव सर्वांचा आवडता असाच ोता. या आनंदोत्सवाचे वर्णन लीळाचरित्रात असे करण्यात आलेले आहे–

'कुमरू जीयाला जीयाला : ' म्हणौनी वाद्येंत्रें लागली : सर्वज्ञे म्हणीतलें ': प्रधानु सीह्राणा चतुरू : कुसळु : तेणें दृष्टीं देखतखेओ जाणीतलें : जे हा तो व्हे : सीधांसाधकांचा ठाइं प्रकायाप्रवेसु असे: तेहीं भोगाकारणे हे स्वीका- रलें : ' तैसाचि 'कुमरू जीयाला जीयाला' ऐसे म्हणौनि मंगळ वाद्ये वाजीन्नली : वघेया नगरांतु गुढीया उभिलीया : पांच पालवीया आणिलीया : पांचपालवौं चामृतें न्हवण केलें : वरवीं धुवटें वस्त्रें वेढिलीं : मग दांडीयेवरि आरोहण ोउनि नगरामधुनि : कमळा नावं राणी : तेयांचेया आवारासि बीजे केलें : मंगळ रें वाजों लागलीं : तेथही पांचपालवीं न्हवण जालें : पाटु पासवडिला : मळाआउसासीं सेसु भरिली : ...

मेहेकर येथे श्रीचक्रधरस्वामींचा मुक्काम असताना वाणेश्वर मंदिरातील ाध्या बोणेबाई मातीचे गोकुळ उभे करून गोकुळ अष्टमी साजरी करणार ती. त्यासाठी तिने मातीही आणली होती. ते पाहून स्वामींनी स्वत: लकृष्णाची मूर्त धारण केली; बोणेबाईला देवकी मानून स्वामींनी गोकुळ ष्टमी साजरी करावयास लाविली. मेहेकर येथील ती गोकुळ अष्टमी अशी ाजरी झाली–

**कुळ अष्टमी पुजा स्वीकारू**

एकु दीं गोसावीं उदीयांचि नीद्रास्थानुनि बोणेबाईयांचीए गुंफेसि बीजें लें : तवं तीहीं आधिली दीसीं माती आणिली होती : सर्वज्ञें म्हणीतलें : बाइ : आजि तुमतें लवडसवड मोटीसी ? " "बा : मौन्यदेव हो : आजि कुळाष्टमी : " सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : तरि हे माती काइसी ? " वा : मौन्यदेव हो : तुम्ही नेणा ? आजि गोकुळाष्टमि : आजि श्रीकृष्णु

जन्मले : याचा श्रीकृष्णु करूनि : नंदु : एस्वदा : वसुदेओ : देवकी करूनि : गोकुळ करूनि बा : फुलवरा कीजे : व्रत कीजे : " सर्वज्ञें म्हणीतलें : " बाइ : श्रीकृष्णु तो काइ मातीएचा? नंदु : एस्वदा : वसुदेओ : देवकी : तीएं काइ मातीएचीं? गोकुळ काइ मातीएचें? तीएं साचोकारीं माणुसें होतीं कीं : श्रीकृष्णु काइ मातीएचा होता? हें होइल श्रीकृष्णु : तुम्ही होआ देवकी देवी ' एं व्रतस्तें होउनि एथ पुजा करिती : हे माती परती सांडा अवघी : " " हो कां बा मौन्यदेव हो : " माती परती सांडिली : मग गोसावियांसि आरोगण दीधली : मग गोसावीं वीहरणासि बीजें केलें : ॥

तवं तेहीं सोजी काढिली : वळिवटें वळिलीं : कडकणें पहीलें केलें : पुरीया : घारीया : सोवाळी : सेंगळीं : बुडुडीं : ऐसा फुलउरा केला : तीए दीसीं गोसावीं सकाळींचि वीहरणौनि बीजें केलें : मग गोसावी आपुलेनि श्रीकरें फुलौरा बांधला: तीयें ओउंओउं देति : गोसावी बांधति : अवघी फळोवळि बांधिली : अवघी आइति केली : मग वीळिचां गोसावीयांसि मर्दना : मादणें : आरोगण जाली : मग जेव्हडेया वेळा श्रीकृष्ण जन्मले तीए वेळे गोसावीं श्रीमुर्ति संकोचिली : गोसावीं कामाइसांचीए उसंगीए रीगाले : श्रीमुर्तिवरि बाळकत्वाची प्रव्हा जाली : नागाइसीं तीहीं व्रतस्तें होउनि बरवी पुजा केली : कामाइसीं ऐसां वरता पालौ उपरतौनि दोहीं पदरीं माथा बांधला : खीरि रांधली : वाण दीधलें : गोसावीयांसि मर्दना : मादणें : पुजा : आरोगण येथ जाली : गुळुळा जाला : वीडा ओळगविला : तीएं उपवासु करितें होती : गोसावीं तेयातें म्हणीतलें : " बाई : तुम्हीं जेवा : " " जी जी : आजि गोकुळ अष्टमी : मीं व्रत करीन : " सर्वज्ञे म्हणीतलें : " बाइ : देवकीए देवीसि श्रीकृष्ण जन्मले तें काइ तीहीं उपवासु केला? पेज तऱ्हीं प्यालीच कीं : " मग तीए गोसावीयांचीए पांतीसि जेविली : सवळेसीचि गोसावीं वीहरणा बीजें करू आदरिलें : कामाइसीं म्हणीतलें : " बा मौन्यदेव हो : लवकरि या : मग हे तुमचीए पांती पारणें करील : " नागाइसें व्रतस्तें : ते हीं गोसावीयांसि पडदणी दीधली : मर्दना दीधली : मादणें जालें : पुजा अवसरु जाला : मग गोसावीयां आरोगण जाली : मग तेयांसि पांती पारणें जालें : ॥

कडकणी वगैरे पदार्थ तयार करून ते माळेत ओवून फुलौरा बांधण्याची पद्धत (सध्याच्या काळी नवरात्रात अनेक ठिकाणी करतात त्याप्रमाणे) गोकुळ अष्टमी साजरी करतानाही त्या काळी आचरणात होती. अष्टमी-निमित्त हल्लीही कडकणी करून फुलौरा बांधण्याची पद्धत महाराष्ट्रात काही ठिकाणी प्रचलित आहे.

श्रीचक्रधर स्वामींचा हिवरळीला मुक्काम असताना महदाइसेने इच्छा व्यक्त केली आणि तीनुसार स्वामींसह सर्व शिष्यांनी दिवाळीसण साजरा केला त्याचेही वर्णन आकर्षक आहे. ते वर्णन असे ––

**माहादाइसीं महात्मेयां दीवाळी सणु करवणें**

माहादाइसीं वीनवीलें : "जी जी: मी गोसावीयांचां ठाइं दीवाळी सणु करीन :" सर्वज्ञें म्हणीतलें: "माहात्मेयांसहीतु करा : तुमतें असे तें तुम्हीं करा : न पुरे तें वाइसांतें मागा : " "हो कां जी :" मग सांजवळे माहादाइसीं पाणी-यांची सामग्री केली : चीकसा (= सुगंधी उटणे) : तेल:उमाइसांचां धरूनि आणिला : मग प्रातकाळीं गोसावीयांसि उपहडू जाला : गोसावीयांसि आसन रचिले : भगतिजनां पाट पासवडिले : जोन्हळेयांचा चौकु भरिला : गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : भगतिजन गोसावीयांसेजे बैसले : माहादाइसीं गोसावी-यांसि ओवाळणी केली : भगतिजन ओवाळिले : गोसावीयांसि वीडा ओळगविला : भगतिजनांसि तांबोळें दीधलीं : सर्वज्ञें म्हणीतलें : "तांबोळ घेया गा : " मग गोसावीं माहादाइसांसि तांबोळ दीधलें : गोसावीयांसि मर्दना दीधली : उरलेल्या चीकसेया आंतु आणीकु चीकसा घातला : तो भगतिजनांसि दीधला : भगतिजनीं एकमेकांचीं आंगें उटिली : गोसावीयांचां श्रीमुगुटीं तेल ओळगविलें : उरलें तेल: तया आंतु आणीक तेल घातलें : ऐसें भगति जनांसि दीधलें : एकमेकांचे माथे माखिले : मग गोसावीयांसि सोंडीएवरि आसन जालें : श्रीमुगुटीं भोगी (ओल्या नारळाचे दूध) ओळगविली : श्रीमुगुटिचेया पीळया आंतु आणीक भोगी घातली : ऐसी भगतिजनासि दीधली : भगतिजनांचे माथे माखिले मग गोसावीयांसि मादणें जालें : माहादाइसें गाडु ढाळीति : बाइसें श्रीमुगुटु चोखीति : श्रीमुर्ति

प्रक्षाळीति : भगतिजन सोंडीएतळि रीगौनि गोसावीयांचेनि उदकें न्हाले : सेवटीं श्रीमुगुटावरि गाडु ढाळीति : गोसावी श्रीकर दोन्ही श्री मुगुटावरि ठेवीति : दोहीं कींपराचेनि पाणीएं भगतिजन न्हाति : ऐसें गोसावीयांसि मादणें जालें : मागौते गोसावी बहुतें पाणिएं न्हाणवीले : भगतिजनः मग माहादाइसी आक्षेंबाणे आणिले : गोसावीयांसि ओवाळिलें : मग गोसावी वस्त्रें वेढिली : आसनी उपवीष्ट जालें : चंदनाचा आडा रेखिला : मग गोसावीयांसि ओवाळणी जाली : भगति जन ओवाळिले : मग दीसु निगाला : बाइसीं आपुला नीमस्तु पुजा अवस्वरू केला : मग गोसावी वीहरणासि बीजे केले : माहादाइसीं उपाहारू नीफजविला : गोसावी वीहरणौनि बीजे केले : पुजा अवस्वरू जाला : गोसावीयांसि ताट जाले : भगतिजनांसि ठाए जाले : मग माहादाइसी ओवाळिले : गोसावीयांसि आरोगण जाली : भगतिजनासि जेवणें जालीं : गुळुळा वीडा जालाः ऐसा गोसावीयांसि भगतिजनासहितु दीवाळी सणु जाला :

अशा तऱ्हेने महदाइसेने दिवाळी सण साजरा केल्यानंतर श्रीचक्रधरस्वामींनी नागदेव व महादाइसा यांना श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी रिद्धपूरला पाठविले. महदाइसेने भाऊबीज साजरी करण्यासाठी एल्हाइसेला सूचना केली. एल्हाइसेने भाऊबीज अशा प्रकारे साजरी केली––

## एल्हाइ भाऊबीज करणे

माहादाइसें : भट : रीधपुरासि नीगालीं .... मग माहादाइसीं एल्हाइसांतें म्हणीतलें: "एल्हो : तु गोसावीयांते राहावि: ऐसे म्हण: "जी जी : मी गोसावीयांचां ठाइं भाउबीज करीन : " मग तीएं गोसावीयांसि आली : फूटेयासि पीळा घातला : "जी जी : आजि गोसावीं राहावें: मी गोसावीयांचा ठाइं भाऊबीज करीन : सर्वज्ञें म्हणीतलें : "तुमतें काइ असे ?" "मातें च्यारि दाम असति : तेयाचे मी गोसावीयां लागौनि लाडु करीन " गोसावीं तेयांची वीनवणी स्वीकारिली : ....

मग गोसावीं तेयांसि वीधि वीहिलाः " आपणचि गहुं दळावे : आपणचि सोजी काढावी : आपणचि सेव वळावी : आपणचि सेव तळावी : आपणचि

लाडु बांधावे : दाखौ लाभे : परि करूं न लभे : " "हो कां जी : " म्हणौनि तेहीं मानिले : जें जें करीति तें तें दाखवीतें जाति : तैसे लाडु बांधले: दूरडीए घालुनि : पालवे : झाकुनि : घेउनि आली : गोसावीयांपुढे दूरडी ठेविली : दंडवत घातले : श्रीचरणां लागली ... मग ते लाडु गोसावी आपुलेया वीनयोगा नेले :

दिवाळीला केले जाणारे अभ्यंग स्नान म्हणजे केवढा मोठा थोरला विधी होता हे पहाताना गंमत वाटल्याखेरीज रहात नाही. अभ्यंगस्नानात उटणे, तेल आणि विशेष म्हणजे भोगी–ओल्या नारळाच्या दुधाचा वापर केला जाई. हे मंगल स्नान कितीतरी काळ चालूच रहात असले पाहिजे. स्नानानंतर फराळासारख्या या गोष्टीच महत्त्वाच्या दिसतात. फराळाच्या नाना परी. भाऊबीजेला एल्हाइसेने केलेले लाडू अगदी वैशिष्टयपूर्ण दिसतात . . त्या काळीही सण साजरा करायचा म्हणजे स्त्रीवर्ग प्रचंड उत्साहाने भाग घेऊन मोठ्या प्रमाणात श्रमत होता, ही गोष्ट सहज लक्षात येण्यासारखी आहे.

लीळाचरित्रात सोमवारी साजरी करण्याचेही वर्णन आले आहे. सोमवारी म्हणजे अमावास्येला आलेला सोमवार. या पर्वकाळी आचरण्याच्या व्रताला तेव्हा बरेच महत्त्व होते असे दिसते. या पर्वकाळाच्या आचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे ––

**साधां सोमवारी देणें**

मग सोमवारी आली : मग साधीं म्हणीतलें : "आइ तुझा जरू जाएन्चिना : आणि मज गोसावी सोमवारीए पुढारले असति : तरि मीं जाइन : तरि तुं राहे:" "ना हो कां:" मग साधीं परीवंटु (वस्त्रांचे सामान बोचके) बांधिला: आणि तीयेंहीं उठीली : तीहीं परिवंटु बांधो आदरिला : "हें काइ आइ ? तुं कां परीवंटु बांधतेसि ? " "ना एल्होः मीं चालैन : चालवैल तरि चालैनः मग न चलवे तरि तेथ तुं सांडुनि माते जाए:" "ना हो कां" मग तीया भींगालीयाः भींगारा आलीया : मग चीचवंडीए नीबीया जोगनाएकाचे तीं तीं रुवाचे (=एक चांदीचे नाणे) गहुं दळिले होते: तयांते एकी ठाइं बैसवीले :

मग साधें हाटांतु गेली : तीं रूआंचीया तीनि माळा घेतलीया : तीं रूआंचे तीनि वीडे घेतले : तीं रूआंचे तीनि भेले (गुळाची छोटी ढेप) घेतले : एतें असति : तंव तान्हैली : एका ब्राह्मणाचेया घरा पाणीं पेयावेया गेली : हातिचे भेले ओसरीएवरि ठेविले : ... तीयां पाणी पेवेया सुदलें : पाणी पेओं बैसली: तवं वासरूं आले : तेणें एकु भेला खादला : "आतां काई आइचा खादला म्हणो : कीं बाइएचा खादला म्हणो ? खादला माझा नीदैवेचा : " मग आली : तीयां दोघीं हाती माळा वीडे गुळाचे भेले दीधले : मग गोसावीयांचेया दरीसना आलीया : गोसावीयांसि आदीत्याचां देउळीं आसन असे : आलीं : गोसावीयांसि दंडवत घातली : स्त्रीचरणां लागली: मग स्त्रीकंठी माळा घातलीया : आसनावरि वीडे : गुळाचे भेले ठेविले: साधी माळ घातली : आणि वीडा ओळगविला : मग बैसलों : मग गोसावी पुसिलें: "हें काइ साधें हो : एहीं एथ गुळ संपादिला तुम्ही एथ गुळ संपादाचिना तें काइ ?" "जी जी तें जालें ऐसें : हाटा गेलीयें : तीं रुवांचीया तीनि माळा घेतलीया : तीं रुवांचे तीनि वीडे घेतले : तीं रुवांचे तीनि भेले घेतले : एतीयें होतीयें तवं तान्हैलीयें : मग एकां ब्राह्मणाचेया घरा पाणी पेयावेया गेलीयें : वोसरीयेवरि तीन्हीं भेले ठेविले : पाणी पेओं बैसलीयें तवं वासरूं आले : तेणें एकु भेला खादला : आतां काइ आइएचा खादला म्हणों : की बाइएचा म्हणों : खादला माझ्या नीदैवेचा :" सर्वज्ञे म्हणीतलें : "सांधे हो तुम्हो काइसेया नीदैवें होआल ? हे तुम्हा गुळु, देइल :" "जी जी : गोसावीयांचाचि गोसावीयांसि काइ देयावा ?" सर्वज्ञें म्हणीतलें : "साधें हो : कव्हणाते कांही असे ? हे सकळै देवाचें कीं : मां देओ : दे ते आपुले" "हो कां जी :" मग सर्वज्ञें म्हणीतले : "बाइ : तुमतें कांहीं गुळ असें ?" "हो बाबा : असे" सर्वज्ञें म्हणीतलें : "घेउनि या :" मग बाइसीं गुळु आणिला : मग गोसावीं आंजुळी घेतला : गोसावीं साधांचीए आंजुळी घातला : ते उमाळ आंजुळि भरली : साखर गुळु मग आसनावरि ठेविला : मग दंडवत घातले : स्त्रीचरणां लागली : मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाई : घेया : एथिचेया उपेगा नेआ :" मग बाइसीं गुळु ठेविला : मग सर्वज्ञ म्हणीतलें : "साधें हो : हें तुमची सोमवारी लागे : ते दीधली हो : आता तुम्हा अनोज्ञा देओं ना ?" ...

लीळाचरित्रात पुढे एका लीळेत सारंग पंडितांनी सोमपर्वी केलेल्या पूजेचे वर्णन आले आहे. सोमपर्व म्हणजे चंद्रग्रहण किंवा पौर्णिमातिथी. या दिवशी करावयाच्या पूजेचे वर्णनही उद्‌बोधक ठरते.

**गणपति मढी सारंगपंडितीं सोमपर्वी पुजा**

एकु दीसीं सोमपर्व जालें : मग सारंगपंडिती आवघेयां उपहाराची आइति केली : पसंबुरी (कोशिंबिरीचे पदार्थ) आदि करुनि खांडलीया : मग चंदन उगाळिले : माळा गुंफिलीया : आवघेयां लागि एकि एकि माळ : एकु एकु वीडा : मग चौरंगु घेतला: गंगाळ: लोहे : ऐसीए आइतीसी गणपति मढां आले ... मग सारंग पंडितीं घागरी घेतली : पाणीं आणिलें: मादनेयालागौनि पाणीं ठेविलं : हारीं बुरुंगाळि बुरुंगाळि पाणीं एताए : मोटकी बोंब जाली : आणि सारंगपंडितीं गोसावीयांसि पडदनि देओं आदरिली : सर्वज्ञें म्हणीतलें: "पांडे या : आझुइ पर्वकाळु न वर्ते गा :" "जी जी :" ते मान आलें : मग सर्वज्ञें म्हणीतलें: "पांडे या : आतां पर्वकाळु वर्तत असे गा :" मग सारंग पंडितीं गोसावीयांसि पडदनी बांधली: मग बोंडणवावीचीए सोंडियेवरि चौरंग घालौनि मादनें जालें : मग भक्तजनीं आणिकें पाणीयें आंघोळी केलीया : मग चौरंगावरि बरवें आसन घातिलें: गोसावीयांसि आसन जालें : मग चंदनाचा आडा रेखिला : गोसावीयांसि बरवी पूजा केली : धुपार्ती जाली : मंगळार्ती जाली: वीडा जाला : तंव उमाइसा निद्रा आली होती : तंव चेवो आला : तीयें रडों लागली: "मातें उठवाचि ना :" सारंग पंडिती म्हणीतलें: "तुम्हीं उठाचिना का ? तुम्हीं काइ एथ निद्रा करावेया आलीति ?" मग सर्व सर्वज्ञें म्हणीतलें. "पांडे या : वोहारी (सून) काइगा रुसली ?" "जी जी : यें कां रुसताति ? ये काइ येथ निद्रा करावेया आली जी ? अवसरा चुकलीये म्हणताति :" सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ : या :" आली: मग सर्वज्ञें म्हणीतलें : "बाइ: ऐसी उर्मि उपजो नेदिजे की : उपजली तरी समिजे : ना तरि आपणेयां एथचें असणें गोमटें अंतरे :" सर्वज्ञें म्हणींतलें : "बाइ : यांसि माळ वोपा :" मग बाइसी माळ वोपिली : मग तीं गोसावीयांचां श्रीकंठी माळ घातली : वीडा ओळगविला: मग बाइसीं उपाहारू नीफजवीला :

गोसावीयांसि ताट जालें : भक्तजनां ठाए जालें : गोसावीयांसि आरोगण जाली : गुळुळा जाला: वीडा जाला: ....

लीळाचरित्रात आलेले काही प्रसंग आनंदोत्सव, सण, पर्वकालीन व्रतोत्सव आपण पाहिले. यावरून त्या काळच्या रीतिरिवाजांची काही ओळख पटायाला मदत होते. पुष्कळसा भर स्नानांवर, ओवाळण्यावर, फराळ, भोजन यांवर असलेला दिसतो. शिवाय एखादी गोष्ट करायची सक्ती कोणावर होती अशातला भाग नव्हता. परंतु एकदा ती करण्याचा निश्चय केल्यानंतर मात्र ती शास्त्रशुद्ध रीतीने करण्याचा, करवून घेण्याचा, कटाक्षाने प्रयत्न होत असे; अशावेळी मग आजार किंवा कंटाळा या गोष्टींचे लाड चालत नसत! फराळाचे जिन्नस, पक्वान्ने नानापरीने केली जात असत. वेगवेगळे पदार्थ करण्याचा, करणाऱ्याचा किंवा खाणाऱ्याचाही आळस कुठे दिसत नाही ... एकूणकाळ तसा सुबत्तेचा असला तरी आपली एखादी गोष्ट नाहीशी झाली तर ती गोष्ट फार मनाला लागत असे ही गोष्ट साधेच्या सोमवारीच्या लीळेतून दिसून येते. पूर्वापार चालत आले म्हणून गोकुळ अष्टमीसारखे उपवास केले जात. तसेच 'अधिकारी' व्यक्तीने या गोष्टीला अती महत्त्व देऊ नको म्हणून सांगितल्यावर मुरड घालून मिळते जुळते घेण्याची तयारीही दिसते.

सण किंवा उत्सव साजरे होत असताना उत्साहाचेच वातावरण असायचे. तिथे मारून मुटकून केले, निभावून नेले, असा भाग नसायचा.

लीळाचरित्रातील हा भाग आपल्याला तत्कालीन समाज जीवनात डोकावण्याची व तत्कालीन उत्सवात मनाने का होईना भाग घेण्याची संधी देतो यात शंकाच नाही.

# एक होता—हे ते !

प्रा. वामन चोरघडे

एक होता कुणीतरी, नाव त्याचे आटू !
त्याचा एक मित्र, नाव त्याचे बाटू !
अन् एक होती कुणीतरी, तिचे नाव मनी !
असे झाले तिघे !

आटू एक बाटू दोन मनी तीन
तिघांची होती दोस्ती.
दोस्ती कशी दोस्ती कशी ?
चंदन पाणी एकच जशी !

चंदन पाणी निराकार
वास सुवास अपार अपार
तिघे राहती आपापल्या स्थानी
पण एकाची गोष्ट दुसऱ्याच्या कानी !

जसा करी आटू तसा करी बाटू
तशीच मनी
तिघे जसे एकच एक !
बोलायला कसे नेकच नेक !

एकदा काय झालं, घडलं काय ?
तसं काही विशेष घडलंच नाय् !
पण तिघांचे झाले भले भले
ऐकता ऐकता दिवस कले

सकाळ झाली पहाट फुटली
पाखरांआधी आटूची झोप उघडली
बाटू उठला तसा सकाळी
मनी पण उठली पहाटेच भली
पहाट सांगे, सांगते काय ?
रोज विचारी झोपलात काय ?

आटू उठला, बाटू उठला
मनी पण उठली
आटू लागला कामाला
मनी पण लागली कामाला
कोणते काम बरे कोणते काज ?
केल्याने भागे भूक लाज !

काम करून आटू थकला
बाटू पण आमचा कामाने वाकला !
मनीने केले इतके काम, इतके काम
की सूर्य म्हणाला थांब थांब !

मग लागली आटूला भूक
तशीच बाटूला लागली भूक
मनीची पण भूकच भूक !

आता काय करायचे, करायचे काय ?
अन्न पाणी दे गे धरती माय
दाणे निवडून रांधायचे
कष्टाचे आपल्या आपण खायचे

आटू गेला बाजारात
बाटू गेला बाजारात !
मनी गेली बाजारात !

आटूने घेतले तांदूळ
करीन मी भात, याचा करीन भात !

बाटूने घेतले तांदूळ
होय रे गड्या शिजवीन भात
मनीनं पण घेतले असेच तांदूळ
पण मनी म्हणाली
नकोरे गड्या भात एके भात

मी घेते डाळ
आटू बाटू तुम्ही पण घ्या
डाळ तांदूळ एकात एक
खिचडी होते छान सुरेख !

हळद टाकू पिवळी धमक
सोन्याची येईल खिचडीला चमक
पोट भरून जाईल तट्ट !
भुकेची वाचेल कटकट !

आटू म्हणाला खरे ग मने,
तिघांची जणू एकच मने !
आटूने मग घेतली डाळ
बाटूने पण घेतली डाळ !

आटू आला घरी
बाटू आला घरी
मनी आली घरी

आटू गेला विहिरीवर
बाटू गेला आडावर
मनी गेली बावडीवर

घागर भरली आटूने
भांडे भरले बाटूने
मनीची घागर शिगोशीग

आटूने पेटविली चूल
बाटूने पेटविली चूल
मनीने पेटविली चूल

तीन दोस्त पण तीन चुली
एकच चूल नाही भली !
कामाचा उगाच घोळ घाली !

आटूचे भांडे चुलीवर
त्याने मांडली खिचडी
बाटूचे भांडे चुलीवर
त्याची पण चढली खिचडी

मनीचे काय ती तर पोर
चढली खिचडी संपला घोर

विस्तव पेटे फर फर फर
आधण येई वर वर वर
कामे सरली भर भर भर

आटूची खिचडी शिजली
बाटूची खिचडी शिजली
पण मनी बिचारी, मनी बि
खिचडी तिची जळून गेली !

आटूला कळलं नाही
बाटूला कळलं नाही
अन् मनीनं पण सांगितलं नाही !

आटू बसला जेवायला
बाटू बसला जेवायला
पण मनीचे काय ? मनीचे काय ?
रांधण जळलं उपाशी बाय् !

आटूने घेतला घास
बाटूने घेतला घास
पण मनीचा जणू चातुर्मास

आता कसे व्हायचे, आता काय व्हायचे !
मनीने काय उपाशीच राहायचे ?

आटू म्हणाला बाटू रे बाटू
बाटू म्हणाला काय रे आटू ?

अरे, मनीचा आपल्या गळला घाम
आपल्या संगे केले काम
तिच्या पण मनात असतो राम

राम उपाशी आपण खायचे ?
अशाने मग कसे रे व्हायचे ?

आटूचा घास हातीच राहिला !
बाटूचा घास हातीच राहिला !
मनीच्या डोळ्यात आलं पाणी
भुकेची भकभक जीवघेणी !

आटू जेवीना बाटू जेवीना
मनीच्या डोळ्यातले पाणी गड्या कमीच होईना !

मग काय झाले बरे, मग काय झाले ?
आटूला सुचले भले भले !
आटूने केले तसे बाटूने केले !

आटूने दिला आपल्यातला घास
बाटूने दिला आपल्यातला घास
अन् मनीचे पोट भरले तुडुंब !

आटूचे काम झाले बाटूचे काम झाले
आटू, बाटू, मनी कामाला लागले
दोघांचे दोन घास तिसऱ्याचे भरी पोट
आमच्या कहाणीला काढायची नाही खोट

एक होता आटू
एक होता बाटू
एक होती मनी
तिघांची गोष्ट
असू द्या कानी !

ही एक लोककथा आहे. लोककथा म्हणजे काय ? जी सर्व लोकांनी सांगितलेली असते ती ? की सर्व लोकांना ऐकावीशी वाटते ती ? लोककथा लिहिणारा अज्ञात असतो आणि लोककथा ही सार्वकालीन असते. हे समजण्यासाठी एखादे उदाहरण घेता येईल.

वेद हे सार्वकालीन आणि सनातन मानले जातात, जे नित्य नूतन असते त्याला सनातन म्हणतात. वेद हे अपौरुषेय आहेत असे आपण म्हणतो. अपौरुषेय म्हणजे कोणत्याही एका पुरुषाने लिहिलेले नाहीत असे. हा अर्थ समजावून घेतला पाहिजे. सहा सात हजार वर्षांपूर्वी ऋषीमुनी एकांतात चिंतन करीत बसत. सृष्टीबद्दल त्यांना मोठे कुतूहल असायचे. पंचमहाभूते म्हणजे काय ? हा प्रश्न त्यांना चिंतनासाठी पुरायचा. ही सृष्टी कशी निर्माण झाली हे सांगणाऱ्या ऋग्वेदातील ऋचा मोठ्या काव्यमय आहेत. प्रथम काय निर्माण झाले अशा जिज्ञासेने चिंतन करीत असताना ऋषींना जे वेगवेगळे आविष्कार झाले ते आनंदाच्या भरात बोलून गेले. त्यांच्या आजूबाजूच्या ऋषींना ते

ावडल्यामुळे त्यांनी ते तोंडपाठ केले. अनेक ऋषींच्या चिंतनातून जे बोल कट झाले त्यात सर्वकाळी उपयोगी असे काहीतरी होते.

ते सर्व जेव्हा एकत्र केले गेले आणि व्यवस्थित मांडले गेले ते वेद! वेदात पकालीन काहीच नाही. चिरकालीन उपयोगी पडेल असेच आहे. अशा ह्या िकांच्या चिंतनातून जे 'सुंदर' प्रकट झाले ते सर्वांचे; कोणा एकाचे नाही!

आटू बाटूची ही जी लोककथा आहे ती मला माझ्या आईने सांगितली ईला मी विचारले, तर ती म्हणाली, की मला माझ्या आईने सांगितली. हीच ा माझ्या मुली त्यांच्या मुलामुलींना सांगतात. शब्द थोडे वेगळे असतात अर्थबोध एकच असतो. या कथेमध्ये आटू, बाटू, मनी अशी तीन नावे ी आहेत. ही नावे आपल्याला विचित्र वाटतात नाही?

एक कल्पना अशी करू की, माझ्या मुलीला दोन मुले व एक मुलगी असून ची नावे अतुल, राजीव आणि अंजू अशी आहेत. माझी मुलगी गोष्टीची वात – 'एक होता अतुल, एक होता राजू, एक होती अंजू' अशी करील. बदलली तरी कथेचा आशय बदलणार नाही.

या लोककथेत आटू, बाटू, मनी हे कुठे राहत होते? कसे राहत होते? ही कधी रचली गेली? याचा उल्लेख नाही. पण कथा सांगणारा किंवा णारी मनात काही हेतू धरून नाव, गाव, काळ सांगेल तरी देखील टीतला आशय बदलणार नाही. लोककथा लवचिक असते ती या अर्थाने! चिक म्हणजे ती कितीही लांबविता येते.

ा कथेत आटूने काम केले, बाटूने काम केले. एवढेच सांगितले आहे. ते काम केले हे सांगितले नाही. पण कथा सांगणारी आई असेल तर ती ल्या मुलांना कोणते काम आवश्यक आहे, त्याचा उल्लेख करील. गोष्टीचा आहे आटूने एक घास दिला, बाटूने एक घास दिला, मनीचे पोट भरून मुलांना मनीचे पोट भरल्याचे ऐकून आनंद होईल.

परंतु या घटनेत किती मोठा आणि किती खोल अर्थ भरला आहे हे सांगितले तर खरोखरच आपल्याला आश्चर्य वाटेल. मोठमोठे शब्द वापरले तर मोठेपणी आपल्याला ते तत्त्वज्ञान वाटेल!

आटू, बाटू व मनीची एकच चूल नसेल; एका घरात ते राहत देखील नसतील. पण एका समाजात तर ते राहतातच !

तिघेही सकाळी उठले. तिघांनीही काम केले. तिघांना चूल पेटविण्यापर्यंत कोणताच अडथळा आला नाही. सर्व परिस्थिती अनुकूल व एक सारखीच होती. चुलीवर खिचडी मांडीपर्यंत कसलेच विघ्न आले नाही. मग आटूची, बाटूची खिचडी शिजावी व मनीची मात्र जळून जावी असे का? आटू, बाटूचे पोट भरावे व मनीवर मात्र उपाशी राहण्याची पाळी का यावी ?

आटू, बाटूची खिचडी जळली असती तर आपण म्हटले असते की मुलांची जात; त्यांना सवय नसेल. परंपरेपासून सैपाक व जेवण तयार करण्याचे काम आपल्या समाजात स्त्रियांकडे राहिले आहे. मनी मुलगी असल्यामुळे तिला सैपाकाचा सराव असणारच. तिच्या वाट्याला दुःख का यावे ?

मनीच्या दुःखाचे कारण शोधायला मोठी माणसे चौकशी समित्या नेमतात; वृत्तपत्रे मनीबद्दल एकतर दुःख प्रदर्शित करतात किंवा मनीच्या निमित्ताने स्त्रीजातीला दोष देतात !

पण आपल्या या गोष्टीत कितीही चौकशी केली तरी आपल्या या मनीचे पोट भरणार नाही. दुःखाचे कारण सापडले तरी दुःख दूर होत नाही. प्रथम दुःख दूर करावे. उरेल वेळ तर चौकशी करावी.

आपल्याला असे दिसेल की, भारताच्या प्रत्येक समाजाने आपापले काम नियमित व चांगले केले तर रिकामा वेळ मिळतच नाही!

माणसाला दुःख का होते ? यावर थोर थोर पुरुषांनी फार विचार केला. त्यातले काही म्हणतात की दुःख अभावातून निर्माण होते. आपल्याला गरज असलेली वस्तू जर मिळाली नाही तर दुःख जरूर होईल. धान्य मिळाले नाही तर उपासाचे दुःख होईल. राहायला घर मिळाले नाही तर ऊन पावसाने आपण दुःखी होऊ !

तथापि हे दुःख शारीरिक आहे. उपासाने सर्व परिस्थितीत आपल्या मनाला दुःख होतेच असे नाही. आई आपल्या मुला-लेकरांसाठी सैपाक करते. मुले पोटभर जेवली, अन्न संपून गेले व आईला उपाशी राहावे लागले तर ती दुःखी होईल ? आपल्या मुलाला आपल्या पदराने झाकून आई ऊन, थंडी सहन करील, पण तिला दुःख होणार नाही. याचे कारण की आईचे आपल्या मुलावर प्रेम असते. समाजामध्ये एकमेकांचे परस्परावर प्रेम असेल तर या समाजात अशा दुःखाची कोणी पर्वा करणार नाही.

बरे; अभावातून जर दुःख होत असेल तर भरपूर मिळून तरी दुःख दूर झाले पाहिजे. पण दुःख दूर होते असे नाही. श्रीमंताजवळ भुकेच्यावेळी खायला भरपूर असते. मोठमोठ्या उत्तम घरात ते राहतात. पण ते पूर्णपणे सुखी असतातच असे नाही. सुख किंवा संतोष ही फार वेगळी गोष्ट आहे.

अभाव, उणीव, कमतरता यांच्यामुळे माणसाचे दुःख दूर होऊ शकते हे म्हणणे तितकेसे खरे वाटत नाही. मग दुःखाचे मूळ कारण काय असावे ?

आपल्या भारतातील संतसत्पुरुषांनी दुःख निर्माण होण्याची जी कारणे सांगितली, ती जाणून घेण्याची वेळ आली आहे. यंत्र, भौतिकशास्त्र, माणसाला सर्वस्वी सुखी करू शकतात, हा विश्वास जरा पारखून पाहावयाची केव्हा तरी पाळी आपल्यावर येणार होती; ती वेळही आताच आहे.

संत ज्ञानेश्वरांनी श्रीमत् भगवद्गीतेचा अर्थ मराठीत समजावून दिला. त्यांच्या या मराठी ग्रंथाचे नाव ज्ञानेश्वरी असे आहे. ज्ञानेश्वरीतील मराठी भाषा सोपी तर आहेच, शिवाय ती सुंदर आणि अमृतासारखी गोड आहे.

एखादे सुंदर निरोगी मूल अंगावर जडावाचे दागिने घातले की जसे अधिक खुलून दिसते, तशीच ज्ञानेश्वरांची मराठी भाषा आहे. या ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायात सत्पुरुष किंवा सज्जन कसा असतो हे समजावून सांगितले आहे. खेळण्याबागडण्याच्या लहान वयात त्यांना इतके चांगले कसे लिहिता आले हा एक चमत्कार आहे. त्यांच्या काही ओव्याच आपण बघू या, म्हणजे अनायसे ज्ञानेश्वरांना नमस्कार घडेल व आपल्याला ज्ञान मिळेल.

आता कदर्थवीत व्याधी । बळीकरणाचिया आर्धी ।
आपपरु न शोधी । सद्वैद्यु जैसा ।। १ ।।

कां चिखलीं रुतली गाये । धडभाकड न पाहे ।
जो तिर्यंचिया ग्लानी होये । कालाभुला ।। २ ।।

नाना बुडतयाते सकरुणु । न पुसे अन्त्यजु की ब्राह्मणु ।
काढूनि राखे प्राणु । हेचि जाणे ।। ३ ।।

की माय वनीं पापिये । उघडी केली विपाये ।
ते नेसल्यावीण न पाहे । शिष्टु जैसा ।। ४ ।।

तैसें अज्ञानप्रमादादिकी । कां प्राक्तनही सदोखी ।
निंद्यत्वाचां सर्व विखीं । खिळिले जे ।। ५ ।।

तेया आंगीक आपुले । देऊनिया भले ।
विसरविजती सलें । सलतीं तियें ।। ६ ।।

अगा पुढिलाचा दोखु । करुनि आपुलिये दिठी चोखु ।
मग धापे अवलोकु । तयावरी ।। ७ ।।

जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरुनि शेता जाइजे ।
तोषौनि प्रसाद घेइजे । अतिथीचा ।। ८ ।।

तैसे आपुलेनि गुणे । पुढिलाचे उणे ।
फेडुनिया पाहणे । तयाकडे ।। ९ ।।

वांचूनि न विधि जें वर्मी । नातुडविजे अकर्मी ।
न बोलविजे नामी । सदोषीं तिहीं ।। १० ।।

वरि कोणे एके उपायें । पडिले ते उभें होये ।
तेचि कीजे परि घाये । नेदावे वर्मी ।। ११ ।।

पै उत्तमाचियासाठीं । नीच मानिजे किरीटी ।
हे वांचोनि दिली । दोषु न घेपे ।। १२ ।।

अगा अपैशुन्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण ।
मोक्षमार्गीचे सुखासन । मुख्य हें गा ।। १३ ।।

ज्ञानेश्वरांनी सज्जन कोणाला म्हणावे, तो कसा वागतो म्हणून सज्जन होतो, हे फक्त तेरा ओव्यांत सांगितले आहे. त्यांनी वापरलेल्या प्रत्येक शब्दामध्ये शब्दाचा अर्थ आहेच पण हजारो वर्षांपासून जी संस्कृती घडविली गेली तिचा इतिहासही या शब्दाशब्दात आहे. शिवाय आपल्यासाठी आनंदाची गोष्ट म्हणजे हे सर्व शुद्ध मराठीत आहे.

आपला विचार स्पष्ट करण्यासाठी ज्ञानेश्वर काही विशेष शब्द वापरतात. उदा., दोन शब्दांचा उल्लेख करतो. पहिल्या ओवीतील दुसरा शब्द "कदर्थवित" व चौथा शब्द "बळीकरणाचिये" हे दोन शब्द कितीही स्पष्ट करून सांगितले तरी त्याचा अर्थ समजत नाही, पण तेच त्या शब्दाकडे नुसते बघत बघत आपण आपल्या मनाशी आळविले तर त्यांचा अर्थ आपोआप मनात शिरतो. शब्दाची जादू अशीच असते.

या तेरा ओव्यांचा मला समजलेला अर्थ देत आहे.

(१)

एखाद्याला एखादी व्याधी किंवा दुखणे झाले तर–

मनाला दुखणे झाले तर ती आधी, देहाला दुखणे झाले तर ती व्याधी आणि आजूबाजूच्या परिस्थितीने जो आपल्याला ताप होतो त्याला उपाधी असे म्हणतात.

एखाद्याला व्याधी झाली आणि त्याला वैद्याने तपासले. वैद्य जर चांगला असेल तर रोग्याच्या व्याधीने त्याच्या मनाला दुखणे होईल. आणि ते दुखणे दूर व्हावे म्हणून त्या माणसाला त्या व्याधीपासून वैद्य नुसतेच मुक्त करणार नाही तर त्याचे बळीकरण करील. वैद्य या आधीचा इतका ध्यास घेतो की हा रोगी माझा नातेवाईक आहे की अगदी कोणी परका आहे असा कोणताही विचार त्याच्या मनात येत नाही. त्या रोग्याला पूर्वी तो जसा होता तसे केल्याशिवाय त्या वैद्याला चैन पडणार नाही. म्हणजे वैद्य सज्जनही आहे व औषध देण्यात निष्णात आहे.

आपल्या गोष्टीतील मनी उपाशी राहिल्याने आटू, बाटू कळवळले. त्यांचे मन दुखले आणि त्यांनी इतर कोणताही विचार मनात न आणता मनीला आपल्या घासातील घास दिला.

(२)

समजा एक गाय आहे. ती चिखलात रुतली आहे. आपण चिखलात फसू असे काही गायीने ठरविलेले नसते. ती चिखलात फसल्याने तिची तडफड चालू असते.

एक मनुष्य ते पाहतो. गायीची तडफड बघून त्याचे मन कळवळते. त्या कळवळचापोटी ही गाय दूध देणारी आहे की म्हातारी आहे असा विचार त्याच्या मनात येत नाही. तिला तो चिखलातून काढतो. मगच त्याचे मन शांत होते. अशा माणसाला सज्जन म्हणावे? गाय वाचावी म्हणून त्याने गायीला चिखलाबाहेर काढले की त्याचे मन शांत व्हावे म्हणून काढले? स्वतःच्या आनंदासाठी त्या माणसाने गायीला वाचविले.

मनीला आपल्यातला घास देताना, मनी आपल्याशी असे वागेल की नाही, ती आपल्याला घास देईल की नाही असा कोणताही विचार आटू बाटूच्या मनात आला नाही. आपण दिलेल्या घासाने मनीचे पोट भरले हाच त्यांचा आनंद!

(३)

कोणीतरी एक बिचारा पाण्यात बुडतो आहे. जगण्यासाठी धडपड करतो आहे. ही त्याची धडपड एका दयाळू माणसाने पाहिली. त्याने चटकन उडी मारून त्या माणसाला वर काढले. त्याचा प्राण वाचविला. त्यामुळे त्या दयाळू माणसाला आनंद झाला, प्राण वाचविताना त्याने बुडत्या माणसाला तू कोण आहेस ? कोणत्या जातीचा आहेस, चांगला आहेस की वाईट आहेस ? असे विचारले नाही. ते त्याला सुचलेच नाही. बुडत्याला आधार देणे हेच त्याला सुचले व तसे त्याने केले.

आपल्या घासातील घास देताना मनी मुलगी आहे, तिची खिचडी जळता कामा नये असे विचार आटू बाटूच्या मनात आलेच नाहीत. त्यांच्या मनाला फक्त दयेचा पाझर फुटला आणि त्या दयाळू माणसासारखे ते सज्जनही ठरले.

(४)

एक आईसारखी स्त्री आहे. नशीबाच्या फेऱ्यात सापडून कोणा पापी, दुष्टाने तिच्यावर संकट आणले. तिची वस्त्रे फेडून घेतली हे सगळे एका माणसाच्या लक्षात आले. तो भला माणूस होता. त्याने आपल्या अंगावरचे वस्त्र त्या आईवाणी दिसत असलेल्या स्त्रीच्या अंगावर घालून मगच तिच्याकडे त्याने पाहिले. दुसरा कोणताच विचार त्याच्या मनात आला नाही. ज्याच्या डोळ्यांना काही अमंगळ दिसले तर ते आपल्या प्रयत्नाने जो मंगल करून घेतो त्याला शिष्ट किंवा सज्जन म्हणतात.

एखादी कठीण कल्पना स्पष्ट करावयाची असल्यास ज्ञानेश्वर आपल्याला समाजातील अशी उदाहरणे देतात की ती कल्पना आपली आपल्यालाच स्पष्ट होते. समाजामध्ये जे प्रकार घडतात तेच उदाहरणासाठी घेऊन अशा प्रकारात कसे वागावे हे ते सांगतात.

वरील चार ओव्यात एक आजारी माणूस, एक चिखलात रुतलेली गाय, एक बुडणारा माणूस, आणि एक कुलीन स्त्री यांची उदाहरणे आहेत. आजारी

पडणे, चिखलात फसणे, पाण्यात बुडायला जाणे किंवा अन्न घालवून बसणे हे कोणी काही मुद्दाम करीत नाही. प्रत्येकजण जगण्याची व चांगले जगण्याची धडपड करतो; चांगले जगणे साधावे म्हणून इतरानाही चांगले जगविण्याची धडपड करावी लागते.

मग माणसावर असे प्रसंग का येतात ? या संबंधी विचार फार पूर्वीपासून फार लोकांनी केला आहे. आता ज्ञानेश्वरांची पाचवी ओवी. जणू आपल्या मनात येणाऱ्या प्रश्नांचीच उत्तरे त्यानी दिली आहेत.

(५)

दुःख कशाने निर्माण होते ? पहिले कारण अज्ञान. ज्ञान हे जसे अखंड आणि अमित असते तितकेच अज्ञानही अपार असते. अज्ञान शब्दाचा साधा अर्थ ' न जाणणे ' लक्षात न येणे येवढाच आपण सध्या घेऊ. आजारी पडलेला माणूस अज्ञानामुळे आजारी पडला.

प्रमाद हे दुःखाचे दुसरे कारण, प्रमाद या शब्दाचा खरा अर्थ धुंद होणे ! गाय चिखलात रुतली ती कशी ? तिला समोरचा हिरवागार चारा दिसत होता. तिचे सारे लक्ष गवताकडे होते. चाऱ्याकडे बघत बघत ती धावली. आपल्या धावण्याच्या मार्गात चिखल आहे हे तिच्या ध्यानातच राहिले नाही. चाऱ्याच्या धुंदीत रस्ता बघायला ती चुकली, या अर्थाने प्रमाद म्हणजे चूक असे आपण मानतो. नित्य जीवनामध्ये एका गोष्टीच्या धुंदीमध्ये आपण पदोपदी चुका करतो. त्यामुळे ती धुंद भागायच्या आधीच आपण असे रुततो किंवा फसतो, आपल्या चुकीमुळे जे दुःख होते त्याला तात्त्विक भाषेमध्ये प्रमादाचे दुःख म्हणतात.

तिसरे दुःखाचे कारण प्राक्तन असे दिले आहे. प्राक्तन म्हणजे नशीब, पूर्वजन्मी जे काही आपण केले ते या जन्मी भोगावे लागते, असे अनुभवी वृद्ध माणसे सांगतात. उपनिषदांमध्ये हा ' कर्म भोग ' अटळ आहे असे सांगितले आहे.

हे नशीबाचे दुःख आज आपल्याला पटतेच असे नाही. तरी प्राक्तनाचे काही अडत नाही. नशीब मानले तर माणसाच्या प्रयत्नाला, कर्तबगारीला, पराक्रमाला वाव मिळत नाही; असे आज चांगले चांगले लोक म्हणू लागले आहेत. त्यांचे म्हणणे मान्य केले तर वरील उदाहरणातील मातेसारख्या स्त्रीवर असा बेअब्रूचा प्रसंग का यावा ? ती अज्ञान होती; तिने चूक केली असे तर नाही ? आईसारखी स्त्री. असे म्हटले की आई शब्दाच्या वलयामध्ये ज्या कल्पना आपल्या मनात पक्क्या बसल्या आहेत त्या कल्पनेत अज्ञान, प्रमाद, काहीच बसत नाही मुलाचा पहिला देव तर आईच असते. त्याला राम, कृष्ण यांच्या ऐवजी आईच हवी असते. अशी आई नागविली जाते, ती तिच्या हौसेमुळे तर खासच नाही! आपल्या आजूबाजूला असाच अनुभव येतो.

आंगणातल्या झाडावर असंख्य फुले फुलतात त्यातली काही सुंदर स्त्रियांच्या वेणीत जाऊन बसतात. काहींना एखाद्या रसिकाच्या हृदयात स्थान मिळते आणि काही फुले प्रेतावर चढविली जातात. एकाच झाडाची ही फुले आपल्या मनात काय म्हणत असतील ? ती म्हणतील आम्ही फुललो, फुलणे आमचे काम. त्याशिवाय तर आम्ही काहीच केले नाही. झाडावरच सुकून जाण्याची आमची इच्छा होती. ज्याच्या हाती आम्ही पडलो त्यांनीच आमचे अस्तित्व असे केले !

एक सुंदर पक्षी झाडावर बसला आहे. एकजण त्याच्याकडे बघतो. काय सुंदर पाखरू आहे असे म्हणत म्हणत स्वतःला विसरून तो त्या पाखरावर कविता करतो. आणि दुसरा एक जण बाण मारतो अन् ते सुंदर पाखरू झाडाखाली मरून पडते.

या कृतीमागे पाखराचे अज्ञान किंवा चूक असावी हे म्हणणेच चूक आहे.

पुष्कळ गोष्टी अशा घडतात. मग आपल्या समाधानासाठी दैव, नशीब असे आपण म्हणून जातो. रोजच्या व्यवहारात दुर्दैव हा शब्द ज्याचे मुखातून आजवर निघाला नाही असा माणूसच निर्माण झाला नाही. पांडवांपैकी पाचही भाऊ

सहावा कर्ण, द्रौपदी, कुंती येवढेच नव्हे राजा धृतराष्ट्रही हा शब्द उच्चारून गेले. खरे की खोटे ही चर्चा आपल्यावर प्रसंग आला म्हणजे सुचतच नाही.

अज्ञान, प्रमाद, प्राक्तन हे शब्द वापरल्या नंतर ज्ञानेश्वर निंद्यत्व असा वापरतात.

अज्ञानामुळे, प्रमादामुळे विपत्ती कोसळते. नशीबाच्या फेऱ्यात सापडूनही दु:ख निर्माण होते. अन् असे लोक ज्ञानेश्वर म्हणतात, 'निंद्यत्वाच्या विषा' मध्ये सर्वतोपरी खिळून जातात. या दु:खितांसाठी काय करायला हवे? आपण त्यांना नुसतीच नावे ठेवायची? मेल्याहून मेल्यासारखे करायचे? त्यांचे दु:खच तर मरणप्राय आहे.

सज्जन माणूस अशावेळी काय करतो?

(६)

तो त्यांना 'आपुले आंगीक' देतो, म्हणजे आपल्या अंगात जे चांगले गुण असतील त्यांच्या अनुषंगाने तो त्यांचे संकट दूर करतो. त्यांचा अभाव दूर करतो, उणीव दूर करतो! नुसता उपदेशच करीत नाही, त्याची उणीवच नुसती दूर करीत नाही, तर त्याच्या मनात सलणारे सलही तो काढून टाकतो.

(७)

आपल्यासमोर जो दोष, उणीव दिसते ती उणीव सज्जन प्रथम दूर करतो मगच तिकडे बघतो. अजाण अर्भक रस्त्यावर रडते आहे. धुळीने अंग माखले आहे. नाकाडोळ्यातून पाणी गळते आहे. ते सज्जनाच्या दृष्टीस पडल्याबरोबर तो त्याला उचलून घेतो. आपल्या वस्त्राने त्याचे नाक डोळे पुसतो व त्या मुलाला रडव्याचे हसते करून टाकतो. दुसरे काहीच त्याला सुचत नाही. त्या मुलाच्या आईबापांना दोष देण्याऐवजी तो सज्जनच त्याचे आईबाप होऊन जातो.

(८)

ज्ञानेश्वरांचा हेतू असा की समाजामध्ये सगळ्यांनी असे करावे. देवाचे दर्शन घ्यायचे तर प्रथम त्याची शोडषोपचारे पूजा करूनच! शेत बघायला

जायचे तर त्याचे पीक पेरूनच! अतिथीचा आशीर्वाद घ्यायचा तर त्याला तृप्त करूनच! जिथे माझी नजर पडेल तिथे मी सत्याचा सौंदर्याचा अविष्कार करीन तोच माझा आनंद. भल्या माणसाचे वागणे असेच असते अन् असावेही!

(९)

रडत्याला हसते करूनच, आजाऱ्याला बरे करूनच, सज्जनाचे भलेपण सिद्ध होत नाही; दुसऱ्याचे बरे करताना ते केले असे त्याच्या तोंडून चुकूनही निघत नाही. मी नसतो तर तुझी विपत्ती दूर झाली नसती, असे म्हणून दाखविण्याचा विचारच त्याच्या मनात येत नाही. मग त्याच्या विपत्तीचा फायदा घेणे तर दूरच! पुढचा माणूस संकटात सापडला आहे, आता आपण पुरेपूर त्याच्या पासून लाभ उठवायला पाहिजे, असा पापाचा विचार त्याच्या मनात येत नाही. एखाद्याचे वर्म काढणे, उण्याचे दुणे करणे हा विचार भला नव्हेच!

(१०)

असले विचार मनामध्ये मुळीच न आणता समोर जे खचले पिचले आहे, तुटले मोडले आहे. त्यावर उपाय योजून ते उभे करायचे हीच भलेपणाची पारख होय.

(११)

उत्तमाच्या, चांगल्याच्या, भलेपणाच्या तुलनेने अधमपण, वाईटपण आणि नीचपण त्याला जणू शिवतच नाही. सूर्याच्या किरणांनी अंधार होत्याचा नव्हता ज्याप्रमाणे होऊन जातो, त्याप्रमाणे सज्जनाच्या अस्तित्वाने वाईटपणा निपटून जातो.

अर्जुना, अपयशून्याचे म्हणजे सज्जनतेचे हे लक्षण मी तुला स्पष्ट करून सांगितले. सज्जनाचे बोलणे, सज्जनाचे वागणे, आणि त्याची कृती त्याला सुखनैव मोक्षाकडे घेऊन जाते!

ज्ञानदेवांनी समाजाच्या भलेपणाचेच नियम इथे स्पष्ट केले आहेत. आटू बाटू व मनी यांना याची गरज आहे की काय ते बघू !

आपला समाज आटू, बाटू व मनीचा बनलेला आहे. श्रेष्ठ असो की कनिष्ठ असो सर्वांनाच पोटासाठी काम करावे लागते. प्रामाणिकपणे काम केले तरी पोटापुरते मिळतेच असे नाही. सध्यातरी याउलट परिस्थिती आहे. आटू बाटूची खिचडी शिजते व मनीची जळून जाते. जे आटू बाटूने केले तेच काम मनीने केले. खिचडी शिजविण्याचे ज्ञान तिला नव्हते असे कसे म्हणता येईल ? तिने काही चूक केली असेही नाही. मनीचा दोष असला तर तो तिच्या नशीबाचाच असला पाहिजे.

मनीच्या नशीबाचा हा दोष दूर करण्याची जबाबदारी सर्वच समाजावर असते. ती जबाबदारी पार पाडली नाही तर समाज टिकूच शकत नाही. शासनाने, कायद्याने सुख निर्माण करता येत नाही.

मनीच्या नशीबाचा दोष तिच्याच समाजातील भली माणसे म्हणून आटू बाटूनी आपल्या घासातील घास देऊन दूर केला. मनीला उपाशी राहावे लागले नाही. आपल्या वाट्याचा घास देत असता त्यांनी मनीला असे म्हटले नाही की मने अशी कशी ग तू ? स्त्री असूनही तुला तांदूळ शिजविता येत नाहीत ? उणे, दुणे बोलण्याशिवाय इतर काहीही न केल्याने कोणत्याही समाजातील दुःखे कधीही दूर होणार नाहीत. आटूबाटूचे यावेळचे वर्तन ज्ञानेश्वरांनी क्रमांक सहाच्या ओवीत हुबेहूब व्यक्त केले आहे. त्या दोघांचेही वर्तन सज्जनाच्या वर्तनाप्रमाणेच झाले, दोघांच्या भलेपणाने तिघे सुखी झाले.

आटू, बाटू व मनी सर्वकाळीच्या समाजाचे प्रतिनिधी असल्यामुळे ते तिघेही कोण कुठे राहतात, त्यांची वये किती होती ही चौकशी करणे व्यर्थच! लोककथांना स्थळ, काळ, अवस्था यांचे बंधन नसतेच लोककथेतील नर्म आणि वर्म सर्वप्रकारच्या समाजाला लागू पडते याच अर्थाने लोकसाहित्य हे सर्वांचेच असते. कोणा एकाचे ते नसते म्हणून तर ते सर्वांच्या उपयोगाचे असते!

# नारळी पौर्णिमा

*श्री. बालकराम वरळीकर*

हाराष्ट्र राज्याला अकराशे मैलांचा समुद्र किनारा मिळाला आहे आणि या किनारपट्टीवर अहोरात्र सागराशी झुंज देत आपले जीवन जगत असलेली ही क कोळी जमात आहे. त्यांचे राहणे वागणे, पेहराव सर्वांपेक्षा अगदी वेगळे सतात. तसे मासळी मारून काही सुखी, श्रीमंत तर बहुसंख्य जमात दुःखीच सते. ज्या प्रमाणे शेतकरी समाज फक्त चारच महिने शेतासाठी मेहनत रतो. पण कोळी जमातीतील स्त्री-पुरुष वर्षाचे बाराही महिने कष्ट करीत सतो. फावल्या वेळात बांधव जाळी विणणे, रंग देणे, होडीची डागडूजी रीत असतात तर भगिनी मासळी सुकविणे, साफ करणे पावसाळी बेगमी हणून व्यवस्थित करंडचात भरणे अशी कामे करीत असतात.

मध्येच लग्न, सण उत्सव आले म्हणजे नियमित साजरे करीत असतातच. र्षाकाठी एकविरा देवीची पालखी तर सोमवती अमावास्येला खंडोवाची लखी याला हजेरी लावणे वगैरे गोष्टी चालूच असतात. तसे कोळ्यांचे र्व सण सर्वसाधारण हिंदू धर्माप्रमाणेच प्रिय असतात. पण त्यातल्या त्यात ारळी पौर्णिमा, होळी आणि गणपती हे महत्त्वाचे सण व उत्सव मोठ्या मधडाक्यात साजरे करतात. या सणाच्या व उत्सवाच्या वेळेस वेगवेगळी णी आणि नृत्याचे प्रकार असतात. प्रथम आपण नारळी पौर्णिमा या बद्दल चार करू या.

नारळी पौर्णिमा म्हटली म्हणजे श्रावणातली मोठी पौर्णिमा. तेव्हा श्रावण हिना पाळणारी ( म्हणजे मांस मच्छि न खाणारी ) बहुसंख्य कोळी

जमातीतील मंडळी रोज संध्याकाळी प्रवचन (पोथी) आणि कीर्तनात भाग घेतात. काही ठिकाणी तर सप्ताह पाळत असतात. कारण कोळी जमात फार देवभोळी असते.

नारळी पौर्णिमेलाच चार महिने समुद्र किनाऱ्यावर चढवून ठेवलेल्या जहाजांची (होडयांची) प्रथम पूजा करतात. घरोघरी सकाळी रक्षाबंधन (राखी) बांधण्याची ही प्रथा फार मोठ्या प्रमाणात आहे. तसेच रस्त्या रस्त्यावर एक दुसऱ्याच्या हातावर नारळ फोडण्याचे प्रकार अगदी गर्दी गर्दीने आणि जिद्दीने सुरू असतात. दुपारी दर्यादेवाला म्हणजेच (सागराला) गोड जेवणाचे ताट (नैवेद्य) अर्पण केल्याशिवाय घरातील कोणीही जेवणार नाहीत. दुपारी गावातील हाक मारणारा (मडवी) सर्व गावकऱ्यांना संध्याकाळी गावाचा सोन्याचा नारळ दर्यादेवाला वाहण्यासाठी पाटलांच्या वतीने जाहीर निमंत्रण देत असतो. तो प्रत्येक चौकाचौकात वेंबीच्या देठापासून ओरडून हाक मारीत असतो. "ऐक लोक आज सांचा नारोल नेवाचा हाय. तवा वाजत गाजत जानाऱ्या पालखीसंगत सगल्यांनी आयलंच पाहिजे. जो कोन येनार नाय त्याला गावकी काय करेल ते सांगता येवाच नाय." अशी मड-व्याने हाक मारून झाल्यावर संध्याकाळी प्रत्येक पाटील आणि त्याच्या जमा-तीचे लोकांनी सुशोभित केलेल्या पालखीवर सोन्याचा नारळ ठेवून गावातून टाळ मृदंग भजनी मेळाव्यासहित काही ढोल ताशे, पिपाणी तर काही बँडच्या तालासुरावर वाजत गाजत पुढे स्त्री-पुरुष नाचत संध्याकाळी सूर्यास्ताबरोबर समुद्र किनारी नारळाची पूजा करून दर्यादेवाला (म्हणजे समुद्राला) अर्पण करतात आणि परततात. तसेच दुसऱ्या दिवसापासून चार महिने किनारी चढवून ठेवलेली जहाजे (होडया) सांघीक रीतीने पाण्यामध्ये उतरविण्यास एकमेकांस मदत करतात आणि आपला व्यवसाय (धंदा) सुरू करतात.

नारळी पौर्णिमा म्हटली म्हणजे कोळयांच्या जीवनातील एक फारच सुंदर असा दिवस असतो. पावसाळयापूर्वीचे वादळी वारे, त्यात मासेमारी करण्यास जड जाते, धोका असतो. अशा वेळी सर्व लहान मोठ्या होडया किनाऱ्यावर

ढवून त्या ताडपत्री किंवा झावळ्यांनी झाकून ठेवण्यात येतात. पण या दिवशी होडीची पूजा करून होडी समुद्रात लोटण्यात येते व प्रत्येक घरातून ागराला नैवेद्य म्हणून नारळाच्या गोड पदार्थांचे ताट अर्पण करण्यात येते. ायंकाळी कोळीवाड्यातून वाजत गाजत नेऊन नारळ समुद्रात टाकण्यात येतात. से म्हणतात की, पूर्वी सोन्याचा नारळ अर्पण करण्याची चाल असे. परंतु जूनही नारळावर सोन्याचे बेगड लावून तो समुद्रात सोडण्याची प्रथा आहे. शीच काही नारळी पौर्णिमेची गीते.

(१)

भाद्व्या महीन्याते पूनवेला रे रामा
धनी माझे गेले बारान डोलीला रे रामा
अवचीत सुटलाय वादली वारा रे रामा
धनी माझे कैसे येतीन घरा रे रामा
धन्याचे जीवावं संसार केलाय रे रामा
नारली पूनवेचे सनाला रे देवा
सोन्याचा नारल वावीन तुला रे देवा
धन्याचं होरं येऊंदे बंदरा रे देवा
रे देवा सुखरूप ये बंदराला
नवसाला खंडोबा पावलाय रे तारू लागलं बंदरा
नवसाला एकविरा पावलीय रे तारू लागलं बंदरा
लागलंय बंदरा, लागलंय बंदरा, लागलंय बंदरा

(२)

नारली पुनवेचा दिस आयलाय
हावलु मानकु जकल्या[1] चला

---

१. जकल्या–सर्व.

दर्याला पानी आता चरावचं हाय
सोने केंड्याला सांग डोली जावाचं हाय
घरान बसून आता चालावंच नाय
दर्यानं डोलीला जावाचं हाय
होरकं भरून म्हावरं येवाचं हाय
पारू बुगऱ्या नि बोरमाल करावची हाय
दारान मांडव सजवायचा हाय
पारू माझे बनसीचं[1] लगीन हाय
जेजुरीच्या खंडोबाला जावाचं हाय
पाल वर्षाचा नवस फेरावचा[2] हाय
मल्हारी राया तू नवसाला पाव
पुरचे वर्षाला पंढरी दाव

(३)

डोल डोलते वाऱ्यावं
बाय माझी डोल डोलते वाऱ्यावं
पुनवेचा चांद कैसा आयलाय[3] घरा
साद[4] घाली पाटलाच्या भांगऱ्या दादा
पुनवेच्या दिसा दर्याचे लाटावं
नारोल परलाय पाणी कमी झयलंय[5]
हायबाला कालिना हाय बाला कालिना
जकलय[6] नाखवा लोटीतिन मचवा
हिमतीनं काम कर जोर धर नाखवा

---

१. बनसीचं–बहिणीचं. २. फेरावचा–फेडायाचा. ३. आयलाय–आला आहे.
४. साद–हाक मारणे. ५. झयलय झालंय. ६. जकलय–सगळे.

जोसानं मार आता वल्हं रं मार आता जोसानं मार
खंडोबा राया पार आपली साया
मोत्याची रास[1] माझे होरक्यान[2] येवू दे
खंडोबाची पालखी जेजूरी चालली

## श्रावणी पौर्णिमा

सौ. शरदिनी मोहिते

श्रावण पौर्णिमेला साजऱ्या होणाऱ्या रक्षाबंधनासंबंधी प्रचलित असलेल्या अनेक कथांपैकी एक अशी ––

बलाढ्य बळीराजाचे वर्चस्व देवांना सहन झाले नाही. बळीराजाचा दरारा इतका प्रचंड प्रमाणात निर्माण झाला होता की, देवांची झोप उडाली होती. या बळीराजाचा नाश करण्यासाठी देवांना कपटाचा आश्रय घ्यावा लागला. बळीराजाने उभारलेल्या यज्ञ मंडपात जाऊन विष्णु वामनावतार धारण करून बटूच्या रूपात बळीराजापुढे उभा राहिला. बळीराजाने या तेजस्वी बटूचे कौतुक केले. बळीजवळ वामनाने फक्त तीन पावले जमीन मागितली. बळीने तीन पावले जमीन देण्याचे आनंदाने मान्य केले. पण दोन पावलातच बटूने पृथ्वी व्यापली आणि त्याला तिसरे पाऊल ठेवायला जागाच उरली नाही. तेव्हा बळीने आपले मस्तक वामनापुढे नमवले. वामनाने आपले

---

१. रास–ढीग. २. होरक्यान–होडीत.

पाऊल बळीच्या मस्तकावर ठेवले आणि त्याला पाताळात लोटले, अशा तऱ्हेने तिसरे पाऊल पूर्ण केले. वामनाने या प्रकारे कपटानेच बळीचे वाटोळे केले. अशा प्रकारे कपटाचा धनी झाल्याने वामनाला बळीच्या वाड्यावर द्वारपाल म्हणून राहावे लागले.

इकडे लक्ष्मीला विष्णूला शोधून काढल्यावाचून राहवेना. तिने नारदाचा सल्ला घेतला. नारदाने सांगितलेली युक्ती तिने अंमलात आणली. लक्ष्मी बळीच्या वाड्यावर गेली. साक्षात लक्ष्मी माता आपल्याकडे आलेली पाहून बळीला आनंद झाला. आणि त्याने तिला विचारले, "काय सेवा करू ?" लक्ष्मीने उत्तर दिले, "आज रक्षाबंधनाचा दिवस आहे. माझा भाऊ म्हणून आज मी तुला राखी बांधणार आहे. ती तू बांधून घे." बळीने आनंदाने राखी बांधून घेतली. आणि या गोष्टीची फेड कशी करावी म्हणून चौकशीही केली. त्यावर लक्ष्मी म्हणाली, "तुझ्या त्या द्वारपालाला तुझ्या सेवेतून तू मुक्त कर. तो माझा पती आहे." आपल्या दारावर असलेला द्वारपाल म्हणजे साक्षात विष्णूच आहे हे कळल्यावर बळीने त्याला आनंदाने मुक्त केले. आणि लक्ष्मीनारायणाचे दर्शन घेऊन तो धन्य झाला.

पूर्वीच्या काळी मंत्री राजाला राखी बांधत असे, राखी बांधताना मंत्री ज्या मंत्राचा उल्लेख करीत असे त्यातही बळीचा अशा प्रकारे उल्लेख असे –

येन बद्धो बली राजा दानवेन्द्रो महाबलं
तेन त्वामपि बन्धामि रक्षमा चल माचलो

(ज्या राखीने दानवांचा महापराक्रमी राजा बली याला बद्ध केले, आपलेसे केले, ती राखी मी तुला बांधीत आहे. माझे रक्षण कर. यात अंतर देऊ नकोस.)

# ऋषीपंचमी एक वेगळा विचार

श्री. कृ. भा. बाबर

ऋषीपंचमी हे एक व्रत आहे. ते स्त्रिया करतात. भाद्रपद शुद्ध पंचमीच्या दिवशी हे व्रत करतात. ह्या दिवशी स्त्रिया उपवास करतात आणि बैलाच्या कष्टाचे काहीही खात नाहीत.

भारतीय संस्कृति कोशात ह्या व्रतासंबंधी माहिती दिली आहे ती अशी—

> "स्त्रियांचे एक व्रत. स्त्रिया सकाळी उठून नदीवर जाऊन आघाड्याच्या काड्यांनी १०८ वेळा दात घासतात. नंतर तितक्याच वेळा नदीत बुड्या मारतात किंवा तितके वेळा तांब्ये अंगावर ओततात. घरी आल्यावर एका पाटावर तांदुळाच्या आठ पुंज्या घालून त्यावर कश्यपादि सात ऋषी व एक अरुंधती यांच्यासाठी आठ सुपाऱ्या मांडतात. नंतर संकल्प करून षोडशोपचारे पूजा करतात. मग ऋषींचे विसर्जन करतात. या दिवशी स्त्रिया कंदमुळाचा आहार करतात व बैलांच्या श्रमांचे काहीही खात नाहीत."

हे व्रत सात वर्षे केल्याने अज्ञानस्थितीत घडलेल्या विटाळाचा दोष जातो.

इतर अनेक लेखकांनी ह्या व्रताबद्दल लिहिताना रजस्वला म्हणजे विटाळशी झालेल्या स्त्रियांच्या हातून जे स्पर्शादिस्पर्शाचे दोष घडलेले असतात, त्यांचे पाप नाहीसे होण्यासाठी हे व्रत करावयाचे असते असे म्हटलेले आहे. आणि त्यासाठी मग काही कथाही दिलेल्या आहेत. ह्या कथा परंपरेने चालत आलेल्या आणि अर्थातच बहुतेक काल्पनिक असतात.

ऋषीपंचमीच्या ह्या व्रताबद्दल काही दिवसांपूर्वी ह्या व्रताच्या दिवशी मुंबईच्या नवाकाळ पत्राने आपल्या अग्रलेखात एक वेगळा विचार मांडलेला आहे. ह्या पत्राने म्हटले आहे की, हा दिवस पुरुषांनीही पाळावा आणि तो वेददिन म्हणून पाळावा.

वेद म्हणजे ज्ञान. हिंदू लोकांच्या प्राचीन धर्मग्रंथांना वेद म्हणतात. हे वेद चार आहेत. ते ऋषींनी रचलेले आहेत. ह्या वेदांमध्ये त्याकाळचे बरेचसे ज्ञान आहे.

आजही आपण ऋषी शब्द वापरतो. ज्ञानी किंवा एखाद्या विशेष कामासाठी तपश्चर्या केलेल्या माणसांना आपण हा शब्द लावतो. महर्षि अरविंद, महर्षि कर्वे, महर्षि अण्णासाहेब शिंदे इत्यादी.

फार वर्षांपूर्वीच्या काळापासून ऋषी शब्द प्रचारात आहे. जुन्या काळीही ज्ञानी माणसांसाठी तो वापरला जात होता.

तेव्हा ऋषीपंचमीच्या दिवशी वेददिन पाळावा व ऋषींची आठवण करून आपण ज्ञानाची उपासना करावी. ऋषींच्याबद्दल आदर व्यक्त करावा, हे अधिक शहाणपणाचे होईल.

नाहीतरी रजस्वला स्त्रीने आपल्या हातून कळत नकळत स्पर्शास्पर्श दोष घडले असतील, तर त्याचे परिमार्जन करण्यासाठी ऋषीपंचमीची निवड का केली आहे कळत नाही ! रजस्वला स्त्रीला ऋषीची आठवण कशाला व्हावी?

रजस्वला स्त्रीच्या हातून स्पर्शास्पर्श दोष घडत असतो, ह्या समजुतीलाच काही अर्थ नाही. रजस्वला स्त्रीच्या शरीरातून काही दूषित रक्त बाहेर जात असून ती अधिक शुद्ध होत असते, तथापि काहीसा अशक्तपणा येत असतो. म्हणून तिला भारी किंवा श्रमाची कामे करायला लागू नयेत अशी परिस्थिती निर्माण होते आणि तिला काहीसा विसावा मिळेल असे करणे हे योग्य ठरते. पण तिच्या शिवाशिवीत दोष कसला आहे ? काही सनातनी हिंदू स्त्रियांखेरीज जगातील कोणीही स्त्रिया पाळीच्या काळात वेगळ्या बसत नाहीत. आणि

आपल्या देशातही आता शिकलेल्या मुली व नोकरी करणाऱ्या बायका ह्या काळात सुटचा घेत नाहीत.

म्हणूनच आता ऋषीपंचमीचे व्रत स्त्रियांनी पाळणे हे एक वेडगळपणाचेच लक्षण ठरल्याशिवाय राहणार नाही.

तथापि ऋषीपंचमीचा दिवस वेददिन किंवा ज्ञानदिन म्हणून सर्वांनीच पाळायला हरकत नाही. गुरूपौर्णिमा किंवा व्यासपूजेचा दिवस हा अशाच जातीचा दिवस आहे.

ऋषी म्हणजे तपश्चर्या करणारा पुरुष. तप म्हणजे बारा वर्षांचा काळ चर्या म्हणजे वागणूक. एखादे काम हाती घेऊन ते सतत बारा वर्षे करीत राहिल्यास त्या कामाचा अभ्यास होतो व ते चांगल्या प्रकारे पार पडते. म्हणून पुष्कळ काळ एखादे काम करीत राहणे ह्याला तपश्चर्या म्हणतात. खेड्यातील सामान्य स्त्री सुद्धा बोलताना म्हणते की, बारा न् बारा चोवीस वर्षे मी ह्या घरात नांदते आहे. म्हणजे बारा वर्षांचा काळ हे एक काळ मोजायचे पूर्वीचे माप आहे. त्या मापालाच तप असे नाव आहे.

ऋषी किंवा ज्ञानी लोकांनी पुष्कळ काळ एखाद्या विषयाचा ध्यास घेऊन किंवा अभ्यास करून अनेक प्रकारचे शोध लावले आहेत. आपण, ज्या जगात राहतो ते जग व त्या जगाचा उत्पत्तीकर्ता कोणी असलाच तर तो ह्यासंबंधी ऋषीमुनींनी अनेक वर्षे विचार करून काही कल्पना निश्चित केल्या व त्या लोकांपुढे मांडल्या. ह्या कल्पनांनाच पुढे ज्ञानाचे स्वरूप आले. वेद आणि त्यांच्यानंतर तयार झालेली उपनिषदे ह्यांच्यातील ज्ञान हे अशाच प्रकारे निर्माण झालेले आहे. ज्ञानाचे शुद्ध स्वरूप विशेषतः उपनिषदातून आढळून येते.

ईशावास्योपनिषदातील आरंभीचे मंत्र पहा–

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।<br>
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवाव शिष्यते ॥

ह्याचा अर्थ, ते (ब्रह्म) पूर्ण आहे, हे (ब्रह्म) पूर्ण आहे. पूर्णापासून जे उत्पन्न होते तेही पूर्णच. पूर्णामधून पूर्ण वजा केले असता बाकीही पूर्णच राहते.

ते म्हणजे आपणापासून दूर जे काही दिसते ते सारे पूर्ण आहे आणि हे म्हणजे आपल्याजवळ किंवा आपल्यामध्ये जे काही आहे तेही पूर्णच आहे. असे ह्या मंत्रात सांगितलेले आहे, याचा अर्थ ब्रह्म किंवा ईश्वरी शक्ति, चैतन्य, सर्वत्र भरून राहिले आहे. कोठेही काही उणे नाही. असे हा मंत्र सांगतो.

हे मंत्र सांगणाऱ्या ऋषीने केवढे मोठे तत्त्वज्ञान त्याकाळी सांगून ठेवले आहे बरे ?

ह्या उपनिषदातील पुढील मंत्र पहा–

ॐ ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ।।

याचा अर्थ, या पृथ्वीवर ज्याला म्हणून जीवन आहे ते सर्व परमात्म्याने आच्छादलेले आहे. नामरूप कर्म असलेले जे जे वस्तुमात्र आहे त्याचा त्याग-बुद्धीने उपभोग घे. कसल्याही धनाचा मोह धरू नकोस.

जीवनाचे हे मोठे तत्त्वज्ञान आहे. हे सांगणारा ऋषी खराच ज्ञानी पुरुष असला पाहिजे यात शंका नाही. अनेक ऋषींनी अशाप्रकारे इतर ज्ञान सांगून ठेवले आहे.

तेव्हा अशा ऋषींचे स्मरण करून कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आणि आपसात चर्चा करून ज्ञानगंगा सतत वाहती ठेवण्यासाठी ऋषीपंचमी या दिवसाचा उपयोग करता येईल.

आजही नवेनवे शोध लावून जगाचे कल्याण करणारे ऋषीमुनी आपल्या देशात व पृथ्वीतलावर इतरत्र आहेत. त्यांच्यापैकी एखाद्याचा उपयोग करून घेऊन ऋषीपंचमी मोठ्या प्रमाणावर साजरी करता येणे शक्य आहे.

नाहीतरी शास्त्रज्ञ किंवा तत्त्वज्ञ लोकांचे मेळावे आजही कोठे कोठे भरतातच की ? ऋषीपंचमीचा दिवस त्यासाठी प्रमुख ठरवून काही काम झाले तर उपयुक्त होईल.

हा एक काहीसा वेगळा विचार आहे, असे मला वाटते.

# हरतालिका व्रत

सौ. उषाताई माटे

ब्रह्मदेवाची उत्पत्ती झाल्यानंतर सृष्टीची वाढ होण्यासाठी त्यांनी दहा मानसपुत्र उत्पन्न केले व नऊ पुत्र व एक कन्या अशी दहा अपत्ये आपल्या शरीराच्या अवयवांपासून उत्पन्न केली.

दक्ष प्रजापती ब्रम्हदेवाने आपल्या हाताच्या अंगठ्यापासून उत्पन्न केला. या प्रजापतीने अनेक रूपाने सृष्टीच्या उत्पत्तीची वाढ केली. ह्यानं आपली दाक्षायणी नामक कन्या ही शंकराला दिली.

एकदा देवलोकी सभा भरली असता दक्ष प्रजापती तिथे गेले. त्यावेळी सर्व सभेने उठून त्यांचे स्वागत केले. पण शंकर बसूनच राहिला. तो राग दक्षाच्या मनात कायम राहिला होता. वैदिककाळी यज्ञयागाचं महत्त्व होतं. दक्षाने पण यज्ञ करण्याचे ठरविले. सर्वांना आमंत्रणे गेली. सर्व देवमंडळी आपापल्या स्त्रियांसह यज्ञाला जमली होती. दाक्षायणीच्या सर्व वहिणी पण

आपल्या यजमानांच्यासह जमल्या होत्या. सर्व ऋषीमुनींचे वेदपठण सुरू होते. दक्ष आपल्या पत्नीसह यजमानपद स्वीकारून यज्ञकर्म करीत होता. प्रत्येकाला मंत्रयुक्त आहुती दिली जात होती.

श्री शंकर कैलास पर्वतावर दाक्षायणीसह आनंदात होते. आकाशातून मंजूळ स्वरांचे आवाज व विमाने जात होती. त्यातच नारदाची स्वारी कैलास पर्वतावर आली. शंकरानी उठून स्वागत केले. नारद दाक्षायणीला म्हणाला, " तुझ्या माहेरी यज्ञ आहे तू इथे कशी ? " तेव्हा शंकराना बोलावणे नाही हे कळून आले ! पण कदाचित चुकून राहिले असेल तेव्हा जायला हरकत नाही म्हणून नेहमीप्रमाणे कलह उत्पन्न करून नारद निघून गेले. शंकर नको नको म्हणत असताना ही दाक्षायणी हट्टानं माहेरी गेली. तिथे सर्वांचा मानसन्मान चाललेला तिने पाहिला. तिच्या पित्याने तिच्याकडे पाहिलेसुद्धा नाही! तर मग स्वागत कुठले ? मंडपात शंकराचे स्थान रिकामे पाहून ती अतिशय चिडली. दक्षासह सर्व ऋषीमुनींची तिने निर्भत्सना केली. तिचे स्वरूप त्यावेळी एखाद्या प्रलयरूपिणी सारखे दिसत होते.

यज्ञमंडपात तिने गर्जून सांगितले की, जिथे माझ्या पतीचा अपमान झाला आहे तो यज्ञ मंडप या यज्ञासह विध्वंसून जाईल हे लक्षात ठेवा. माझ्या पतीची नेहमी निंदा करणारा हा दक्ष–माझा पिता–याचाही या यज्ञात शेवट होईल आणि या पित्यापासून हा माझा देह उत्पन्न झाला आहे म्हणून मी त्या देहाचाही या यज्ञात उडी घेवून शेवट करणार ! एवढे बोलून तिने त्या यज्ञात उडी घेतली !

या प्रसंगाने मोठाच गोंधळ उडाला. शिवगणांनी यज्ञमंडप उध्वस्त करून दक्षाचे शीर उडवले. पण सर्वांच्या विनंतीने एक बोकडाचे शीर लावून त्याला जिवंत केले.

आपल्या प्रिय पत्नीचा यज्ञात शेवट झालेला ऐकून शंकर उद्वीग्न झाले व तप करण्यासाठी एका पर्वतावर निघून गेले. आपल्या पतीवर दाक्षायणीचे

अत्यंत प्रेम होते म्हणून ती हिमालय पर्वताचे पोटी जन्माला आली. हिमवान व मैना यांना ही कन्या फार तपश्चर्या करून झाली होती. ही प्रत्यक्ष आदि-शक्तीच्या रूपाने तुमच्या पोटी आली हे नारदांनी पण सांगितले होते.

हिमाचल प्रदेशातील हिमवान राजाची ही कन्या. तेव्हा तिचे ऐश्वर्य काय वर्णन करायचे ? सर्वगुणसंपन्न अशी ही कन्या राजाची अत्यंत लाडकी होती. कन्या वर्षाची, दोन वर्षाची, तीन वर्षाची, चार वर्षाची झाली. अशा तऱ्हेने ती वाढत असता राजाला आता तिच्या लग्नाची काळजी वाटू लागली. आपल्या बाळ मैत्रिणींसह खेळताना–हिंडताना–नटताना–मुरडताना तिला पाहून त्याला धन्य वाटायचे आणि हे रत्न दुसऱ्याला द्यायचे याबद्दल दुःखही व्हायचे ! अशा परिस्थितीत असतानाच नारदाची स्वारी झाली. राजसिंहासना-जवळच हे कन्यारत्न होते. नारदांनी लगेच भविष्य सांगितले, "ही तुझी कन्या एका तपस्व्याचा पती म्हणून स्वीकार करील ! ही कन्या आदिशक्तीचे रूप आहे." राजाला ही गोष्ट तितकीशी पसंत पडली नाही. तो म्हणाला, "मुनी-वर्य, हिला एखाद्या रूपवान, धनवान, सर्वगुणसंपन्न असा पती मिळावा अशी माझी इच्छा आहे." "तर मग राजा, त्या भगवान विष्णूशिवाय दुसरा हिच्या योग्य असा वर माझ्या तरी पाहण्यात नाही." अशा तऱ्हेची चाललेली आपल्या लग्नाविषयीची बोलणी पार्वती ऐकत होती. आदल्या जन्मीच्या संस्कारामुळे तिची शंकरावर भक्ती होती.

विष्णूंना आपल्याला देण्याचा आपल्या आईवडिलांचा निश्चय तिने ऐकला. पण याला काय उपाय करायचा हे तिला समजेना. तिला अशी उदास पाहून तिच्या सख्या तिला त्याचे कारण विचारायच्या, "काय ग पार्वती, तू अशी उदास का दिसतेस ? मनातलं सांगायला संकोच करू नकोस. मी त्याला उपाय सांगेन". पार्वतीने मग सर्व हकीकत तिला सांगून 'शंकराशिवाय मी कुणाचाही पती म्हणून स्वीकार न करण्याचा आपला निश्चय असल्याचे सांगितले. आणि तूच माझी या संकटातून मुक्तता कर' अशी तिची विनवणी केली.

पार्वतीचा हा निश्चय ऐकून सखी म्हणाली, "चल, आपण वनात जाऊ. तू तप करून शंकराना प्रसन्न करून घे." अशा तऱ्हेने त्या दोघी त्या राजवाड्यातून बाहेर पडून वनाच्या रस्त्याला लागल्या. त्या कुठल्याही संकटाला डगमगल्या नाहीत की निश्चयापासून ढळल्या नाहीत. पार्वतीने तर शंकराचे लिंग स्थापन करून त्याची पूजा केली व उपोषणाला सुरुवात केली. इकडे आपली लाडकी लेक घरातून नाहीशी झालेली पाहून राजा व सर्वजण चिंताक्रांत झाले. जिकडे तिकडे शोधाशोध सुरू झाली. कुणालाच अन्नपाणी सुचेना. इकडे पार्वती तर तपश्चर्येत मग्न होती. श्रीशंकराशिवाय तिला कोणी दिसेना. तिने कंदमुळे, झाडाची पाने, पाणी व शेवटी तर वारा भक्षण करून तप केले. तर थंडीत थंड पाण्याने तर उन्हाळ्यात अग्नी पेटवून अशी तपश्चर्या केली. हे तप इतके प्रखर झाले की, तिच्या तेजाने पृथ्वी तप्त झाली ! सर्व ऋषीमुनी, देवगण, शंकराला विनवू लागले की, आता तुम्ही पार्वतीचे पाणिग्रहण करा. तिचा पक्का निश्चय आहे. इकडे राजा अगदी हवालदिल झाला असता एका अरण्यात तपश्चर्येला बसलेली आपली कन्या त्याने पाहिली. ती कृश परंतु तेजस्वी दिसत होती. राजाने कन्येला तर मिठीच मारली. पार्वतीने पण वडिलांच्या पायांवर डोके ठेवले. शंकरांना तिला देण्याचे वचन दिल्यावर मोठ्या आनंदाने तो पार्वतीसह घरी आला आणि थाटामाटात शंकर पार्वतीचे लग्न झाले. या वृत्तांतावरून असे दिसून येते की, कुठल्याही गोष्टीत निश्चय, एकनिष्ठा, त्याग या गोष्टी असल्या तर नक्कीच आपले इप्सित आपल्याला मिळते.

पार्वतीला तिच्या या व्रतामुळे जसे इच्छित फळ प्राप्त झाले तसे आपल्याला मिळावे व तिची स्मृति रहावी यासाठी या व्रताचे पुढे रूढीत रूपांतर झाले. या व्रताचा पूजाविधी असा आहे की, सखीसह पार्वतीच्या दोन मूर्ती व एक शिवलिंग यांची ब्राह्मणाकडून प्राणप्रतिष्ठा करून त्या चौरंगावर ठेवाव्यात. केळीचे खांब लावून ते स्थान शोभिवंत करावे. शोडशोपचारे त्याची पूजा करावी. सुवासिक फुले, दुर्वा, बेल, तुळस वाहावी. बांगड्या, गळेसर ही सौभाग्य चिन्हे वाहावीत. सुवासिनींच्या ओटचा भराव्यात. आरती करावी, ध्यानस्थ बसून गौरीमहेश्वराचे ध्यान करावे. पूर्वीच्या काळी

दिवशी चुलीला लावलेले काही खात नसत. त्यातला हेतू फळफळावळ
ऊन दूध पिऊन नैसर्गिक जीवन जगावे. अशाने तिखटमीठ आपोआपच
र्य होते. मुख्य म्हणजे तिचे गुण आपल्यात आणण्याचा प्रयत्न करावा.
त्री जागरण करावे. नाना तऱ्हेचे खेळ खेळावे. गाणी म्हणावी. अशा तऱ्हेने
 दिवस तरी एकत्र येवून सर्वांनी जीवनाचा आनंद लुटावा व आरती करून
ाची सांगता करावी. आपल्या सर्व शक्तीमान अशा महादेवाची प्राप्ती
वी म्हणून पार्वतीने जे व्रत केले त्या व्रताला हरतालिका असे म्हणतात.

# निरनिराळ्या व्रतांच्या कथा

सौ. इंदिरा कुलकर्णी

## १. बुध, बृहस्पतीच्या व्रताची कथा

देवांचे वंदनीय गुरू, बुध व बृहस्पती यांच्यावर नितांत निष्ठा ठेवून पूजा
यामुळे एका स्त्रीचा कसा उद्धार झाला ती ही कथा आहे. विश्वास,
ठा, सोशिकता यांच्या विजयाची. एकाद्या गोष्टीसाठी निधीध्यास धरल्याने,
 एकाग्रता एकत्रित केल्याने, असाध्य गोष्टही कशी साध्य होते ते या कथेत
ण्यासारखे आहे.

हे अलौकिक व्रत गुरूंच्या स्मरणार्थ श्रावणमासात आचरायचे असते. सुज-
् सुफलाम् अशा धरित्रीच्या आवडत्या श्रावणातल्या दर बुधवारी व गुरू-
ी बुध बृहस्पतीची मनोभावे पूजा करायची. त्याने मनी इच्छिलेले पूर्ण
. मात्र निष्ठा हवी. दोन बाहुल्या कागदावर, पाटावर किंवा भिंतीवर

काढून त्यांना गुरूरूप मानून त्यांची शोडशोपचारे पंचामृत पूजा करावयाची. ब्राह्मणास भोजन द्यायचे. ह्या व्रताने मानवास सर्व सुखे प्राप्त होतात, इच्छित हेतू साध्य होतात.

ज्या स्त्रीला तिच्या एकनिष्ठ सेवेने बुध बृहस्पती प्रसन्न झाले ती कथा अशी –

एक आटपाट नगरी होती. त्या नगरीत एक सावकार राहत होता. घरात समृद्धी नांदत होती. चार मुलगे, चार सुना, असा संतती, संपत्तीचा वास त्या घरात होता. पण –

पण सर्वांत लहान सुनेला सासू फार जाच करीत होती. कारण ती जरा गरिबाची होती म्हणून ! तसे पाहिले तर ती चौघी सुनात गुणवान होती. पण कितीही काम केले तरी तिचा जाच सुटत नव्हता. रात्रंदिवस बिचारी मुळूमुळू रडे नी काम करीत राही.

अशीच ती एके दिवशी उन्हाची धुण्याचा गठ्ठा घेऊन नदीवर धुवायला गेली होती. धुवून धुवून दमलेली ती बिचारी थोडावेळ रडत बसली. तेवढ्यात तिकडून दोन तेजःपुंज पुरुष तिच्या जवळ आले. तिला रडताना पाहून त्यांना वाईट वाटले. ते म्हणाले, "मुली तू का रडतेस ?"

'अं? . . .आपण कोण आहात ?'

'तू का रडतेस ते सांगशील का ? मग आम्ही कोण ते सांगू ? '

'बाबा मी सांगते, पण सांगून काय उपयोग ? माझा जाच तुम्ही कसा कमी करणार ? माझी सासू मला सारखी कामाला जुंपते. जुंपुदे, कामाने काही माणूस मरत नाही. पण उपाशी ठेवते हो ? मारझोडही विनाकारण करते. आजही मी उपाशीच आहे. शिव्या द्यायच्या, मारायचे, उपाशी ठेवा-यचे मग नाही का हो माहेरच्या आठवणीने रडू येणार ? तरी बघा रडायची पण सोय नाही ! लगेच मार पडतो.'

'वरं बरं पोरी, तू शहाणी दिसतेस. आम्ही सांगू ते एक करशील का ?'

'हो करीन की !'

'असं कर, येत्या बुधवारी दोन बाहुल्या भिंतीवर गंधाने काढ आणि त्यांची मनापासून भक्तीने पूजा कर. मग बघ काय होते.'

'बरं वरं करीन हो, त्यानं माझा छळ तरी कमी होईल ना ?'

'हो नक्की होईल.'

दुसरे दिवशी बुधवार होता. सकाळी उठली सारे काम आवरले. अंग धुवून स्वच्छ झाली नी जवळपास कोणी नाही असं पाहून भिंतीवर बाहुल्या काढू लागली, जणू तिच्या पाळतीवर असल्यासारख्या जावा तिथे हजर झाल्या. ताबडतोब त्यांनी आपल्या सासूला लहानी काहीतरी मंत्रतंत्राचं भुताखेताचं, करते आहे असे सांगितले. आधीच सासूची नावडती त्यात हे अभद्र कळल्यावर तर काही बघायलाच नको. छोटीला त्या दिवशी खूपच मार पडला.

पण काम कुठे चुकले ? ती नदीवर जाऊन, धुणे दगडावर ठेवून, आपल्या शिवाला आठवून रडत बसली. पुन्हा ते कालचे दोघे आले. चौकशी केली. मग म्हणाले, "मुली उद्या गुरूवार आहे. तू असं कर. दाराआड बाहुल्या काढ व पूजा कर, म्हणजे कुणाला दिसणार नाही."

पण केर काढताना तेही जावांना दिसलेच ! सासूजवळ चहाड्या झाल्या नी कालच्या सारखेच आजही घडले.

पुन्हा नदीवर बुध बृहस्पती आले. म्हणाले, "आता असे कर आघाड्याच्या पानावर आमच्या प्रतिमा काढ, पूजा कर व ती पाने निऱ्यात ठेव."

पण तिच्यावर डूख धरून बसलेल्या श्रीमंत माहेरच्या त्या दुष्ट जावांनी तिची तीही पूजा उधळून टाकली ! मग मात्र धाकटी फार निराश झाली.

बिचारी धुणे घेऊन नदीच्या काठावर रडत बसली. धुणे धुवायचेही तिला सुचेना. एकनिष्ठपणे पूजा करण्याची इच्छा असूनही तिची पूजा घडू देत नाहीत म्हणून बुधबृहस्पतींना वाईट वाटले. शेवटी त्यांनी एक अंगठी दिली व म्हणाले, " ही तुझ्या नवऱ्याच्या शेंडीत बांध. याने तुझा छळ कमी होईल. " डोळे पुसत तिने ती अंगठी पदरात बांधून ठेवली, धुणे आवरून घरी आली व रात्रीची वाट पाहू लागली.

सर्वजण झोपल्यावर ती नवऱ्याजवळ आली नी गुपचुप ती अंगठी तिने नवऱ्याच्या शेंडीत बांधली. तशी काय नवल घडले बघा ! दुसरे दिवशीपासून नवरा तिचेशी चांगला वागू लागला. जरी सासू खूप छळत होती तरी नवऱ्याच्या प्रेमळ वागणुकीने तिला बरे वाटत होते. जाच सहन करायला थोडे बळ रहात होते.

एकेदिवशी अशीच उगाचच सासू संतापली, हवेतसे तिला बोलू लागली. तेव्हा तिच्या नवऱ्याला सासूचा राग आला. 'तू तिला बोलू नकोस' असे आईस म्हणाला. कधीही एक अक्षर न बोलणारा आपला मुलगा बायकोचा कैवार घेऊन बोलतो आहे हे पाहून सासूच्या अंगाची आग मस्तकाला पोचली ! ती काठी घेऊन मुलाला मारू लागली.

मुलगा रागावला नी रागारागाने घरातून निघून गेला. चालत चालत, मजल दरमजल करीत तो भुकेला मळलेला, मळक्या फाटक्या कपड्यातला, एका गावाच्या वेशीत दमून भागून बसला. तेथेच त्याला झोप येऊ लागली. एवढ्यात त्याला गलका ऐकू आला. पाहतो तो एक हत्तीण सोंडेत माळ घेऊन त्याच्या रोखाने येत होती. मागून खूप माणसे येत होती.

हत्तीण जवळ आली आणि ह्या वाटसरूच्या गळ्यात तिने माळ घातली ! तो तर बावरूनच गेला ! त्याला काहीच कळेनासे झाले.

काय झाले होते ? त्या गावचा राजा वारला होता. पोटी संतान नव्हते, कुणीच राज्याला वारस नव्हते व वारस गादीवर बसविल्याखेरीज प्रेतदहन

करणे शक्य नव्हते. म्हणून हत्तीण ज्याच्या गळ्यात माळ घालील त्या व्यक्तीस राज्याभिषेक करायचा व नंतर राजाचे प्रेत दहन करावयाचे होते.

मात्र या पांथस्थास माळ घातलेली पाहून लोक म्हणाले, "हा बावळट काय राज्य करणार? पुन्हा हत्तीणीच्या सोंडेत माळ द्या." त्याप्रमाणे तीन वेळा हत्तीणीच्या सोंडेत माळ दिली, पण तीनही वेळा तिने ह्याच माणसाच्या गळ्यात ती घातली.

मग मात्र लोकांनी त्याला राजवाड्यात नेले. न्हाऊ धुऊ घातले.

इकडे त्याच्या घरी मात्र बुध बृहस्पतीच्या कोपाने म्हणा किंवा काही म्हणा अन्नान्न दशा आली. सारी श्रीमंती गेली. खायला अन्न मिळायची भ्रांत पडली. कुठेतरी कामधंदा शोधण्यासाठी सारे प्रयत्न करू लागले.

एके दिवशी परड्यात परसाकडेला चौघी जावा गेल्या असता भुकेने सुकलेल्या तिघी जावा म्हणाल्या, 'गडे कुठे का होईना आपण काम करू नी पोटाला मिळवूया.' तेव्हा छोटी म्हणाली, 'मला नाही तसे वाटत. मला वाटते, मोठ्ठे ब्राह्मण भोजन घालावे, मी तुपाचे भांडे घेऊन वाढावे नी त्यावेळी माझ्या कंठातला कंठा तुटावा आणि तुम्ही त्याचे मोती वेचावेत.'

हे ऐकताच साऱ्या म्हणाल्या, 'आहा ग भिकारडे! वेळेवर भाकरी मिळेना ती ही भिकारीण लागली ब्राह्मण भोजन घालायला, तोंड बघा मेलीचं?'

सर्व दूरच दुष्काळ पसरला होता म्हणून या सुनेच्या नवऱ्याने, म्हणजे नवीन राजाने, सर्वांना काम करून तरी पोटभर अन्न मिळावे ह्या सद्हेतूने दुष्काळी कामे सुरू केली. त्यासाठी गावोगावचे मजूर कामाला येऊ लागले. एके दिवशी पहाणी करीत असता राजाला आपल्या घरची माणसे मजुरी करताना दिसली! त्याला वाईट वाटले.

त्याने आपली ओळख दिली नाही व त्यालाही त्या वैभवात कुणी ओळखले नाही. मात्र राजाने आपल्या आईवडिलांना वेगळे काम नेमून दिले.

धान्याने भरलेल्या ह्याऱ्यातून भिकाऱ्यांना धान्य द्यावयाचे काम त्यांना दिले, तसेच बायकोला आपल्या तैनातीला ठेवले.

एक दिवस राजाला तेल लावताना तिला त्याच्या शेंडीत अंगठी दिसली. तिला आपल्या नवऱ्याच्या आठवणीने हुंदका आला. सेवा करताना रडू आले म्हणून तिने त्याची क्षमा मागितली.

शेवटी राजाने ओळख दिली. ती राणी झाली. ब्राह्मण भोजन घातले. तुपाचे भांडे हाती घेऊन तिने वाढले. पंगतीत कंठा तुटला, जावा मोती वेचण्यास धावल्या. सारे मनासारखे झाले. बुध बृहस्पतीच्या निष्ठेने केलेल्या पूजेला, सेवेला, चांगले फळ आले.

साऱ्यांनाच योग्य कामे वाटून दिली. ते आनंदात राहू लागले. असे हे व्रत, असा हा सण, निष्ठेने पुजायचा नी भरभरून सुखाची प्राप्ती करून घेण्याचा.

## २ व्रत जिवंतिकेचे

आपल्या भारतीय परंपरेत सण उत्सव इत्यादी धार्मिक कार्यांना अनन्य साधारण महत्त्व आहे. कारण ह्यातूनच आपल्या सामाजिक जीवनात संस्काराचे शिक्षण मिळते.

म्हणूनच पूर्वजांनी सामाजिक जडणघडण सुघटित होण्यासाठी विचारपूर्वक विधियुक्त सण, उत्सव साजरे करण्यासाठी संहिता लिहून ठेवल्या आहेत.

पाडवा, दसरा, दिवाळी इत्यादि सण सामुदायिकपणे साजरे करावयाचे सण आहेत. यातून आनंद, एकतेची भावना, आपुलकी, सहकार्य यांचे आपोआपच शिक्षण मिळते.

या सर्व सणात माझ्या दृष्टीने अधिक महत्त्वाचा वाटणारा, मातेने आपल्या अपत्यासाठी करावयाचा सण, म्हणजे व्रत, जिवतीदेवीचे ( जिवंतिकेचे ). ही पूजा प्रत्येक माता श्रावणातल्या दर शुक्रवारी मनोमनी जिवतीदेवीची प्रतिमा कल्पून त्याची मनोभावे पूजा करते. ही देवी बाळाची रक्षणकर्ती आहे. मुलांना

जीवदान देणारी आहे. म्हणूनच ह्या सणाचे मातेच्या दृष्टिकोनातून अनन्य-साधारण महत्त्व आहे. माता श्री देवीची स्थापना करून हळदकुंकू, फुले, दुर्वा, तुळस, आघाडा, गेजावस्त्रे, अक्षता वाहून पुरणाच्या आरतीने देवीला ओवाळते नी मनोभावे आपल्या बाळासाठी औक्षण करून आयुष्य मागते. पुरणावरणाचा सैपाक करून सवाष्णीला जेवू घालते नीं अनेक व्रतांनी कटिबद्ध राहते. हे बाळाचेसाठीचे व्रत वर्षानुवर्षे माता करीत आल्या आहेत.

हे व्रत कधी सुरू झाले हे सांगणे कठीण पण कसे सुरू झाले त्याची गोष्ट सांगणार आहे. ही फार फार जुनी कथा आहे. एका निष्ठावंत मातेची आणि तिच्या सत्‌शीला पुत्राची.

एका नगरीत राजाराणी सुखाने राज्य करीत होते. वैभव, समृद्धी सर्व सुखे पायाशी लोळत होती. प्रजा सुखी होती. सारे म्हटले तर आबादी आबाद होते. पण राजाराणीच्या पोटी मूलबाळ नव्हते. खूप प्रयत्न करूनही अपत्यसुख मिळाले नाही. त्यामुळे सारी सुखे त्यांना शून्यवत वाटत होती. ती दोघे सततच उदास निराश दिसायची. कशातच त्यांचे मन लागत नव्हते. अशा बेचैनीत त्यांचे दिवस जात होते. एक दिवस राजा फारच उदास झाला आणि वैतागून दूर जाण्यासाठी बाहेर पडला. राणीला खूप वाईट वाटले. पण काय करणार ? परंतु काहीतरी सामान राहिले म्हणून राजाचा नोकर ते नेण्यास परत आला. तेवढ्यात राणीला एक धाडसी विचार सुचला. ती नोकराला म्हणाली, 'अरे महाराजांना सांग, मला तीन महिने झालेले आहेत. (त्यांना) म्हणावं परत या.'

राजा अत्यानंदाने परत आला. पण पुढे काय ? अशा विचाराने राणीचे डोके भांबावून गेले. डोके फुटायची वेळ आली, संकटेच संकटातून वाट काढायची युक्ती सुचवितात हे खरे. राणीकडे रोज एक माळीण हार गजरे घेऊन यायची, राणीने तिला आपल्या कटात सामील करून घ्यायचे ठरविले. पुष्कळ संपत्ती देण्याच्या व्यवहाराने माळीण कबूल झाली. राणीने तिला आपला विचार सांगितला.

माळणीने नगरात बराच शोध केला तेव्हा तिला एक भटीण गरोदर असल्याचे समजले. तशा पुष्कळ दिसल्या पण आपल्या बेताशी जमेल अशी गरीब भटीण तिला योग्य वाटली. ती भटिणीकडे जाऊन म्हणाली, 'बाई, तुझी गरीबी, तेव्हा तुझे बाळंतपण मी फुकट करीन. योग्य वेळ आली की मला बोलाव हं?' भटणीला ही घर बसल्या अनुभवी नी मोफत बाळंतपण करणारी सुईण मिळाली म्हणून आनंद झाला. तिने माळणीला बोलावण्याचे ठरविले.

इकडे माळिणीने राणीला सारी हकीकत सांगितली व गर्भारपणाचे सोंग बरोबर वठविण्यास सांगितले. त्याप्रमाणे राणी दर महिन्याला लुगड्याची एक एक जास्त घडी पोटावर बांधू लागली.

ठरल्याप्रमाणे एक दिवस भटणीचे पोट दुखू लागले. लगेच तिने माळिणीला निरोप धाडला. ताबडतोब सावधपणे माळणीने आधी वाड्यात येवून राणी-साहेब आता तुमचे पोट दुखत आहे असे वाड्यात जाहीर करा म्हणाली ती आपण भटणीच्या घरापर्यंत भुयार खणलेच आहे. तेव्हा ती बाई बाळंत होताच नाळेवारेसह मूल हातोहात भुयारातून तुमच्याजवळ आणून ठेवते. इथेच बाळाचा पहिला टचाँहा होईल. तुम्ही काळजी करू नका. राणी म्हणाली, 'पण बाई मला भीति वाटतेय. सारं बिनबोभाट झालं पाहिजे हं? तुझ्यावर माझी सारी भिस्त आहे. लक्षात ठेव.'

राणी मनातून घाबरली होती, पण आनंदही झाला होता. राणीसाहेबांचे पोट दुखू लागले आहे हे कळल्यावर राजवाड्यात नुसती धांदल उडाली होती. राजेसाहेबांना तर काही सुचतच नव्हते ते अस्वस्थपणे महालात येरझाऱ्या घालीत होते.

इकडे माळीण भटणीकडे आली. प्रथम माळिणीने तिला घाबरवीलेच. म्हणाली, "बाई ग, पहिलटकरीण आहेस तू भिशील तर तुझे डोळे बांधून ठेवते." बिचाऱ्या भटणीला तिचे बोलणे खरे वाटले. तिने डोळे बांधून घेतले, चार एक तासाने भटणीची सुटका झाली, मुलगा झाला. लगेच माळीणीने त्याला फडक्यात गुंडाळून राणीकडे नेण्याची व्यवस्था केली. पण तेवढ्यातही नेता नेता मूल रडलेच. मूल लांब नेल्याची खात्री झाल्यावर माळणीने भटीणीचे डोळे

सोडले व शेजारीच असलेल्या केरसुणीचा बुरखुंडा दाखवून म्हणाली, "बाई ग, तुझं नशीबच फुटकं ग? बघ तुला असलं विचित्र मूल झालं बघ !"

भटणीला नवलच वाटलं. कारण तिने मूल रडल्याचाही आवाज ऐकला होता, ती फार निराश झाली. पण वाईट वाटून काहीच उपयोग नव्हता. तिला माळिणीचे कपट कसे कळावे ? शेवटी भटीण उदासपणे जगू लागली. हतबलपणे दिवस कंठू लागली.

मात्र तिला मनोमन खात्री होती की, आपल्याला खरेच मूल झालेले आहे. म्हणून तिची आई करीत असलेले अपत्यासाठीचे व्रत ती एकनिष्ठपणे करू लागली. श्रावणातल्या दर शुक्रवारी न्हाऊन धुवून मनोभावाने जिवतीदेवीची यथासांग पूजा करू लागली, पुरणावरणाचा नैवेद्य करून आरती करून अक्षत टाकायची नी माझा बाळ असेल तेथे खुशाल ठेव म्हणून देवीला प्रार्थना करायची ! तेव्हा नवल म्हणजे तिने टाकलेली अक्षत राजपुत्राच्या डोक्यावर येऊन पडायची ! असा आगळा वेगळा सण ती साजरा करायची.

शिवाय तिने एकेक व्रतंही आरंभिली होती. ज्या कोवळ्या बाळाची, ज्या हिरव्याकंच कोवळ्या जिवाची, ताटातूट झालेली होती त्या हिरव्या वस्तूंचा तिने त्याग केला होता. हिरवे केळीचे पान जेवणासाठी घ्यायचे नाही, हिरवी बांगडी भरावयाची नाही, हिरव्या (कारल्याच्या) वेलीखालीही जायचे नाही. बाळाला घालावयाचे भाताचे शीतही खायचे नाही. नव्हे त्या तांदळाचे पाणीही ओलांडून जायचे नाही. अशी व्रते अनेक वर्षे ती करत राहिली.

इकडे राजवाड्यात बाळ जन्मल्याचे नानाविध सोहाळे चालू होते. साखरेच्या गोणी, पेढ्यांची ताटे हत्तीवरून वाटली जात होती. वाजंत्री, बारा बलुतेदार येवून हजेरी लावीत होते. भटजी बाळाचे जातक मांडण्यात मग्न होते. बाळ अलोट कौतुकाच्या सोनेरी साउलीत दिसामासी वाढत होते. त्याच्या बाळलीलांनी राजाराणी हर्षीत होत होती.

आता राजपुत्र बारा एक वर्षांचा झाला होता. त्या वेळच्या प्रथेप्रमाणे त्याला विद्याभ्यासासाठी काशीसारख्या विद्येच्या नगरीत पाठविणे भाग होते.

राजाराणीला बाळाला पाठविताना बरे वाटत नव्हते. तेवढ्यात राणीचा भाऊ पाहुणा आला. म्हणाला, "मी भाच्याला काशीच्या वेदशाळेत घेऊन जातो, तुम्ही काळजी करू नका."

राजाराणीने मनाचा हिय्या करून राजपुत्राची निघण्याची तयारी केली आणि साश्रूनयनाने मामाबरोबर त्याला पाठविला. मामाभाचे मजल दरमजल करीत रात्रीच्या वेळी एका नगरातील कुटुंबात उतरले.

त्या घरातील सूनबाई बाळंत असून तिला पाचवा दिवस होता. ते सारे भयभीत झालेले दिसले. कारण विचारताच कळले की, हिची दोन मुले पाचवे दिवशी सटवी येते नी घेऊन जाते. आजही तसाच प्रसंग येणार म्हणून सारे चिंताक्रांत बसले होते.

मध्यरात्र झाली नी दोन्ही वेळेप्रमाणे सटवी मुलाला नेण्यास आली. पण ज्या बालकाची माता एकनिष्ठपणे जिवंतिकेची आराधना करते आहे ते बालक म्हणजे राजपुत्र आज घरी पाहुणा होता. जिवंतिका जे जे तिला मनोभावे भजतात त्यांच्या रक्षणासाठी अहोरात्र त्यांच्या पाठीशी उभी असते. आजही ती राजपुत्राच्या संरक्षणासाठी साऊलीसारखी येथे आलीच होती.

सटवी आणि जिवती यांची बरीच बोलाचाली झाली. ती म्हणाली, "मी इथे आहे तर मी ह्या घरच्या बाळालाही तुला नेऊ देणार नाही." जिवतीच्या प्रभावाने सटवी भेदरली व निमूटपणे नवजात बालकाला न नेता परत गेली. राजपुत्राने त्या दोघींचे संभाषण थोडेफार ऐकले, पण पूर्ण उलगडा झाला नाही. मात्र त्या घरच्या लोकांना पाहुण्यांचा पायगूण म्हणून मूल वाचले ह्याचा फार आनंद झाला. पुन्हा येताना देखील इथे उतरा असा त्यांनी आग्रह केला.

राजपुत्रानेही परत इथे उतरायला यायचे असा मनोमन निश्चय केलाच होता. म्हणजे रात्रीच्या संभाषणाचा काही धागादोरा लागतो का ते त्याला पहायचे होते.

त्याप्रमाणे तीन वर्षांनी विद्यासंपादन करून राजपुत्र परत येताना त्या घरीच उतरला. योगायोगाने त्याही वेळी सुनेला बाळंत होऊन पाचवाच दिवस होता. रात्री मागच्याप्रमाणेच सटवी आली पण जिवतीच्यापुढे तिचे काही चालले नाही. ती परत गेली. मात्र जिवतीने ज्या सणाची आणि व्रताची माहिती सटवीला सांगितली ती समग्र यावेळी मुद्दाम जागे राहून राजपुत्राने ऐकून ठेवली.

अक्षत अचानक डोक्यावर पडणे, माझ्या पाठीशी देवी सतत राहून संरक्षण करणे, ह्याचे राजपुत्रास कोडेच वाटू लागले. कारण त्याची राजवाड्यातील आई काही हे व्रत वा सण करीत नव्हती. म्हणून त्याने ह्या कोड्याचा उलगडा करण्यासाठी काशीहून आल्यावर माउंदे करावयाचे ठरविले.

सर्व गावात दवंडी पिटविली. कुणीही उद्या चूल पेटवायची नाही, सर्वांनी वाड्यावर जेवायला यायचे. हा वार मुद्दामच श्रावणातला शुक्रवारच मुक्रर केला. तसेच केळीची पाने, हिरव्या बांगड्या, कारल्याचा वेल व तांदुळाचे पाणी वाटेत सारे ठेवले.

इकडे श्रावणी शुक्रवार असल्याने भटिणीला न्हाणेधुणे पूजा करणे भाग होते. घरात धूर निघालेला कुणी पाहिला तर संशय येईल म्हणून तिने रानात पाणी तापवून न्हाणे केले. कणकीच्याच आरत्या केल्या, यथासांग घरी येवून जिवतीची पूजा केली. ओवाळून अक्षत टाकली ती इकडे राजपुत्राच्या डोक्यावर नेहमीप्रमाणे पडली !

मग ती राजवाड्यात जेवायला गेली. पण तांदुळाच्या पाण्यावर गेली नाही, हिरव्या बांगड्या घातल्या नाहीत. वेलाच्या बाजूने आत गेली. केळीचे पानही जेवायला घेतले नाही. मात्र ह्या सर्व गोष्टींकडे राजपुत्राचे बारीक लक्ष होतेच. पंगत बसली, राजपुत्र स्वतः तूप वाढायला पंगतीत आला. भटिणीच्या पानाशी येवून तूप वाढू लागला तो चमत्कार झाला. भटिणीला अचानक पान्हा फुटला नी चोळीतून दुधाच्या धारा थेट राजपुत्राच्या तोंडावर उडाल्या !

राजपुत्राने तुपाचे भांडे तिथेच ठेवले व तो महालात गेला. त्याने राजा-राणीला बोलावून घेतले. त्या दोघांना कशासाठी बोलावले हे काहीच कळेना! मग त्याने भटिणीला तिच्या नवऱ्यालाही वर बोलाविले. त्या सर्वांच्या देखत राजपुत्राने राणीला सवाल केला, "मी तुझा कोण आहे? खरा मुलगा आहे का? सांग." राणी तशी गडबडलीच! पण राजपुत्र विचारायचा थांबेचना तेव्हा तिने स्पष्ट सत्य गोष्ट सांगितली.

त्याक्षणी राजपुत्राला त्याची खरी व्रतस्थ नी सत्शील आई भेटली, आईला इतक्या दिवसांच्या व्रताचे फळ मिळाले. जिवती प्रसन्न झाली आणि अनेक वर्षांच्या वियोगाची, मायलेकरांच्या मीलनाची, पूर्तता झाली. निष्ठेने केलेले व्रत, एकनिष्ठपणे आचरलेले संकल्प कधीतरी फळाला येतात हेच खरे.

राजाने मग भटिणीला अर्धे राज्य बक्षीस दिले आणि राजपुत्राचे जन्मदाते व पालनकर्ते असे दोन्ही आईवडील व तो स्वतः सुखाने नांदू लागले.

## ३ राणूबाई

ज्यांना सूर्यनारायणाचे व्रत आहे, ते हे व्रत साजरे करतात. हे व्रत करताना श्रावणातल्या पहिल्या किंवा दुसऱ्या रविवारी एका तांब्यावर नारळ ठेवतात, तांब्याला हळदी कुंकवाची बोटे ओढतात. तो घट चौरंगावर ठेवून त्याला करदळीचे खांब लावतात. चौरंगाभोवती रांगोळी घालतात व तिची यथा-सांग पूजा करतात. या सणाचे वैशिष्ट असे की, या सणास आपल्या घराण्यातील सर्व व्यक्तींच्या नावाच्या, गव्हाच्या दोन दोन मुठी घेतात आणि घरीच अंघोळी करून शुचिर्भूतपणे दळतात. याच कणकीच्या पोळ्या करतात. ही कणीक संपेपर्यंत त्यातील कणीक परगोत्रातील लोकांना वा भिक्षुकांना द्यावयाची नाही, असा नियम आहे. सूर्यदेवाला काहीतरी गोड करून नैवेद्य दाखवितात. ही राणूबाईची पूजा सकाळी लौकर उठूनच करतात. अखिल जगताला जीवन देणाऱ्या ह्या देवाची पूजा केल्याने ती देवता आपणावर संतुष्ट होऊन आपले कल्याण होईल अशी पूज्य भावना मनी असते.

## ४ वरदा लक्ष्मी

श्रावणातल्या दुसऱ्या किंवा चौथ्या शुक्रवारी ह्या वरदालक्ष्मीची पूजा करतात. पितळेच्या दोन तांब्यांवर व भांड्यांवर रंगाने मुखवटे काढून त्यांना खण पांघरून त्या देवी चौरंगावर बसवितात. दुर्वा, आघाडा, फुले माळा वगैरेंनी त्यांची पूजा करतात. त्यांना फुटाणे पण वहातात. त्या दिवशी नैवेद्यास पंच पक्वान्ने करतात, दोन सवाष्णींना भोजनाला बोलवून विडा-सुपारी देऊन त्यांना संतुष्ट करतात. अशा ह्या " वर " देणाऱ्या, आपल्यावर कृपेचा वर्षाव करणाऱ्या, देवतेचा सण तिला प्रसन्न करण्यासाठी थाटात साजरा करतात.

## ५ कराष्टमी (कालाष्टमी)

आश्विन मासात दिवाळीचे आधी येणाऱ्या अष्टमीस हे व्रत करतात. या व्रतासाठी सात देवी शेंदराने भिंतीवर काढतात. त्यांचे पुढे सात करे (दिवे पणतीसारखे) ठेवतात. त्यातील प्रत्येक कऱ्यात थोडे गहू घालतात. त्यावर एक एक सांजोरी ठेवून, त्या सांजोरीवर एक एक कणकीचा दिवा करून ठेवून, त्यात तेलवात घालतात व देवींना ओवाळतात. देवींची षोडषोपचारे पंचामृती पूजा करतात. हा सण वा व्रत संध्याकाळी करतात. अंधार पडल्यावरच ही पूजा असते. त्यावेळी काही ठराविकच पदार्थ करतात. सांजोऱ्या, कटाची आमटी, भोपळ्याची भाजी, एक चटणी, भाजून तांदळाचा भात आणि चण्याच्या डाळीची वाटून मुटकुळी एवढाच असतो. जेवणे रात्री. चंद्रोदय १२ पर्यंत होतो. (अष्टमीला लौकर होत नाही.) तेव्हा चंद्र दर्शन घेऊन जेवणे होतात. ब्राह्मण सवाष्ण बोलावतात. मात्र त्यांचेसह सर्वजण दिवसभर उपास करतात. आणखी एक नियम पाळतात, देवींची पूजा पुरुष करतात. जो पुरुष पूजा करतो, त्याने भोजनानंतर पुन्हा देवीचे दर्शन घ्यायचे नसते. म्हणून पूजा, जेवणे झाली की, लगेच देवीवर अक्षत टाकून त्या पुसून टाकतात. हिला संकट मोचनदेवी म्हणतात.

# कहाणी शिळा सप्तमीची

कु. रतन ठाकूर

आटपाट नगर होते. तेथे एक राजा होता. त्या राजाने एक गाव वसविला. जवळच एक तळे बांधले. पण काही केल्या त्या तळ्याला पाणी लागेना. जलदेवतेची राजाने प्रार्थना केली. त्या प्रसन्न झाल्या. "राजा राजा, तुझ्या सुनेचा वडील मुलगा बळी दे. पाणी लागेल." हे राजाने ऐकले. घरी आला. मनी विचार केला. अतिशय दुःखी झाला. अनेक जीवांच्यापेक्षा नातवाचा जीव अधिक नाही. पण ही गोष्ट घडणार कशी? सून कबूल होईल कशी? तशी त्याने तोड काढली. सुनेला माहेरी पाठवावी. मुलगा ठेवून घ्यावा. सासऱ्याने आज्ञा केली. सून माहेरी गेली. इकडे राजाने चांगला दिवस पाहिला. मुलाला न्हाऊमाखू घातले. जेवू घातले. दागदागिने अंगावर घातले आणि एका पलंगावर निजवून तो पलंग तळ्यात नेऊन ठेवला. जलदेवता प्रसन्न झाल्या. तळ्याला भरपूर पाणी आले. पुढे राजाची सून माहेराहून येऊ लागली. भावाला बरोबर घेतले. मामंजींनी बांधलेले तळे आले. पाण्याने भरलेले पाहिले. त्याच दिवशी श्रावण शुद्ध सप्तमी होती. तिला वशाची आठवण झाली. तो वसा कसा? तळ्याच्या पाळी जावे. त्याची पूजा करावी. काकडीचे पान घ्यावे. दहीभात घालावा. एक शिव-राळ सुपारी ठेवावी. आणि भावाला वाण द्यावं. एक मुटकुलं तळ्यात टाकावं आणि जलदेवतांची प्रार्थना करावी की, "जय देवी आई, माते, आमचे वंशी कोणी पाण्यात बुडाले असतील तर ते आम्हाला परत मिळोत." याप्रमाणे तळ्यात उभे राहून तिने त्या दिवशी प्रार्थना केल्यावर राजाने बळी दिलेला मुलगा पाय ओढू लागला. "आई, मी येथे आहे. आई मी येथे

आहे" असे म्हणू लागला. पाय कोण ओढते व आपणास "आई" म्हणून कोण हाक मारत आहे हे ती पाहू लागली. तोच तिचा मुलगा तिच्या दृष्टीस पडला! तिने कडेवर घेतला. आश्चर्य करू लागली. सासरी येऊ लागली.

राजाला राजधानीत कळले, सून आपल्या वडील मुलासह परत येत आहे. राजाला आश्चर्य वाटले. त्याने तिचे पाय धरले. तिला विचारले, "अग अग मुली, तुझा मुलगा आम्ही बळी दिला तो परत कसा आला ?"

सून म्हणाली, "मी शिळा सप्तमीचा वसा केला. तळयात वाण दिले, जलदेवतांची प्रार्थना केली. मूल पुढे आले, तसे उचलून कडेवर घेतले." राजाला फार आनंद झाला. तिच्यावर ममता करू लागला. जशा तिला जलदेवता प्रसन्न झाल्या तशा तुम्हा आम्हा होवोत. ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफल संपूर्ण.

# पर्यूषण पर्व

सौ. लीला मर्चंट

पर्यूषण पर्वाला 'दशलक्षण पर्व' असेही म्हणतात. अष्टानिक पर्वाप्रमाणे हा पर्वही अनादि आहे. हा पर्व भाद्रपद शुक्ल पंचमी पासून सुरुवात होऊन भाद्रपद पौर्णिमेस समाप्त होतो. या दहा दिवसात उत्तम क्षमा, उत्तम मार्दव, उत्तम आर्जव, उत्तम शौच, उत्तम सत्य, उत्तम संयम, उत्तम तप, उत्तम त्याग, उत्तम अकिंचन्य आणि उत्तम ब्रम्हचर्य या दशधर्माचे, चिंतन पूजन

केले जाते. हे व्रत सदगुरूकडून ग्रहण करतात. हे विधिपूर्वक आचरणात आणून गुरू साक्षीने विसर्जन करतात. गुरू नसल्यास जितेंद्र भगवंताच्या समोर हे व्रत ग्रहण करतात.

पर्युषण महापर्व अथवा दशलक्षण व्रतासंबंधी आणखी काही माहिती मिळते ती अशी की, पर्युषण पर्वाची उत्पत्ती 'त्रिलोकसार' ग्रंथानुसार पुढीलप्रमाणे आहे. अवसर्पिणी कालाच्या सहाव्या भेदाच्या अंती भरत क्षेत्राच्या आर्यखंडात प्रलय होतो. पर्वत, भूतल, वृक्ष, जीव सहाव्या कालाच्या अंती यांचा नाश होतो. सर्वत्र अग्नी पेटतो. धुराची व धुळीची वृष्टि होते. पृथ्वी एका योजना-पर्यंत खाली जळून खाक होते. हा अंत आषाढ शुक्ल १५ ला होतो. ४९ दिवसानंतर सहाव्या कालानंतर नवीन युगास आरंभ होतो. हा आषाढ वद्य प्रतिपदेस होतो. तेथून आषाढ कृष्णपक्षाचे १५ दिवस व श्रावण महिन्याचे ३० दिवस मिळून ४९ दिवस संपल्यानंतर भाद्रपद शुक्ल ५ पासून पर्युषणपर्व सुरू होतो.

या पर्वातील सर्व व्रतांत प्रोषधोपवास, ब्रम्हचर्य, जिनपूजन, धर्मध्यान आदि गोष्टी प्रत्यक्ष आचरणात आणावयाच्या असतात. व्रतांच्या आचरणाने आत्मशुद्धी होऊन मोक्षमार्गाने दर्शन घडते.

जैनाचार्यांनी सर्व पर्वात पर्युषण पर्वाला विशेष महत्त्व दिले आहे. कारण हा पर्व भौतिक सुखापासून अलग राहून आध्यात्मिक विचारांकडे मानवाला वळवितो. सुख शांतीचा खरा मार्ग दाखवितो. दहा दिवसात हा धर्म शक्यतो आचरण्यात आणण्याचा पुढीलप्रमाणे दीर्घ प्रयत्न केला पाहिजे.

( १ ) क्रोधाचा त्याग केला की क्षमागुण धर्म प्रकट होतो.

( २ ) जाती, कुल, रूप आदीचा मान अथवा गर्वाच्या त्यागाने मार्दव गुण प्रकट होतो.

( ३ ) मायेच्या त्यागाने आर्जवगुण प्रकट होतो.

( ४ ) लोभाच्या त्यागाने शौचगुण प्रकट होतो.

(५) असत्याच्या त्यागाने व सुंदर वचन बोलण्याने उत्तम सत्यगुण प्रकट होतो.

(६) विषय कषा यांच्या त्यागाने अर्थात पंचेंद्रिये व मन ताब्यात ठेवल्याने उत्तम संयम गुण प्रकट होतो.

(७) इच्छा रोखून विषयांची आवड नष्ट करणे व कषायांस जिंकणे या क्रियांमुळे उत्तम तपगुण प्रकट होतो.

(८) सत्पात्रास चार प्रकारचे दान दिल्याने व अनाचार आदि गोष्टी सोडल्याने उत्तम त्यागगुण प्रकट होतो.

(९) अंतर बाह्य परिग्रहांचा अर्थात ममत्वाचा व प्रापंचिक वस्तूंचा त्याग केल्याने उत्तम अकिंचन्य धर्मगुण प्रकट होतो.

(१०) काम-विकारांना जिकून आत्म्यात लीन झाल्याने उत्तम ब्रह्मचर्य हा धर्मगुण प्रकट होतो.

दशधर्माचे उत्तम पालन केल्याने मोक्ष प्राप्ती होते.

# जैनांची व्रते

डॉ. सुमन पाटील

### अष्टान्हिक पर्व

आषाढ, कार्तिक, फाल्गुन ह्या तीन महिन्यात शुक्ल अष्टमीपासून शुक्ल पौणिमेपर्यंत जैन मंडळी व्रत करतात. आठ दिवसांचे नंदीश्वर व्रत विधीपूर्वक पालन केल्याने काही जीव षट्खंड पृथ्वीचे चक्रवर्ती धारण ऋद्धिधारी मुनी आदि थोर पुरुष झाल्याचे पुराणांतरी दाखले मिळतात.

## व्रतपालनाचे फळ

जंबुद्विपातील सुदर्शन मेरूच्या दक्षिणेस भरत क्षेत्रात वाराणशी नगरीत पाकशासन राजा राज्य करीत होता. एकदा एका भयंकर रोगाच्या साथी-मुळे लोक हैराण झाले. तेव्हा शांतीसाठी कार्तिक मासाच्या शुक्ल पक्षात आठ दिवसांपर्यंत कोणीही नगरात हिंसा करू नये, असा राजाने हुकूम केला. राजाला धर्म नावाचा एक व्यसनी व पापी मुलगा होता. त्याने रानात जाऊन आपला एक मेंढा मारला. ही बातमी हेराकडून राजास समजताच त्याने आपल्या मुलास सुळी देण्याचा हुकूम दिला. त्यासाठी यमपाल चांडाळ नावाच्या मातंगास बोलावणे पाठविले. त्या दिवशी चतुर्दशी होती. चतुर्दशीस कोणतीही जीव हिंसा करावयाची नाही असे व्रत एका मुनीजवळ त्या यम-पालाने घेतले होते. त्याने आपल्या पत्नीस सांगितले की, "मी परगावी गेलो आहे असे सांग." तो लपून बसला. सेवकांनी त्याच्या बायकोस विचारले, 'यमपाल कोठे आहे?' ती म्हणाली, "तो गावाला गेला आहे." सेवक म्हणाले, "तुम्ही किती कमनशिबी आहात! आज तुम्हाला राजाकडून फार धनलाभ होणार आहे." त्याच्या बायकोचे मन लालचवले. ती तोंडाने घरात नाही असे म्हणत कोपऱ्याकडे बोट दाखवू लागली. त्यावरून सेवकांनी त्या मांगाला बाहेर आणले, तो म्हणाला, "माझा प्राण गेला तरी बेहत्तर, पण मी आज जीव हिंसा करणार नाही."

राजाजवळ नेताच तो धैर्याने म्हणाला, "महाराज, चतुर्दशी दिवशी मी प्राणी वध करू शकत नाही. कारण मी असे व्रत घेतले आहे." राजाला क्रोध येऊन त्याने हुकूम दिला की, "माझ्या मुलाला व या मातंगाला नदीच्या डोहात बुडवून टाका." सेवकांनी दोघांस पोत्यात बांधून डोहात बुडविले. पण देवतांनी पाण्यावर सिंहासन ठेवून मातंगास उचलून त्यावर बसविले व सत्कार केला. हे सर्व दृश्य लोकांनी पाहिले. राजाला हे वृत्त कळाले. राजाने मोठ्या समारंभाने यमपालास दरबारात आणले. त्याला विपुल धन देऊन त्याचा सत्कार केला. असे हे व्रत पालनाचे महात्म्य.

## चातुर्मास

चातुर्मास आषाढ शुक्ल १४ पासून कार्तिक शुक्ल १४ पर्यंत चार महिने मानतात. चातुर्मासात साधूसाध्वींचा उपदेश ऐकणे, व्रते करणे, स्वाध्याय करणे, यथाशक्ती तप करणे, अंतरंग शुद्धी करणे हे पवित्र कर्तव्य असते. आपल्या जीवनात निर्मलता उत्पन्न करणे हे ध्येय आपल्या उराशी बाळगले पाहिजे. आईबापांनी, पालकांनी मुलांना कुलाचार धर्म शिकविला पाहिजे. गाळीव पाणी पिण्याची आवश्यकता आरोग्याच्या व अहिंसेच्या दृष्टीने पटविली पाहिजे. देव गुरूंचे दर्शन, पूजन, यांचे आकर्षण, अभक्ष्य पदार्थ न खाण्याचे वळण इत्यादी गोष्टींचे शिक्षण मुलांना देऊन चांगले संस्कार घडविल्यास चातुर्मासाच्या अवधीत कितीतरी मोठे कार्य होईल.

## नोपी व्रते

चातुर्मासात नियमितपणे दोन्ही वेळेला मंदिरात जाणे, देवदर्शन, पूजाविधी करणे, नियमाने देवाचा जप करणे, नियमाने देवाला १०८ फुले वाहणे. १०८ तांदूळ न मोडलेला वाहणे, नियमाने एक फळ आपणास जे जे नियमितपणे शक्य होईल ते देवाला वाहणे. गरीब स्त्रिया हळदीकुंकवाची नोपी घेतात. अशा प्रकारे नोपी व्रते घेतात आणि शेवटच्या दिवशी नोपी व्रतांचे उद्यापन करतात. देवांची महापूजा करतात.

# श्रीगणेशाचे चतुर्थी व्रत-संकष्टी चतुर्थी

श्री. वसंत गोविंद जोशी

प्रत्येक मराठी महिन्यामध्ये दोन पक्ष असतात. शुद्ध पक्ष व दुसरा वद्य पक्ष. प्रत्येक वद्य पक्षातील चतुर्थीला 'संकष्टी चतुर्थी' असे म्हणतात. आपल्यावरील संकटांचा नाश होण्याकरिता विशेषतः पुत्र लाभाकरिता ह्या व्रताचे आचरण करतात.

असे म्हणतात की, पूर्वी एक कृतवीर्य नावाचा राजा होता. त्याला सर्व प्रकारचे सौख्य होते. परंतु पुत्र नव्हता. कृतवीर्याच्या वडिलांनी साक्षात ब्रह्मदेवाकडून या व्रताची माहिती घेतली व कृतवीर्याला सांगितली. कृतवीर्याने एक वर्षभर या व्रताचे अगदी श्रद्धेने आचरण केले व त्यामुळे त्याला पराक्रमी व किर्तीमान असा एक पुत्र झाला. तोच तो पुढे प्रसिद्धीस आलेला कार्तवीर्य राजा.

हे व्रत करावयाचे असल्यास त्याचा आरंभ श्रावण वद्य चतुर्थी किंवा माघ चतुर्थी पासून करावा. जर २१ वर्षे सतत या व्रताचे आचरण केले तर मान, सन्मान, पुत्र, विद्या, ऐश्वर्य इत्यादी प्राप्त होते. व्रत समाप्तीनंतर ब्राह्मण भोजन घालून व्रताची सांगता करावी. निश्चित इष्ट फलसिद्धी मिळते.

चतुर्थीच्या दिवशी संपूर्ण दिवस उपोषण करावे. या दिवशी अभक्ष्य व अपेय वस्तूला स्पर्शसुद्धा करू नये. रात्री पुन्हा स्नान करून श्री गजाननाचे पूजन करून चंद्रोदय समयी चंद्राचे पूजन करून चंद्रालाही नमस्कार करावा व देवाला नैवेद्य समर्पण करून भोजन करावे.

ही चतुर्थी जर मंगळवारी आली तर अंगारकी चतुर्थी असे म्हणतात. जर शुद्ध चतुर्थी मंगळवारी आली तर ती अत्यंत सुखकर समजावी. कारण मंगळवारच्या शुद्ध चतुर्थीचे नावच मुळी 'सुखा' म्हणजे सुख देणारी असे आहे. कोणतीही चतुर्थी ही गणेश प्रिय आहेच. परंतु त्यातल्या त्यात मंगळवारी आलेली चतुर्थी ही श्री गणेशाला अत्यंत प्रिय वाटते.

## *गीत : गोमटच्या पोरींचे !*

प्रा. वामन चोरघडे

**मा**झी कुवत कमी ! ज्ञान तोकडेच ! म्हणूनच मला विनोबा म्हणजे अद्‌भुत चमत्कारच वाटत आला आहे. ते इतक्या उंचीवर उभे होते, की आम्हाला काहीच दिसले कळले नाही !

१९४५ म्हणजे तब्बल चाळीस वर्षांपूर्वी 'संतांचा प्रसाद' हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाले. तुकारामाचे शंभर अभंग निवडून विवरणासहित लोकांपुढे ठेवण्याचा त्यांचा संकल्प होता. या पुस्तकात पस्तीस अभंग आहेत. पुस्तकाची पाचवी आवृत्ती साडेचौदा हजार प्रतींची मे १९७६ मध्ये निघाली. एकनाथांची भजने, मोरोपंतांची कविता, विष्णुसहस्त्रनाम सर्वच ठिकाणी विनोबांची मूळ वृत्ती दिसून येते आणि वाचक स्तिमित होऊन जातो. ऋग्वेदसार कुराणसार, सर्व धर्मांबाबत, सर्व संताच्याबद्दल, सत्पुरुषांबद्दल विचार करण्याची त्यांची दृष्टी इतकी निर्मळ की शब्दाशब्दातून आपल्यालाच आंघोळ

घडते. कोणताही धर्म म्हटला की तो पवित्र असायलाच हवा कारण तो धर्म आहे ही विनोबांची निर्मळ दृष्टी ! स्वामी विवेकानंदाचे एक वाक्य आठवते, "तुमचा धर्म जर पवित्र आणि शुद्ध असेल तर दुसऱ्याचाही धर्म पवित्र आणि शुद्ध असलाच पाहिजे कारण तो धर्म आहे."

'वैदिक' आणि 'लोक' असे दोन शब्द आपल्याला वाटतात त्याहून कितीतरी प्राचीन आहेत. वैदिक साहित्य आणि लोकसाहित्य हे दोन भिन्न आहेतच असे नाही. ईशावास्योपनिषदात तिसऱ्या मंत्रात "लोक" शब्द आलेला आहे आणि वैदिकांनीच लोक शब्द योजून त्याला प्रतिष्ठा दिली आहे. लोकांचे साहित्य आणि वैदिक साहित्य यातील मूलभूत अध्यातमविचार एकच आहेत असे दोन्ही साहित्याचा अभ्यास असणारे म्हणू शकतात.

या प्रस्तावनेचा उद्देश पूर्वसूरींना आणि विनोबांना वंदन करण्याचाच आहे.

'संताचा प्रसाद' मध्ये तुकारामांच्या पस्तीस अभंगांवरील विनोबांचे विवरण वाचले की भाषा धर्म कोणताही असो, सर्वांचे अधात्मविचार कसे सारखे आहेत हे कळते. उदाहरणादाखल विनोबांनी तुकारामांचा निवडलेला पहिलाच अभंग घेऊ –

**तीळ जाळीले तांदुळ । कामक्रोध तैसेचि खळ ।**
**का रे सिणलासी वाउगा । न भजता पांडुरंगा ॥**

मूळ भक्ती नसेल तर धर्म अधर्मच होऊन जातो. या अभंगावरून विनोबांना श्रुतीचे वचन आठवले.

**तमेतं वदानुवचनेन ब्राह्मणा । विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसा ॥**

दुसरे उदाहरण म्हणजे अकरावा अभंग –

**मनवाचातीत तुझे हे स्वरूप ।**
**म्हणोनिया माप भक्ति केले ॥**

या अभंगातून विनोबांना तैत्तिरीय उपनिषदातला मंत्र आठवला –

'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह'

तिसरे उदाहरण सत्ताविसाव्या अभंगाचे–

भूती देव म्हणोनि भेटतो या जनां । नाही हे भावना नर-नारी

आपल्या विवरणात विनोबांना श्रुतीतील खालील मंत्र आठवला–

त्वं स्त्री त्वं पुमानसि । त्वं कुमारः उत वा कुमारी ॥
त्वं जीर्णो दण्डेन अंचसि । त्वं जातो भवसि विश्वतोमुखः ॥

प्रत्येक अभंगामध्ये गीतेची साक्ष तर आहेच शिवाय इतर संतांचीही सम-वचने आहेत. भाषेची, आविष्काराची, शैलीची, आडवणी कुठेच दिसत नाही.

संत तुकारामांनी वेद–उपनिषदे वाचली होती काय ? हा विषय विद्वा-नांचा आहे. यातील महत्तत्त्व एकच. ते म्हणजे एका विलक्षण साक्षात्कारातून जे अध्यात्म स्फुरते ते एकच असते. सम असते अन् समान पण असते. अपौरुषेय हा शब्द या समदृष्टीतूनच विचार करण्याजोगा आहे. ज्ञानदेवांच्या ओवीतून कित्येक मंत्रांचा मागोवा घेता येतो. कबीराच्या दोह्यातून या सम-विचारांचा आढळ होतो.

दृष्टी आहे म्हणूनच सृष्टी आहे. दृष्टीचा व्याप जेवढा तेवढाच व्याप सृष्टीचाही ! दृष्टी सम तर सृष्टीही सम ! म्हणूनच विनोबांना विष्णुसहस्र-नामातून सर्वधर्मातील समानार्थ नावे दिसू शकली.

लोकसाहित्याकडे याच समदृष्टीतून बघितले तर केवढे मोठे अर्थ गवसतात. हे दाखवून देण्यासाठीच वरील खटाटोप केला. ईश्वर आहे आणि तो सर्व-भूतांच्या ठिकाणी आहे हे अधिष्ठान पक्के असले तर जगाच्या दोन टोकांवर राहणारी माणसे– त्यांचे बोल एकच असतील. विज्ञानात लहरींचा शोध

आणि संशोधन पुष्कळ झाले आहे. त्यामुळे ते बोल ऐकूही येतील. आणि मनाची जडण घडण समान असलेल्या माणसाला त्याचा अर्थही समजेल.

पुढे एक लोकगीत संपूर्णपणे देत आहे. हे गीत ऐकून आणि पाठ करून मलाच आता साठ वर्षे झालीत. माझ्या लहानपणी छोटचा छोटचा मुली गौर शिरविताना हे गीत म्हणायच्या. मुले मुली यात आजच्याइतके अंतर पडले नसल्यामुळे आम्हा मुलांनाही त्या घोळक्यात समावेश असायचा. कलेसाठी कला तसेच गीतासाठी गीत ! तुम्ही गाता आम्हीही गातो असा खाक्या ! पुढे मोठा झालो. शिक्षण झाले आणि असल्या गीतांना अर्थ नसतो आणि अर्थ शोधण्यातही अर्थ नसतो अशी माझी मीच खात्री करून घेतली. त्यामुळे विद्वत्तेचा टिळाही काही काळ कपाळी लागला. बरे वाटले.

आणि विनोबांचे हे पुस्तक हाती पडले. गर्भगळित या शब्दातला अर्थ अनुभवला.

आम्ही हे लोकगीतच बघा.

आम्ही पोरी गोमट्या । सर्व जाऊ पाण्याला ॥
वाटेत भेटला वाणीदादा ।
वाणीदादा शोभा दे । शोभा देऊ नदीला ॥
नदी नदी पाणी दे । पाणी देऊ शेताला ॥
शेता शेता चारा दे । चारा देऊ गायीला ॥
गायी गायी दूध दे । दूध देऊ बगळ्याला ॥
बगळ्या बगळ्या पंख दे । पंख देऊ राजाला ॥
राजा राजा घोडा दे । घोडा देऊ बापाला ॥
बापा बापा साडी घे । साडी देऊ आईला ॥
आई आई चोळी शीव । चोळी देऊ बहीणीला ॥

बहीणी बहीणी भातकुल दे । भातकुल देऊ भावाला ॥
भावा भावा गोंडे दे
तेच गोंडे लेऊ
सासरा जाऊ
सासराच्या वाटे
कुचूकूचू काटे
माहेराच्या वाटे
हळद कूंकू दाटे । नारळ फुटे ॥

संपले हे मजेदार गीत ! यात अर्थ सांगण्याजोगा शब्द एकच आहे. वाणीदादाला मुली 'शोभा' मागतात. शोभा = सौभाग्य वायने ! (प्रसाधन साधने असा अर्थ मुद्दामच सांगत नाही. ) शोभा म्हणजे हळदकुंकू, गुलाल इ. वस्तू.

एक दोन शंकाही मनात येतात. (१) मुली गायीला दूध मागतात अन् ते दूध बगळयाला देण्याचा संकल्प सोडतात. (२) मुली बगळयाला पंख मागतात. पण पंख राजाला द्यायचे ठरवितात. या दोन्ही शंका न सोडविणे बरे कारण मुलींच्या मनाचा थांग आपल्याला आपापल्यापरी घेता येतो !

सबंध गीतामध्ये एक मूलभूत रहस्य आहे आणि ते रहस्य हजार दोनहजार वर्षांपूर्वीच्या प्रश्नोपप्रश्नांची उकल करणारे आहे. माझ्या मनात ज्या कल्पना आल्या त्याच लिहितो. त्या बरोबर असल्याच पाहिजेत असा आग्रह सुतराम नाही. समसमान विचार व्यक्त करण्याचा प्रत्येकालाच अधिकार आहे.

सगळयात सोपे व सुटसुटीत म्हणून ईशावास्योपनिषत् मी नित्यनेमाने म्हणतो. एकूण अठरा मंत्र त्यात आहेत. पहिलाच मंत्र म्हणताना मन जागे होते.

ॐ ईशावास्यमिदं सर्वं
यत्किंच जगत्यां जगत् ।

तेन त्यक्तेन भुञ्जीथा
मा गृध: कस्य स्विद्धनम् ।।

हा मंत्र विनोबांनी मराठीत दिला तो असा –

"ह्या जगात जे काही जीवन आहे ते सर्व ईश्वराने वसविलेले आहे. म्हणून ईश्वराच्या नावाने त्यागून तू (यथाप्राप्त) भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस."

'ईश्वराच्या नावाने त्यागून भोगीत जा.' अर्थ सोपा आहे, आकलन अवघड आहे! शिवाय ब्राम्हणाने निष्कारण वेदउपनिषदांचे अध्ययन अध्यापन करावे ही अट आहेच. सर्वच ईश्वराचे आहे, सर्वातच ईश्वर आहे, म्हणजे तो माझ्यातही आहे. मग माझ्याच नावाने मिळेल त्याचा त्याग करून भोग मी कसा घेणार ?

जे माझे आहे ते दुसऱ्याला देण्यात मनाला आनंद मिळतो. हा अनुभव पुष्कळांचा आहे. भूक भडकल्यावर अन्नाचे ताट समोर यावे. योग म्हणजे माझ्याहून अधिक भूक लागलेला समोर यावा. मी ते ताट त्याच्यासमोर करावे! या उपासाने आनंद वाटतो. हेच तर अध्यात्म! त्यागाचा आनंद हेच ते भोगणे असू शकेल काय? मातेला हा आनंद पदोपदी उपभोगायला मिळतो. कारण तिची मुले तिला ईश्वररूपच असतात.

वरील सर्व विचारांचा गुंता या गोमटचापोरींच्या गाण्याने मात्र आपोआप उकलला जातो. या गोड–आंबट मुलींना हवे आहे सगळे! जो समोर भेटेल त्याला त्या मागत सुटतात. अन् मिळाले रे मिळाले की दुसऱ्याला देऊन टाकतात, आणि आनदाने डोक्यावर गोंडे मिरवीत झपुर्झाच्या गतीने बेभान होतात. पायचेंडूच्या खेळात प्रत्येक खेळाडू म्हणतो, 'अरे चेंडू मजकडे दे!' चेंडू मिळाला रे मिळाला की पाय, खांदे, डोके, कशाचा तरी उपयोग करून तो दुसऱ्याकडे देतो. दुसरा तिसऱ्याकडे–आणि असे पुढे जात जात अखेर मोक्ष! आणि मुलांचे खेळाडूच्या आनंदाने बेहोष होणे! एखाद्याने मिळालेला चेंडू धरून स्वत:

जवळच ठेवला की खेळही संपतो, जीवनही संपून जाते. कुठला मोक्ष अन् कसले काय ?

हे लोकगीत परंपरेने आमच्यापर्यंत आले आणि शिक्षण संस्कार असल्या अटी न घालता धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम् असे म्हणणाऱ्यांशी वाद न घालता अध्यात्माचे मोठे तत्त्व आमच्यापर्यंत पोचवून गेले. मराठी संतांच्या ओव्याअभंगातून विनोबांना वेदउपनिषदे दिसली. असे हे ‘ दिसणे ’ ज्याला साधेल त्याच्या डोळ्यात आणि ओठात सर्व मिळून पाण्याला जाणाऱ्या गोमटया मुली दिसतील !

# पिठोरी अमावस्या

कुमुदिनी रांगणेकर

श्रावणी अमावास्येला पिठोरी म्हणतात. सौभाग्यवती स्त्रिया पिठोरीची पूजा करतात. ह्या पूजेची कथा अशी आहे --

फार पूर्वी श्रीधर नावाच्या एका ब्राम्हणाची सुमित्रा नावाची बायको होती. तिच्या मोठ्या मुलाचे नाव शंकर व सुनेचे नाव विदेहा होते. विदेहेचे मूल जगत नसे. एकदा असे झाले की, श्रावणी अमावस्येला त्यांच्या घरी श्राद्ध होते आणि त्याच दिवशी विदेहा बाळंतीण झाली.

जुन्या रीतीप्रमाणे बाई बाळंतीण झाली की, दहा दिवस सुयेर पाळतात. बाळंतिणीला नि बाळाला शिवत नाहीत. आणि घरात कसलेही धार्मिक कार्य करीत नाहीत. करू शकत नाहीत.

आपल्या कुटुंबात नवा जन्म झाल्यावेळी सुयेर ही गोड अडचण येते. आणि कुटुंबात मृत्यू झाल्यावेळी सुतकाची कडू अडचण येते. घरातील माणूस वारले की, दहा दिवस सुतक पाळावे लागते. अन् बिचारी विदेहा फार दुर्दैवी असल्यामुळें तिचे हे नवे मूलही लगेच मरण पावले. आधी सुयेराची गोड अडचण आली नि नंतर लगेच सुतकाची कडू अडचण आली आणि श्राद्ध अपुरे राहिले. विदेहेच्या सासूला राग आला नि तिच्या सांगण्यावरून शंकराने विदेहेला घराबाहेर घालविले.

मृत बाळ घेऊन बापडी विदेहा दूर अरण्यात गेली. तिथे एक आश्रम होता. त्या आश्रमाजवळ एक देवता होती. ती विदेहेला म्हणाली, "तू ह्या आश्रमात लपून रहा. कारण इथे भुतांची फार भीती आहे. परंतु काही वेळाने इथे ६४ योगिनी देवता येतील व त्यांच्या पद्धतीप्रमाणे 'कोणी अतिथी आहे काय ?' असे विचारतील. तेव्हा तू पुढे होऊन त्यांना शरण जा. म्हणजे तुझे कल्याण होईल". त्याप्रमाणे त्या देवता आल्यावर त्यांनी विचारले, "कोणी अतिथी-पाहुणा- आहे काय ?"

विदेहा भीत भीत पुढे आली नि तिने सर्व हकीकत त्यांना सांगितली. त्यांच्या कृपेने तिची सर्व मुले जिवंत झाली. मग घरी तिचे उत्तम स्वागत करण्यात येऊन तिचे आयुष्य सुखात गेले.

आपल्या मुलांना भरपूर आयुष्य मिळविण्यासाठी माता हे व्रत सध्याही करतात. आता चौरंगावर देवतांच्या मूर्ती किंवा चित्रे मांडतात. पण पूर्वी पिठाच्या मूर्ती करीत व नैवेद्यासाठीही पिठाचेच लाडू करीत. बहुधा ह्याचमुळे ह्या पूजेला पिठोरी पूजा हे नाव पडले असावे. पूजेवरून अमावास्येलाही पिठोरीच म्हणण्यात येऊ लागले.

# विधात्री व्रत, अहोई अष्टमी

सौ. मालती शर्मा

[अ]होई अष्टमी पर विचार करते करते जब बचपनसे अबतक स्मृतिपटल पर भरते व्रत त्यौहारोंके दृश्य चित्रों को उंगलियोंकी रेखाओं पर संख्या देने लगती तो सन्तान प्राप्ति, संतति रक्षार्थ जातकों के आरोग्य, दीर्घायू, सुख और भव के लिये किये जाते व्रतों की सूची लम्बी और लम्बी होती चली जाती । सन्तान सप्तमी, शीतला सप्तमी, प्रदोषव्रत, जीवपुत्रिका व्रत, हरइठ, दा एकादशी व्रत, दूबरी साते, दो चार हों तो गिनाये भी जायँ ? पर चती हूँ सन्तति को इतना महत्त्व क्यों? कदाचित आत्मविस्तार की कांक्षा नितान्त नैसर्गिक है। अनादि ब्रह्म की इच्छा " एकोहम् बहुस्याम् " सृष्टि रूप मे हमारे सम्मुख आई। जैविक जगत में, वानस्पतिक जगत में, गीर्मक संसार में प्रजनन और नाश की अनवरत प्रक्रिया चल रही है। यह क्रिया है तभी जीवन और जगत है वर्ना क्या रह जाये ? मनुष्यमें भी जन्म की प्रवृत्ति प्रकृति प्रदत्त और जन्मजात है। इसी को पहचान मनुस्मृतिकार स्त्रियों को प्रजननार्थ ही उद्दिष्ट किया है तभी वे गृह को दीप्त करती है। जनार्थं महाभागाः पूजार्हा गृह दीप्तयः ।

लेकिन जहाँ इतर जगत अपने सृजन की रक्षा के लिये बहुत सचेष्ट नहीं या रह नहीं पाता है, यहाँ जन्म के साथ रक्षा का भार भी प्रकृति पर है। हिसाब पैदा होता है, बेहिसाब नष्ट होता है, जो बच रहाता है वह किसी वरत प्रक्रिया का अंग होकर ही रहता है। प्राकृतिक जीवन का यह सत्य न लोकोक्ति में बडे सुन्दर रूप में अभिव्यंजित हुआ है ।

( खातें खातें रहि जाय बँही बीज कू सै = खाने से जो ( अन्न ) जो बचेगा तभी बीज होगा ) इतना ही नही इतर जगत में सर्पिणी बिल्ली, कुत्ते जैसे प्राणी भूख से व्याकुल हो अपने बच्चों को खालेतेभी सुने जाते हैं लेकिन मानवी संसार, प्राकृतिक, दैविक, और भौतिक संकटो, आपदाओंसे संतति के जीवन रक्षार्थ स्वयं भूखा रहता है। अन्नजल त्याग, व्रत धारण कर स्तुति-प्रार्थना, बलिदान-नैवेद्य और पूजन-अर्चन से वह बाह्य शक्तियों, यहाँ तक कि सर्प जैसे हिंसक जन्तु को भी संतुष्ट करने का प्रयत्न करता है। व्रतों से, क्रूर प्रकृतिसे चित शुद्धि कर मन में भूतदया जाग्रत करता है। और तब ऐसे व्रतों की कथाओंमे वह सर्प जैसे घातक जन्तु के मन में भी अपने लिये सोहार्द, दयाभाव जगा हुआ पाता है।

अतः हमारे व्रत पर्व, त्यौहारमात्र भय पर टिके, आदिम अंधविश्वासों और रूढ परम्परा के ही संवाहक नही हैं। वे मनुष्य की मानवीयता के, पशु जगत से उसकी मैत्री भावना के द्योतक हैं। मनुष्य जाति की मानसिक आवश्यकताओंकी पूर्ती हैं। इन व्रत त्यौहारों में मनुष्य जातिका मानसिक रूप में प्राकृतिक, सामाजिक और जैविक स्तर पर जीवन संघर्ष मुखर हुआ है। उसके टूटे हारे मन को मानसिक दृढता और आत्मवल मिला है। हमारे व्रत, शब्दमें से शब्दों, क्रिया से क्रियाओं, चित्रों से चित्रों और गीतों से गीतों के अटूट क्रम में तय होती हुई जीवन संघर्ष में मानवीय आस्था की जय-यात्रा है मात्र कोई ढकोसला नहीं, आडम्बर नहीं, दिखावा नहीं है। श्रेष्ठ जीवन की अपराजेय जिर्जविषा और आत्मविस्तार का तोष ही संतति सुख, आरोग्य और ऐश्वर्य हेतु व्रतों में अर्चित हुआ है।

पुत्र रक्षार्थ अहोई अष्टमी व्रत विशेष रूपसे उत्तर प्रदेश और राजस्थान में प्रचलित है। कार्तिक के कृष्ण पक्ष की अष्टमी अहोई अष्टमी कही जाती है। इसे अशोकाष्टमी भी कहते है। पुत्रवती स्त्रियाँ अहोई अष्टमी को दिनभर निर्जल व्रत रखती है। तिपहर में अधिकतर रसोई घर में या किसी भीतरी कक्ष में कुटुम्बकी प्रथानुसार गेरू या कोयले एवं विविध रंगो से अहोई की आकृति दीवार पर बनाती है। उसके सम्मुख पीले कलश की, स्थापना होती

है । खीर पूडी या हलुआ पूरी और पुयेका नैवेद्य लगाती है। तारे निकलने पर उन्हें अर्घ्य दे तब भोजन करती है । अर्घ्य देने से पूर्व अहोई अष्टमी की कहानी कही-सुनी जाती है ।

अहोई अष्टमी के समग्र व्रतानुष्ठान और उसमें निहित अभिप्राय पर निम्न उपशीर्षको में विचार विश्लेषण अपेक्षित है –

(१) कहानी - निबद्ध अभिप्राय
(२) नाम तिथि और पूजनविधि मे निहित अभिप्राय
(३) चित्र-निबद्ध अभिप्राय

अहोई अष्टमी की व्रती स्त्रियाँ संध्यासमय पूजन और अर्घ्य के पूर्व हाथ में अक्षत या गेहूँ के दाने लेकर निम्न कहानी कहती सुनती है। एकसेठ के सात बेटे, सात बहू एक लड़की थी । कार्तिक आया तो वे सब दिवाली की लिपाई पुताई के लिये खदान=खान में से मिट्टी लेने गई । मिट्टी खोदते खोदते ननद के फावडे से स्याहू[1] माता के सात बच्चे कट गये । क्रोधित स्याहू ननद को खाने दौडी और उससे बोली "या तो अपनी कूरव दै कै माँग दें" (या तो अपना पति दे, या बच्चे दे) सबसे छोटी भाभी ने ननद के बदले अपनी कूरव देना स्वीकार कर लिया । दुर्भाग्य से वह कार्तिक कृष्णा अष्टमी का दिन था । उस दिन से प्रतिवर्ष उस छोटी बहू के, जो भी बच्चे होते, स्याहू-माता लेलेती । अहोई अष्टमी उसके लिये शोक लेकर आती । देवरानी जिठानियों ने छोटी बहू का नाम "सद रोमनी" "हमेशा रोनेवाली" "रख दिया था वे कहती" "जल्दी जल्दी पूजा कर लो नही तो सदरोमनी रोने लगेगी" इस तरह जब उसके छह बच्चे मर गये तो अत्यंत दुखी होकर उसने अपना दुख पडौस की एक वृद्धा से कहा । बुढियाने उसे बताया कि आगामी अहोई अष्टमी को तू खूब घर लीप पोतकर फूल बिखेर देना । बिटौरा में बच्चा पैदा करना नादों में कढी चावल और मीठा दूध भरके रख देना, जब स्याहू माता आयें

---

१. कहानी के एक रूपान्तर में ये बच्चे सेही अथवा साही के भी कहे गये हैं । इन्हें चीकली चीकला नाम से भी पुकारा गया हैं ।

तो उसके पैर लग पहले आशिष लेलेना फिर पीढे पर बिठा कहना "लाओ भइया तुम्हारे जुआँ देख दूं" वह मने भी करे तो मानना मत, जब स्याहू खूश हो कुछ मांगने को कहे तो वचन लेलेना, तब उसके कानों की तुरपुती या तरकी=कानों का आभूषण मांगलेना, तेरे सारे बच्चे जी जायेगें।

छोटी बहू ने तदनुसार किया। जैसे ही स्याहू आई वह पैरो पडी तो उसने आशिष दी "दूधों नहाओ पूतो फलो" फिर वह जुये निकालने लगी, बच्चे को गोद में डाल लिया। देखते देखते उसने बच्चे को नोंच लिया, बच्चा रोन लगा तो स्याहू ने पूछा कि क्यों रो रहा है ? स्त्री बोली "मइया तुम्हारे कानों की तुरपुरी मांग रहा है" अब स्याहू भला बच्चे को कैसे मना करती ? बस उससे निकलकर स्त्री के छहो बच्चे आँगन में खेलने लगे। स्याहू माता बोली "मै तो तुझे छलने आई थी, तूने मुझे ही छल लिया। पर जा आज के दिन जो अहोई पूजा करेगा उसके बच्चे नही छिजेंगे। "जैसे आगे आई वैसी किसी को न आवे, जैसी पिछे आई वैसी सब किसी को आवे"।

अहोई अष्टमी की उपरोक्त कहानी से कई जिज्ञासाऐं उठती हैं। मुख्य प्रश्न है यह स्याहू माता या स्याओ माता कौन है ? सन्तति रक्षण और प्रजनन से क्या उनका कोई सम्बध है ? यदि है तो क्या उसमे कोई संश्लिष्ट और परम्परित अभिप्राय अभिव्यक्त हुआ है अथवा अहोई अष्टमी का अभिप्रायही ! ये अभिप्राय ऐतिहासिकम क्रम में कितने पीछे जाते है ? पूजन के लिये बने अहोई के थापे, पूजन विधि और तिथि में क्या कोई क्रमिक विकास है ? एवं ये परस्पर सम्बद्ध और संगत है अथवा असंगत ? ऐसे सारे प्रश्नोंके उत्तर से ही किसी निष्कर्ष की संभावना है।

सेठ की लडकी से अनजाने जमीन खोदते समय बच्चे कटे, अतः किसी बडे प्राणी के बच्चे वहाँ होने की संभावना कम है। ऐसा प्रतीत होता है कि वहाँ सर्पकी कोई बॉबी रही होगी और ये बच्चे किसी सर्पिणी के हो सकते है। एक और भी बात है सर्पो में बदले की भावना होती है, वे मारने वाले को कभी भूलते छोडते नहीं, नाग पंचमी, दूबरी साते एवं बहुला चतुर्थी की

लोककथाएं एवं अन्यान्य बहुत सी घटनाएँ एवं सत्य कथाये[1] यह बताती है कि सर्प ने बदला अवश्य लिया है। यें कहानियाँ सर्प स्वभाव की पुष्टि करती है। स्याहू माता में भी यह, स्त्री से अपनें बच्चों का बदला लेने की सर्प प्रकृती-जन्य प्रतिकार वृत्ति देख पडती है। साँप अगर बैर पड जाय तो लोक विश्वास में उसके लिये नियत समय पर छह बच्चों को काटते चले जाना असंभव नही है। साँप शब्द रूप का भाषा विज्ञान के अनुसार बोलते बोलते "स्याहू या स्याउ" बन जाना भी संभव है[2]। इस तरह स्याहु के सर्पिणी होने की संभावना का जीव वैज्ञानिक एवं भाषा वैज्ञानिक आधार तो है लेकिन अब देखना यह है कि अहोई पूजा के भित्ती चित्र में भी क्या स्याहु माता सर्पाकार में चित्रित है ?

यद्यपि जाति, कुल, गाँव और प्रान्त के स्थानीय रंगो में रंगी, विकसनशील तथा हर आठ मील पर परिवर्तन शील लोक चित्रकला मे न्यूनाधिक अन्तर होते है, पर मूलभूत समानताभी रहती है। विभिन्न शहरों और गाँवो से एकत्र अहोई के चित्रों में भी कहानी में प्राधान्य मिले पक्ष और स्थानीय रुचि की वस्तुओं से वस्तु और विषयगत अन्तर है लेकिन ये मुख्य अंकन समान है :–

(१) सात बेटे सात का बहू चित्र
(२) चंद्रसूर्य, तारों का अंकन
(३) नसैनी पर चढी अर्ध्य देनेवाली
(४) मिट्टीका खदाना, ननद भावज और स्याहू के बच्चे
(५) कंघी, डोरा, पान सुपारी चौपड

स्याहूमाता के हाथ, पैर, मुँह इत्यादि बना उसे मानव रूप में भी परि-कल्पित किया गया है और मूलरूप में भी चित्रित किया गया है। किसी घर

---

१. डॉ. सत्येंद्र : व्रज लोकसाहित्यका अध्ययन, पृ. ४५७.
२. वोगेल : दी सर्पेन्टलोर पृ. १९.

में स्याहू के हाथ नही बनते, किसी घर में मूंह। ब्रज क्षेत्र से जितने भी चित्रप्राप्त हुये हैं, उनमें स्याहू माता और उसके बच्चों की मूलाकृति घोंघा से (Snail) मिलती जुलती भी है जिसे मराठी में गोगल गाय कहते है। कहानी के एक रूपान्तर में यह भी बताया गया है कि खदान में बच्चेसेही या साही के कटे थे, उसने स्त्री को श्राप दिया कि तेरेभी बच्चे इसी तरह मरेंगे। कहानी के राजस्थानी रूप में स्याहूमाता और गाय की मैत्री का पक्ष प्रमुख है अतः राजस्थानी "होई" माँडने में सात गायें प्रमुख हो गई है। इस तरह अब कहानी के रूपान्तर और आकृतिक दृष्टि से सर्प के साथ घोंघा या साही के बच्चों की संभावना और होती है। पर साही जैसे प्राणीके बच्चे अनदेखे कट जाना कठिन है। घोंघे जैसे जीव में न तो इस तरह के आचारण की संभावना है न वह लोक जीवन में पूज्य ही माना जाता है।

यह भी दृष्टव्य है कि जिन घरों में अहोई का थापा विभिन्न रंगों से बनता है उनमें भी स्याहूमाता काले रंग से ही बनाई जाती है। कुछ कुटुम्बोंमें दूधमें कोयला घिसकर भी स्याहू बनाते है। स्याहू का काला रंग होना सर्प रूप के पक्ष में जाता हैं। अब कहानी में स्त्री स्याहू के प्रीत्यिर्थ जो वस्तुएँ रखती है उन्हे भी विचार लिया जाय, क्योंकि नैवेद्य का देव प्रकृति और रुचि से सम्वन्ध रहता है। पुराणों मे कहा गया है कि खीर दूध पंचामृत और कमल के फूल नाग की प्रिय वस्तु है। यह दुखी स्त्री भी नादों में मीठा दूध, चावल-कढी आदि भरके रखती है, रास्ते मे फूल बिछाती है। आजकल भी अहोई को खीर पूडी या सीरा पूड़ी का, पुये का नैवेद्य लगता है। किसी समय अहोई का पुजापाया वायना मालिन को दिया जाता था, संग्रह के दौरान एक वृद्धाने मुझे ऐसा बताया, पर आजकल सास ननद को देने की प्रथा पड़ी है। सर्व बाग वगीचों मे तो अक्सर पाये ही जाते है।

हालाँकि अहोई के अंकनों मे सर्पिणी की वह लोकप्रचलित रूपाकृति नही मिलती जैसी नाग पंचमी के नाग या गूंगा नौमी के नांगो की होती है। लेकिन

ूसरे पक्ष इतने पुष्ट और प्रवल हैं कि स्याहू माता सर्पिणी ही प्रतीत होती ह। हो सकता है सर्पिणी कुंडली मारे बैठी हो।

इतना ही नही अहोई अष्टमी के संपूर्ण व्रत विधान में और स्याहू माता ी परिकल्पना में सर्प सम्बन्धी विश्वासों के कई स्तर हैं, हमारी ऐतिहासिक ांस्कृतिक चेतना की कई परतें है। यह तो निःसंदेह है कि सर्प पूजा का ाधार धर्म का पहला पाया भय ही है। यह मृत्यु भय सर्प के लिए प्रयुक्त ोक शब्द " काल जेवरी = मृत्यु पाश " में सुरक्षित है पर लोक कथाओं में र्प भयावह रूप मात्र में नही, संश्लिष्ट अभिप्राय ( Motif ) में अभिव्यक्त ुआ है। अहोई अष्टमी की कहानी में सर्पभय, वैर शोधन, पूजा नैवेद्य से ंतुष्ट हो उसका दयालु भाव, वचन रक्षण, स्याहू के साथ बुने हैं।

इस अभिप्राय के पहले स्तर में सर्प और धरती का सम्बध आता है। ' पाँच नाज पच्चीस पूजो " की व्रत कथा में तथा और वहुत सी लोककथाओं ं सर्प को " धरती का राजा " कहा गया है। जैन साहित्य में भी ऐसे उल्लेख मिलते हैं। सर्प सब जगह हैं, जल, थल, और नभ में उसकी अव्या- ृत गति से यह राज-गौरव मिला है। सर्प-धरती का सम्बन्ध वैदिक और ौराणिक कल्पनाओं मे पल्लवितभी हुआ है। पृथ्वी शेष नाग के फन पर ही टकी है, अथर्ववेद के पृथ्वी सूक्त में धरती को सर्प-हिलनेपर कम्पायमान ोती बताया गया है " १२–१–३७ " लोक में यह धारणा है कि जब शेष- ाग थककर फन बदलते है धरती पर भूचाल आता है। शतपथ ब्राह्मण में ाग माता कद्रू को पृथ्वी का प्रतीक मान पूजनीय ठहराया गया है[1]। धन त्नों से भरपूर नागलोक पृथ्वीके नीचे ही है, अहोई की स्याहू की भी यही स्थिति है।

धरती में रहने के कारण आदिम मानसमें धीरे धीरे ऐसा विश्वास भी ानपा कि सर्प उपज से भी रिश्ता रखता है, पानी भी बरसा सकता है,

---

१. शतपथ ब्राह्मण ३–६–२–२.

